


# प्रस्तावना.

आलीकडे राजाश्रय नसल्यामुळें, संस्कृतविद्या बुडत चालली आहे, ह्मणून संस्कृत ग्रंथांतील सकल विद्यांचें ज्ञान नष्ट होत चाललें आहे. अमुक विषयावर किती ग्रंथ आहेत, किंवा अमुक विषय कोठें सांपडेल, हें सागणारे विद्वान् फारच थोडे मिळतील. संस्कृतांत असलेले विषय, ती भाषा व तिचा अभ्यास कमी होत चालल्यामुळें, प्राकृतजनांस कळण्याचे मार्ग, त्या त्या ग्रंथाचें भाषांतर प्राकृतांत करण्याशिवाय, दुसरे राहिले नाहींत हें स्पष्टच आहे.

व्यवहारांत वारंवार उपयोगी पडण्यास योग्य असून प्राचीन आणि मान्य असा ग्रंथ वराहमिहिरकृत बृहत्संहिता आहे. यास्तव प्राकृत जिज्ञासु लोकांस त्याचा उपयोग व्हावा ह्मणून त्याची टीका प्राकृतच लिहिली आहे.

कलकत्ता येथें शके १७८६ इसवी सन १८६५ त छापिलेली एक प्रत कलकत्त्याहून आणविली. तींत फक्त मूळ मात्र आहे. सदरहु ग्रंथावर भट्टोत्पलनामक पंडितानें केलेल्या टीकेचीं मूळासह दोन पुस्तकें संपादन केलीं.

वे० शा० रा० रा० सीताराम जोशी नासीककर वास्तव्य बडोदें, माजी दानाध्यक्ष, यांणीं आपले घराहून नासीक येथून एक प्रत देवविली. दुसरी प्रत वे० शा० रा० रा० विष्णुशास्त्री जोशी ( वकील ) वास्तव्य पांवस जिल्हा रत्नागिरी यांणीं दिली. मुळाची एक प्रत व सटीक दोनप्रति एकून तीन प्रतींवरून हा ग्रंथ छापिला आहे. मूळ बहुतकरून कलकत्त्याचे प्रतीप्रमाणेंच आहे. अर्थास विपर्यास भासून टीकेच्या पुस्तकांत त्याचा अर्थ भिन्न केलेला आढळला तेथेंमात्र त्या पुस्तकाप्रमाणें लिहिलें आहे. तथापि असें फारच थोड्या ठिकाणीं झालें आहे. कलकत्त्याची प्रत चांगली शुद्ध केलेली आहे.

मूळश्लोकांतील वाक्यार्थी व शब्दार्थीच पाहिले तर कित्येक ठिकाणीं भिन्नार्थ दिसेल; पण तो टीकाकाराचे आशयावरून लिहिला आहे. कित्येकस्थळीं स्पष्टार्थ होण्यासाठीं कसांत ( पहा पृ० ३१२ ओळ २१ ) विशेष मजकूर लिहिला आहे. कचित्स्थळीं कस न घालतांही लिहिला आहे. कित्येक ठिकाणीं शब्दार्थ तेथेंच लिहिला नाहीं. कारण तो अर्थ पुढें त्याच प्रकरणांत लिहिलेला आहे. ( पहा पृष्ट ३९ ओळ १७ ) यांत अशनीचा अर्थ लिहिलेला नाहीं. पुढें पृ० ४० ओळ १३ यांत लिहिला आहे. ग्रंथाचे टीकेवरून व

कोशांवरूनही ज्या शब्दांचा स्पष्टार्थ होईना ते शब्द तसेच ठेविले आहेत. ( पहा पृ० २७५ ओळ १२ विसृक्क ) कित्येकस्थळीं श्लोकांतील पदांवरून व टीकेवरून, लिहिला आहे, याहून अधिक स्पष्टार्थ न समजे, ह्मणून विशेष स्पष्टार्थ करिता आला नाहीं. ( पहा पृ० ३३० ओळ ६ कुसुमयुक्तमेवतत् ) कित्येक शब्दांचे अर्थ प्राकृतांत अनेक असून त्यांतून एकादा लिहिला तर संस्कृत शब्दार्थाचा पूर्ण समावेश त्या शब्दांत होत नाहीं; तेथें संस्कृत शब्दच ठेविला आहे. ( वापी ह्मणजे सामान्यत्वे विहीर; परंतु कोठेंकोठें वापीशब्दानें तळीही घेतां येते; पण विहीरशब्दानें तळीचें ग्रहण होत नाहीं. ) जें प्रकरण पहाणे असेल तें आरंभापासून शेवटपर्यंत लक्षपूर्वक वाचावें ह्मणजे चांगले समजेल. मध्येंच वाचिल्यानें पूर्वापर अन्वयाची गरज असते ह्मणून बरोबर समजणार नाहीं.

या ग्रंथांत जे जे देश लिहिले आहेत. त्या त्या देशांचा बोध होण्यासाठीं शब्दरत्नाकर या कोशावरून जितका स्पष्टार्थ मिळाला तितका लिहिला आहे. जीं नावें कोशांत सांपडली नाहींत त्यांची माहिती लिहिली नाहीं. देशांचे नावांचें पूर्वोक्त कोशातून जें स्पष्टीकरण घेतले आहे, ते बरोबर असेल, ह्मणजे कोशांतवरावरच लिहिलें गेलें आहे, असें ह्मणवत नाहीं. कारण या कोशांतील अर्थाप्रमाणें पाहिलें तर देशांच्या दिशाही बदलल्या जातात.

या ग्रंथांतील शब्दांचे अर्थाचें ज्ञान होण्यासाठीं कोशाचे साह्यानें या ग्रंथांचे शेवटीं कोश लिहिला आहे. व ज्या शब्दांचा अर्थच इतर कोशांवरूनही न समजे ते शब्द यांत लिहिले नाहींत.

यांत १०७ अध्याय आहेत. त्यांत काय काय विषय आहेत हें स्पष्ट समजण्यासाठीं अध्यायाचे नावावरून जो बोध होतो त्याशिवाय आणखी काय काय प्रकरणें आहेत हें समजण्यासाठीं तशी अनुक्रमणिका लिहिली आहे.

वराहमिहिर ( यासच कोठें वराहमिहरही ह्मटलें आहे ) हा आदित्यदासनामक ब्राह्मणाचा पुत्र होय. त्याणें पित्यापाशींच अभ्यास केला. यास कापित्थनामक ग्रामांत सूर्याचा वर प्राप्त झाला. आवंतक देशांत उज्जयिनी ( उज्जनी ) येथें तो राहत असे. त्याणें पूर्वऋषींचे ग्रंथ पाहून जातकशास्त्र केलें. ही माहिती बृहज्जातक अध्याय २८ श्लोक ९ यांत आहे. तो श्लोक.

आदित्यदासतनयस्तदवाप्तबोधःकापित्थकेसवितृलब्धवरप्रसादः ॥ आवंतकोमुनिमतान्यवलोक्य सम्यग्घोरांवराहमिहिरोरुचिरांचकार ॥९॥

वराहमिहिराचे ग्रंथावर टीका करणारा भट्ट उत्पल याचे मताप्रमाणे कापित्थ हा खेडेगाव होता. त्याच गांवांत वराहमिहिराने विद्याभ्यास केला. भट्टोत्पलाने, वराहमिहिर हा, मगध ब्राह्मण होता असें बीजगणितनामक ग्रंथांत लिहिलें आहे. , वराहमिहिरच मगधदेशाहून आला होता असें नाहीं. त्याचे कोणी पूर्वज त्या देशांतून उज्जनीकडे आले असावे. देश सोडून कितीही वर्षे झालीं तरी पूर्वजांनीं लाविलेलेंच ज्ञातिवाचक इत्यादि नाव लावण्याची रीति सर्वत्र आहे. त्याप्रमाणेंच वराहमिहिराचे पूर्वज मगधदेशांतून आलेले असावे.

बृहत्संहिता ग्रंथावर भट्टोत्पलानें टीका केली तींत शेवटीं २ श्लोक लिहिले आहेत ते या ग्रंथाचे शेवटीं पृ० ५६७ यावर आहेत. ती टीका त्याणें शके ८८८ फाल्गुन कृष्ण द्वितीया गुरुवारीं समाप्त केली.

**धन्वन्तरिःक्षपणकोमरसिंहशंकुवेतालभट्टघट कर्परकालिदासाः ॥ ख्यातोवराहमिहिरोनृ पतेःसभायांरत्नानिवैवररुचिर्नवविक्रमस्य॥**

हें वाक्य ज्योतिर्विदाभरणांत आहे.

१ धन्वंतरि २ क्षपणक ३ अमरसिंह ४ शंकु ५ वेतालभट्ट ६ घटकर्पर ७ कालिदास ८ वराहमिहिर ९ वररुचि हे ९ विक्रमराजाचीं रत्नेंच होत.

या वाक्यावरून, वराहमिहिर हा विक्रमराजाचा पंडित होता.

संस्कृतावरून प्राकृत खर्डा वे० शा० रा० महादेवशास्त्री जोशी राहणार कांठवली यांजकडून करवून तो सर्व वाचून पाहून, त्यांत जरूर दिसलें त्या त्या ठिकाणीं न्यूनाधिक इत्यादि करून, हें पुस्तक छापिलें आहे.

व्यवहारास उपयोगी पडण्याजोगे जे जे विषय यांत आले आहेत त्यांचा अनुभव, सुज्ञ आणि उद्योगी असे जन घेऊन आनंद पावतील, तेव्हां या ग्रंथाची प्राकृत टीका करण्याचे श्रम सार्थकता पावले असे मी समजेन.

रत्नागिरी. दक्षिणकोंकण, इलाखा मुंबई. मिती भाद्रपद कृष्ण १२ बुधवार शके १७९६ ता० ७ आक्टोबर सन १८७४.

जनार्दन हरि आठल्ये.

# बृहत्संहितानुक्रमणिका.

विषयसंबंधाशिवायही कांहीं प्रकरणें आहेत तीं तो अध्याय वाचिल्यावांचून ही कळावीं ह्मणून तींतीं प्रकरणें त्यात्या अध्यायाचे पोटीं लिहिलीं आहेत.


१ देवतेचें नमन.
,, जगदुत्पत्तीचें कारण.

अध्याय २.

३ सांवत्सरसूत्र.
४ जोशाचें लक्षण.
५ पांच सिद्धांतांचीं नावें.
,, कालप्रमाणाचीं नावे.
,, चार प्रकारचे मासांचीं नावें.
६ अजाणते, मूर्ख जोशांचीं लक्षणें.
७ होराशास्त्राचे भेद.
९ जोशानें प्रतिक्षणीं विचार करावयाच्या गोष्टि.
१० राजानें किती जोशी ठेवावे.
११ पूर्ण ज्योतिःशास्त्र जाणणारा श्राद्धास प्रथम पूज्य होय.
१२ यवनांस पूर्वाचार्यांकडून ज्योतिःशास्त्र मिळालें.
,, ज्योतिःशास्त्र न जाणतां आपणास जो जोशी ह्मणवितो त्यास नक्षत्रसूची ह्मणावें. तो पंक्तीस अपवित्र करतो.
,, अयोग्य जोशास राजानें सोडावा.
,, त्रिस्कंध ज्योतिष.

अध्याय ३.

१३ आदित्यचार.
१३ पूर्वशास्त्रांत अयनप्रवृत्ति.
१४ अयननिवृत्तीचे दिवशीं छायाप्रवेशाचें फल.
,, त्वष्टानामकग्रहदर्शनाचें फल.
१५ तामस, कीलक नामक ३३ केतु.
,, त्यांचें उदयांचें फल.
,, अंभःकल्पादिकांचीं फळें.
१६ ताम० कील० केतूंचें फल कोठें होईल.
१७ ध्वांक्षादि उत्पात.
१७ ऋतुपरत्वें सूर्यकिरणांचीं फळें.
१९ सूर्याचे आकाराचीं फळें.
,, सूर्य, उदयास्तकाळीं मेघाच्या निरनिराळ्या आकारांनीं आच्छादित वगैरे झाला असतां त्याचीं फळें.
२० प्रतिसूर्यदर्शनाचें फळ.

अ० ४.

२१ चंद्रचार.
२१ चंद्र, सूर्यतेजानें प्रकाशित होतो.
,, चंद्र उदकमय आहे.
,, चंद्राचें बिंब वृद्धि व क्षय पावतें तो प्रकार.
२२ चंद्रचाराचीं फळें.

अ० ५.

२८ राहुचार.
,, राहुस्वरूपाचा विचार.
३२ पर्वेशाचीं नावे व फळें.
३३ एकामासांत दोन ग्रहणांचें फळ.
,, ग्रहणासह चंद्र, सूर्य, उदय व अस्त पावतील तर त्यांचीं फळें.
३४ अयनपरत्वें ग्रहणाचीं फळें व स्पर्शादिकांचीं दिशापरत्वें फळें.
३५ राशिपरत्वें ग्रहणाचीं फळें.
३७ ग्रहणभ्रमणाचीं फळें.
३८ ग्रहणसंबंधी अन्यप्रकारचीं फळें.
४० ग्रहणांत जीं निमित्तें होतील त्यांचीं फळें.
४१ मंगळादि ग्रस्तग्रहांचीं फळें.
,, मासपरत्वें ग्रहणाचीं फळें.
४२ ग्रहणमोक्षाचीं दिशापरत्वें फळें.
४७ चंद्रग्रहणानंतर १५ दिवसांत

सूर्यग्रहण झाल्यास त्याचें फळ.
,, सूर्यग्र० न० १५ दि० त चद्रग्रहण झाल्यास त्याचे फळ

अ० ६

,, भौमचार

अ० ७.

५० बुधचार.
,, बुधोदयाचीं फळें.
५१ सप्तधातूंचीं नांवें

अ० ८.

५४ बृहस्पतिचार.
,, बार्हस्पत्यवर्ष.
५६ बृहस्पतीचे नक्षत्रभोगाचें फळ.
५७ बृहस्पतीचे वर्णाचीं फळें.
५८ बृहस्पतिभोगाचीं युगें.
५९ बृह० चे उदयावरून प्रभास संवत्सराची उत्पत्ति.
६० संवत्सराचीं फळें.

अ० ९.

६१ शुक्रचार.
,, नक्षत्रपरत्वें वीथी.
६६ ज्योतिःशास्त्र हें वेदोक्त शास्त्र आहे.
६९ सूर्यास्तापूर्वी व मध्यान्हीं शुक्रदर्शनाचें फळ.
७२ शुक्र व गुरु हे परस्पर सप्तमराशिगत असतील तेव्हां त्याचे फळ.
,, शुक्राचे अग्रभागीं ४ ग्रह राहतील तेव्हां त्याचें फळ.
७३ प्रत्येक ग्रह शुक्रापुढें असेल त्याचें फळ.
७४ शुक्राचे वर्णाचीं फळें.

अ० १०.

,, शनिचार
७४ शनीचीं नक्षत्रपरत्वें फळें.
७८ शनैश्वर कृत्तिकानक्षत्रीं व गुरु विशाखानक्षत्रीं असेल व दोघे एकानक्षत्रास असतील तेव्हांचीं त्याचीं फळें.
,, शनीचे रंगाचीं फळें.

अ० ११.

७९ धूमकेतुचार.
,, पिशाचदीपिका हें केतूचें स्वरूप होय.
,, फासफरस हें केतूचें रूप होय.
८० केतूचे स्वरूपावरून वगैरेचीं फळें.
८२ केतुगणांचें वर्णन.
८८ नक्षत्रपरत्वें केतूचीं फळें.
८९ उल्केनें ताडितकेतूचे फळ.

अ० १२.

९० अगस्त्यचार.
,, अगस्तीचें वर्णन.
९३ अगस्तीच्या उदयानें उदकें स्वच्छ होतात.
९५ अगस्तीचा पूजाप्रकार.
९६ अगस्तीचे रंगाप्र० फळें.
,, उल्का व केतु यांहीं स्पृष्ट अगस्तीचें फळ.
,, अगस्तीचे सर्वस्थळींचे उदयास्त समजण्याचा प्रकार.

अ० १३.

९७ सप्तर्षिचार.
,, ऋषि कोण या नक्षत्रास आहेत हें काढणें.
९८ ऋषींचे वर्ण.
,, ऋषींचे वर्णाप्रमाणें त्याचे वर्गास फळ होतें.

अ० १४.

९९ कूर्मविभाग.
९९ भरतखंडांत केलेले ९ विभाग.
१०४ नक्षत्रवर्ग पापग्रहपीडित असतां त्याचे राजाला नाश होतो.

अ० १५.

१०४ नक्षत्रव्यूह.
„ कृत्तिकांपासून प्रत्येक नक्षत्राचा आश्रय करणारे लोक इत्यादि.
११० चंद्राने पीडितनक्षत्राचें लक्षण.
„ उपहत (उलटस्वभाव) नक्षत्राचें फळ.
„ सूर्यादिग्रहांचे देश इत्यादि.
११६ ग्रह वर्णानें, उपद्रवानें, स्थानानें चांगला वाईट असेल तसें त्याचे देश व पदार्थ शुभ किंवा अशुभफळ भोगतात.

अ० १७.

११७ ग्रहयुद्ध.

अ० १८.

१२२ शशिग्रहसमागम.
„ चंद्र, नक्षत्रांच्या व ग्रहांच्या मधळून जाईल त्याचीं फळें.

अ० १९.

१२४ ग्रहवर्षफल.
१२५ वर्षाधिकार व मासाधिकारपरत्वें सर्वग्रहांचीं फळें.

अ० २०.

१३० ग्रहशृंगाटक.
„ सूर्यास्तावेसमयीं ग्रहमालादर्शनाचें फळ.
„ ग्रहांचे ६ योगांचीं लक्षणें व फळें

अ० २१.

१३१ मेघाचें गर्भलक्षण.
१३२ गर्भधारण पाहण्याचा काळ.
१३९ गर्भ कितीदिवशीं पडेल तें दिवसमान.
१३७ गर्भ किती योजनें वृष्टि करितो याचें प्रमाण.
„ कशागर्भाची किती वृष्टि होते.

अ० २२.

१३९ धारणाप्रकार.
„ गर्भस्रावाचें लक्षण.
१३९ धान्यास चांगली अशी वृष्टि होण्याचीं पूर्वचिन्हें.

अ० २३.

१४० प्रवर्षण.
„ पर्जन्य मोजण्याचें पात्र.
„ ज्येष्ठवद्यांत पूर्वाषाढादिनक्षत्रीं वृष्टि होईल ती मोजून पुढील शुभाशुभ सांगणें.
१४१ कोणत्या नक्षत्रीं किती वृष्टि होते याचें प्रमाण.

अ० २४.

१४२ रोहिणीयोग.
„ रोहिणीयोगीं सर्व बीजांचें विन्ह जाणणें.
१४३ वायु कोणत्या दिशेचा वाहतो हें समजण्यासाठीं निशाण करावें.
„ वायूप्रमाणें पुढें केव्हां कसा पाऊस पडेल हें जाणणें.
१४४ मेघ व वायु यांचीं फळें.
१४७ राजनामांकित व देशनामांकित कलश ठेवून त्यांवरून त्यांचें फळ पाहणें.
१४८ रोहिणीनक्षत्राशीं चंद्राचे योगाचीं फळें.
१४९ योगतारालक्षण.

१४९ गाई, बैल यांचे अस्तमानचे ग
मनावरून फळें.
अ० २५.
१५० स्वातीयोग
,, स्वातीयोगाचीं फळें.
१५१ अर्पाक्‌नक्षत्राचें स्थान.
,, माघांतील स्वातीयोगाचीं फळे
,, फा० चै० वैशाखांतील स्वाती
योगाचें फळ.
अ० २६.
१५२ आषाढीयोग.
,, धान्याची वृद्धि होईल किंवा ना
श होईल हें जाणणें.
,, तराजू कशी करावी.
,, सर्व पदार्थ तोलून त्याचें शुभा
शुभ पहावें.
१५३ दांडीचें काष्ठ वगैरे व प्रमाण.
१५४ वर्षाकाळ शुभाशुभ जाणण्या
चीं चिन्हें.
,, उत्तम धान्य होण्याचें आषाढ
पौर्णिमेस लक्षण.
अ० २७.
१५५ वातचक्राध्याय.
,, वायुपरत्वें शुभाशुभ.
अ० २८.
१५७ सद्योवर्षण.
,, पर्जन्याविषयीं प्रश्न पाहाणें.
१५८ सूर्याचे तेजावरून त्वरित वृष्टि
होईल हे जाणणे.
,, त्वरितवृष्टीचा लक्षणें.
१५९ ,, ,,
१६० ,, ,,
१६२ चर शुक्र व चर शनि यांपासून
वृष्टीचा योग
१६२ नियमित वृष्टीचे दिवस.
,, ग्रहयोगानें वृष्टिलक्षण.
,, सूर्यापुढें किंवा मार्गे बहुत ग्रह
येतील तेव्हा वृष्टि होईल.
अ० २९.
१६३ कुसुमलताध्याय
(फल, पुष्प यांचे समृद्धीवरून
द्रव्यधान्यादिकाची समृद्धि.)
अ० ३०
१६५ सध्यालक्षण.
१६६ सूर्योदयीं व सूर्यास्तीं वायु, पशु
पक्षी यांचे शब्द वगैरे पाहून
फळें पाहणें.
१६७ सूर्यकिरणाचीं फळें.
१६८ अन्यचिन्हें.
१७० सहाऋतूत वर्ण.
१७१ फळे केव्हा होतात.
१७२ सध्या, वीज, मेघगर्जना, उल्का
निपात याचीं फळें कशीं हो-
तात.
,, अन्यचिन्हांचीं फळें.
अ० ३१.
१७२ दिग्दाह व त्याची फळें.
अ० ३२.
१७३ भूमिकंप.
१७४ भूकंपाचें कारण.
१७५ त्याचीं फळें.
१७७ भूकंपाचें फळ केव्हा घडतें.
,, उल्कादिकाचें फळ केव्हां घडतें.
,, उत्पाताचीं नावें व त्याचीं फळें.
१७८ फळांचानाश.
,, अद्भुताचे फळाचा काळनियम.
१७९ मडळपरत्वें भूकंपाचें चलन
,, भूकंप.

अ० ३३.

१७९ उल्कालक्षण.

,, उल्काचे ५ भेद व त्यांचीं फळें.

१८३ उल्कापाताचीं फळें.

,, विजेच्या शब्दाचीं फळें.

१८५ परिवेपलक्षण अ० ३४.

१८९ इंद्रायुधलक्षण अ० ३५.

१९१ गंधर्वनगरलक्षण अ० ३६.

अध्याय ३७.

१९२ प्रतिसूर्यलक्षण.

अध्याय ३८.

१९२ रजोलक्षण.

अध्याय ३९.

१९४ निर्घातलक्षण.

अ० ४०.

१९५ सस्यजातक.

,, वृश्चिक व वृषभ संक्रांतिवेळेवरून उन्हाळी व पावसाळी धान्याचीं लक्षणें.

१९६ अन्य लक्षणें.

अध्याय ४१.

१९८ द्रव्यनिश्चय.

,, द्रव्यांचे मेषादि स्वामी.

१९९ पदार्थ महाग, स्वस्त होण्याचीं कारणें.

अध्याय ४२.

२०० अर्घकांड (धान्यादिकांची किंमत चढेल किंवा उतरेल.)

२०१ खरेदि व विक्री यांचा विचार.

अध्याय ४३.

२०३ इंद्रध्वजसंपत् (शुभवृक्षाचा ध्वज आणतांना त्याचें फळ.)

२०५ इंद्रध्वजास वर्ज्य वृक्ष.

२०९ पूर्णाहुतीचे वेळीं ज्वालेचें फळ.

२०९ अग्नीचे शब्दाचीं फळें.

,, अग्नीचे गंधाचीं फळें.

२१४ ध्वजावर बसलेल्या पक्ष्यांचें फळ.

,, अन्य फळें.

अध्याय ४४.

२१६ नीराजनविधि (नीराजनविधिनामक शांति.)

२१९ स्वारीस जाण्याचा प्रकार.

अध्याय ४५.

२२१ खंजनदर्शन.

,, खजरीटपक्ष्याचे प्रथमदर्शनाचें फळ.

२२३ भूमिगत निधि, कांच, कोळसे, याची परीक्षा.

,, खंजरीटाचे प्रथमदर्शनाचें व प्रतिदिवसाचे दर्शनाचें फळ.

अध्याय ४६.

२२४ उत्पात.

,, लिंग, मूर्ति, देवांचीं स्थानें, यांचीं निमित्तावांचून भंग, चलन, घर्म, रोदन, पतन, संभाषण, हसणें, इत्यादिकांचें फळ.

२२६ वैकृतांची शांति.

,, अनेक वैकृतांचीं फळें.

२२७ अग्निवैकृत.

२२९ वृक्षवैकृत.

२३० सस्यवैकृत.

२३१ वृष्टिवैकृत.

२३३ जलवैकृत.

२३४ प्रसववैकृत.

,, चतुष्पदवैकृत.

२३५ वायव्यवैकृत.

२३६ मृगपक्षिवैकृत.

(सृष्टिनियमाप्रमाणें सामान्य वै

ज्या गोष्टी घडावयाच्या.त्या त्या न घडतां उलट्या व विपरीत होतात असे प्रकार या सर्व वैकृतांत सांगितले आहेत.)

अध्याय ४७.

२४२ मयूरचित्रक (ग्रहांचे उत्तरादि मार्गगतादि फळ.)

अध्याय ४८.

२४८ पुष्यस्नान.
२५० पुष्यस्नानास स्थान.
२५१ यज्ञभूमि.
२५५ आसनास बैलाचीं२, सिंहाचें, वाघाचें अशीं ४ कातडीं असावीं.
२५९ आसनास ७ कातडी सांगितलीं; त्यांत मांजराचें दुसरें सांगितलें
२६० कुलशील पा० श्रुतानुसार ब्राह्मणास राजानें दक्षिणा द्यावी. मारावयास नेलेल्या मेषादि पशूस व बंदिवानास सोडावें परंतु राजाचे शरीरास दुःख देणारे, अंतःपुरांत अपराध करणारे यास सोडू नये.
२६१ पुष्यस्नानाहून दुसरें मंगलकारक नाहीं

अ० ४९.

,, पट्टलक्षण (मुकुटाचें लक्षण)

अ० ५०.

२६३ खड्ग (तरवारीचें) ल०.
२६५ पृच्छक प्रश्न करील तेव्हां खड्गाचीं व्रणादि सांगणें.
२६७ शस्त्रास पाणी देणें.
,, हत्यार बळकट करण्यास पाणी देणें.
२६८ लोखंड तोडण्याजोगें पाणी देणें.

अ० ५१.

२६८ अंगविद्या (प्रश्नकर्ता प्रश्न करील तेव्हां तो कोठें, कसा आहे, काय करीत आहे, हें पाहून त्याचें शुभाशुभफळ सांगणें. यांत अनेकप्रकारच्या प्रश्नांचा विचार आहे.)

अ० ५२.

२७८ पिटकलक्षण (आंगावर बारीक फोड वगैरे येतात त्यांचीं लक्षणें.)

अ० ५३.

२८१ वास्तुविद्या (घर बांधण्याविषयीं विचार)
,, राजगृहाची रुंदी.
२८२ सेनापति, प्रधान, युवराज, मांडलिकराजे, श्रेष्ठ राजपुरुष, भालदार, वेश्या, गायनादिकला जाणणारे यांचे घरांची लांबी, रुंदी.
२८३ अठरा कारखानदार, मुख्य यांचीं घरें.
,, जामदारखाना, जनानखाना, कमेशालाधिकारी, जासूद, जोशी, उपाध्याय, वैद्य, यांचे घराची लांबी, रुंदी.
,, घराचे उंचीचें प्रमाण.
,, एकेल्या घराची लांबी.
,, चार वर्णांच्या घरांची रुंदी.
,, कोशागृह, क्रीडागृह यांचें मान.
,, शिंदा, (ब्राह्मणापासून शा०) यांचे घरांचें मान.
,, गोठा, मठ, कोठार, हत्याराची जागा.

२८३ अग्निस्थान, जनानखाना, यांचें प्रमाण.
,, घराची उंची.
,, दालन, पडवी यांचें प्रमाण.
२८५ वीथिका (मार्ग, ओटा) यांचें प्रमाण.
,, मजल्यांची उंची.
,, भिंतीचें प्रमाण.
,, राजा व त्याचे सेनापति इ० आश्रित यांचे दाराचें प्रमाण.
२८६ इतरांचे दाराचें प्रमाण.
,, चौकटीचें प्रमाण.
,, खांब.
२८७ भारतुला, वारें यांची रुंदी.
२८८ दिशापरत्वें शालांवरून घराचें फळ.
२८९ वास्तूंत देवता राहातात. त्यांचीं नांवें वगैरे.
२९० वास्तुपुरुष कसा राहतो.
२९१ वास्तुपुरुषाचीं मर्में.
,, शल्यजाणणें.
२९३ गृहमध्यस्थ ब्रह्मदेवाचे रक्षणानें यजमानाचें रक्षण होतें.
,, गृह, नगर, ग्राम यांचा तीच प्रकार जाणावा.
,, आपल्या गृहाचे कोणते आंगास इतरांचीं घरें करावीं.
२९४ द्वारविचार.
,, स्वतःउघडणारेंव मिटणारे दाराचें फळ.
,, अप्रमाण दाराचें फळ.
,, दारावर दार असूं नये.
,, अतिल्हान दार असूं नये.
,, उघडण्यास कठिण असें दार असूं नये.
,, उंबरठ्यास टेंकतेंदार असूं नये.
,, तोललेलें दार असूं नये.
,, दिशाहीन दाराचें फळ.
,, मुख्यदार कसें असावें.
२९६ नगर, गृह, ग्राम याचे कोनावर राहण्याचें फळ.
,, घराचे कोणते दिशेस कोणते वृक्ष असावे.
,, समीपभागीं कोणते वृक्ष नसावे.
,, वर्ज्य वृक्ष न तोडवेल तर त्यांत कोणते लावावे.
२९७ घर बांधण्यास भूमिपरीक्षा.
,, घराजवळ कोणतें घर, कोणतें झाड, इत्यादि नसावें.
,, वर्णपरत्वें कोणत्या उतरणाची भूमि असावी.
,, मातीची परीक्षा.
२९८ मातीचें वजन करून परीक्षा.
,, खळग्यांत दिवे लावून भूमीची परीक्षा.
,, खळग्यांत फुलें टाकून भूमीची परीक्षा.
,, रंग, वास, गवत, चंव पाहून भूमि वर्णानुक्रमानें योजावी.
२९९ पाया खणण्याचा प्रकार.
३०० चौथऱ्याखालीं द्रव्य आहे अशी परीक्षा करणें.
३०१ पाया कसा घालावा.
,, खांब उभा करण्याचा प्रकार.
,, पाया दिशा साधून व पाणसाळीनें करावा.
३०२ घर वाढविणें झाल्यास कोणीकडे वाढवावें.

३०२ घरांत कोठें कोणतें स्थान करावें.
,, दिशापरत्वें विहिरीचें फळ.
,, घरास कोणतीं झाडें तोडूं नयेत.
३०३ झाड तोडल्यावर त्याचे बुंधाचे छेदाचा रंग पाहून त्या लांकडांत काय आहे हें जाणणें.
,, निद्रा कोठें व कशी करूं नये.
,, वास्तुप्रवेशास कायकाय करावें.
अ० ५४.
३०४ दगार्गल ( जमिनींतील पाण्याची परीक्षा. )
३१२ जमिनींत धन ( धातू वगैरे ) असण्याचीं चिन्हें.
३२० दिशापरत्वें कूपाचें फळ.
३२२ शिला ( दगड ) याचे रंग वगैरे वरून पाण्याची परीक्षा.
३२४ दगड फोडण्यास उपाय, औषधें वगैरे.
३२४ विहीर वगैरे पूर्वपश्चिम किंवा उत्तरदक्षिण बांधावी.
,, विहीर वगैरे कशी बांधावी.
३२५ विहिरीचे सभोंवार कोणतीं झाडें लावावीं.
,, पाणी चांगलें करण्यास औषध.
३२६ कूपारंभास नक्षत्रें.
अ० ५५.
,, वृक्षायुर्वेद ( बाग वगैरे )
३२७ प्रथम भूमि कशी करावी.
,, बागेत व घराजवळ प्रथम कोणते वृक्ष लावावे.
,, खांदी कोणत्या झाडाची जगत्ये.
,, तोडलेली खांदी जमिनींत कशी लावावी.
३२७ कलम करण्याचा प्रकार.
,, खांद्या कोणत्या झाडाच्या जगतात.
,, कोणते वृक्ष कधीं व कसे लावावे.
३२८ खांदी लांब नेणें असेल तर काय करावें.
,, झाडें शिंपण्याचा प्रकार.
,, पाणथळ देशांत होणारे वृक्ष.
,, झाडांमध्यें अंतर किती असावें.
,, झाडांस रोग झाल्याची परीक्षा.
,, रोगाचा परिहार.
,, फळें गळतील किंवा नासतील तर उपाय.
३२९ पाहिजे तेव्हां झाडांस फळें व फुलें आणण्याचा प्रकार.
३३० कोणत्याही बीजास त्वरित फुलें आणणें.
,, झाडांस लौकर पालवी आणणें.
३३१ कवटीस फार उत्तम व लौकर पल्लव आणणें.
,, बीजास लागलेच अंकुर आणून फार लौकर फळें आणणें.
३३२ भोंकरीचे बीजास एक दिवसांत फळें आणणें.
,, झाडें लावण्यास नक्षत्रें.
अ० ५६.
,, प्रासादलक्षण (देवालय बांधणें).
३३४ देवळाची उंचीवगैरे.
अ० ५७.
३३८ वज्रलेप.
अ० ५८.
३४० प्रतिमालक्षण ( विष्णुआदिकरून देवांच्या मूर्ति कशा कराव्या )
,, अंगुळप्रमाण.
,, मूर्तीचे कामाचे अंगुळ.

३४८ मूर्तीचे उंचीवरून शुभाशुभ.
३४९ लिंगाचें प्रमाण.
अ० ५९.
३५० वनसंप्रवेश ( मूर्ति करण्याकरितां झाडें तोडण्यास जाणें )
अ० ६०.
३५२ प्रतिष्ठापन ( देवस्थापना )
३५६ गोलक्षण. अ० ६१.
,, बैलाचें लक्षण.
३५८ ओझें नेण्यास योग्य बैल.
३५९ ओझें घेणारे व जलद चालणारे बैल.
,, बैलाचीं शुभाशुभ लक्षणें.
अ० ६२.
३६० श्वलक्षण ( कुत्र्याचें ल० )
अ० ६३.
,, कुक्कुटल० ( कोंबड्याचें ल० )
अ० ६४.
३६१ कूर्मल० ( कासवाचें ल० )
३६२ छाग (बकरा) लक्षण. अ० ६५.
३६४ अश्व (घोडी) ल० अ० ६६.
३६६ गज (हत्ती) ल० अ० ६७.
३६८ पंढहत्तीचें ल०.
३६९ पुरुषलक्षण अ० ६८.
३७६ सामुद्रिक लक्षणें.
३८८ स्त्री आणि पुरुष यांची उंची व वजन, हें पूर्णतस कधीं येतें.
३९० महापुरुषल० अ० ६९.
३९१ पुरुषाचे उंचीचें प्रमाण.
३९२ सत्व, रज, तमोगुणादि पुरुषाचीं लक्षणें.
३९९ स्त्रीलक्षण. अ० ७०.
४०३ मिशी आलेली स्त्री अशुभकारक होय.
अ० ७१.
४०४ वस्त्रच्छेदल० ( वस्त्र फाटलें व जळलें तर त्याचें ल० )
अ० ७२.
४०७ चामर ( चवरी ) ल०.
४०८ काठीचे पेरांवरून तिचें फळ.
,, छत्रलक्षण. अ० ७३.
,, छत्रीचा आकारवगैरे.
,, स्त्रीप्रशंसा. अ० ७४.
४१२ व्यभिचारी पुरुषास प्रायश्चित्त.
अ० ७५.
४१४ सौभाग्यकरण(सुंदरत्व कसें होईल)
४१५ लोकप्रिय होणें.
अ० ७६.
४१६ कांदर्पिक ( मुलगा, मुलगी होण्याचें कारण, कामवृद्धि होण्याचीं औषधें )
४१७ शक्तिवृद्धीचीं औषधें.
४१८ ,, [ कारणें.
४१९ संभोगशक्ति कमी होण्याचीं
अ० ७७.
,, गंधयुक्ति ( सुगंधि पदार्थ करणें)
,, केंस काळे होण्यास औषध.
४२० मस्तकास लावण्याचें उटणें.
,, चाफ्याचें अत्तर तयार करणें.
४२१ अनेक प्रकारचे धूप.
४२५ दंतधावनकाष्ठें करणें.
४२६ तांबूलाचे गुण.
,, तांबूलाचे पदार्थ.
अ० ७८.
४२७ पुंस्त्रीसमायोग ( स्त्रीपुरुषांवर परस्परांची इच्छाप्रकार ).
,, अनुरक्तस्त्रियांचीं लक्षणें.
४२८ ,,

४२८ विरक्तस्त्रीचीं लक्षणें.
" कुटणीचें काम कोणत्या स्त्रिया करितात.
४२९ दुष्टसंकेताचीं स्थानें.
" उत्तमस्त्रीचे गुण.
४३० वर्ज्य स्त्रियांचीं लक्षणें.
४३१ गर्भधारण करणाऱ्या शोणिताचें लक्षण.
" पुरुष, स्त्री, नपुंसक, जुवळ, या गर्भांचीं उदरांत स्थानें.
४३२ संभोगास मुहूर्त.
" विटाळशीशीं संभोग करूं नये.

अ० ७९.

" शय्यासन (पलंग व पाट यांचें) लक्षण.
" पलंग व पाट करण्यास कोणते वृक्ष योग्य.
४३३ वर्ज्यवृक्ष.
" जुनें लांकूड शुभ होईल किंवा कसें याची परीक्षा.
" अंगुळप्रमाण.
४३५ फळांचे सर्व वृक्ष, पलंग व पाट वगैरे बैठक करण्यास उक्त होत.
" उक्तवृक्षांचे योगानें हस्तिदंत योग्य होय.
४३६ हस्तिदंत, कामास किती लांबी पर्यंत घ्यावा याचें प्रमाण.
४३७ पलंगाचीं लांकडें (बाजू) जुळविण्याचा प्रकार.
४३९ रत्नपरीक्षा. अ० ८०.
४४० रत्नांचीं नांवें.
" रत्नाच्या देवता.
४४१ आठ पादऱ्या राईभार १ तांदुळ.
" हिऱ्याची किंमत.

अ० ८१.

४४२ मुक्ताफळ (मोतीं) परीक्षा.
" हत्ती, सर्प, शिंपा, शंख, मेघ, वेळु, मत्स्य, डुकर या आठांपासून मोतें होतात.
" शिंप्यांतील मोतीं उत्तम व व्यवहारोपयोगी होय.
४४३ मोत्यांचीं उत्पत्तिस्थानें ८आहेत.
" मोत्याचे रंगावरून त्याचें दैवत्व.
४४४ मोत्याची किंमत वजनाचे मानानें.
" पुरवणीचे मोत्यांची किंमत.
४४६ सप्तमवायुस्कंधांतून पडलेलें मोतीं मेघोत्पन्न होय.
४४७ मोत्यांचे हार करण्याचा प्रकार.

अ० ८२.

४४८ पद्मराग (माणिक) परीक्षा.
४५० पद्मरागाची किंमत.

अ० ८३.

" मरकत (पाच) परीक्षा.
४५१ दीपलक्षण. अ० ८४.
" दंतकाष्ठलक्षण. अ० ८५.

अ० ८६.

४५४ सर्वशाकुन (मिश्रकाध्याय शकुनांचीं फळें)
४५५ पशुपक्ष्यांमध्यें पुरुष, स्त्री, नपुंसक हें स्पष्ट समजत नाहीं. तें त्यांचे शरीरावरून वगैरे समजण्याचीं लक्षणें.
" मार्गांमध्यें, सैन्यामध्यें, गावांत, जनसमुदायामध्यें, शुभाशुभ फळ कोणास समजावें.
४५९ कोणत्या ऋतूंत कोणकोणते पक्षि व चतुष्पाद मदयुक्त होतात त्यांचीं नांवें.

४६१ गमनकर्त्यांच्या डाव्याआंगीं कोण शुभ.
,, उजव्या आंगास शुभ कोण.
४६२ प्रयाणकाळीं शब्द, नामसकीर्तन, दर्शन, कोणाचें शुभ होतें.
,, डावे जाणारे कोण चांगले.
,, कोणत्या दिशेस कोण चांगले.
४६३ राजदर्शनार्थ राजवाड्यांत प्रवेश असतां शुभाशुभ.
४६४ एक शुभ व एक अशुभ शकुन झाला तर फळ कोणाचें घ्यावें.
४६६ सर्प, उंदीर, माजर, मासे, हे स्वजातीचें मास खाणारे आहेत.
,, मनुष्य, घोडा, गाढव यांवांचून सर्व प्राणी परयोनींच्याठाई मैथुन करतीलतर देशनाश होतो.
अ० ८७.
४६९ अंतरचक्र (दिशापरत्वें शकुन व त्यांचें फळ).
अ० ८८.
४७७ शकुनरुत (गमनकाळीं पक्षी व श्वापदें यांचे शब्दाचें फळ)
अ० ८९.
४८७ श्वचक्र (कुत्र्याचें रडणें वगैरे)
४८९ वर्षाकाळीं कित्येक स्थळीं कुत्रे मोठ्यांनीं रोदन करतील तर महान् वृष्टि होईल.
,, अवर्षण असतां वर्षाकाळीं कुत्रे पाण्यांत उभेवगैरे राहून फिरतील, पाणी हालवितील तर १२ दिवसांत वृष्टि होईल.
अ० ९०.
४९२ शिवारुत (भालूचे शब्दाचें फळ.
,, माघ, फाल्गुन व कुंभ, मीन यांत कोल्ह्यांस मस्ति येते.
४९३ भालूच्या तोंडांतून ज्वाला निघत असतील असें वाटतें. ओ. २१
अ० ९१.
४९५ मृग (रानांतील जनावरें) चेष्टित.
अ० ९२.
४९६ गवेंगितं (गाय इत्यादिवगैरे त्याचें फळ).
,, गाईस, माशा व कुत्रीं यांणीं रोधिली तर लवकर बहुत वृष्टीपासून उपद्रव होईल.
४९७ हशींचें फळ गाईसारखें समजावें.
अ० ९३.
,, अश्वचेष्टित (घोड्यांचींलक्षणें वगैरे)
,, घोड्याचें आंगावर केव्हां केव्हां अग्नि दिसतो.
४९९ घोड्याचें निजणें व उभें राहणें याचे फळाप्रमाणेंच, अन्यवाहनाचें पहावें.
अ० ९४.
५०० हस्तिंगितं (हत्तीचें लक्षणवगैरे)
,, हत्तीचे दांत कापण्याचें प्रमाण.
५०१ दांत पडल्याचें लक्षण.
५०३ केव्हां केव्हां हत्ती सुतवरीत घेऊन जमिनीवर येतो.
अ० ९५.
,, वायसरुतं (कावळ्याचे ओरडणें वगैरे).
,, कावळ्याचे घरट्याचें फळ त्याच प्रदेशांत होईल.
५०४ घरट्यावरून वृष्टिलक्षण जाणणें.
,, घरट्यावरून उंदिरादिकांचा उपद्रव जाणणें.

६०४ कावळ्यास ९ पर्यंत पिलीं होतात.
६१३ एक कावळ्याविषयीं जीं फळें सांगितलीं तींच बहुतांविषयीं समजावीं.
" अन्यपक्ष्यांचें फळ कावळ्याप्रमाणें समजावें.
" वनांतील पशूंचें व घरदारांचे डुकरादिकांचें फळ कुत्र्याप्रमाणें समजावें.
" वृष्टिलक्षण.
" मधमाशांचें पोळें बसण्याचें फळ.
६१४ मुंग्यांचे ओझ्यांवरून वृष्टिल०.
" पहिल्या शकुनावरून यात्रेचें शुभाशुभ पहाणें.
" मार्गांतील शकुनाचें फळ त्याच दिवशीं समजावें.
" या अध्यायांत सांगितलेले शकुन सर्वकाळ पहावे.
" सर्व कार्यांचा आरंभ, यात्रा (प्र० प्रयाण), गृह प्रवेश इत्यादिकांविषयीं सर्व शकुन पहावे.
" शिक कोणत्याही कर्मी शुभ नव्हे.
" शुभशकुन झाले तर काय काय होतें.
" फोसापुढें पेंद्याचा शब्द निष्फळ होय.
" अपशकुन एक दोन तीनवगैरे झाले तर काय करावें.
अ० ९६.
६१५ शाकुनोत्तराध्याय (शकुनांच्या बलाबलविचारानें फळ जाणावें०
६१८ प्रश्नकर्त्याचें किंवा येणाराचें नाव किती अक्षरांचें आहे अथवा दोन नावें आहेत हें जाणणें.
६१८ प्रश्नलग्नावरून येणाराचें किंवा चोराचें वगैरे नाव सांगणें.
" वय सांगणें.
६१९ पाकाध्याय ९७. (शकुनाचें वगैरे फळ कधीं होईल)
" स्थिर व चर पदार्थांचें अन्यत्व.
" नदीचा प्रवाह दुसरीकडे वळल्यास त्याचें फळ.
६२० अचेतन पदार्थांचें भाषण, रोदन, कांपणें, घाम घाम येणें, इत्यादि अद्भुतांचें फळ.
" डिफळ उदकावर तरणें.
" वाद्याचा शब्द होणें.
" भूमिविदारण.
" अग्नि नसतां पेटणें.
" तूप, तेल, मास, रक्त यांची वृष्टि.
" फार द्वेषी प्राण्यांचा परस्पर स्नेह, मांजर व मुंगस यांचा उंदराबरोबर संग.
" अद्भुतांचें फळाचा काळ सांगितला तेव्हां फळ होणार नाहीं तर दुप्पट काळानें होईल.
६२२ शांतीनें, आणि दानानें अद्भुतांचें फळ होत नाहीं.
" नक्षत्रगुणाः अ० ९८.
" प्रत्येक नक्षत्रांच्या तारांची संख्या.
" विवाहाचेठाईं होणारें फळ नक्षत्रांचे तारांचे संख्येइतक्या वर्षांनीं होतें.
" ज्वरादि व्याधींचा नाश नक्षत्रांचे तारांचे संख्येइतके दिवसांनीं होतो.
" नक्षत्रांचे स्वामी.
६२३ ध्रुवसंज्ञकनक्षत्रांवर कोणकोणतीं कर्मे करावीं.

६२३ तीक्ष्णसंज्ञक न० कार्ये.
,, उग्रसंज्ञक न० कार्ये.
,, लघुसंज्ञक न० कार्ये.
,, मृदुसंज्ञक न० कार्ये.
,, मृदुतीक्ष्ण ( मिश्र ) न० कार्ये.
,, क्षौरकर्मास उक्तनक्षत्रें.
,, क्षौरास उक्तनक्षत्र न मिळे तर काय करावें.
,, क्षौर कोणी, कोणत्यावारीं व तिथींस वगैरे करावें.
,, क्षौरास केव्हां मुहूर्त नको.
,, पुंसवनास नक्षत्रें.
६२५ नामकरणादि संस्कारांस नक्षत्र आणि वार.
,, नामकरणास लग्नशुद्धि.
,, कर्णवेधास लग्न व नक्षत्र.
,, सामान्यत्वें सर्वारंभास लग्नशुद्धि.
,, गृहारंभ व गृहप्रवेश यांस लग्नशुद्धि.
,, तिथिकरणगुण. अ० ९९.
,, तिथींचे स्वामी.
,, नंदादितिथि.
,, जें कार्य ज्या नक्षत्रीं, करणीं आणि मुहूर्तीं करावयाचें तें नक्षत्र वगैरे न मिळे तर काय करावें.
,, करणें व त्यांचे स्वामी.
६२७ कोणत्याकरणावर कोणतीं कार्यें करावीं.

अ० १००.

,, विवाहनक्षत्रलग्ननिर्णय.
,, विवाहास नक्षत्रें, लग्नें, लग्नशुद्धि.
,, राशिकूट.
६२८ लग्नशुद्धि, योग, तिथि, वार, अयन, मास, लग्न, नवमांश.
,, नक्षत्रजातक. अ० १०१.

अ० १०२.

६३१ राशिप्रविभाग ( बाराराशींचे विभाग ).
६३२ विवाहपटल.
( विवाहमुहूर्तलग्नीं ग्रह असतील त्यांचीं फळें ). अ० १०३.
६३५ गोधूलिमुहूर्ताचें फळ.
,, ग्रहगोचराध्याय (गोचरींचे ग्रहांचीं फळें ) १०४.
,, यांत प्रत्येक श्लोकाचे निरनिराळे छंद सांगितले आहेत.
६३६ गोचरीचे ग्रहांचीं फळें.
६४५ गोचरीचे ग्रहांचीं फळें कोणास कसकशीं अनुभवास येतात.
६४६ अशुभग्रहांचे पीडापरिहारार्थ पूजादिप्रकार.
,, सूर्यादिग्रह राशीच्या कोणत्या भागीं कसें फळ देतात.
६४७ शुभ आणि अशुभ ग्रह यांचे फळांचा बलाबलविचार.
६४९ सूर्यादिग्रह कोणकोणत्या स्थानीं असतां व त्यांचे वारीं कोणकोणतीं कृत्यें करावीं.
६५१ नक्षत्रपुरुषव्रत. अ० १०५.
६५२ हें व्रत करणाऱ्या मनुष्याचें शरीर पुढीलजन्मीं सुंदर होतें.
६५३ मार्गशीर्षादि मासांचे स्वामी.
६५४ उपसंहाराध्याय. १०६.
६५५ ग्रंथानुक्रमणिका. (अध्यायांची अनुक्रमणिका ). अ० १०७.
६५७ वराहमिहिरकृत नव्हत असे अध्याय या ग्रंथांत कोणते व किती आहेत.
,, ग्रंथसमाप्तीचा शक वगैरे.

श्री

# बृहत्संहिता

( वराह मिहिरकृत )

मूळश्लोक संस्कृत असून त्यांचा अर्थ प्राकृत ( महाराष्ट्र ) भाषेंत लिहिला आहे.

# THE BRIHATSANHITÁ

[ BY VARÁHA-MIHIRA ]

यांत व्यवहारोपयोगी सर्वप्रकारचे विषय आहेत.


पुस्तक १ लें    तारीख २५ मे १८७३.    अंक १

VOL I    25th May 1873.    No. 1


रत्नागिरी

येथें

जनार्दन हरि आठल्ये

यांणी

आपल्या

जगन्मित्र छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

---

प्रत्येक अंकांत मोठ्या तक्तीचे साच्याचा चतुष्पत्री ३२ पृष्ठें असून समारें ८०० ग्रंथ येत जाईल.

# अथ बृहत्संहितेची अध्यायानुक्रमणिका प्राकृत अर्थासह.


१ उपनयनाध्यायः–इष्टदेवतेचें नमन व ग्रंथास साधनें.

२ सांवत्सरसूत्र–ज्योतिषी कसा असावा त्याचीं लक्षणें.

३ आदित्यचारः–सूर्याच्या दक्षिणोत्तर गती व वर्ण इत्यादिकांचीं फलें.

४ चंद्रचारः–नक्षत्राच्या बाजूनें चंद्रगमन व शृंगोन्नति इत्यादिकांचीं फलें.

५ राहुचारः–ग्रहणाचीं फलें.

६ भौमचारः–मंगलाचीं वक्रादिक फलें.

७ बुधचारः–अश्विन्यादि नक्षत्रीं बुध व त्याचीं उदयादि फलें.

८ बृहस्पतिचारः–नक्षत्रांच्या भागानें बृहस्पतिगतिफल इत्यादि.

९ शुक्रचारः–उत्तरमध्यादि मार्गी शुक्रास्तादि फलें इत्यादि.

१० शनैश्वरचारः–अश्विन्यादि नक्षत्रीं शनीचीं फलें इत्यादि.

११ केतुचारः–दिव्यभौमांतरिक्षादि उत्पातांचीं फलें.

१२ अगस्त्यचार.–अगस्तीच्या वर्णाचें फल इत्यादि.

१३ सप्तर्षिचारः–वसिष्ठादि सप्तर्षीच्या वर्णांचें फल इत्यादि.

१४ कूर्मविभागः–कृत्तिकादि तीन तीन नक्षत्रीं पापग्रह असतां देशपरत्वें पीडा.

१५ नक्षत्रव्यूहः–पापग्रहदूषित कृत्तिकादि नक्षत्र फलें.

१६ ग्रहभक्तयः–रव्यादिग्रह देशाचें स्वामी सांगून त्यांचीं फलें.

१७ ग्रहयुद्ध–सूर्यादि ग्रहांच्या युद्धाचें फल.

१८ शशिग्रहसमागमः–ग्रहांच्या दक्षिणोत्तर भागानें चंद्रगतीचें फल.

१९ ग्रहवर्षफल–सूर्यादि ग्रहांच्या वर्षांचें फल.

२० ग्रहशृंगाटक–ग्रहांच्या उदयास्तादिकांवरून फलें.

२१ गर्भलक्षण–मेघाच्या गर्भाचीं लक्षणें.

२२ धारणा–मेघाच्या गर्भधारणाचें शुभाशुभ फल व गर्भस्रावाचे दिवस.

२३ प्रवर्षण–वृष्टीवरून शुभाशुभ.

२४ रोहिणीयोग.–आषाढकृष्णपक्षीं रोहिणी नक्षत्रीं चंद्र जाईल त्या वेळेवरून फलें.

२५ स्वातियोगः–आषाढशुक्लपक्षीं स्वातीस चंद्रयोगकालीन वेळेवरून फलें.

२६ आषाढीयोग–आषाढपौर्णमासीस धान्यें तोलून त्यांवरून शुभाशुभ.

२७ वातचक्र–पूर्वादिवायूवरून फल.

२८ सद्योवृष्टिलक्षण–शीघ्रवृष्टीचें लक्षण

२९ कुसुमलताध्यायः–फलपुष्पसमृद्धीवरून द्रव्य धान्यादिकांची समृद्धि.

३० संध्यालक्षण–संध्यासमयीं वायूवरून शुभाशुभ फलें.

३१ दिग्दाहलक्षण–दिशांचे वर्णावरून फलें.

३२ भूमिकंपलक्षणं—भूकंपावरून शुभाशुभ.

३३ उल्कालक्षणं—वीज जशी रखेल तसे तिजवरून फल.

३४ परिवेषलक्षणं—चंद्रसूर्यांस खळें पडते त्यावरून शुभाशुभ.

३५ इन्द्रायुधलक्षणं—आकाशांत धनुष्य पडतें त्याचें फल.

३६ गन्धर्वनगरलक्षणं—आकाशांत नगराभास होतो त्याचें फल.

३७ प्रतिसूर्यलक्षणं—एककालीं आकाशांत दोन सूर्य दिसतात त्यांची फलें.

३८ रजोलक्षणं—आकाशांत धूळ उडते तिचें फल.

३९ निर्घातलक्षणं—मेघवायुगर्जनेचें फल

४० सस्यजातकं—सूर्यसंक्रांतीवरून धान्य होण्याचीं लक्षणे.

४१ द्रव्यनिश्चयः—द्रव्यादि पदार्थांचे मेषादि राशिस्वामी सांगून त्यांवरून फल.

४२ अर्घकांड—अमुक संक्रांतींत धान्यादि घेऊन त्याच्या व्यापारांत लाभ इत्यादि.

४३ इन्द्रध्वजसंपत्—शुभवृक्षाचा ध्वज आणावा, त्याचें फल.

४४ नीराजनविधिः—युद्धास जाणारांनीं नीराजनविधि करून त्यावरून शुभाशुभ फल पहाणें.

४५ खंजनदर्शनं—खंजरीटपक्ष्याच्या प्रथमदर्शनावरून फलं

४६ उत्पातलक्षणं—उत्पातापासून शुभाशुभ.

४७ मयूरचित्रकं—ग्रहांचे उत्तरादिमार्गगतादि फल.

४८ पुष्यस्नानं—सर्वदोषापह पुष्यनक्षत्रीं स्नान व राजप्रस्थान कर्म.

४९ पट्टलक्षणं—सुवर्णपट्टलक्षण.

५० खड्गलक्षणं—तरवारीचें लक्षण.

५१ अंगविद्या—प्रश्नकालीं अंगास स्पर्शादि होतील त्यांवरून फलें.

५२ पिटकलक्षणं—फोडावरून शुभाशुभ फलें.

५३ वास्तुविद्या—घर बांधण्याविषयीं विचार.

५४ दगार्गलं—भूमींतील जलपरीक्षा (पाणी पहाणे).

५५ वृक्षायुर्वेदः—झाडें लावण्यास जागा इत्यादि बागांविषयीं माहिती.

५६ प्रासादलक्षणं—देवालय बांधण्याचा प्रकार.

५७ वज्रलेपः—वज्रलेप करण्याचा प्रकार.

५८ प्रतिमालक्षणं—विष्ण्वादि देवांच्या प्रतिमा कशा असाव्या याचा प्रकार.

५९ वनसम्प्रवेशः—गृहादिकांत वृक्ष तोडण्याकरितां वनांत जाऊन तोडण्याचा प्रकार व फल.

६० प्रतिष्ठापनं—देवस्थापनाचा प्रकार.

६१ गोलक्षण—गाईचें लक्षण.

६२ श्वलक्षणं—कुत्र्याचें लक्षण.

६३ कुक्कुटलक्षणं—कोंबड्याचें लक्षण.

६४ कूर्मलक्षणं—कासवाचें लक्षण.

६५ छागलक्षणं—बकऱ्याचें ल० (शेळी).

६६ अश्वलक्षणं—घोड्याचें लक्षण.
६७ गजलक्षण—हत्तीचें लक्षण.
६८ पुरुषलक्षणं—पुरुषाचे लक्षण (सामुद्रिकादि).
६९ पचमहापुरुषलक्षण— महापराक्रमी पुरुषलक्षण.
७० स्त्रीलक्षणं—स्त्रीयांचीं लक्षणें.
७१ वस्त्रच्छेदलक्षणं—वस्त्रच्छेदनाचें लक्षण.
७२ चामरलक्षण—चंवरीचें लक्षण.
७३ छत्रलक्षणं—छत्राचें लक्षण.
७४ स्त्रीप्रशसा—स्त्रियाचें महत्व.
७५ सौभाग्यकरण—सुंदरत्व कसें होतें.
७६ कान्दर्पिकं—स्त्री व पुरुष उत्पत्तीचा प्रकार.
७७ गधयुक्तिः—पांढरे केस काळे करणें इत्यादि प्रकार.
७८ पुंस्त्रीसमायोगः—स्त्रीपुरुषांवर परस्परांची इच्छा प्रकार.
७९ शय्यासनलक्षण—पलंगाचें लक्षण.
८० वज्रपरीक्षा—हिऱ्याची परीक्षा व लक्षण.
८१ मुक्ताफलपरीक्षा—मौक्तिकांची परी.
८२ पद्मरागपरीक्षा—माणिकाचीपरीक्षा.
८३ मरकतपरीक्षा—पचा, पन्ना याची परीक्षा.
८४ दीपलक्षणं.
८५ दन्तकाष्ठलक्षणं.
८६ मिश्रकाध्यायः—सामान्य सर्व फलें.
८७ अन्तरचक्र—दिशापरत्वें शकुन व फल. [ मनकाळीं ).
८८ शकुनरुत—पक्षिशब्दाचे फल (ग-
८९ श्वचक्रं—कुत्र्याच्या शब्दाचें फल.
९० शिवारुतं—भाल्वें शब्दाचें फल.
९१ मृगचेष्टित—वन्यमृगशब्दाचें फल.
९२ गवेंगितं—गाय हंबरत्ये वगैरे त्याचें फल.
९३ अश्वचेष्टितं—घोड्याच्या चलनादिकांचें फल
९४ हस्तींगित—हत्तीच्या चल०
९५ वायसरुत—काकशब्दाचें व घरत्यादिकांचें फल.
९६ शाकुनोत्तराध्यायः—शकुनाच्या बलाबलविचारानें सिद्धि.
९७ पाकाध्यायः—फल कधीं होईल तें.
९८ नक्षत्रगुणाः—अमुक नक्षत्र अमुक कर्मास उक्त व नक्षत्र संज्ञा व तारा.
९९ तिथिकरणगुणाः—अमुक तिथि व अमुक करणीं कार्य.
१०० विवाहनक्षत्रलग्ननिर्णयः—विवाहीं नक्षत्र व लग्नादि विचार.
१०१ नक्षत्रजातक—जन्मकालीन अश्विन्यादि नक्षत्रांची फलें.
१०२ राशिप्रविभागः—अश्विन्यादि नक्षत्रांच्या राशि १२ यांचा प्रकार
१०३ विवाहपटलं—विवाहलग्नीं ग्रहाचें फल.
१०४ ग्रहगोचरः—जन्मराशीवरून शुभाशुभ ग्रह पाहणें.
१०५ नक्षत्रपुरुषव्रतं—नक्षत्रांचें पुरुषाकारानें वर्णन करून त्याचें व्रत
१०६ उपसहारः—ग्रंथाचा उपसहार.
१०७ अनुक्रमणिका ग्रंथाच्या प्रकरणांची (अध्यायांची) अनुक्रमणिका.

## ॥ श्रीगणेशायनमः ॥



**जयतिजगतःप्रसूतिर्विश्वात्मासहजभूषणंनभसः ॥**
**द्रुतकनकसदृशदशशतमयूखमालार्चितःसविता ॥१॥**

अर्थ—सर्व जगत् ज्यापासून उत्पन्न होत असा, स्थावरजंगमात्मक जगाचा आत्मा, आकाशाचें स्वाभाविक भूषण, पातळ झालेल्या सुवर्णासारख्या हजार किरणांच्या मालेनें पूजित असा सूर्य सर्वोत्कर्षे वर्तता॥१॥

**प्रथममुनिकथितमवितथमवलोक्यग्रंथविस्तरस्यार्थं**
**नातिलघुविपुलरचनाभिरुद्यतःस्पष्टमभिधातुं ॥२॥**

अर्थ—अन्य ज्योतिःशास्त्रें असतां हें कां आरंभिलें याचें कारण या श्लोकानें सांगतात. ब्रह्मानें सांगितलेल्या सत्यरूप विस्तृत ग्रंथाच्या अर्थातें अवलोकन करून, मी वराहमिहिराचार्य स्वल्प नव्हत न अतिविस्तृतही नव्हत अशा वाक्यपदांच्या मध्यम रचनांहीं स्पष्ट बोलण्यास उद्युक्त झालों आहे ॥२॥

**मुनिविरचितमिदमितियच्चिरंतनंसाधुनमनुजग्र**
**थितं। तुल्येर्थेक्षरभेदादमंत्रकेकाविशेषोक्तिः ॥३॥**

अर्थ—हें शास्त्र प्राचीन मुनी जे ब्रह्मा इत्यादिक यांणीं केलें यास्तव श्रेष्ठ होय. मनुष्यानें केलेलें शास्त्र श्रेष्ठ नव्हे. अर्थ एकच असला ह्मणजे वेदावांचून इतर ग्रंथात कांहीं चिंता नाहीं वेदात मात्र तींच अक्षरें ह्मटलीं पाहिजेत ॥३॥

**क्षितितनयदिवसवारोनशुभकृदितिपितामहप्रोक्ते ॥**
**कुजदिनमनिष्टमितिवाकोत्रविशेषोनृदिव्यकृते ॥४॥**

अर्थ—ब्रह्मोक्तग्रंथांत क्षितितनयदिवसवारः नशुभकृत् आशा अक्षरांनीं भौमवार शुभ नव्हे असें सांगितलें. व मनुष्योक्त ग्रंथांत कुजदिनमनिष्ट भौमवार शुभ नव्हे असें सांगितलें येणें मनुष्यकृत न देवकृत शास्त्रांत एकच अर्थ आहे. यास्तव यात विशेष नाहीं ४

**आब्रह्मादिविनिःसृतमालोक्यग्रंथविस्तरंक्रमशः**
**क्रियमाणकमेवैतत्समासतोतोममोत्साहः ॥५॥**

अर्थ—ब्रह्मादिऋषींनीं केलेलें विस्तृतशास्त्र पाहून क्रमानें व संक्षेपानेंच हें क्रियमाण शास्त्र करितों यास्तव मन्मा उत्साह (शृंगार) आहे ॥५॥

आसीत्तमःकिलेदंतत्रापांतैजसेभवद्धैमे ॥ स्व
र्भूशकलेब्रह्माविश्वकृदंडेर्केशशिनयनः ॥६॥

अर्थ—हें सर्व जगत् अंधकाररूप होतें त्यात प्रथमत. उदक उत्पन्न झालें. त्या उदकात सुवर्णाचें व तेजस्वी असें अंड झालें. त्याचीं स्वर्ग व भूमि अशीं दोन खंडें झालीं. त्यामध्यें सर्व जगत् उत्पन्न करणारा व चंद्र सूर्य ज्याचे नयन असा ब्रह्मदेव उत्पन्न होता झाला ॥६॥ तात्पर्य—तमोभूत या जगतामध्यें अव्यक्त ईश्वरास प्रजा उत्पन्न करण्याची जेव्हां इच्छा झाली त्याकाळीं प्रथम जल उत्पन्न केलें. त्यामध्यें वीर्य सोडिलें तें अंड सौवर्ण व सूर्यासारखें तेजस्वी होतें झालें त्यामध्यें ब्रह्मदेव झाला त्याणें तेथें एक वर्ष राहून, नंतर देवाचें ध्यान करून दोन शकलें केलीं. त्यांतून एक शकलाचा स्वर्ग व एकाची भूमि केली. तो ब्रह्मा, ज्याचे चंद्रसूर्य नयन, सर्व लोकाचा पितामह व विश्वकर्ता असा झाला. (स्मृतिकार.).

कपिलःप्रधानमाहद्रव्यादीन्कणभुगस्यविश्वस्य
कालंकारणमेकेस्वभावमपरेजगुःकर्म ॥७॥

अर्थ—सांख्याचार्य कपिलमहामुनि प्रकृतिजगदुत्पत्तीचेंकारण असें ह्मणतात. कणादऋषि, द्रव्यादि सहा[1] पदार्थ जगदुत्पत्तीस कारण असें ह्मणतात. कोणी काल कारणिक (पौराणिक) जगताचें कारण काळ ह्मणतात. अन्य (लोकायतिक[2]) स्वभाव कारण ह्मणतात. मीमांसक शुभाशुभ कर्म जगताचें कारण ह्मणतात ॥७॥

तदलमतिविस्तरेणप्रसंगवादार्थनिर्णयोतिमहान्
ज्योतिःशास्त्रांगानांवक्तव्योनिर्णयोत्रमया ॥८॥

अर्थ—प्रसंगवादीं अर्थविचार महान् आहे आणि ज्योतिःशास्त्राच्या अंगाचा विचार मला येथें बोलावयाचा आहे. यास्तव जगदुत्पत्तिप्रसंगवाद पुरे ॥८॥

ज्योतिःशास्त्रमनेकभेदविषयंस्कंधत्रयाधिष्ठितंतत्का
र्त्स्न्योपनयस्यनाममुनिभिःसंकीर्त्यतेसंहिता ॥ स्कं
धोस्मिन्गणितेनयाग्रहगतिस्तंत्राभिधानस्त्वसौहो
रान्योंगविनिश्चयश्चकथितःस्कंधस्तृतीयोपरः ॥९॥

अर्थ—बहुभेदविषयक ज्योति शास्त्र, गणित, होरा व शाखा, एतत्संज्ञक तीन स्कंधामध्यें निर्दिष्ट आहे. त्या ज्योति शास्त्राचें सर्व कथन ज्यांत आहे, त्याचें नाव

१ द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष, समवाय.
२ चार्वाकमतानुसारी, बौद्ध, नास्तिक.

संहिता, असें मुनि ह्मणतात. ज्या ज्योतिःशास्त्रामध्यें गणितानें सूर्यादिग्रहांची गति समजमत्ये. या गणितस्कधांचेच तत्रस्कध असें नाम होय. हा पहिला स्कध. लग्न ( होरा ) याचा निश्चय ज्याणें होतो तो होरास्कंध दुसरा होय. अन्य वक्ष्यमाण जो स्कध तो शाखास्कध तिसरा होय. असें मुनींनीं सांगितलें आहे ॥९॥

वक्रानुवक्रास्तमयोदयाद्यास्ताराग्रहाणांकरणेमयोक्ताः ॥ होरागतंविस्तरतश्चजन्मयात्राविवाहैःसहपूर्वमुक्तं ॥१०॥

अर्थ—भौमादिग्रहाचे वक्र, मार्ग, अस्त, उदय, इत्यादिक मी करणसिद्धांतिकेमध्यें सांगितले. विस्तारानें जातक होराशास्त्रामध्यें सबद्ध आहे. तें यात्राविवाहपटलासहवर्तमान मी पूर्वीच सांगितलें ॥१०॥

प्रश्नप्रतिप्रश्नकथाप्रसंगान्स्वल्पोपयोगान्ग्रहसंभवांश्च संत्यज्यफल्गूनिचसारभूतंभूतार्थमर्थैःसकलैःप्रवक्ष्ये ११

अर्थ—प्रश्न, उत्तर, कथाप्रसंग ( आख्यायिका, ह्म० पूर्वींच्या गोष्टी ) सूर्यादि ग्रहाच्या उत्पत्ति, याचा थोडा उपयोग यास्तव तीं टाकून, जें सारभूत ह्म० श्रेष्ठ (प्रत्यक्ष अनुभवास येणारें) भूतार्थ ह्म० सत्यार्थ (अनुभवास आलेलें) तें परिपूर्ण अर्थांहीं सांगतों ॥११॥

इतिवराहमिहिरकृतौबृहत्संहितायांउपनयनाध्यायःप्रथमः ॥ १ ॥

---

अथातःसांवत्सरसूत्रंव्याख्यास्यामः । तत्रसांवत्सरोभिजातः प्रियदर्शनो विनीतवेषःसत्यवागनसूयकः समः सुसंहतोपचितगात्रसंधिरविकलश्चारुकरचरणनखनयनचिबुकदशनश्रवणललाटभ्रूत्तमांगो वपुष्मान्गंभीरोदात्तघोषः । प्रायःशरीराकारानुवर्तिनोहिगुणाश्चदोषाश्चभवंति ॥

अर्थ–यानंतर सांवत्सर (दैवज्ञ) याचें स्वरूप सांगतों तो सांवत्सर, कुलीन, पाहिला असतां सुख उत्पन्नकरणारा, नम्रवेष, खरें बोलणारा, निंदा न करणारा, शत्रु मित्राच्याठाईं तुल्य, अतिसक्ष्म व पुष्ट अशा आहेत शरीरसंधि ज्याच्या असा, अव्यंग, हात, पाय, नखें, नेत्र, ओष्ठ, दांत, कान, ललाट, भिंवया, मस्तक हीं सुंदर आहेत ज्याचीं असा, शरीर सुंदर आहे ज्याचें असा, गंभीर व उत्कट (मोठा) आहे शब्द ज्याचा असा ज्योतिषी (जोशी) असावा कारण बहुधा शरीराच्या आकाराप्रमाणें गुण किंवा दोष उत्पन्न होतात ॥

## तत्रगुणाःशुचिर्दक्षःप्रगल्भोवाग्मीप्रतिभानवान्देशकालवित्सात्त्विकोनपर्षद्भीरुःसहाध्यायिभिरनभिभवनीयः कुशलोऽव्यसनीशांतिकपौष्टिकाभिचारस्नानविद्याभिज्ञोविबुधार्चनव्रतोपवासनिरतःस्वतंत्राश्चर्योत्पादितज्ञानप्रभावःपृष्टाभिधाय्यन्यत्रदैवात्यया ग्रहगणितसंहिताहोराग्रंथार्थवेत्ता ॥

अर्थ–त्या सांवत्सराच्या शरीरामध्यें गुण असावे ते–शुद्ध ( शास्त्रोक्त शौचानुष्ठान कर्ता व अलोभी) चतुर, शीघ्र कार्य करणारा, शास्त्रानुसार प्रशस्त गर्जणारा, पूर्वापरसंबधानें उत्तर देणारा, सब देशव्यवहार व कालस्वरूप जाणणारा, निर्मल चित्त, सभेमध्यें त्यक्तभय, त्याचे बरोबर अध्ययन करणारास अजेय, शिक्षित, (इंगित जाणणारा ) व्यसन (गीत, वाद्य, नृत्य, स्त्री, द्यूतादि ) रहित वेदोक्त मंत्रपाठविनियोग जाणणारा, शांतिकविद्याभिज्ञ, पौष्टिकविद्याभिज्ञ आभिचार ( जारणमारणादि) विद्याभिज्ञ, नित्यनैमित्तिकादि क्रियांस जाणणारा, देवपूजा, व्रतें, उपवास इत्यादिकांचाठाईं तत्पर, ग्रहगणितादिकांनें आश्चर्य उत्पादक आहे ज्ञानसामर्थ्य ज्याचें असा, विचारलेल्या अर्थांतें सांगणारा, उत्पातसूचित अशुभाविषयीं न विचारतां सांगणारा ग्रहगणित(पंचसिद्धांत)फलग्रंथ (जातकादि ग्रं.) याचा अर्थ जाणणारा॥

## तत्रग्रहगणितेपौलिशरोमकवासिष्ठसौरपैतामहेषुपंचस्वेतेषुसिद्धांतेषुयुगवर्षायनर्तुमासपक्षाहोरात्रयाममुहूर्तनाडीविनाडीप्राणत्रुटित्रुट्यवयवाद्यस्यक्षेत्रस्यचवेत्ता।चतुर्णांचमासानांसौरसावननाक्षत्रचांद्राणामधिमासकावमसंभवस्यचकारणाभिज्ञः। षष्ट्यब्दयुगवर्षमासदिनहोराधिपतीनांप्रतिपत्तिविच्छेदवित्।

अर्थ—त्या ग्रहगणितामध्यें पौलिश, रोमक, वासिष्ठ, सौर पैतामह (ब्रह्म) असे ५ सिद्धांत आहेत. हे पांच सिद्धांत जाणणारा; युग, वर्ष, अयन, ऋतु, मास, पक्ष, अहोरात्र, प्रहर, मुहूर्त, नाडी (घटिका) विनाडी (पल) प्राण (श्वासोच्छ्वास) त्रुटि (दोन निमेष), आणि त्यांचे अवयव इत्यादि कालप्रमाणातें व मेषादिराशिप्रमाणातेंही जाणणारा; सौर, सावन, नाक्षत्र, चांद्र, या चारप्रकारच्या महिन्यांतें व अधिमास क्षयमास यांच्या संभवाचें कारण जाणणारा; ६० संवत्सर, युग, मास, दिन, होरा, यांच्या स्वामीची प्रवृत्ति व निवृत्ति जाणणारा ॥

सौरादीनांचमानानांसदृशासदृशयोग्यायोग्यत्वप्रतिपादनपटुः। सिद्धांतभेदेप्ययननिवृत्तौप्रत्यक्षंसममंडलरेखासंप्रयोगाभ्युदितांशकानांचछायाजलयंत्रदृग्गणितसाम्येनप्रतिपादनकुशलः। सूर्यादीनांचग्रहाणांशीघ्रमंदयाम्योत्तरनीचोच्चगतिकारणाभिज्ञःसूर्याचंद्रमसोश्चग्रहणेग्रहणादिमोक्षकालदिक्प्रमाणस्थितिविमर्दवर्णादेशानामनागतग्रहसमागमयुद्धानामादेष्टा।

अर्थ—सौरादि मासांचें सादृश्य असादृश्य योग्यायोग्यत्वाचें प्रतिपादन करण्यास कुशल असा, सिद्धांतभेद जाणणारा, अयननिवृत्ति ह्म० दक्षिणेस व उत्तरेस सूर्याचें गमन यांतें प्रत्यक्ष ज्ञानानें जाणणारा, विषुववृत्तजाणता, उदितांश जाणणारा, तुरीययंत्रादि छायायंत्रें जलयंत्रें आणि वेध यांचे साम्यानें जाणता, सूर्यादिक ग्रहांच्या शीघ्र, मंद, याम्योत्तर, नीच, उच्च अशा गतींचें कारण जाणणारा; सूर्यचंद्रांच्या ग्रहणांमध्यें ग्रहणाचा आरंभ, मोक्ष, दिशा, प्रमाण, स्थिति, खग्रास, वर्ण, इत्यादिक आदेश यांचा व भाविग्रहयोग, ग्रहयुद्धें यांतें सांगणारा ॥

प्रत्येकग्रहभ्रमणयोजनकक्षाप्रमाणप्रतिविषययोजनपरिच्छेदकुशलो भूभगणभ्रमणसंस्थानाद्यक्षावलंबकाहर्व्यासचरदलकालराश्युदयच्छायानाडीकरणप्रभृतिषुक्षेत्रकालकरणेष्वभिज्ञो नानाचोद्यप्रश्नभेदोपलब्धिजनितवाक्सारोनिकषसंतापाभिनिवेशैर्विशुद्धस्येवाधिकतरममलीकृतस्य शास्त्रस्यवक्तातंत्रज्ञोभवति

अर्थ—प्रत्येकग्रहाचे भ्रमणाचीं योजनें व कक्षा (कर्ण) यांचें प्रमाण जाणणारा, प्रत्येक देशाच्या योजनांच्या प्रमाणाविषयीं कुशल; भूगोल, नक्षत्रगणाचें भ्रमण व संस्थान इत्यादि जाणणारा; ध्रुवोन्नतीचा अवलंबक दिवसव्यास (अहोरात्रार्ध), चरखंडकाल, मेषादि राशींचे उदय (लग्न) छायेवरून इष्टघटी करण इत्यादिक, व लग्नकाल करण यांचा जाणणारा; नानाप्रकारच्या उक्तप्रश्नाच्या भेदज्ञानानें ज्याची उत्तम वाणी झाली असा; कसोटीवर घासून किंवा तापवून किंवा तोडून शुद्ध केलेल्या सुवर्णासारखें अत्यंत स्वच्छ केलेल्या शास्त्राचा वक्ता; असा जो तो गणितशास्त्र जाणणारा होतो ॥

उक्तंचगर्गमुनिना ॥ नप्रतिवद्धंगमयतिव
क्तिनचप्रश्नमेकमपिपृष्टः ॥ निगदतिनच
शिष्येभ्यःसकथंशास्त्रार्थविज्ञेयः ॥१॥

अर्थ—जो मनुष्य शास्त्रोक्तअर्थातें प्रतिपादन करीत नाहीं, कोणी प्रश्न केलाअसतां एकाही प्रश्नाचें उत्तर देत नाही व शिष्यांसही पढवीत नाहीं तो शास्त्रार्थ जाणणारा कसा म्हणावा ॥१॥

ग्रंथोन्यथान्यथार्थःकरणंयश्चान्यथाकरोत्यबुधः ॥
सपितामहमुपगम्यस्तौतिनरोवैशिकेनार्यां ॥२॥

अर्थ—जो मनुष्य ग्रंथाचा अर्थ अन्य असून दुसराच अर्थ करितो. व गणितही निराळेंच करितो तो अबुध (मूर्ख) होय. तो मनुष्य पितामह (आजा) याप्रत जाऊन, वेश्येचे गुण (नखदशन नखक्षत सीत्कारादिक) यांहींकरून मातेची स्तुतिकरितो ॥२॥

तंत्रेसुपरिज्ञातेलग्नेछायांबुयंत्रसंविदिते ॥
होरार्थेचसुरूढेनादेष्टुर्भारतींवंध्या ॥३॥

अर्थ—गणितस्कंध चांगला जाणला असतां; छाया व जलयंत्र यांहीं लग्न चांगलें जाणलें असतां; होरार्थ (लग्न) सुस्थिर असतां; सांगणाराची वाणी निष्फल (मिथ्या) होत नाहीं ॥३॥

उक्तंचार्यविष्णुगुप्तेन ॥ अप्यर्णवस्यपुरुषःप्रतरन्कदा
चिदासादयेदनिलवेगवशेनपारं ॥ नत्वस्यकालपुरु
षाख्यमहार्णवस्यगच्छेत्कदाचिदनृषिर्मनसापिपारं १

र्थ—पुरुष नौकेतून जात असतां, वायूच्या वेगानें परतीरास कदाचित् जाईल;

परंतु हा कालपुरुषाख्य (ज्योतिःशास्त्ररूप) जो महार्णव (मोठा समुद्र) याच्या परतीरास मुनीवांचून कोणी कधींही मनानेंसुद्धां जाणार नाहीं. ऋषि मात्र जाईल. ४

होराशास्त्रेपिराशिहोराद्रेक्काणनवांशकद्वादशभाग त्रिंशद्भागवलावलपरिग्रहोग्रहाणांदिक्स्थानकालचेष्टाभिरनेकप्रकारवलनिर्धारणंप्रकृतिधातुद्रव्यजातिपरिग्रहोनिषेकजन्मकालविस्मापनप्रत्ययादेशसद्योमरणायुर्दायदशांतर्दशाष्टकवर्गराजयोगचंद्रयोगद्विग्रहादियोगानांनाभसादीनांचयोगानांफलान्याश्रयभावावलोकननिर्याणगत्यनूकानितात्कालिकप्रश्नशुभाशुभनिमित्तानिविवाहादीनांचकर्मणांकरणं ।

अर्थ—होरा (जातक) शास्त्रामध्येंही केवळ वक्रानुवक्रास्तमयोदयादिकच सांगितले नाहींत जितके होराशास्त्राचे भेद तितके सांगितले. ते हे:—राशि, होरा, द्रेक्काण, (राशित्रिभाग) नवांश, द्वादशांश, त्रिंशांश, बलाबलविचार, ग्रहांचें दिग्बल, स्थानबल, कालबल, चेष्टाबल, इत्यादि अनेकप्रकारांच्या बलांचा विचार; वातपित्तादि प्रकृति, धातु (मूमांसमेदोस्थिमज्जारेत), ताम्रादिद्रव्य, ब्राह्मणादि जाति, यांचा विचार; गर्भाधान, गर्भमोक्षसमय, यांवरून आश्चर्यकारक जे नालवेष्टितादिक प्रत्यय (दाखले) त्यांचें कथन, अरिष्टाध्याय, जीवितप्रमाण, दशा, अंतर्दशा, अष्टक, वर्ग, राजयोग, चंद्रयोग, द्विग्रहादियोगांचीं शुभाशुभफलें, आश्रयभावाचें अवलोकन, निर्याणगति अनूक तात्कालिक प्रश्न शुभाशुभांचीं निमित्तें, विवाहादिक कर्मांचें करण (कारण)

यात्रायांचतिथिदिवसकरणनक्षत्रमुहूर्तविलग्नयोगदेहस्पंदनस्वप्नविजयस्नानग्रहयज्ञगणयागाग्निलिंगहस्त्यश्वेंगितसेनाप्रवादचेष्टादिग्रहषाड्गुण्योपायमंगलामंगलशकुनसैन्यनिवेशभूमयोग्निवर्णामंत्रिचरदूताटविकानांयथाकालंप्रयोगाःपरदुर्गलंभोपायाश्चेत्याद्युक्तंचाचार्यैः ।

अर्थ—यात्रेचाठायीं (प्रयाणीं) तिथि, (प्रतिपदादि) रव्यादिवार, ववादि करणें, अश्विन्यादि नक्षत्रें, अहोरात्र ३० मुहूर्त, यांचीं फलें; मेषादि तात्कालिक लग्नें, योगाध्यायोक्त योग, देहस्पंदन (देहस्फुरण), स्वप्न, विजयार्थस्नान, ग्रहयज्ञ, गुह्य—

पूजन, अग्निचिन्ह, हस्ती, घोडा यांचें चेष्टित, सैन्याचा (मी पुढें इत्यादि) वाद व चेष्टा व उत्साह इत्यादि करणें, संधिविग्रहादि षाड्गुण्य, सामदामादि उपाय, शुभाशुभ शकुन, सैन्य रहाण्यास योग्य भूमि, प्रस्थानाग्निकर्मी शुभाशुभ, प्रधान, बातमीदार, दूत, पारधी, यांचे यथाकालीं प्रयोग, शत्रूच्या किल्ल्याच्या प्राप्तीचे उपाय, इत्यादिक होराशास्त्राचे भेद आचार्यांनीं सांगितले.

जगतिप्रसारितमिवालिखितमिवमतौनिपिक्तमिव
त्द्वदये । शास्त्रंयस्यसभगणंनादेशानिःफलास्तस्य ५

अर्थ—जगतामध्ये विस्तारित, बुद्धीचाठाईं चित्रासारखें, हृदयाचाठाईं ठसलेलें असें ज्याचें गणितशास्त्र आहे त्याच्या उक्ति (भाषणें) कधींही निष्फल होत नाहींत॥५॥

संहितापारगश्च दैवचिंतकोभवति । यत्रैतेसंहिताप
दार्थाः । दिनकरादीनांग्रहाणांचारास्तेषुचतेषां प्रकृ
तिविकृतिप्रमाणवर्णकिरणद्युतिसंस्थानास्तमनोदय
मार्गमार्गांतरवक्रानुवक्रर्क्षग्रहसमागमचारादिभिः फ
लानिनक्षत्रकूर्मविभागेन देशेष्वगस्तिचारः सप्तर्षि
चारोग्रहभक्तयोनक्षत्रव्यूहग्रहशृंगाटकग्रहयुद्धग्रहस
मागमग्रहवर्षफलगर्भलक्षणरोहिणीस्वात्यपाढीयो
गाःसद्योवर्षकुसुमलतापरिधिपरिवेषपरिघपवनोल्का
दिग्दाहक्षितिचलनसंध्यारागगंधर्वनगररजोनिर्घाता
र्घकांडसस्यजन्मेंद्रध्वजेंद्रचापवास्तुविद्यांगविद्यावा
यसविद्यांतरचक्रमृगचक्राश्वचक्रवातचक्रप्रासादल
क्षणप्रतिमालक्षणप्रतिष्ठापनवृक्षायुर्वेदोदगार्गलनी
राजनखंजनोत्पातशांतिमयूरचित्रकघृतकंवलखड्ग
पट्टकृकवाकुकूर्मगोजाश्वेभपुरुषस्त्रीलक्षणान्यंतःपुर
चिंतापिटकलक्षणोपानच्छेदवस्त्रच्छेदचामरदंडश
य्यासनलक्षणरत्नपरीक्षादीपलक्षणंदंतकाष्ठाद्याश्रि
तानिशुभाशुभानिनिमित्तानिसामान्यानिचजगतःप्र

तिपुरुपंपार्थिवेचप्रतिक्षणमनन्यकर्माभियुक्तेनदैवज्ञे नचिंतयितव्यानि ।

अर्थ—सूर्यादि ग्रहाचे चार (गतिवशानें शुभाशुभ कथन), त्या चारामध्येंही ग्रहाची प्रकृति(स्वभाव), विकार, जगताचें प्रमाण, शुक्लादिवर्ण, किरण व त्यांची कांति, आकार, अस्त, उदय, दक्षिणोत्तर मध्यममार्ग, मार्गमध्य, भौमादिकाचे वक्रत्व, मार्गत्व, नक्षत्राबरोबर ग्रहाचासयोग, चार, इत्यादिकांनीं फलें होतात. नक्षत्रकूर्मविभागानें देशामध्ये फलें होतात. अगस्तिचार, वसिष्ठादि सप्तऋषिचार, ग्रहाणा भक्तय ( देशद्रव्याणि प्राणिनामाधिपत्य ), नक्षत्रव्यूह (द्रव्यजनाधिपत्य ), ग्रहशृगाटक ( ताराग्रहाचें शृगाटकसस्थानानें शुभाशुभज्ञान ), ग्रहाचें युद्ध, ग्रहाचा चद्राशीं समागम, ग्रहाच्या वर्षाधिपत्यानें फलें, मेघगर्भलक्षण, रोहिणीचा चद्राशा योग, तसाच स्वातियोग, व पूर्वाषाढायोग, सद्योवृष्टिलक्षण, पुष्प व लताचें लक्षण, (वृक्षादिकाच्या फलपुष्पसमृद्धीनें लोकामध्ये शुभाशुभ कथन ) परिधि ( प्रतिसूर्याचें ) लक्षण, परिवेष (खळें) याचें लक्षण, परिघ (सूर्योदयास्तसमयीं तिर्यक्रेषा) याचें लक्षण, असेंच वायूचे लक्षण, उल्कापात व दिग्दाह याचें लक्षण, भूकप, सध्याराग, गंधर्वनगरलक्षण, रजोलक्षण, निर्घातलक्षण, अर्घकाड (राशींवरून द्रव्याचें महर्घत्वादि) सस्यजातक, इंद्रध्वजपूजा, इंद्रधनुष्याचें लक्षण, वास्तुविद्या (गृहाचें लक्षण), प्राण्याच्या अगस्पर्शानें शुभाशुभ ज्ञान, काकचेष्टित, शाकुनचक्र, मृगचेष्टित, अश्वचेष्टित, वातचक्र, ( अष्टदिशामध्यें फिरणाऱ्या वायूचें लक्षण ), देवळाची रचना, प्रतिमालक्षण, ( देवप्रतिमाचे लक्षण ), वृक्षाची चिकित्सा, दगार्गल ( जलप्राप्ति ), नीराजन ( शातिकर्म ) अथवा नीराजन, मत्रपूतजलानें अजन ( क्षेपण, स्पर्शन ), खनन पक्ष्याचे लक्षण, उत्पातशाति, मयूराचित्रक, घृतकवल (पुण्यस्नान) खड्गपरीक्षा, पट्ट ( नृपमुकुट ) याची परीक्षा, कुक्कुट, कूर्म, गो, मेढा, अश्व, गज, पुरुष, स्त्री, यांचीं लक्षणे, अत पुरस्त्रियाचें लक्षण, पिटक ( फोड ) याचें लक्षण, उपानत् ( वाहणा ) याचा छेद, वस्त्रच्छेद, चामरदडपरीक्षा, शय्यासनाचें लक्षण, हीरकादि रत्नाची परीक्षा, दीपाची परीक्षा, दतकाष्ठादिकावरून शुभाशुभ निमित्तें, व सर्व जगताचीं सामान्य निमित्तें, पुरुषापुरुषाप्रति जीं शुभाशुभ लक्षणें तीं, तशींच राजाचेठाईं जीं लक्षणें तीं, हीं सर्व प्रतिक्षणीं अन्यकर्मरहित दैवज्ञानें चिंतन करावीं. ( याचा विचार करावा )

नचैकाकिनाशक्यंतेहर्निशमवधारयितुंनिमित्तानि । तस्मात्सुभृतेनैवदैवज्ञेनान्येतद्विदश्चत्वारोभर्तव्याः। तत्रैकेनैंद्रीचाग्नेयीचदिगवलोकयितव्या याम्यानैर्ऋ

तीचान्येनैवंवारुणीवायव्याचोत्तराचैशानीचेति । य
स्मादुल्कापातादीनिनिमित्तानिशीघ्रमुपगच्छंतीति ।
तेषांचाकारवर्णस्नेहप्रमाणदिक्ग्रहर्क्षाभिघातादिभिः
फलानिभवंति ।

अर्थ–रात्रंदिवस निमित्त पाहणें एकट्याच्यानें होत नाहीं. यास्तव राजानें सुपो-षितदैवज्ञानें दुसरे ज्योति शास्त्रज्ञ चार दैवज्ञ ठेवावे. त्यामध्यें एकानें पूर्व व आग्नेयी पहावी. दुसऱ्यानें दक्षिण व नैर्ऋति प०, तिसऱ्यानें पश्चिम व वायव्य प०, चवथ्यानें उत्तर व ईशानी पहावी. उल्कापातादि निमित्तें अल्पकालिक होत. यास्तव त्या उल्कादिकाचे आकार, वर्ण, स्निग्धता, हस्तादिप्रमाण, उ-त्तरादि दिक्, ग्रह, नक्षत्र, याचा अभिघात ( अभिहनन ) इत्यादिकानीं शुभाशुभ फलें होतात.

उक्तंचगर्गेणमहर्षिणा । कृत्स्नांगोपांगकुशलंहोरागणित
नैष्ठिकं । योनपूजयतेराजासनाशमुपगच्छति ॥७॥

अर्थ–सर्व ज्योति शास्त्राचीं अंगें व उपागें (पुरुष लक्षणादिक) याचा जाणणारा, जा-तक व गणित यामध्यें निष्णात (तत्पर) अशा दैवज्ञाची जो राजा पूजा (सत्कार) करीत नाहीं. तो नाशातें प्राप्त होतो ॥७॥

वनंसमाश्रितायेपिनिर्ममानिःपरिग्रहाः । अपितेप
रिपृच्छंतिज्योतिषांगतिकोविदं ॥८॥

अर्थ–जे वनात राहिलेले, अहंकाररहित, स्त्रियादिपरिग्रहरहित असे तेही ग्रहन क्षत्रादिज्योतींची गतिजाणणाऱ्या दैवज्ञाप्रत विचारितात. (त्यासही शुभाशुभ सम जण्याची इच्छा असते) ॥८॥

अप्रदीपायथारात्रिरनादित्यंयथानभः । तथाऽसांव
त्सरोराजाभ्रमत्यंधइवाध्वनि ॥९॥

अर्थ–जशी रात्रि दीपावाचून शोभत नाहीं व आकाश सूर्यावाचून शोभत नाहीं तसा राजा दैवज्ञावाचून शोभत नाहीं. इतकेंच नाहीं, जसा मार्गामध्यें आधळा फिरतो त्या सारखा राजा सर्वत्र सशयानें फिरतो ॥९॥

मुहूर्ततिथिनक्षत्रमृतवश्चायनेतथा । सर्वाण्ये
वाकुलानिस्युर्नस्यात्सांवत्सरोयदि ॥१०॥

अर्थ—आर्द्रादि मुहूर्ते, प्रतिपदादि तिथि, अश्विन्यादि नक्षत्रें, शिशिरादि ऋतु, दक्षिणोत्तर अयनें, हीं सर्व सांवत्सर (दैवज्ञ) नाहींतर निष्फळ होतात ॥१०॥

तस्माद्राज्ञाधिगंतव्योविद्वान्सांवत्सरोऽग्रणीः ।
जयंयशःश्रियोभोगान्श्रेयश्वसमभीप्सता ॥११॥

अर्थ—पूर्वोक्त कारणास्तव जय, यश, लक्ष्मी, उपभोग, आणि आरोग्य यांतें इच्छिणाऱ्या राजानें पंडित व श्रेष्ठ असा दैवज्ञ ठेवावा ॥११॥

नासांवत्सरिकेदेशेवस्तव्यंभूतिमिच्छता ।
चक्षुर्भूतोहियत्रैपपापंतत्रनविद्यते ॥१२॥

अर्थ—संपत्ति इच्छिणाऱ्या पुरुषानें दैवज्ञरहित देशामध्यें राहूं नये. सर्व शुभाशुभादिकांचा प्रकाशक हा दैवज्ञ आहे. तो जेथें राहतो, तेथें पाप रहात नाहीं ॥१२॥

नसांवत्सरपाठीचनरकेषूपपद्यते ।
ब्रह्मलोकेप्रतिष्ठांचलभतेदैवचिंतकः ॥१३॥

अर्थ—ज्योतिःशास्त्र पठन करणारा नरकाप्रत जात नाहीं. तो ब्रह्मलोकामध्यें प्रतिष्ठेतें प्राप्त होतो ॥१३॥

ग्रंथतश्चार्थतश्चैतत्कृत्स्नंजानातियोद्विजः ।
अग्रभुक्सभवेच्छ्राद्धेपूजितःपंक्तिपावनः ॥१४॥

अर्थ—या ज्योतिःशास्त्रातें पाठानें व अर्थानें जो ब्राह्मण संपूर्णत्वेंकरून जाणतो, तो श्राद्धाचेठाईं पूज्य व प्रथमभोक्ता होतो, आणि तो पूज्यब्राह्मण ज्या पंक्तीमध्यें बसतो, त्या पंक्तीला पवित्र करितो ॥१४॥

म्लेच्छाहियवनास्तेषुसम्यक्शास्त्रमिदंस्थितं
ऋषिवत्तेपिपूज्यंतेकिंपुनर्दैवविद्विजः ॥१५॥

अर्थ—यवन हे म्लेच्छ (रानटी) आहेत तरी त्यांमध्यें हे ज्योतिःशास्त्र उत्तमप्रकारें राहिलें आहे (त्यांणीं तें पूर्वाचार्यांपासूनच संपादिलें) यास्तव ते यवनही ऋषींसारखे पूजिले जातात. मग दैवज्ञ ब्राह्मण पूज्यहोतील, यांत काय सांगावयाचें आहे १५

कुहकावेशपिहितैःकर्णोपश्रुतिहेतुभिः ।
कृतादेशोनसर्वत्रप्रष्टव्योनसदैववित् ॥१६॥

णारे लोक, शरदृतूतील धान्य, शबर (भिल्ल), यान या सर्वांस पीडा होते ॥१८

यदाविशाखासुमहेंद्रमंत्रीसुतश्चभानोर्दहन
र्क्षयातः ॥ तदाप्रजानामनयोतिघोरःपुरप्र
भेदोगतयोर्भमेकं ॥१९॥

अर्थ—जेव्हा विशाखानक्षत्रीं बृहस्पति आणि कृत्तिकानक्षत्रीं शनैश्वर असे असतील, तेव्हा लोकांत फार भयकर अनीति होईल. व जर ते दोघेही एकनक्षत्रीं असतील तर नगराचा भेद होईल ॥१९॥

अंडजहाविजोयदिचित्रःक्षुद्भयकृद्यदिपीतमयूखः ।
शस्त्रभयायचरक्तसवर्णोभस्मनिभोवहुवैरकरश्च ॥२०॥

अर्थ—शनि, जर अनेकरंगांचा दिसेल तर पक्ष्यांचा नाश होतो. जर पीतकिरण दिसेल तर दुर्भिक्ष करील. रक्तवर्ण दिसेल तर शस्त्रभय होतें. भस्मासारखा दिसेल तर लोकांमध्यें बहुत वैरें होतील ॥२०॥

वैडूर्यकांतिरमलःशुभदःप्रजानांवाणातसीकु
सुमवर्णनिभश्चशस्तः ॥ यंचापिवर्णमुपग
च्छतितत्सवर्णान्सूर्यात्मजःक्षपयतीतिमुनिप्र
वादः ॥२१॥

अर्थ—शनि, वैडूर्यमण्यासारखा असून स्वच्छ असेल तर प्रजांचें कल्याण होईल व बाण (काळा कोरांटा), अतसी (जवसाचें झाड) यांच्या पुष्पांच्या वर्णासारखा शनीचा वर्ण असेल तर प्रशस्त होय. श्वेत, रक्त, पीत, कृष्ण या चार वर्णांतून जो वर्ण शनि घेईल त्या ब्राह्मणादि चार वर्णांचा नाश होईल असें गर्गादि ऋषि म्हणतात. (श्वेतवर्ण शनि ब्राह्मणांचा, रक्त० क्षत्रियांचा, पीत० वैश्यांचा व कृष्ण० शूद्रांचा नाश करितो) ॥२१॥

॥ इतिवृहत्संहितायांशनैश्वरचारोदशमोध्यायः ॥१०॥

## ॥ अथकेतुचारः ॥

( केतु म्ह० धूमकेतु, शेंडे नक्षत्र )

**गार्गीयंशिखिचारंपाराशरमसितदेवलकृतंच ।**
**अन्यांश्चबहून्दृष्ट्वाक्रियतेयमनाकुलश्चारः ॥१॥**

अर्थ–गार्गी, पराशर, असित, देवल या ऋषींनीं केलेले व अन्य ऋषींनींही केलेले बहुत केतुचार पाहून मी हा निःसंशय केतुचार करितों ॥१॥

**दर्शनमस्तमयोवानगणितविधिनास्यशक्यतेज्ञातुं ।**
**दिव्यांतरिक्षभौमास्त्रिविधाःस्युःकेतवोयस्मात् ॥२॥**

अर्थ–या केतूचे उदय किंवा अस्त हे गणितानें समजत नाहीं; कारण केतु दिव्य ( आकाशांतील ), आंतरिक्ष (आकाशांतील व पृथ्वीवरील याचे मध्यें झालेले), भौम ( भूमीवर झालेले, पिशाचदीपिकादि ) असे तीन प्रकारचे आहेत ॥२॥

**अहुताशेनलरूपंयस्मिंस्तत्केतुरूपमेवोक्तं । ख**
**द्योतपिशाचालयमणिरत्नादीन्परित्यज्य ॥३॥**

अर्थ–ज्या देशीं अग्नि नसून अग्नि ( तेज ) दिसतो तें केतुस्वरूपच सांगितलें; परंतु खद्योत ( काजवा किंवा इंद्रगोप म्ह० सोनकिडा ), पिशाचालय ( ज्या ठिकाणीं रात्रीच्या वेळेस वारंवार ज्योति वगैरे दिसतात तें ), चंद्रकांतादिमणि, मरकतादिरत्नें, कांच इत्या० काष्ठप्रभृति म्ह० कांहीं नियमित कुसलेल्या काष्ठांत तेज ( फास्फरस ) दिसतें तें इत्यादि जीं तेजें यातें सोडून अन्य जीं तेजें राहिलीं तें केतु स्वरूप होय असें सांगीतलें आहे ॥३॥

**ध्वजशस्त्रभवनतरुतुरंगकुंजराद्येष्वथांतरिक्षास्ते ।**
**दिव्यानक्षत्रस्थाभौमाःस्युरतोन्यथाशिखिनः ॥४॥**

अर्थ–ध्वज, शस्त्र, गृह, वृक्ष, अश्व, हत्ती इत्यादिकाचेठाईं जें तेज दिसतें ते आंतरिक्ष केतु होत. नक्षत्रांमध्यें जे केतु दिसतात ते दिव्य होत. यांहून अन्य जे भूमीवर दिसतात ते भौम केतु होत ॥४॥

शतमेकाधिकमेकेसहस्रमपरेवदंतिकेतूनां ।
बहुरूपमेकमेवप्राहमुनिर्नारदःकेतुं ॥५॥

अर्थ–पराशरादि कोणी ऋषि, एकशें एक केतु आहेत असें ह्मणतात. अन्य ऋषि, हजार केतु असें ह्मणतात. नारद ऋषि केतु एकच आहे; परंतु त्याचीं बहुत रूपें आहेत असें ह्मणतो ॥५॥

यद्येकोयदिवहवःकिमनेनफलंतुसर्वथावाच्यं ।
उदयास्तमयैःस्थानैःस्पर्शैराधूमनैर्वर्णैः ॥६॥

अर्थ–केतु एक असो किंवा बहुत असोत, येथें केतूंच्या उदय, अस्त, स्थान, स्पर्श, आधूमन (धोंडी असणें) व वर्ण यांहीं करूनच त्यांचें फल सांगावयाचें आहे ॥६॥

यावंत्यहानिदृश्योमासास्तावंतएवफलपाकः ।
मासैरब्दांश्चवदेत्प्रथमात्पक्षत्रयात्परतः ॥७॥

अर्थ–जितके दिवस केतु दिसेल तितके महिन्यांनीं, फल होईल. जितके महिने दिसेल तितक्या वर्षांनीं फल होईल. तें फल केतु दृष्टिगोचर झाल्यापासून ४५ दिवसांपुढें महिने किंवा वर्षें जाणावीं ॥७॥

ह्रस्वस्तनुःप्रसन्नःस्निग्धस्त्वृजुरचिरसंस्थितःशुक्लः ।
उदितोवाप्यभिवृष्टःसुभिक्षसौख्यावहःकेतुः ॥८॥

अर्थ–ह्रस्व (आंखूड), तनु (जाड), निर्मल, स्निग्ध (आर्द्र), सरळ, थोडावेळ रहाणारा, श्वेतवर्ण, ज्याचा उदय झाला अ० पर्जन्य पडतो असा केतु सुभिक्ष व सौख्य यांतें करणारा होय ॥८॥

उक्तविपरीतरूपोनशुभकरोधूमकेतुरुत्पन्नः ।
इंद्रायुधानुकारीविशेषतोद्वित्रिचूलोवा ॥९॥

अर्थ–पूर्वोक्ताहून, विपरीतस्वरूप उत्पन्न जो केतु, तो शुभ नव्हे व इंद्रधनुष्या सारखा अशुभ होय. दोन शिखेचा किंवा तीन शिखेचा विशेषेंकरून अशुभ होय ॥९॥

हारमणिहेमरूपाःकिरणाख्याःपंचविंशतिःसशिखाः ।
प्रागपरदिशोर्दृश्यानृपतिविरोधावहारविजाः ॥१०॥

अर्थ—हार ( मोत्याचा ), चन्द्रकांतादि मणि, सुवर्ण, यासारख्या रूपाचे शिखायुक्त जे केतु, ते किरणसंज्ञक सूर्यापासून उत्पन्न पंचवीस आहेत. त्यातून एकच दृष्टिगोचर होतो तो पूर्वेस किंवा पश्चिमेस दिसतो. तो दिसला असता राजास विरोधावह ( अशुभ ) होतो ॥१०॥

**शुकदहनबंधुजीवकलाक्षाक्षतजोपमाहुताशसुताः ।**
**आग्नेय्यांदृश्यंतेतावंतस्तेपिशिखिभयदाः ॥११॥**

अर्थ—कीर, अग्नि, दुपारीचें पुष्प ( अति तांबडे ), लाख, रक्त यासारखे आग्नेयीस दिसणारे पंचवीसच अग्निपुत्र धूमकेतु दृष्टिगोचर झाले तर अग्नीपासून भय होतें ॥११॥ त्यातून एकच दृष्टिगोचर होतो हें सर्वत्र जाणावें ॥

**वक्रशिखामृत्युसुतारूक्षाःकृष्णाश्चतेपितावंतः ।**
**दृश्यंतेयाम्यायांजनमरकावेदिनस्तेच ॥१२॥**

अर्थ—वाकड्या शिखाचे, रसरखीत, कृष्णवर्ण असे मृत्युपुत्र पंचवीस केतु आहेत, ते दक्षिणदिशेकडे दिसतात, तेही लोकास मृत्युकारक होत ॥१२॥

**दर्पणवृत्ताकाराविशिखाःकिरणान्विताधरातनयाः।**
**क्षुद्भयदाद्वाविंशतिरैशान्यामंबुतैलनिभाः ॥१३॥**

अर्थ—आरशासारखेवर्तुळ, शिखारहित, किरणयुक्त असे २२ केतु भूमिपुत्र उदक व तेल यासारख्या वर्णाचे ईशानीदिशेस दिसतात ते दुर्भिक्षकरणारे होत॥१३॥

**शशिकिरणरजतहिमकुमुदकुंदकुसुमोपमाः**
**सुताःशशिनः।उत्तरतोदृश्यंतेत्रयःसुभिक्षाव**
**हाःशिखिनः ॥१४॥**

अर्थ—चंद्रकिरण, रुपें, बर्फ, कमल, कुंदपुष्प याच्या वर्णासारखे तीन चंद्रपुत्र केतु उत्तरेस दिसतात, ते सुभिक्षकरणारे होत ॥१४॥

**ब्रह्मसुतएकएवत्रिशिखोवर्णैस्त्रिभिर्युगांतकरः ।**
**अनियतदिक्संप्रभवोविज्ञेयोब्रह्मदंडाख्यः ॥१५॥**

अर्थ—तीन शिखाचा व तीन वर्णाचा ब्रह्मपुत्र ब्रह्मदंडनामक सर्वदिशेस दिसणारा असा केतु एकच आहे, तो युगांत ( प्रलय ) करणारा होय ॥१५॥

शतमभिहितमेकसमेतमेतदेकेनचिरहितान्यस्मात् ।
कथयिष्येकेतूनांशतानिनवलक्षणेःस्पष्टैः ॥१६॥

अर्थ–केतूंचें एकाधिकशत १०१ सांगितलें. त्यानंतर केतूंचीं एकोननऊ शतें ८९९ स्पष्ट लक्षणांहीं सांगतों ॥१६॥

सौम्यैशान्योरुदयंशुक्रसुतायांतिचतुरशीत्याख्याः ।
विपुलसिततारकास्तेस्निग्धाश्चभवंतितीव्रफलाः ॥१७॥

अर्थ–शुक्रपुत्र ८४ केतु उत्तर व ईशानी या दिशास उदय पावतात. ते विस्तीर्ण, शुभ्रतारांचे व निर्मल असे दृष्टिगोचर होतात त्यांपासून अशुभफल होतें ॥१७॥

स्निग्धाःप्रभासमेताद्विशिखाःषष्टिःशनैश्चरांगरुहाः ।
अतिकष्टफलादृश्याःसर्वत्रैतेकनकसंज्ञाः ॥१८॥

अर्थ–निर्मल व तेजयुक्त आणि दोनशिखांचे शनैश्वराचे पुत्र साठ, कनकसंज्ञक केतु आहेत ते सर्वदिशेस दृष्टीस पडतात त्यांचे अशुभफल होय ॥१८॥

विकचानामगुरुसुताःसितैकताराःशिखापरित्यक्ताः ।
षष्टिःपंचभिरधिकाःस्निग्धायाम्याश्रिताःपापाः ॥१९॥

अर्थ–श्वेत, एकतारा, शिखारहित, निर्मल, विकचनामक पासष्ट ६५ बृहस्पतिपुत्र केतु दक्षिणेस दिसतात ते अशुभफलद होत ॥१९॥

नातिव्यक्ताःसूक्ष्मादीर्घाःशुक्लायथेष्टदिक्प्रभवाः ।
बुधजास्तस्करसंज्ञाःपापफलास्त्वेकपंचाशत् ॥२०॥

अर्थ–अस्पष्ट, सूक्ष्म, लांब, श्वेतवर्ण, सर्वदिशेस दिसणारे, तस्करसंज्ञक बुधाचे पुत्र केतु एकावन्न आहेत ते अशुभफलद होत ॥२०॥

क्षतजानलानुरूपास्त्रिचूलताराःकुजात्मजाःषष्टिः ।
नाम्नाचकौंकुमास्तेसौम्याशासंस्थिताःपापाः ॥२१॥

अर्थ–रक्त व अग्नि यासारखे, तीनशिखांचे, कौंकुमसंज्ञक भौमपुत्र, साठ केतु उत्तरेस दिसतात ते अशुभ होत ॥२१॥

त्रिंशत्त्र्यधिकाराहोस्तेतामसकीलकाइतिख्याताः ।
रविशशिजादृश्यंतेतेषांफलमर्कचारोक्तं ॥२२॥

अर्थ—तेतीस, राहूचे पुत्र तामसकीलकसंज्ञक केतु चंद्रसूर्यमंडळीं दिसतात त्याचें फल रविचारामध्यें सांगीतलें ॥२२॥

विंशत्याधिकमन्यच्छतमग्नेर्विश्वरूपसंज्ञानां ।
तीव्रानलभयदानांज्वालामालाकुलतनूनां ॥२३॥

अर्थ—एकशेंवीस विश्वरूपसंज्ञक अग्निपुत्र केतु ज्वालांनीं व्याप्तदेह, असे आहेत ते तीव्र अग्निभय देणारे होत ॥२३॥

श्यामारुणावितारावामररूपाविकीर्णदीधितयः ।
अरुणाख्यावायोःसप्तसप्ततिःपापदाःपुरुषाः ॥२४॥

अर्थ—श्यामलोहितवर्ण, ताराराहित, चवरीसारखे व पसरलेल्या किरणाचे अरुण सं० वायुपुत्र रूक्ष असे ७७ आहेत ते अशुभ होत ॥२४॥

तारापुंजनिकाशागणकानामप्रजापतेरष्टौ ॥
द्वेचशतेचतुरधिकेचतुरस्त्राब्रह्मसंतानाः ॥२५॥

अर्थ—नक्षत्रसमुदायासारखे गणकनामक आठ प्रजापतिपुत्र केतु, ते अशुभ होत. दोनशेंचार चतुरस्त्र ( चौकोनी किंवा चतुरस्त्रनामक ) ब्रह्मपुत्र केतु आहेत ते अशुभ होत ॥२५॥

कंकानामवरुणजाद्वात्रिंशद्वंशगुल्मसंस्थानाः ।
शशिवत्प्रभासमेतास्तीव्रफलाःकेतवःप्रोक्ताः ॥२६॥

अर्थ—कंकनामक, वेळूच्या वेटासारखे, चंद्रासारख्या तेजानें युक्त बत्तीस वरुणपुत्र केतु सांगीतले ते तीव्रफल ( अशुभ ) होत ॥२६॥

षण्णवतिःकालसुताःकबंधसंज्ञाःकबंधसंस्थानाः ।
चंडाभयप्रदाःस्युर्विरूपताराश्चतेशिखिनः ॥२७॥

अर्थ—छिन्नमस्तक ( धड ) यासारखे, कबंधसंज्ञक, भयंकर, अस्पष्टतारेचे, शाण्णव कालपुत्र केतु आहेत ते भय देणारे होत ॥२७॥ ( ज्यास दिशा सांगितली नाहीं ते अनियतदिक् जाणावे )

शुक्लविपुलैकताराः नवविदिशाकेतवःसमुत्पन्नाः।
एवंकेतुसहस्रंविशेषमेषामतोवक्ष्ये ॥२८॥

अर्थ–श्वेतवर्ण व मोठा एकच तारा आहे ज्याचा असे, अतरालदिशेचे पुत्र व आग्नेय्यादि विदिशेमध्ये दिसणारे नऊ केतु आहेत ते दृष्टिगोचर झाले तर भय देणारे होत. याप्रकारे हजार केतु सांगितले. आतां त्यांचाच विशेष सांगतों॥२८॥

उदगायतोमहान्स्निग्धमूर्तिरपरोदयीवसाकेतुः।
सद्यःकरोतिमरकंसुभिक्षमप्युत्तमंकुरुते ॥२९॥

अर्थ–उत्तरदिशेस दीर्घ, अतिस्थूल, स्वच्छ, पश्चिमेस उदयपावणारा, वसासंज्ञक केतु पाहिला असतां त्याचदिवशीं महामारी इत्यादि रोग उद्भवतात. व उत्तम सुभिक्षही होतें ॥२९॥

तल्लक्षणोस्थिकेतुःसतुरूक्षःक्षुद्भयावहःप्रोक्तः।
स्निग्धस्तादृक्प्राच्यांशस्त्राख्योडमरमरकाय ॥३०॥

अर्थ–अस्थिकेतुनामक केतु, वसाकेतूच्या लक्षणांनीं युक्त व रूक्ष (रखरखीत) दुर्भिक्षकारक होय. वसाकेतूसारखाच निर्मलदेह, पूर्वेस दिसणारा शस्त्रकेतुसंज्ञक केतु, युद्ध (शस्त्रकलह) व महामारी करणारा होय ॥३०॥

दृश्योमावास्यायांकपालकेतुःसधूम्ररश्मिशिखः।
प्राङ्नभसोर्धविचारीक्षुन्मरकावृष्टिरोगकरः ॥३१॥

अर्थ–धूम्रवर्णशिखाचा कपालकेतु अमावास्येस पूर्वदिशेकडे आकाशाच्या अर्धामध्यें दृष्टिगोचर होतो तो दुर्भिक्ष, महामारी, अवर्षण व रोग यातें करतो ॥३१॥

प्राग्वैश्वानरमार्गेशूलाग्रःश्यावरूक्षताम्रार्चिः।
नभसस्त्रिभागगामीरौद्रइतिकपालतुल्यफलः॥३२॥

अर्थ–पूर्वेकडे अग्निवीथींत (पूर्वाषा० उत्तराषाढा यांसमीप), शूलाकृति (त्रिशिख), धूम्रवर्ण, रूक्ष व ताम्र आहे कांति ज्याची असा आणि आकाशाच्या तीन भागांत फिरणारा रौद्रनामक केतु, कपालकेतुसारखेंच (क्षुन्मारकावृष्टिरोगकर) फल देतो ॥३२॥

अपरस्यांचलकेतुःशिखयायाम्याग्रयांगुलोच्छ्रितया ।
गच्छेद्यथायथोदक्तथातथादैर्घ्यमायाति ॥३३॥
सप्तमुनीन्संस्पृश्यध्रुवमभिजितमेवचप्रतिनिवृत्तः ।
नभसोर्धमात्रमित्वायाम्येनास्तंसमुपयाति ॥३४॥
हन्यात्प्रयागकूलाद्यावदवंतींचपुष्करारण्यं । उदग
पिचदेविकामपिभूयिष्ठंमध्यदेशाख्यं ॥३५॥
अन्यानपिचसदेशान्क्वचित्क्वचिद्धंतिरोगदुर्भिक्षैः ।
दशमासान्फलपाकोस्यकेश्चिदष्टादशप्रोक्तः ॥३६॥

अर्थ—चलकेतु, पश्चिमदिशेस एक अंगुल उंच व दक्षिणेकडे अग्र अशा शिखेनें युक्त दिसतो, तो जसजसा उत्तरेकडे जाईल तसतसा लांब होतो ॥३३॥ आणि तो सप्तऋषींस, ध्रुवास व अभिजित्नक्षत्रास स्पर्श करून मागें फिरतो आणि आकाशाच्या अर्ध्या भागात जाऊन दक्षिणेस अदर्शन ( अस्त ) पावतो ॥३४॥ तो चलकेतु प्रयागाच्या तीरापासून अवंतीनामक नदीपर्यंत, पुष्करनामक अरण्य व उत्तरदिशेकडे देविकानामक नदी व मोठा मध्यदेश याचा ॥३५॥ व अन्य देशाचांही रोग व दुर्भिक्ष यांहींकरून कोठेंकोठें नाश करितो. या चलकेतूच्या फलाचा अनुभव दहा महिन्यांनी येतो. कोणी गर्गादिमुनींनीं १८ महिन्यांनीं येतो असें सांगीतलें आहे ॥३६॥

प्रागर्धरात्रदृश्योयाम्याग्रःश्वेतकेतुरन्यश्च ।
कइतियुगाकृतिरपरेयुगपत्तौसप्तदिनदृश्यौ ॥३७॥
स्निग्धौसुभिक्षशिवदावथाधिकंदृश्यतेकनामायः ।
दशवर्षाण्युपतापंजनयतिशस्त्रप्रकोपकृतं ॥३८॥

अर्थ—दक्षिणदिशेसशिखा असा श्वेतकेतुनामक केतु, मध्यरात्रीच्या पूर्वीं दिसतो व दुसरा कनामक केतु, युग ( जोखड ) यासारखा पश्चिमेस दिसतो हे दोन्हीं एककालीं सात दिवस दृष्टीस पडतात ॥३७॥ ते स्निग्ध ( अतिनिर्मल ), सुभिक्ष व कल्याण करणारे होत. कदाचित् जो कनामक केतु तो अधिक दिवस दृष्टीस पडेल तर दहा वर्षेपर्यंत युद्धकृत दुःख होईल ॥३८॥

श्वेतइतिजटाकारोरूक्षःश्यावोवियत्त्रिभागगतः ।
विनिवर्ततेपसव्यंत्रिभागशेषाःप्रजाःकुरुते ॥३९॥

अर्थ–श्वेतनामक केतु जटाकार, रूक्ष ( रखरखीत ), धूम्रवर्ण, आकाशाच्या तीन भागांत फिरणारा होय. तो जर अपसव्य फिरेल, तर तिसरा हिसा प्रजा राहील ( प्रजांच्या दोन भागाचा नाश करील ) ॥३९॥

आधूम्रयातुशिखयादर्शनमायातिकृत्तिकासंस्थः ।
ज्ञेयःसरश्मिकेतुःश्वेतसमानंफलंधत्ते ॥४०॥

अर्थ–स्वल्पधूम्रवर्णशिखेनें दृष्टीस पडणारा व कृत्तिका नक्षत्राजवळ राहणारा असा रश्मिकेतु पूर्वोक्त श्वेतासारखें फळ (तिसराहिसा प्रजा शेष राहणें ) देतो ॥४०॥

ध्रुवकेतुरनियतगतिप्रमाणवर्णाकृतिर्भवतिविष्वक् ।
दिव्यांतरिक्षभौमोभवत्ययंस्निग्धइष्टफलः ॥४१॥
सेनांगेषुनृपाणांगृहतरुशैलेषुचापिदेशानां ।
गृहिणामुपस्करेषुचविनाशिनांदर्शनंयाति ॥४२॥

अर्थ–ध्रुवकेतुसंज्ञक केतु, गमन, प्रमाण ( स्थूल सूक्ष्मादि ), श्वेतादिवर्ण व आकृति यांहींकरून अनिश्चित व आसमतात् ( सर्वत्र ) होणारा होय. हा दिव्य, अंतरिक्ष व भौम असा होतो. हा स्निग्ध ( निर्मल ) व शुभफलदेणारा होय ॥४१॥ हा ध्रुवकेतु नाशपावणाऱ्या राजाच्या सेनांगात (गज, वाजी, रथ, पदाति) व नाश पावणारे देशांतील गृहें, वृक्ष, पर्वत यावर व गृहस्थाच्या दर्वी, शूर्प, मार्जनी इत्यादिकाचाठायीं दृष्टीस पडतो ॥४२॥ ह्मणजे ज्या स्थळीं हा दिसतो तेथें नाश होतो

कुमुदइतिकुमुदकांतिर्वारुण्यांप्राक्शिखोनिशामेकां ।
दृष्टःसुभिक्षमतुलंदशकिलवर्षाणिसकरोति ॥४३॥

अर्थ–कुमुदनामक केतु, श्वेतवर्ण, पश्चिमेकडे पूर्वशिख असा एकरात्र दृष्टीस पडतो तो दिसला तर दहा वर्षें बहुत सुभिक्ष होईल ॥४३॥

सकृदेकयाममदृश्यःसुसूक्ष्मतारोपरेणमणिकेतुः ।
ऋज्वीशिखास्यशुक्लास्तनोद्गताक्षीरधारेव ॥४४॥
उदयन्नेवसुभिक्षंचतुरोमासान्करोत्यसौसार्धान् ।
प्रादुर्भावंप्रायःकरोतिचक्षुद्रजंतूनां ॥४५॥

अर्थ–मणिकेतुनामक केतु, पश्चिमेकडे एक प्रहरपर्यंत एकदां दिसणारा, अति

सूक्ष्मतारा अशा स्तनांतून निघालेल्या दुधाच्या धारा तशा व सरळ आणि श्वेत शिखेचा होय ॥४४॥ याचा उदय झाला असता साडेचार महिने सुभिक्ष होतें व क्षुद्रजंतु ( नकुलादिक ) याचा प्रादुर्भावही ( उत्पत्ति ) होतो ॥४५॥

**जलकेतुरपिचपश्चात्स्निग्धःशिखयापरेणचोन्नतया ।**
**नवमासान्ससुभिक्षंकरोतिशांतिंचलोकस्य ॥ ४६ ॥**

अर्थ–पश्चिमेकडे उच्च अशा शिखेचा निर्मलदेह असा जलकेतुनामक केतु पश्चिमेकडे दृष्टिगोचर होतो. तो दृष्टीस पडला तर नऊ महिने सुभिक्ष करितो व लोकांचें कल्याणही करितो ॥४६॥

**भवकेतुरेकरात्रंदृश्यःप्राक्सूक्ष्मतारकःस्निग्धः ।**
**हरिलांगूलोपमयाप्रदक्षिणावर्तयाशिखया ॥ ४७ ॥**
**यावतएवमुहूर्तान्दर्शनमायातिनिर्दिशेन्मासान् ।**
**तावदतुलंसुभिक्षंरूक्षेप्राणांतिकान्रोगान् ॥४८॥**

अर्थ–पूर्वदिशेस एकरात्र दिसणारा, लहानतारा, निर्मलदेह, सिंहाच्या पुच्छासारखी व प्रदक्षिण फिरलेल्या शिखेनें युक्त असा भवकेतुनामक केतु जितके मुहूर्त ( दोन घटिकेचा एक ) दृष्टीस पडेल तितके महिने बहुत सुभिक्ष होईल व तोच केतु रूक्ष (रखरखीत) असेल तर प्राणनाशक रोग होतील ॥४७॥४८॥

**अपरेणपद्मकेतुर्मृणालगौरोभवेन्निशामेकां ।**
**सप्तकरोतिसुभिक्षंवर्षाण्यतिहर्षयुक्तानि ॥४९॥**

अर्थ–श्वेतवर्ण, पद्मकेतुनामक केतु, पश्चिमकडे एकरात्र दृष्टीस पडतो तो सातवर्षे सुभिक्षकरून सर्वांस हर्षित करतो ॥४९॥

**आवर्तइतिनिशार्धेसव्यशिखोरुणानिभोपरेस्निग्धः ।**
**यावत्क्षणान्सदृश्यस्तावन्मासान्सुभिक्षकरः ॥५०॥**

अर्थ–निर्मलदेह, आरक्त, सव्यशिख, असा आवर्तनामक केतु, मध्यरात्रीस दृष्टीस पडतो. तो जितके मुहूर्त दृष्टीस पडतो तितके महिने सुभिक्ष करतो ॥५०॥

**पश्चात्संध्याकालेसंवर्तोनामधूम्रताम्रशिखः ।**
**आक्रम्यवियत्त्र्यंशंशूलाग्रावस्थितोरौद्रः ॥५१॥**

**यावंतएवमुहूर्तान्दृश्योवर्षाणिहंतितावंति ।**
**भूपाञ्छस्त्रनिपातैरुदयर्क्षंचापिपीडयति ॥५२॥**

अर्थ—धूम्रवर्ण असून तावड्या शिखाचा, आकाशाचा तिसरा भाग व्यापून राहणारा, शूलाग्रासारखा ( त्रिशिख ), भयंकर असा सवर्तनामक केतु संध्याकाळीं पश्चिमेकडे जितके मुहूर्त दृष्टीस पडतो तितकीं वर्षे युद्धाहीं राजाचा नाश करितो व ज्या नक्षत्रीं उदय होतो तें नक्षत्र दूषित होतें ॥५१॥५२॥

**येशस्तास्तान्हित्वाकेतुभिराधूमितेथवास्पृष्टे ।**
**नक्षत्रेभवतिवधोयेषांराज्ञांप्रवक्ष्येतान् ॥५३॥**

अर्थ—जे शुभ केतु, त्याते सोडून अशुभकेतूनी आधूमित ( त्याजवर शिखा गेलेली) अथवा स्पष्ट (धूमकेतुच्या शिखा नक्षत्रास लागलेल्या) अशीं अश्विन्यादि नक्षत्रें असता कोणतें नक्षत्र स्पष्ट अ० कोणत्या राजाचा नाश होईल तो प्रकार पुढें सांगतों ॥५३॥

**अश्विन्यामश्मकपंभरणीषुकिरातपार्थिवंहन्यात् ।**
**बहुलासुकलिंगेशंरोहिण्यांशूरसेनपतिं ॥५४॥**

अर्थ—अशुभकेतूनें अश्विनी न० आधूमित किंवा स्पष्ट अ० अश्मक ( सूर्यवंशातील ) राजाचा नाश होतो. भरणी न० अ० किरातराजाचा नाश. कृत्तिका अ० कलिंगराजाचा नाश. रोहिणीन० अ० शूरसेन राजाचा नाश होतो ॥५४॥

**औशीनरमपिसौम्येजलजाजीवाधिपंतथार्द्रासु ।**
**आदित्येश्मकनाथंपुष्येमगधाधिपंहंति ॥५५॥**

अर्थ—मृगशीर्षन० अशुभ केतूनें धूमित किंवा स्पष्ट असतां उशीनरदेशाच्या राजाचा नाश होतो. आर्द्रान० अ० मत्स्यादि जलजप्राण्यावर वाचणारे जे प्रागदेशवासी लोक त्याच्या राजाचा नाश होतो. पुनर्वसून० अ० अश्मकराजाचा नाश होतो. पुष्यन० अ० मगधदेशच्या राजाचा नाश होतो ॥५५॥

**असिकेशंभौजंगेपित्र्येंगंपांड्यनाथमपिभाग्ये ।**
**औज्जयनिकमार्यम्णेसावित्रेदंडकाधिपतिं ॥५६॥**

अर्थ—आश्लेषान० अ० असिकराजाचा नाश होतो. मघान० अ० अंगदेशच्या राजाचा नाश होतो. पूर्वान० अ० पांड्यदेशच्या राजाचा नाश होतो. उत्तरान०

अ० उज्जयनीच्या राजाचा नाश होतो. हस्तन० अ० दंडकारण्याच्या राजाचा नाश होतो ॥५६॥

चित्रासुकुरुक्षेत्राधिपस्यमरणंसमादिशेत्तज्ज्ञः ।
काश्मीरककांबोजौनृपतीप्राभंजनेनस्तः ॥५७॥

अर्थ—चित्रान० अ० कुरुक्षेत्राच्या राजास मरण, केतुफळ जाणणाराने सांगावे. स्वातीन० अ० काश्मीर व कांबोज देशाचे राजे नाहिसे होतात ॥५७॥

इक्ष्वाकुरल्कनाथौहन्येतेयदिभवेद्विशाखासु ।
मैत्रेपुंड्राधिपतिर्ज्येष्ठास्वथसार्वभौमवधः ॥५८॥

अर्थ—विशाखानक्षत्र अ० इक्ष्वाकुराजा व अलकानगरीचा राजा याचा नाश होतो. अनुराधानक्षत्र असता पुंड्रदेशच्या राजाचा नाश होतो. ज्येष्ठान० असता सार्वभौम राजाचा नाश होतो ॥५८॥

मूलेंध्रमद्रकपतीजलदेवेकाशिपोमरणमेति ।
यौधेयकार्जुनायनशिविचैद्यान्वैश्वदेवेच ॥५९॥

अर्थ—मूल न० केतूनें आधूमित किंवा स्पृष्ट अ० आंध्र व मद्र या देशांच्या राजाचा नाश होतो. पूर्वाषाढा न० अ० काशिराजाचा नाश होतो. उत्तराषाढा न० अ० यौधेयक, आर्जुनायन, शिनि, चैद्य या राजांचा नाश होतो ॥५९॥

हन्यात्कैकयनाथंपांचनदंसिंहलाधिपंवांगं ।
नैमिषनृपंकिरातंश्रवणादिषुपट्स्विमान्क्रमशः ॥६०॥

अर्थ—श्रवण न० अ० कैकयराजाचा, धनिष्ठा न० अ० पांचनदराजाचा, शततारका न० अ० सिंहलदेशच्या राजाचा, पूर्वाभाद्रपदा न० अ० अंगदेशच्या राजाचा, उत्तराभा० न० अ० नैमिषारण्याच्या राजाचा, रेवतीनक्षत्र अशुभकेतूनें आधूमित किंवा स्पृष्ट असता किरातदेशच्या राजाचा नाश होतो ॥६०॥

उल्काभिताडितशिखःशिखीशिवःशिवतरोभिवृष्टोयः।
अशुभःसएवचोलावगाणसितहूणचीनानां ॥ ६१ ॥

अर्थ—उल्केनें (आकाशांतून तेजरूप तारा पडतो तो) ताडित आहेत शिखा ज्याच्या असा केतु शुभ होय व जो दृष्टीस पडताच वृष्टि होते तो तर अतिशुभ

होय. पूर्वोक्तच केतु चोल, अवगाण, सित, हूण ( जगत्प्रदेश ), चीन या देशच्या लोकांस अशुभ होय ॥६१॥

नम्रायतःशिखिशिखाभिसृतायतोवाऋक्षंचय त्स्पृशतितत्कथितांश्चदेशान् । दिव्यप्रभाव निहतान्सयथागरुत्मान्भुंक्तेगतोनरपतिःप रभोगिभोगान् ॥६२॥

अर्थ—ज्या दिशेकडे केतूच्या शिखा नम्र झाल्या किंवा ज्या दिशेस गेल्या त्या दिशेकडे गेलेला किंवा केतुशिखांनीं ज्या नक्षत्रास स्पर्श केला त्या नक्षत्राच्या वक्ष्यमाण देशांकडे गेलेला राजा उत्तमपराक्रमानें शत्रु मारून देशातें उपभोगितो. जसा गरुड उत्कृष्ट सर्पांच्या देहातें खातो तसा शत्रूस मारून राज्य भोगितो ६२

इतिवराहमिहिरकृतौबृहत्संहितायांकेतुचारएकादशः ११

---

## ॥ अथअगस्त्यचारः ॥

(भानोर्वर्त्मविघातवृद्धशिखरोविंध्याचलः स्तंभितोवातापिर्मुनिकुक्षिभित्सुररिपुर्जीर्ण श्चयेनासुरः । पीतश्चांबुनिधिस्तपोंबुनिधि नायाम्याचदिग्भूपितातस्यागस्त्यमुनेःपयो द्युतिकृतश्चारःसमासादयं ॥१॥)

अर्थ—सूर्याच्या मार्गाचा अवरोध करण्याकरितां वाढलीं आहेत शिखरें ज्याचीं असा जो विंध्यपर्वत तो ज्याणें पूर्ववत् केला असा व ऋषींच्या पोटात शिरून पोटें फोडणारा, देवाचा शत्रु, जो वातापिनामक दैत्य तोही ज्याणें पोटात जिरवला असा व समुद्र ज्याणें प्राशन केला असा, तपाचा केवळ समुद्रच असा व ज्याणें दक्षिणदिशा सुशोभित केली असा व उदकें स्वच्छ करणारा, असा जो अगस्त्यऋषि त्याचा चार सांगतों ॥१॥

**समुद्रोत:शैलैर्मकरनखरोत्खातशिखरैःकृतस्तोयो च्छित्यासपदिसुतरांयेनरुचिरः । पतन्मुक्तामिश्रैःप्र वरमणिरत्नांबुनिवहैःसुरान्प्रत्यादेष्टुंमितमुकुटरत्ना निवपुरा ॥१॥**

अर्थ—ज्या अगस्त्यमुनीनें उदकाच्या नाशेंकरून मकर (सुसर) यांचीं जीं नखें त्यांहींकरून उकरलीं आहेत शिखरें ज्यांचीं असे जे इंद्रभयानें आंत रहाणारे मैनाकादिक पर्वत त्यांहींकरून समुद्र तत्काल अत्यंत सुंदर केला. त्या ऋषीचा उदय श्रवण करा असा सहाव्याश्लोकीं संबंध आहे. जो समुद्र, पतनपावणाऱ्या मौक्तिकांनीं मिश्रित असे जे श्रेष्ठमणि, रत्नें व उदकसमुदाय त्यांहींकरून, परिमित आहेत मुकुटसंबंधी रत्नें ज्यांचीं अशा देवांप्रत सांगावयाकारणेंचकाय जाताझाला॥१॥

**येनचांबुहरणेपिविद्रुमैर्भूधरैःसमणिरत्नविद्रुमैः । निर्गतैस्तदुरगैश्चराजितःसागरोधिकतरंविराजितः ॥२॥**

अर्थ—ज्या मुनीनें उदक हरण केलें असतांही वृक्षरहित पर्वतांहींकरून व मणि, रत्नें, पोंवळीं यांहीं सहित पंक्तिशः बाहेर निघालेले जे पर्वतांतील सर्प त्यांहींकरून समुद्र फारच शोभूं लागला ॥२॥

**प्रस्फुरत्तिमिजलेभजिह्मगःक्षिप्तरत्ननिकरो महोदधिः ॥ आपदांपदगतोपियापितोयेन पीतसलिलोमरश्रियं ॥३॥**

अर्थ—ज्या मुनीनें प्यालें आहे उदक ज्याचें असा व विपत्तीप्रत पावलेला असाही जो समुद्र त्यास देवांची लक्ष्मी (शोभा) दिली. तो समुद्र कसा. हालणारे मत्स्य, जलहस्ति व सर्प हे ज्यांत आहेत असा व पसरला आहे रत्नसमुदाय ज्यामध्यें असा. देवलक्ष्मी (शोभा) कशी. तेजस्वी मत्स्य, जल, गज, कुटिल यांहीं गमन करणारे. कोणी मत्स्यग, जलग (नारायण), गजग (इंद्र), कुटिलगति (भौमादिग्रह), यांहींयुक्त व क्षिप्त (पसरले) आहेत रत्नसमुदाय जीमध्यें अशी देवांची लक्ष्मी तिची शोभा समुद्रास आणिली ॥३॥

**प्रचलत्तिमिशुक्तिजशंखचितःसलिलेपहृतेपि पतिःसरितां ॥ सतरंगसितोत्पलहंसभृतःसर सःशरदीवविभातिरुचं ॥४॥**

अर्थ—चलनपावणारे मत्स्य, शिंपीतले जीव व शस यांहीं व्याप्त असा समुद्र ऋषी ने उदक हरण केलें असतांही तरंगांनी सहित जीं श्वेतकमळें, व हंस यांतें धारण करणाऱ्या सरोवराच्या शरदतूंतील शोभेतें धारण करिता झाला ॥४॥

**तिमिसितांबुधरंमणितारकंस्फटिकचंद्रमनंबु शरद्युति ॥ फणिफणोपलरश्मिशिखिग्रहं कुटिलगेशवियच्चचकारयः ॥५॥**

अर्थ—जो मुनि समुद्रच आकाश करिता झाला तो समुद्र व आकाश कसें. मत्स्य हेच श्वेतमेघ, मणि हेच नक्षत्रें, स्फटिक हेच चंद्र, उदकाभाव हीच शरदतूची कांति, सर्पाच्या फणातील मण्याचे किरण हेच केतुग्रह अशाप्रकारचें केलें ॥५॥

**दिनकररथमार्गविच्छित्तयेभ्युद्यतंयच्चलच्छृंगंउद्भ्रांत विद्याधरांसावसक्तप्रियाव्यग्रदत्तांकदेहावलंबांबरा भ्युच्छ्रितोद्धूयमानध्वजैःशोभितं । करिकटमदमि श्ररक्तावलेहानुवासानुसारिद्विरेफावलीनोत्तमांगैः कृतान्वाणपुष्पैरिवोत्तंसकान्धारयद्भिर्मृगेंद्रैःसनाथी कृतांतर्दरीनिर्झरं । गगनतलमिवोल्लिखंतंप्रवृद्धैर्गजा कृष्टफुल्लद्रुमत्रासविभ्रांतमत्तद्विरेफावलीगीतमंद्रस्व नैःशैलकूटैस्तरक्षर्क्षशार्दूलशाखामृगाध्यासितैः । र हसिमदनसक्तयारेवयाकांतयेवोपगूढंसुराध्यासितो द्यानमंभोशनानन्नमूलानिलाहारविप्रान्वितंविंध्य मस्तंभयद्यश्चलस्योदयःश्रूयतां ॥६॥**

अर्थ—सूर्याच्या रथाचा मार्ग बंद करण्याकरितां उद्युक्त झालें आहे चचल शिखर ज्याचें असा, घाबरलेल्या विद्याधरांच्या (देवयोनि) बाहूंचाठाई सत्तम झालेल्या ज्या स्त्रिया त्यांहींकरून धावरून मांडीवर बसवलेल्या देहावरचीं वस्त्रें तीच उंच व कंपित जे ध्वज त्यांहीं करून शोभायमान असा, हत्तींच्या गंडस्थळांतील जो मद त्याणें मिश्र जें रक्त त्याचें जें चाटणें त्याच्या सुगंधाचें अनुसरण करणारे जे भ्रमर त्यांहीं आश्रयलीं आहेत मस्तकें ज्यांचीं असे न निळ्या कोरान्याच्या पुष्पांनीं

केलेलींच काय जी शिरोभूषणें त्यातें धारण करणारे असे जे सिंह त्यांहीं युक्त आहेत गुहेंतले पाथर ज्याचे असा, हत्तींनीं ओढलेले जे फुललेले वृक्ष त्यांहीं त्रास लेले व भ्रमिरत झालेले व उन्मत्त जे भ्रमर त्याच्या समुदायाच्या गाण्याचा आहे सुंदर शब्द ज्याच्याठाईं अशीं, तरस, आस्वल, व्याघ्र, वानर यांहीं अधिष्ठित (हे ज्यावर आहेत) अशीं व वाढलेलीं जीं पर्वतांचीं शिखरें त्यांहींकरून आकाशतला प्रत रेघा काढतोच काय असा, एकांतस्थलीं कामासक्त जी नर्मदानदी तिणें स्त्री चेपरीच काय आलिंगित असा, देवांनीं आश्रित आहेत वागा ज्याच्या असा व उदक भक्षण करणारे, अन्न न खाणारे, मूलें व वायु यांतें भक्षण करणारे असे जे ब्राह्मण (ऋषि) यांहीं युक्त असा जो विंध्याचल त्यातें जो स्तंभन करिता झाला त्या अगस्त्यऋषीचा उदय श्रवण करावा ॥६॥

**उदयेचमुनेरगस्त्यनाम्नःकुसमायोगमलप्रदू
पितानि । हृदयानिसतामिवस्वभावात्पुन
रंवूनिभवंतिनिर्मलानि ॥७॥**

अर्थ—अगस्त्यनामक ऋषीचा उदय झाला असतां (दर्शन झाले असतां) भूमीच्या योगानें झालेला जो मळ त्याणें दूषित (गढूळ) अशीं जीं उदकें तीं पुन स्व भावानेंच स्वच्छ होतात कोणासारखीं दुष्टाच्या योगानें जें पाप त्याणें दूषित झालेलीं चित्तें तीं साधूच्या दर्शनानें अशीं निष्पाप होतात तशीं उदकें स्वच्छ होतात ॥७॥

**पार्श्वद्वयाधिष्ठितचक्रवाकामापुष्णतीसस्व
नहंसपंक्तिं । तांवूलरक्तोत्कपिताग्रदंतीवि
भातियोपेवसरित्सहासा ॥८॥**

अर्थ—दोहोंबाजूस बसले आहेत चक्रवाकपक्षी जिच्या अशी जी शब्दकरणारी हंसाची पंक्ति तिचें धारण करणारी अशी हास्ययुक्त नदी, तांबूलानें आरक्त झाले ले व वर निघालेले आहेत दंत जिचे अशी जो स्त्री तिचेपरी शोभती झाली ॥८

**इंदीवरासन्नसितोत्पलान्वितासरिद्भ्रमत्षट्प
दपंक्तिभूषिता । सभ्रूलताक्षेपकटाक्षवीक्षणा
विदग्ध्ययोपेवविभातिसस्मरा ॥९॥**

अर्थ—नीलकमलें जवळ आहेत अशीं जीं शुभ्र कमलें त्यांहीयुक्त व फिरणारी जी

भ्रमरांची पंक्ति तिणें सुशोभित अशी नदी, भिवया फिरवून वक्रदृष्टीनें पहाणारी जी कामयुक्त प्रौढ स्त्री तिचेपरी शोभती झाली ॥९॥

इंदोःपयोदविगमोपहितांविभूतिंद्रष्टुंतरंगव
लयाकुमुदंनिशासु । उन्मीलयत्यलिनिली
नदलंसुपक्ष्मवापीविलोचनमिवासिततारकांतं १०

अर्थ—तरंग हेच आहेत वलयें ( हस्तभूषणें ) जिला अशी वापी ( रुंद विहीर ) मेघांच्या गमनानें प्राप्त झालेली अशी चंद्राची शोभा पहावयाकारणें रात्रीस भ्रमर ज्यांमध्यें लीन झाले अशीं आहेत पत्रें ज्याचीं असें, व सुंदर आहे पत्र ज्याचें असें, व काळे आहेत नेत्रांतील बुब्बुळ ज्याचें असें जें कुमुद (चंद्रविकासी कमल) त्यातें नेत्रांसारखेंच काय उघडिती झाली ( अगस्त्युदय झाला म्हणजे कुमुदें फुलतात) १०

नानाविचित्रांबुजहंसकोककारंडवापूर्णतडागहस्ता ।
रत्नैःप्रभूतैःकुसुमैःफलैश्चभूर्यच्छतीवार्घमगस्त्यनाम्ने ११

अर्थ—नानाप्रकारच्या अनेकरंगांचीं जीं कमलें व हंस, चक्रवाक, कारंडव हे पक्षी आणि उदकपूर्ण तळीं हेच आहेत हस्त जिचे अशी भूमि, बहुत पुष्पें व फलें हींच रत्नें याहींकरून अगस्त्यनामक ऋषीकारणें अर्घ्य देते अशीच काय शोभती झाली ॥११॥

सलिलममरपाज्ञयोज्झितंयद्घनपरिवेष्टित
मूर्तिभिर्भुजंगैः । फणिजनितविषाग्निसंप्रदु
ष्टंभवतिशिवंतदगस्त्यदर्शनेन ॥१२॥

अर्थ—मेघांनीं वेष्टित आहेत शरीरें ज्यांचीं असे जे सर्प, त्यांणीं इंद्राच्या आज्ञेनें टाकलेलें असें व सर्पांपासून उत्पन्न झाले जें विष तोच अग्नि त्याणें दूषित असें जें उदक तें अगस्त्यऋषीच्या दर्शनानें शुभ ( कल्याणकारक ह० स्वच्छ ) होतें १२

स्मरणादपिपापमपाकुरुतेकिमुतस्तुतिभिर्व
रुणांगरुहः । मुनिभिःकथितोस्ययथार्घवि
धिःकथयामितथैवनरेंद्रहितं ॥१३॥

अर्थ—ज्या अगस्त्यऋषीच्या स्मरणानेंही पाप जातें मग स्तुतीनें जाईल यात काय सांगावयाचें. या ऋषीचा अर्घविधि असा ऋषींनीं सांगितला तसाच राजाला हितकारक असा सांगतों ॥१३॥

संख्याविधानात्प्रतिदेशमस्यविज्ञायसंदर्शन
मादिशेज्ज्ञः । तच्चोज्जयन्यामगतस्यकन्या
भागैःस्वराख्यैःस्फुटभास्करस्य ॥१४॥

अर्थ—ज्योतिःशास्त्रजाणणारा पंडित गणितानें या अगस्त्यऋषीचा उदय देशादेशाचाठाई जाणून सांगो (ज्योतिष्यानें सांगावा) तो असा कीं, उज्जयनीमध्ये स्पष्टसूर्य कन्याराशीस जाण्यास सात अंश कमी असतां (सिंहसंक्रांतीचे १३ अंश झाले अ०) अगस्तीचा उदय होतो ॥१४॥

ईषत्प्रभिन्नेरुणरश्मिजालैर्नैशेंधकारेदिशिदक्षिणस्यां ।
सांवत्सरावेदितदिग्विभागेभूपोर्घमुर्व्यांप्रयतःप्रयच्छेत्१५

अर्थ—अरुणाच्या किरणांनीं रात्रिसंबंधी अंधकार कांहीं कमी झाला असतां व ज्योतिष्यानें दिग्विभाग दाखविला असतां दक्षिणदिशेस भूमीवर राजानें नम्र होऊन अर्घ्य द्यावें ॥१५॥

कालोद्भवैःसुरभिभिःकुसुमैःफलैश्वरत्नैश्चसा
गरभवैःकनकांबरैश्च ॥ धेन्वावृषेणपरमान्न
युतैश्चभक्ष्यैर्दध्यक्षतैःसुरभिधूपविलेपनैश्च ॥१६॥

अर्थ—त्याकालीं उत्पन्न झालेलीं व सुगंधि अशीं पुष्पें, फलें, समुद्रांत झालेलीं रत्नें, सुवर्ण, वस्त्रें, गाई, वृषभ, क्षीरयुक्त अन्नें, दधि, अक्षता, सुगंध धूप व गंधें यांहींकरून अगस्तीची पूजा करावी ॥१६॥

नरपतिरिममर्घंश्रद्दधानोदधानःप्रविगतगददोषोनि
र्जितारातिपक्षः ॥ भवतियदिचदद्यात्सप्तवर्षाणिस
म्यग्जलनिधिरसनायाःस्वामितांयातिभूमेः ॥१७॥

अर्थ—राजा, श्रद्धायुक्तहोतसाता अर्घ ह्मणजे पूजा करील तर रोग व दोष यांहीं रहित व शत्रु जिंकणारा असा होईल आणि जर या विधीनें हें अर्घ अविच्छिन्न सात वर्षे करील तर तो समुद्रवलयांकित पृथ्वीचा (सार्वभौम) राजा होईल १७

द्विजोयथालाभमुपाहृतार्घःप्राप्नोतिवेदान्प्रमदाश्चपुत्रा
न् । वैश्यश्चगांभूरिधनंचशूद्रोरोगक्षयंधर्मफलंचसर्वे ॥१८

अर्थ—ब्राह्मण, जसे पदार्थ मिळतील त्यांणींच जर पूजा करील तर वेद, स्त्रिया, पुत्र यांतें प्राप्त होईल. वैश्य गाईंतें व शूद्र बहुत धनातें प्राप्त होतो. ब्राह्मणादि चारही वर्ण रोगनाश व धर्मफळ यांतें प्राप्त होतात ॥१८॥

रोगान्करोतिपरुषःकपिलस्त्ववृष्टिंधूम्रोगवाम
शुभकृत्स्फुरणोभयाय ॥ मांजिष्ठरागसदृशः
क्षुधमाहवांश्चकुर्यादणुश्चपुररोधमगस्त्यनामा॥१९॥

अर्थ—तो अगस्त्यनामाऋषि रूक्ष असेल तर रोग करितो. त्याचा पिंगटवर्ण असेल तर अवृष्टि होईल. धूम्रवर्ण असेल तर गाईंस अशुभ करील. चंचल असेल तर भय करितो. मांजिष्ठ (तांबडा) वर्ण असेल तर दुर्भिक्ष व युद्ध करील. फार बारीक असेल तर नगरास वेष्टन करील ॥१९॥

शातकुंभसदृशःस्फटिकाभस्तर्पयन्निवमहींकि
रणौघैः ॥ दृश्यतेयदिततःप्रचुरान्नाभूर्भवत्य
भयरोगजनाढ्या ॥२०॥

अर्थ—अगस्त्यऋषीचा रुप्यासारखा व स्फटिकासारखा वर्ण दिसेल व किरणसमुदायांनीं पृथ्वीतें पुष्ट करतो काय असा ऋषि जर दिसेल तर बहुत अन्न होईल व निर्भय आणि निरोगी असे लोक होतील ॥२०॥

उल्कयाविनिहतःशिखिनावाक्षुद्भयंमरकमेव
चधत्ते॥ दृश्यतेसकिलहस्तगतेर्केरोहिणीमुप
गतेस्तमुपैति ॥२१॥

अर्थ—उल्का (आकाशांतून पडणारा अग्निरूप तारा) व धूमकेतु यांहीं स्पृष्ट अगस्त्यऋषि, दुर्भिक्ष व महामारी यांतें करितो. तो ऋषि हस्तनक्षत्रीं सूर्य असतां दिसतो (उदय होतो) आणि रोहिणीनक्षत्रीं सूर्य असतां अस्ताप्रत पावतो ॥२१॥ याचे उदयास्त सर्वठिकाणीं एकाच वेळीं होतात असें नाहीं. स्थलास्थलाचे उदयास्त निरनिराळे आहेत. हे उदयास्त उज्जनीचे आहेत. ग्रहलाघव अस्तोदयाधिकार श्लोक २१

॥ इतिवृहत्संहितायांअगस्त्यचारोद्वादशोध्यायः ॥

Registered No 29 of 1873

# सूचना.

विद्वान, उदार, परोपकारी आणि श्रीमान् इत्यादि सद्गृहस्थास आम्ही विनयपूर्वक असे सुचवितो की, या ग्रंथाचा राजापासून रंकापर्यंत सर्वांस विशेष उपयोग होईल, असें समजून प्राकृत ( मराठी ) टीकेसह लोकहितो देशानें हें पुस्तक छापण्याचें काम सुरू केलें आहे यास वर्गणीद्वारा साह्य करून, ते पूर्ण करणें सुज्ञ देशबांधवांकडे आहे.

## वर्गणीचेदर.

| | किमत. | हाशील |
|---|---|---|
| आगाऊ किंवा अंक पोंचल्याच दिल्यास दर अंकास | ८ आणे | ६ पै |
| मागाहून दिल्यास दर अंकास | १० आणे | ६ पै |

किमतीबद्दल टिकिटा पाठविणे झाल्यास अर्धा आणा दराच्या पाठवाव्या

मुंबईत ठाकुरद्वारानजीक हरिबावाचे चाळींत रा० रा० नारोकृष्ण दुमाळे यांजकडे पैसा जमा करून त्यांची पावती घ्यावी.

अंक पोंचले असून पुस्तक घेण्याची ज्यांची इच्छा नसेल त्यांनीं कृपाकरून ते अंक बुकपोस्टानें परत आम्हाकडे रवाना करावे. दोन अंकांस एक आणा हाशील बस आहे मात्र रजोंव्यावर बुकपोस्ट असें लिहिलें पाहिजे.

श्री.

# बृहत्संहिता

(वराह मिहिरकृत.)

मूळश्लोक संस्कृत असून त्यांचा अर्थ प्राकृत (महाराष्ट्र) भाषेत लिहिला आहे.

# THE BRIHATSANHITÁ

[BY VARAHA-MIHIRA]

यांत व्यवहारोपयोगी सर्वप्रकारचे विषय आहेत.

पुस्तक १ लें तारीख २५ आगस्ट १८७३. अंक ४

VOL I 25th August 1873. No. 4

रत्नागिरी

येथें

जनार्दन हरि आठल्ये

यांणीं

आपल्या

जगन्मित्र छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

प्रत्येक अंकांत मोठ्या तक्तीचे सांच्याचीं चतुष्पत्री ३२ पृष्ठें असून सुमारें ८०० ग्रंथ येत जाईल.

## जगन्मित्र हपिसांत पुस्तकें विकत मिळतात तीं:—

१० श्रीमद्भागवत.
८ यथार्थदीपिका.
४ धर्मसिंधु (ग्रंथकार याचे घरचे पुस्तकाव रून छापिलेला).
४ भारतचंपु सटीक.
४ एकादशीव्रतसार.
३ बृहज्जातक.
२॥ गीतार्थबोधिनी.
२ विक्रमचरित्र.
२ फौजदारी ठराव.
१॥ नारायणभट्टी.
१॥ व्रतोद्यापनकौमुदी.
१।—॥। दिवाणी व फौजदारी निवडक निवाडे सन १८६४।६५ सालचे.
१। रसमाधव.
१। सर्वार्थचिंतामणि.
१। गोपीचंदराजाचें नाटक मराठी.
१ रुक्मिणीस्वयंवर.
१ बालवैद्य.
१ शिवलीलामृत.
·॥।=मुहूर्तगणपति.
·॥। मुहूर्तमार्तंड प्राकृत टीका. [ण.
·॥। पंचायुधप्रपंचाख्यभा
·॥। निर्मळमाहात्म्य.
·॥। गीतार्थमंजरी.
॥= विष्णुसहस्रनामाचा प्राकृत अर्थ.
·॥=पुनर्विवाहाच्या अशा

स्तवेचा बोधक वाद.
·॥=सप्तश्लोकी गीता.
·॥—प्रतिष्ठामयूख.
·॥· वेताळपंचविशी.
·॥· रत्ना॰ जि॰ वर्णन.
·॥. समर्थचिंतामणि.
·।≡लघुजातक.
·।≡माघसर्ग २ रा.
·।≡वनौषधिसंग्रह.
·।= पांडुरंगमाहात्म्य.
·।— भगवद्गीता.[आक्ट.
·।= नवीन पोलिसचा
·।= बर्थोल्डचरित्र.
·।= माघसर्ग १ ला.
·।= माघसर्ग २ रा.
·।= अपूर्णांक (शिवराम भास्कर काणेकृत).
·।= गुरुदत्तात्रय मीस्वाच्या आरत्या (अक्कलकोटचे स्वामींचे तसबिरीसह).
·।— तर्कदीपिका.
·।— कुडाकं सटीक.
·।॥ लवाकुशाख्यान.
·।॥ विदुरनीति.
·।· स्फुटज्योतिष.
·।· रघुवंशसर्ग ४ था.
·।· सिंहासनबत्तिशी.
·।· आनंदसागर.
८= तीर्थांचीं अष्टकें.
८= शनिमाहात्म्य.
८=। पल्लीपतनकारिका.
८=। गणपतिसहस्रनाम.

८= शिवसहस्रनामावलि.
८= प्रातःस्मरण.
८= बभ्रुवाहनआख्यान.
८= रामदासी श्लोक.
८= गोत्रावली (कऱ्हाडे ब्राह्मणाची).
८= विष्णुसहस्रनाम.
८= रामजोशीकृत लावण्या व पदें.
८= केकावलि.
८= संस्कृत आरत्या.
८= गायनप्रकार.
८= विधवाविवाह सहारसार.
८= केरोपंती पंचांग शके १७९९ चें.
८= गंगालहरी.
८—॥ विष्णुसहस्रनामावलि.
८—॥ विधवाविवाहखंडण.
८—॥ अंकलिपि.
८—। मेस्तक (तोंडचे हिशेब
८— नलाख्यान आर्या.
८— व्यंकटेशस्तोत्र.
८— रामदासाचे अभंग.
८— स्फुट आर्या व श्लोक
८— गर्गाचार्यकृत प्रश्नावलि.
८— एकादशीमाहात्म्य.
८— व्याकरणसार.
८॥। शके १७९६ सालचें पंचांग.
८॥। हरिपाठ.
८॥। धावे.—

## ॥ अथसप्तर्षिचारः ॥

सैकावलीवराजतिससितोत्पलमालिनीसहासेव ।
नाथवतीवचदिग्यैःकौवेरीसप्तभिर्मुनिभिः ॥१॥

अर्थ–उत्तरदिशा ज्या सप्तऋषींनीं नाथवती (पतियुक्त स्त्री) सारखी शोभते. नाथवती कशी. एकावली ( सौभाग्यसूचक विवाहसमयीं गळेसरी गळ्यात बांधितात ती) तिणें सहितच काय. व श्वेतकमलांच्या माळेने युक्त व हास्ययुक्त अशीच काय. या ७ ऋषींनीं उत्तरदिशा शोभते ॥१॥

ध्रुवनायकोपदेशान्नरिनर्तीवोत्तराभ्रमद्भिश्च ।
यैश्चारमहंतेषांकथयिष्येवृध्दगर्गमतात् ॥२॥

अर्थ–फिरणारे जे सप्तऋषि, त्यांहींकरून उत्तरदिशा ध्रुवसंज्ञक नायकाच्या उपदेशानें नाचतेच काय अशी आहे. त्या सप्तऋषींचा चार गर्गमताप्रमाणें मी सांगतों ॥२॥

आसन्मघासुमुनयःशासतिपृथ्वींयुधिष्ठिरेनृपतौ ।
षड्द्विकपंचद्वियुतःशककालस्तस्यराज्ञश्च ॥३॥

अर्थ–युधिष्ठिर राजा, राज्य करीत असता सप्तऋषि, मघानक्षत्रीं होते. त्या राजाच्या शककालास २५२६ मिळवावे ॥३॥ षट्द्विक ह्म० १२ व पचद्वि ह्म० १० एकूण १०१२ त्या राजाच्या शकास ह्म० गतकलीस मिळवावे. त्यांत १०० नीं भागावे. भागाकारास २७ नीं भागावे. आणि जो शेष अंक राहील तितकीं नक्षत्रें मघापासून पुढें मोजावीं व त्या नक्षत्रास ऋषि आहेत असें समजावे. उदाहरण, गतकलि ४९७४ यास १०१२ मिळविले असता ५९८६ होतात. त्यास १०० नीं भागिलें. भाग ५९ लागला. त्यास २७ नीं भागिलें. बाकी ५ राहिले. व शंभराची बाकी ८६ आहे. मघापासून ५ नक्षत्रें भुक्त होऊन सहाव्याचीं ८६ वर्षे झालीं आहेत असें समजावें.

टीकेंत जें उदाहरण वगैरे लिहिलें आहे तें बरोबर बसत नाहीं. यास्तव ते न लिहिता मूळश्लोकांतील पदावरूनच जो अर्थ मला बरा दिसला तो लिहिला आहे व त्याप्रमाणेंच जवळजवळ सांप्रत सप्तऋषि आहेत.

एकैकस्मिन्नृक्षेशतंशतंतेचरंतिऋक्षाणां ।
प्रागुत्तरतश्चैतेसदोदयंतेससाध्वीकाः ॥४॥

अर्थ—ते सप्तऋषि, एक एक नक्षत्रीं शभर शभर वर्षे रहातात. हे ईशानी दिशेस अरुंधतीसहित निरंतर उदयातें पावतात ॥४॥

पूर्वेभागेभगवान्मरीचिरपरेस्थितोवसिष्ठोस्मात् ।
तस्यांगिरास्ततोत्रिस्तस्यासन्नःपुलस्त्यश्च ॥५॥
पुलहःक्रतुरितिभगवानासन्नानुक्रमेणपूर्वाद्याः ।
तत्रवसिष्ठंमुनिवरमुपाश्रितारुंधतीसाध्वी ॥६॥

अर्थ—पूर्वेकडे भगवान् मरीचिऋषि, त्याचे पश्चिमेस वसिष्ठ, त्याहून पश्चिमेस अंगि' रा, त्याहून पश्चिमेस अत्रि, त्याचे जवळ पुलस्त्य, पुलह, क्रतु; हे सप्तऋषि ओळीनें पूर्वेपासून रहातात. त्यात मुनिश्रेष्ठवसिष्ठाजवळ पतिव्रता अरुंधती आहे ॥५॥६॥

उल्काशनिधूमाद्यैर्हताविवर्णाविरश्मयोन्ह्स्वाः ।
हन्युःस्वंस्वंवर्गंविपुलाःस्निग्धाश्चतद्वृद्ध्यै ॥ ७ ॥

अर्थ—उल्का, अशनि ( वज्र ), धूम, नीहार ( बर्फ ) इत्यादिकेंकरून हत ( आ- च्छादित ), विवर्ण ( फिकट ), किरणरहित व ह्रस्व ( बारीक लिंग ) असे ते ऋ षि जर असतील तर आपापल्या वक्ष्यमाण वर्गाचा नाश करितात व ते विपु ळ ( मोठेबिंब ), निर्मल असतील तर आपल्या वर्गाची वृद्धि करितात ॥७॥

गंधर्वदेवदानवमंत्रौषधिसिद्धयक्षनागानां ।
पीडाकरोमरीचिर्ज्ञेयोविद्याधराणांच ॥ ८ ॥
शकयवनदरदपारतकांबोजांस्तापसान्वनोपेतान् ।
हंतिवसिष्ठोभिहतोविवृद्धिदोरश्मिसंपन्नः ॥९॥

अर्थ—गंधर्व ( अश्वमुखनर देवयोनि ), देव, दैत्य, मंत्र, औषधि, सिद्ध, यक्ष, सर्प, विद्याधर ( देवयोनि ), यांस मरीचिऋषि सतेज असतां पीडा होते व स्निग्ध अ० याची वृद्धि होत्ये ॥ हा मरीचिवर्ग ॥८॥ शक, ( म्लेच्छ ), यवन, दरद ( रानटी लोक ), पारत ( पारा ), कांबोज ( कनोजदेशातील लोक ), तपस्वी, वनवासी, यां च्या, वसिष्ठ तम अ० नाश व किरणयुक्त अ० वृद्धि होत्ये ॥९॥

अंगिरसोज्ञानयुताधीमंतोब्राह्मणाश्चनिर्दिष्टाः ।

अत्रेःकांतारभवाजलजान्यंभोनिधिःसरितः॥ १०॥

अर्थ–ज्ञानयुक्त, बुद्धिमान्, ब्राह्मण यांस अंगिराऋषि सतप्त व स्निग्ध असतां अशुभ व शुभ होतें. अरण्यामध्यें झालेलें, उदकापासून झालेलीं द्रव्यें, समुद्र व नद्या यांस अत्रिऋषि तप्त अ० दुःख व स्निग्ध अ० सुख होतें ॥ १० ॥

रक्षःपिशाचदानवदैत्यभुजंगाःस्मृताःपुलस्त्यस्य ।
पुलहस्यतुमूलफलंक्रतोस्तुयज्ञाःसयज्ञभृतः ॥११॥

अर्थ–राक्षस, पिशाच, दानव, दैत्य, सर्प, यांस पुलस्त्यऋषि पीडित अ० दुःख व स्निग्ध अ० सुख होतें. मूलें, फलें यांस पुलहऋषि तप्त अ० दुःख व स्निग्ध अ० सुख होतें. यज्ञ व यज्ञकरणारे यांस क्रतुऋषि तप्त अ० दुःख व स्निग्ध अ० सुख होतें ॥ ११ ॥

॥ इतिसप्तर्षिचारस्त्रयोदशः ॥१३॥

## ॥ अथकूर्मविभागः ॥

नक्षत्रत्रयवर्गैराग्नेयाद्यैर्व्यवस्थितैर्नवधा ।
भारतवर्षेमध्यात्प्रागादिविभाजितादेशाः ॥१॥

अर्थ–कृत्तिकापासून तीन नक्षत्राचा १ याप्रमाणे २७ नक्षत्राचे ९ विभाग करून ते भाग या भरतखंडामध्यें मध्यापासून पूर्वादिदिशाक्रमानें नऊ विभागांवर योजिले आहेत ॥१॥

भद्रारिमेदमांडव्यसाल्वनीपोज्जिहानसंख्याताः ।
मरुवत्सघोषयामुनसारस्वतमत्स्यमाध्यमिकाः ॥२॥
माथुरकोपज्योतिषधर्मारण्यानिशूरसेनाश्च ।
गौरग्रीवोद्देहिकपांडुगुडाश्वत्थपांचालाः ॥ ३ ॥
साकेतकंककुरुकालकोटिकुकुराश्चपारियात्रनगः ।
औदुंबरकापिष्ठलगजाह्वयाश्चेतिमध्यमिदं ॥४॥

अर्थ—भद्र, अरिमेद, माडव्य, साल्वनीप, उज्जिहान, संख्यात, मरुभू, वत्सघोष, यामुन, सारस्वत, मत्स्य, माध्यमिक, माथुरक, उपज्योतिष, धर्मारण्य, शूरसेन, गौरग्रीव, उद्देहिक, पांडुगुड, अश्वत्थ, पांचाल, साकेत, कंक, कुरु, कालकोटि, कुकुर, पारियात्रपर्वत, औदुंबर, कापिष्ठल, गजाव्हय ( हस्तनापुर ), हे सर्व देश भरतखंडाच्या मध्यभागीं आहेत हें मध्य होय ॥२।३।४॥

अथपूर्वस्यामंजनवृषभध्वजपद्ममाल्यवद्गिरयः ।
व्याघ्रमुखसुह्मकर्वटचांद्रपुराःशूर्पकर्णाश्च ॥ ५ ॥
खसमगधशबरगिरिमिथिलसमतटोड्राश्वव
दनदंतुरकाः । प्राग्ज्योतिपलौहित्यक्षीरोद
समुद्रपुरुपादाः ॥ ६ ॥
उदयगिरिभद्रगौडकपौंड्रोत्कलकाशिमेकलांबष्ठाः ।
एकपदतामलिप्तिककोशलकावर्धमानश्च ॥ ७ ॥

अर्थ—यानंतर पूर्वदिशेकडचे देश सांगतो. अंजन, वृषभध्वज, पद्म, माल्यवान् हे पर्वत; व्याघ्रमुखजन, सुह्मदेश, कर्वटशहर, चंद्रपुरनगरांतील लोक, शूर्पकर्ण लोक, खस, मगध, शबर, गिरि ( शबर पर्वत ), मिथिल, समतट, उड्र, अश्ववदन, दंतुरक, प्राग्ज्योतिष, लौहित्यनद, क्षीरोद ( हे समुद्र ), पुरुषभक्षक लोक, उदयाद्रि, भद्र, गौडक, पौंड्र, उत्कल, काशि, मेकल, आंबष्ठ, एकपद, तामलिप्तिक, कोशलक, वर्धमान हे सर्व पूर्वेकडे ॥५।६।७॥

आग्नेय्यांदिशिकोशलकलिंगवंगोपवंगजठरांगाः ।
शौलिकविदर्भवत्सांध्रचेदिकाश्चोर्ध्वकंठाश्च ॥८॥
वृपनालिकेरचर्मद्वीपाविंध्यांतवासिनस्त्रिपुरी ।
श्मश्रुधरहेमकूटव्यालग्रीवामहाग्रीवाः ॥९॥
किष्किंधकंटकस्थलनिपादराष्ट्राणिपुरिकदाशार्णाः ।
सहनग्नपर्णशबरैराश्लेपाद्येत्रिकेदेशाः ॥१०॥

अर्थ—आग्नेयीदिशेकडे कोशल, कलिंग, वंग, उपवंग, जठरांग, शौलिक, विदर्भ, वत्स, आंध्र, चेदिक, ऊर्ध्वकंठ, वृषस्थान, नालिकेर, चर्मद्वीप, विंध्यपर्वतावर रहाणारे, त्रिपुरी ( नगरी ), श्मश्रुधरजन, हेमकूटस्थान, व्यालग्रीवजन, महाग्रीवजन,

किष्किंधदेश, कंटकस्थल, निषादराष्ट्र, पुरिक, दाशार्ण, नग्नशबर, पर्णशबर, हे सर्व आश्लेषादि त्रिकामधील आहेत ॥८।९।१०॥

अथदक्षिणेनलंकाकालाजिनसौरिकीर्णता
लिकटाः । गिरिनगरमलयदर्दुरमहेंद्रमालिं
द्यभरुकच्छाः ॥ ११ ॥
कंकटटंकणवनवासिशिबिकफणिकारकौंक
णाभीराः । आकरवेणावंतकदशपुरगोनर्द
केरलकाः ॥ १२ ॥
कर्णाटमहाटविचित्रकूटनासिक्यकोल्लगिरिचोलाः ।
क्रौंचद्वीपजटाधरकावेर्यौरिष्यमूकश्च ॥ १३ ॥
वैडूर्यशंखमुक्तात्रिवारिचरधर्मपत्तनद्वीपाः ।
गणराज्यकृष्णवेल्लूरपिशिकशूर्पाद्रिकुसुमनगाः ॥१४॥
तुंबवनकार्मणेयकयाम्योदधितापसाश्रमाऋषिकाः ।
कांचीमरुचीपत्तनचेर्यार्यकसिंहलाऋषभाः ॥ १५ ॥
बलदेवपत्तनंदंडकावनतिमिंगिलाशनाभद्राः ।
कच्छोथकुंजरदरीसताम्रपर्णीतिविज्ञेयाः ॥ १६ ॥

अर्थ—दक्षिणदिशेकडे लंका, कालाजिन, सौरिकीर्ण, तालिकट, गिरिनगर, मलय, दर्दुर, महेंद्र, मालिंद्य, भरुकच्छ, कंकट, टंकण, वनवासी, शिबिक, फणिकार, कोंकण, आभीर, आकरस्थान, ( रत्नांच्या खाणी ), वेणा ( नदी ), आवंतक लोक, दशपुर, गोनर्द, केरलक, कर्णाट, महाटवी, चित्रकूटपर्वत, नासिक्य, कोल्लगिरि, चोल, क्रौंचद्वीप, जटाधर, कावेरीतीरस्थ, रिष्यमूक, वैडूर्य, ( शंखमुक्ता जेथें उत्पन्न होतात ते ), अत्रिऋषीचें स्थान, वारिचर, धर्मपत्तनद्वीप, गणराज्य, कृष्णवेल्लूर, पिशिक, शूर्पाद्रि, कुसुमनग, तुंबवन, कार्मणेयक, दक्षिणसमुद्र, तापसांचे आश्रम, ऋषिकजन, कांची, मरुचीपत्तन, चेर्यार्यक, सिंहल, ऋषभ, बलदेवपत्तन, दंडकावन, तिमिंगिलाशन ( जन ), भद्र ( भद्रसंज्ञक जन ), कच्छ, कुंजरदरी, ताम्रपर्णीनदी, हे दक्षिणेकडचे देश, उत्तराफल्गुनी इत्यादि त्रिकांतले जाणावे ॥११।१२।१३।१४।१५।१६॥

नैऋत्यांदिशिदेशाःपल्हवकांबोजसिंधुसौवीराः ।

वडवामुखारवांबष्ठकपिलनारीमुखानर्ताः ॥१७॥
फेणगिरियवनमाकरकर्णप्रावेयपारशवशूद्राः ।
वर्वरकिरातखंडक्रव्याश्याभीरचंचूकाः ॥ १८ ॥
हेमगिरिसिंधुकालकरैवतकसुराष्ट्रवादरद्राविडाः ।
स्वात्याद्येभत्रितयेज्ञेयश्चमहार्णवोत्रैव ॥१९॥

अर्थ— नैर्ऋतिदिशेकडचे देश. पल्हव, कांबोज, सिंधु, सौवीर, वडवामुख, आरव, आंबष्ठ, कपिल, नारीमुख, आनर्त, फेणगिरी, यवन, माकर, कर्णप्रवेय, पारशव, शूद्र, बर्बर, किरात, खंड, क्रव्यादय, आभीर, चंचूक, हेमगिरि, सिंधुनद, कालक, रैवतक, सुराष्ट्र, बादर, द्रविड, महार्णव, हे होत. हे स्वातीपूर्वक तीन नक्षत्रीं जाणावे ॥१७।१८।१९॥

अपरस्यांमणिमान्मेघवान्वनौघःक्षुरार्पणोस्तगिरिः ।
अपरांतकशांतिकहैहयप्रशस्ताद्रिवोक्काणाः ॥२०॥
पंचनदरमठपारततारक्षितिजृंगवैश्यकनकशकाः ।
निर्मर्यादाम्लेच्छायेपश्चिमदिक्स्थितास्तेच ॥२१॥

अर्थ—पश्चिमेकडचे देश. . मणिमान् ( पर्वत ), मेघवान् , वनौघ, क्षुरार्पण, अस्तपर्वत, अपरांतक, शांतिक, हैहय, प्रशस्ताद्रि, वोक्काण, पंचनद, रमठ, पारत, तारक्षितिजृंग, वैश्य, कनक, शक, निर्मर्यादम्लेच्छ, हे होत. हे ज्येष्ठादि तीन नक्षत्रीं जाणावे ॥२०।२१॥

दिशिपश्चिमोत्तरस्यांमांडव्यतुखारताल्हलमद्राः ।
अश्मककुलूतलहडस्त्रीराज्यनृसिंहवनखस्थाः ॥२२॥
वेणुमतीफल्गुलुकागुरुहामरुकुच्चचर्मरंगाख्याः ।
एकविलोचनशूलिकदीर्घग्रीवास्यकेशाश्च ॥ २३ ॥

अर्थ—वायव्यदिशेकडे देश. मांडव्य, तुखार, ताल्हल, मद्र, अश्मक, कुलूत, लहड, स्त्रीराज्य, नृसिंहवन, खस्थ, वेणुमतीनदी, फल्गुनदी, लुका, गुरुहा, मरुकुच, चर्मरंग, एकलोचन, शूलिक, दीर्घग्रीव, दीर्घास्य, दीर्घकेश हे होत. हे उत्तराषाढादिक तीन नक्षत्रीं जाणावे ॥२२।२३॥

उत्तरतःकैलासोहिमवान्वसुमान्गिरिर्धनुष्मांश्च।

क्रौंचोमेरुःकुरवस्तथोत्तराःक्षुद्रमीनाश्च ॥ २४ ॥
केकयवसातियामुनभोगप्रस्थार्जुनायनाग्नीध्राः ।
आदर्शांतर्द्वीपित्रिगर्ततुरगाननाश्वमुखाः ॥२५॥
केशधरचिपिटनासिकदासेरकवाटधानशरधानाः ।
तक्षशिलपुष्करावतकैलावतकंठधानाश्च ॥ २६ ॥
अंवरमद्रकमालवपौरवकच्छारदंडपिंगलकाः ।
माणहलहूणकोहलशीतकमांडव्यभूतपुराः ॥२७॥
गांधारयशोवतिहेमतालराजन्यखचरगव्याश्च ।
यौधेयदासमेयाःश्यामाकाःक्षेमधूर्ताश्च ॥ २८ ॥

अर्थ–उत्तरदिशेकडील देश. कैलासपर्वत, हिमवान्, वसुमान्, धनुष्मान्, क्रौंच' मेरु (हे पर्वत), उत्तरकुरु, क्षुद्रमीन, कैकय, वसाति, यामुन, भोगप्रस्थ, अर्जुनायन, आग्नीध्र, आदर्श, अंतर्द्वीपि, त्रिगर्त, तुरगानन, अश्वमुख, केशधर, चिपिटनासिक, दासेरक, वाटधान, शरधान, तक्षशिल, पुष्कलावत, कैलावत, कंठधान, अंबर, मद्रक, मालव, पौरव, कच्छर, दंडपिंगलक, माणहल, हूण, कोहल, शीतक, मांडव्य, भूतपुर, गांधार, यशोवती (नगरी), हेमताल, राजन्य, खचर, गव्य, यौधेय, दासमेय, श्यामाक, क्षेमधूर्त, हे होत. हे शततारकादि तीन नक्षत्रीं जाणावे ॥२४।२५।२६।२७।२८॥

ऐशान्यांमेरुकनष्टराज्यपशुपालकीरकाश्मीराः ।
अभिसारदरदतंगणकुलूतसैरिंधवनराष्ट्राः ॥ २९ ॥
ब्रह्मपुरदार्वडामरवनराज्यकिरातचीनकौणिंदाः ।
भल्लापलोलजटासुरकुनठखसघोषकुचिकाख्याः ॥३०॥
एकचरणानुविश्वाःसुवर्णभूर्वसुवनंदिविष्ठाश्च ।
पौरवचीरनिवसनत्रिनेत्रमुंजाद्रिगंधर्वाः ॥ ३१ ॥

अर्थ–ईशानीदिशेकडचेदेश. मेरुक, नष्टराज्य, पशुपाल, कीर, काश्मीर, अभिसार, दरद, तगण, कुलूत, सैरिंध, वनराष्ट्र, ब्रह्मपुर, दार्व, डामर, वनराज्य, किरात, चीन, कौणिंद, भल्लापलोल, जटासुर, कुनठ, खस, घोष, कुचिक, एकचरण, अनुविश्व, सुवर्णभू, वसुधन, दिविष्ठ, पौरव, चीर, निवसन, त्रिनेत्र, मुंजाद्रि, गंधर्व हे होत. हे रेवत्यादि तीन नक्षत्रीं जाणावे ॥२९।३०।३१॥

वर्गैराग्नेयाद्यैःक्रूरग्रहपीडितैःक्रमेणनृपाः ।
पांचालोमागधिकःकालिंगश्चक्षयंयाति ॥ ३२ ॥
आवंतोथानर्तोमृत्युंचायातिसिंधुसौवीरः ।
राजाचहारहौरोमद्रेशोन्यश्चकौलिंदः ॥३३॥

अर्थ–कृत्तिकादि तीन तीन नक्षत्रवर्ग पापग्रहानीं पीडित असता अनुक्रमानें वक्ष्यमाण राजाचा नाश होतो. कृत्तिका, रोहिणी, मृगशीर्ष हीं ३ नक्षत्रें पीडित अ० पाचाल राजा; आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, मागधिकराजा; आश्लेषा, मघा, पूर्वा, कालिंगराजा; उत्तरा, हस्त, चित्रा, आवतराजा; स्वाती, विशाखा, अनुराधा, आनर्तराजा; ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, सिंधुसौवीरराजा; उत्तराषाढा, श्रवण, धनिष्ठा, हारहौरराजा; शततारका, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभा०, मद्रराजा, रेवती, अश्विनी, भरणी, कौलिंदराजा; हे राजे हीं नक्षत्रें रवि, भौम, शनि, या पापग्रहानीं पीडित असता मृत्यु पावतात ॥३२।३३॥

## इतिबृहत्संहितायांकूर्मविभागोनामचतुर्दशोऽध्यायः १४

---

## ॥ अथनक्षत्रव्यूहः ॥

---

आग्नेयेसितकुसुमाहिताग्निमंत्रज्ञसूत्रभाष्यज्ञाः ।
आकरिकनापितद्विजघटकारपुरोहिताब्दज्ञाः ॥१॥

अर्थ–श्वेतपुष्पें, अग्निहोत्री, मांत्रिक, सूत्रज्ञ, भाष्यज्ञ, रत्नाच्या खाणीवर योजलेले, नापित, ब्राह्मण, कुंभार, पुरोहित, ज्योतिषी हे कृत्तिकानक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥१॥

रोहिण्यांसुव्रतपण्यभूपधनियोगयुक्तशाकटिकाः ।
गोवृषजलचरकर्षकशिलोच्चयैश्वर्यसंपन्नाः ॥२॥

अर्थ–उत्तमव्रतस्थ, पण्य ( विकण्याचा जिन्नस ), राजा, धनवान्, योगयुक्त, गाड्यावर जीविका करणारे, गाई, वृषभ, जलचरप्राणी, शेतीलोक, पर्वत, ऐश्वर्ययुक्त हे रोहिणीचा आश्रय करणार होत ॥२॥

**मृगशिरसिसुरभिवस्त्राब्जकुसुमफलरत्नवनचरविहंगाः ।
मृगसोमपीथिगांधर्वकामुकालेखहाराश्च ॥३॥**

अर्थ—सुगधद्रव्यें, वस्त्रे, जलोद्भव पदार्थ, पुष्पें, फलें, रत्नें, वनवासी, पक्षी, आरण्यपशु, सोमपानकरणारे, गाणारे, कामयुक्त, लेखहर (जासूद), हे मृगशीर्ष नक्षत्राचा आश्रय करून रहाणारे होत ॥३॥

**रौद्रेवधबंधानृतपरदारस्तेयशाठ्यभेदरताः ।
तुपधान्यतीक्ष्णमंत्राभिचारवेतालकर्मज्ञाः ॥४॥**

अर्थ—वध, बध, अनृत, परस्त्री, चौर्य, शाठ्य (परकार्यविमुख), भेद, या सर्वांचाठाईं जे तत्पर ते; तुषधान्य (साळी इत्यादि), उग्र, मंत्रवेत्ते, वशीकरणादि कर्मवेत्ते, वेतालोत्थापनादि कर्म जाणणारे, हे सर्व आर्द्रानक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥४॥

**आदित्येसत्यौदार्यशौचकुलरूपधीयशोर्थयुताः ।
उत्तमधान्यंवणिजःसेवाभिरताःसशिल्पिजनाः ॥५॥**

अर्थ—सत्यभाषी, दानशील, शुद्ध (परद्रव्यादिकीं अलुब्ध), कुलीन, सुरूप, बुद्धिमान्, यशस्वी, द्रव्यवान्, उत्तमधान्य, वणिज (व्यापारी), सेवक, शिल्पिजन (सुतार, कुंभार इ०), हे पुनर्वसुनक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥५॥

**पुष्येयवगोधूमाःशालीक्षुवनानिमंत्रिणोभूपाः ।
सलिलोपजीविनःसाधवश्चयज्ञेष्टिसक्ताश्च ॥६॥**

अर्थ—यव, गोधूम, शाली, इक्षु, वनें, प्रधान, राजे, सलिलोपजीवी (धीवरादिक), साधु, यज्ञाच्याठाईं आसक्त, पुत्रकाम्यादि इष्टीचाठाईं आसक्त हे सर्व पुष्यनक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥६॥

**अहिदेवेकृत्रिमकंदमूलफलकीटपन्नगविषाणि ।
परधनहरणाभिरतास्तुपधान्यंसर्वभिषजश्च ॥७॥**

अर्थ—कृत्रिमद्रव्यें (कसनाचीं मोलें इ०), कंद, मूळ, फळ, कीट, सर्प, विष, परद्रव्यहरण करणारे, शाली इत्यादि धान्य, सर्वदेहचिकित्सक (वैद्य), हे आश्लेषाचा आश्रय करणारे होत ॥७॥

पित्र्येधनधान्याढ्याःकोष्ठागाराणिपर्वताश्रयिणः ।
पितृभक्तवणिक्शूराःक्रव्यादाःस्त्रीद्विषोमनुजाः ॥८॥

अर्थ–धनधान्ययुक्त, कोठारें, पर्वतवासी, पितृभक्त, व्यापारी, शूर, मांसभक्षक, स्त्रियांचा द्वेषकरणारे मनुष्य हे मघानक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥८॥

प्राक्फल्गुनीपुनटयुवतिसुभगगांधर्वशिल्पिपण्यानि ।
कर्पासलवणमाक्षिकतैलानिकुमारकाश्चापि ॥ ९ ॥

अर्थ–नट, तरुणस्त्री, सर्वजनप्रिय, गायक, शिल्पी ( चित्रकारादिक ), पण्य ( क्रयविक्रयद्रव्य ), कापूस, लवण, मध, तेल, बालक, हे पूर्वांचा आश्रय करणारे होत ॥९॥

अर्यम्णेमार्दवशौचविनयपाखंडिदानशास्त्ररताः ।
शोभनधान्यमहाधनधर्मानुरताःसमनुजेंद्राः ॥१०॥

अर्थ–मृदुस्वभाव, शुद्ध, नीतिज्ञ, पाखण्डिलोकांत आसक्त, दानरत, शास्त्ररत, शोभनधान्ये ( स्वासिकशाली ), अतिधनयुक्त, धर्मानुरत, राजे हे सर्व उत्तरानक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥१०॥

हस्तेतस्करकुंजररथिकमहामात्रशिल्पिपण्यानि ।
तुषधान्यंश्रुतयुक्तावणिजस्तेजोयुताश्चात्र ॥ ११ ॥

अर्थ–चोर, हत्ती, गाडींतून जाणारे, हत्तींचे महात, शिल्पी, पण्य, तुषधान्य, श्रुतयुक्त ( बहुश्रुत ), व्यापारी, तेजस्वी, हे हस्तनक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥११॥

त्वाष्ट्रेभूषणमणिरागलेख्यगांधर्वगंधयुक्तिज्ञाः ।
गणितपटुतंतुवायाःशालाक्याराजधान्यानि ॥१२॥

अर्थ–अलंकरणादिकींकुशल, मणिलक्षणज्ञ (रत्नपारखी), रंगज्ञ ( रंगारी ), लेखक, गायक, गंधयुक्तिज्ञ ( बहुत सुगंधिद्रव्ये एकत्र करून कांहीं एक नवीन सुगंध उत्पन्न करणारे ), गणितकुशल, कोष्टी, डोळ्यांचे वैद्य, राजधान्ये ( कमोदइ० शाली ), हे चित्रानक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥१२॥

**स्वातौखगमृगतुरगावणिजोधान्यानिवातबहुलानि ।**
**अस्थिरसौहृदलघुसत्वतापसाःपण्यकुशलाश्च ॥१३॥**

अर्थ—पक्षि, आरण्यपशु, अश्व, व्यापारी, धान्यें, वातबहुल ( हरभरे इत्यादि वातधान्यें ), क्षणिकमित्र, लहानप्राणी, तपस्वी, क्रयविक्रयकुशल हे स्वातीनक्षत्राचा आश्रयकरणारे होत ॥१३॥

**इंद्राग्निदैवतेरक्तपुष्पफलशाखिनःसतिलमुद्गाः ।**
**कर्पासमाषचणकाःपुरंदरहुताशभक्ताश्च ॥ १४ ॥**

अर्थ—तांबडीं पुष्पें व फळें आहेत ज्यांस असे वृक्ष, तिल, मूग, कापूस, माष, चणक, इंद्राचे व अग्नीचे भक्त हे विशाखा नक्षत्राचा आ० करणारे होत ॥१४॥

**मैत्रेशौर्यसमेतागणनायकसाधुगोष्ठियानरताः ।**
**येसाधवश्चलोकेसर्वंचशरत्समुत्पन्नं ॥ १५ ॥**

अर्थ—बलयुक्त, गणमुख्य, साधुरत, गोष्ठिरत, वाहनरत किंवा गमनरत, लोकांमध्यें जे साधु ते, शरदतूमध्यें जें धान्यादि उत्पन्न झालें ते सर्व, हे अनुराधानक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥१५॥

**पौरंदरेतिशूराःकुलवित्तयशोन्विताःपरस्वहृतः ।**
**विजिगीषवोनरेंद्राःसेनानांचापिनेतारः ॥ १६ ॥**

अर्थ—अतिशूर, कुलीन, द्रव्यवान्, यशस्वी, परद्रव्यहारक, शत्रु जिंकण्याची इच्छा करणारे राजे, सेनापति हे ज्येष्ठानक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥१६॥

**मूलेभेषजभिषजोगणमुख्याःकुसुममूलफलवार्ताः ।**
**बीजान्यतिधनयुक्ताःफलमूलैर्येचवर्तंते ॥ १७ ॥**

अर्थ—औषध, वैद्य, समुदायामध्यें मुख्य, पुष्पें, मुळें, फळें यांचा व्यापार करणारे; बीजें, अतिधनवान्, फलमूलाहीं वांचणारे, हे मूलनक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥१७॥

**आप्येमृदवोजलमार्गगामिनःसत्यशौचधनयुक्ताः ।**
**सेतुकरवारिजीवकफलकुसुमान्यंबुजातानि ॥१८॥**

अर्थ—मृदुपदार्थ, जलमार्गानें जाणारे, सत्ययुक्त, शौचयुक्त, धनयुक्त, सेतु (पूल) करणारे, उदकानें नाचणारे, उदकापासून झालेलीं फलें व पुष्पें हे पूर्वाषाढाचा आश्रय करणारे होत ॥१८॥

**विश्वेश्वरेमहामात्रमल्लकरितुरगदेवताभक्ताः ।**
**स्थावरयोधाभोगान्विताश्चयेचौजसायुक्ताः ॥१९॥**

अर्थ—महामात्र (महात), मल्ल, गज, अश्व, देवताभक्त, वृक्ष, योध्ये, भोगयुक्त, तेजस्वी हे उत्तराषाढानक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥१९॥

**श्रवणेमायापटवोनित्योद्युक्ताश्चकर्मसुसमर्थाः ।**
**उत्साहिनःसधर्माभागवताःसत्यवचनाश्च ॥२०॥**

अर्थ—मायावी, सर्वकाल उद्योगी, व्यापारादिकर्माचाठाईं समर्थ, उत्साहयुक्त, धर्मयुक्त, भगवद्भक्त, खरे बोलणारे हे सर्व श्रवणनक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥२०॥

**वसुभेमानोन्मुक्ताःक्लीबाश्चलसौहृदाःस्त्रियांद्वेष्याः ।**
**दानाभिरतावहुवित्तसंयुताःशमपराश्चनराः॥ २१ ॥**

अर्थ—मानरहित, नपुंसक, अस्थिरमित्र, स्त्रियांचा द्वेष करणारे, दानतत्पर, बहुतद्रव्ययुक्त, शांतिपरमनुष्य, हे धनिष्ठान० आश्रय करणारे होत ॥ २१ ॥

**वरुणेशेपाशिकमत्स्यवंधजलजानिजलचराजीवाः ।**
**सौकरिकरजकशौंडिकशाकुनिकाश्चापिवर्गेस्मिन् ॥२२॥**

अर्थ— फास घालणारे, मत्स्यबंधक, जलोत्पन्नद्रव्यें, जलचरजीव, डुकरें बाधणारे, परीट, मद्यप, पक्षी धरणारे, हे सर्व शततारका नक्षत्राचा आश्रय करणारे होत२२

**आजेतस्करपशुपालहिंस्रकीनाशनीचशठचेष्टाः ।**
**धर्मव्रतैर्विरहितानियुद्धकुशलाश्चयेमनुजाः ॥२३॥**

अर्थ—चोर, पशुपालक, क्रूर, कृपण, नीचकर्मरत, शठ (अप्रमाणिक, दुष्ट, दुराचरणी इ० दुर्गुणी), धर्मव्रतांहीं रहित, बाहुयुद्ध जाणणारे मनुष्य हे पूर्वाषाढाचा आश्रय करणारे होत ॥२३॥

**आहिर्बुध्न्येविप्राःक्रतुदानतपोयुतामहाविभवाः ।**
**आश्रमिणःपाखंडानरेश्वराःसारधान्यंच ॥२४॥**

अर्थ—ब्राह्मण, यज्ञकरणारे, दाते, तपस्वी, द्रव्य व ऐश्वर्य याणीं युक्त, चतुर्थाश्रमी ( सन्याशी ), पाखंडी, राजे, उत्तमधान्य ( साळी इ० ), हे उत्तराभाद्रपदाचा आश्रय करणारे होत ॥२४॥

**पौष्णेसलिलजफलकुसुमलवणमणिशंखमौक्तिकाब्जानि।**
**सुरभिकुसुमानिगंधावणिजोनौकर्णधाराश्च ॥ २५ ॥**

अर्थ—उदकोत्पन्नद्रव्यें, फळें, पुष्पें, लवण, रत्नें, शंख, मोत्यें, कमळें, सुगंधपुष्पें, सुगंधिद्रव्यें, व्यापारी, नाविक, हे रेवती नक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥२५॥

**अश्विन्यामश्वहराःसेनापतिर्वैद्यसेवकास्तुरगाः ।**
**तुरगारोहाश्ववणिग्रूपोपेतास्तुरगरक्षाः ॥ २६ ॥**

अर्थ—घोडे घेणारे, सेनापति, वैद्य, सेवक, अश्व, स्वार, व्यापारी, सुरूप, अश्वरक्षक, हे अश्विनीनक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥२६॥

**याम्येसृक्पिशितभुजःक्रूरावधबंधताडनासक्ताः ।**
**तुषधान्यंनीचकुलोद्भवाविहीनाश्चसत्वेन ॥२७॥**

अर्थ—रक्त व मांस खाणारे, क्रूर, वध, बंधन, ताडन, करणारे, तुषधान्य, नीचकुलोत्पन्न, नि सत्व हे भरणीनक्षत्राचा आश्रय करणारे होत ॥२७॥

**पूर्वात्रयंसानलमग्रजानांराज्ञांतुपुष्येणसहोत्तराणि ।**
**सपौष्णमैत्रंपितृदैवतंचप्रजापतेर्भंचकृषीवलानां ॥२८॥**

अर्थ—पूर्वा, पूर्वाषा०, पूर्वाभा०, हीं नक्षत्रें ब्राह्मणाचीं होत. उत्तरा, उत्तराषा०, उत्तराभा०, हीं क्षत्रियाचीं होत. रेवती, अनुराधा, मघा, रोहिणी हीं शेतीलोकाचीं ( वैश्याची ), होत ॥२८॥

**आदित्यहस्ताभिजिदाश्विनानिवणिग्जना**
**नांप्रवदंतिभानि । मूलत्रिनेत्रानिलवारुणा**
**निभान्युग्रजातेःप्रभविष्णुतायाः ॥ २९ ॥**

अर्थ—पुनर्वसु, हस्त, अभिजित्, अश्विनी हीं नक्षत्रें वैश्याचीं होत. मूल, आर्द्रा, स्वाती, शततारका, हीं नक्षत्रें होणाऱ्या उग्र जातीचीं होत ॥२९॥

सौम्यैंद्रचित्रावसुदैवतानिसेवाजनस्वाम्यमु
पागतानि । सार्पविशाखाश्रवणोभरण्यश्चं
डालजातेरितिनिर्दिशंति ॥ ३० ॥

अर्थ–मृगशीर्ष, ज्येष्ठा, चित्रा, धनिष्ठा, हीं न० सेवाकरणारांचीं होत. आश्लेषा, विशाखा, श्रवण, भरणी हीं नक्षत्रें चडाल जातीचीं होत ॥३०॥

रविरविसुतभोगमागतंक्षितिसुतभेदनवक्रदूषितं ।
ग्रहणगतमथोल्कयाहतंनियतमुपाकरपीडितंचयत् ३१
तदुपहतमितिप्रचक्षतेप्रकृतिविपर्यययातमेववा ।
निगदितपरिवर्गदूषणंकथितविपर्ययगंसमृद्धये ॥३२॥

अर्थ–सूर्य व शनि याणीं भोगलेलें, मगळानें भेदन केलेलें व वक्रत्वानें दूषित केलेलें, ग्रहण झालेलें, उल्केनें ताडित, चद्रानें पीडित ( चद्र ज्या नक्षत्राच्या योगतारेचा भेद करील किंवा आच्छादन करील किंवा मधून जाईल किंवा दक्षिणभागानें जाईल ) तें नक्षत्र उपहत, असें ऋषि ह्मणतात अथवा प्रकृतीनें विपर्यय ( उलटस्वभाव ) ज्याचा झाला त्यासही उपहत ह्मणतात. असें उपहत झालेलें नक्षत्र आपल्या पूर्वोक्त वर्गाचा नाश करितें व याहून अन्यप्रकारचें असेल तर वृद्धि करितें ॥३१।३२॥

॥ इतिनक्षत्रव्यूहःपंचदशोध्यायः ॥१५॥

---

## ॥ अथग्रहभक्तयः ॥

प्राङ्नर्मदार्धशोणोड्रवंगसुह्माःकलिंगवाल्हीकाः ।
शकयवनमगधशबरप्राग्ज्योतिषचीनकांबोजाः ॥१॥
मेकलकिरातविटकाबहिरंतःशैलजाःपुलिंदाश्च ।
द्रविडानांप्रागर्धंदक्षिणकूलंचयमुनायाः ॥२॥

चंपोदुंबरकौशांबिचेदिविंध्याटवीकलिंगाश्च ।
पुंड्रागोलांगूलश्रीपर्वतवर्धमानाश्च ॥ ३ ॥
इक्षुमतीत्यथतस्करपारतकांतारगोपबीजानां ।
तुषधान्यकटुकतरुकनकदहनविषसमरशूराणां ॥४॥
भेषजभिषक्चतुष्पदकृषिकरनृपहिंस्रयायिचौराणां ।
व्यालारण्ययशोयुततीक्ष्णानांभास्करःस्वामी ॥ ५ ॥

अर्थ—नर्मदानदीचें पूर्वेकडील अर्ध, शोणनद, उड्र, वंग, सुह्म, कालिंग, बाल्हीक, शक, यवन, मगध, शबर, प्राग्ज्योतिष, चीन, कांबोज ॥१॥ मेकल, किरात, विटक, पर्वतांतील व पर्वताजवळील देश, पुलिंद, द्रविडदेशाचें पूर्वार्ध, यमुनेचें दक्षिणतीर ॥२॥ चंप, उदुंबर, कौशांबीनगरी, विंध्यपर्वताची अटवी ( अरण्य ), कालिंग, पुंड्र, गोलांगूल ( वानरवि० ), श्रीपर्वत, वर्धमान ॥३॥ इक्षुमती, तस्करदेश पारतजन, अरण्य, गोप ( गाई राखणारे ), बीजें, तुषधान्य ( साळी ), कटुद्रव्य (मिरीं मिरची इ०), वृक्ष, सुवर्ण, अग्नि, विष, युद्धकुशल, ॥४॥ औषध, वैद्य, पशु, शेतीलोक, राजे, हिंसाकरणारे, प्रवासी, चोर, सर्प, अरण्य ( ओसाडप्रदेश ), यशस्वी, तीक्ष्ण ( निंबादि कडुपदार्थ ), या सर्वांचा सूर्य स्वामी होय ॥५॥

गिरिसलिलदुर्गकोशलभरुकच्छसमुद्ररोमकतुषाराः ।
वनवासितंगणहलस्त्रीराज्यमहार्णवद्वीपाः ॥ ६ ॥
मधुररसकुसुमफलसलिललवणमणिशंखमौक्तिकाब्जानां । शालियवौषधिगोधूमसोमपाक्रंदविप्राणां ॥७॥
सितसुभगतुरगरतिकरयुवतिचमूनाथभोज्यवस्त्राणां ।
शृंगिनिशाचरकर्षकयज्ञविदांचाधिपश्चंद्रः ॥ ८ ॥

अर्थ—गिरिदुर्ग ( डोंगरीकिल्ले ), सलिलदुर्ग ( पाण्यांतील किल्ले ), कोशल, भरुकच्छ, समुद्र, रोमक, तुषार, वनवासी, तंगण, हल, स्त्रीराज्य, महासागर ( दक्षिण समुद्र ), द्वीप ॥६॥ मधुररस, पुष्पें, फळें, उदक, लवण, मणि, शंख, मौक्तिक, जलोत्पन्न (कमलादिक ), शाली, यव, औषधि, गहूं, सोमप (याज्ञिक), आक्रंद (शत्रु पाठीस लागलेले असा राजा ), ब्राह्मण ॥७॥ शुभ्र, सर्वजनप्रिय, अश्व, रतिकर ( कामी ), स्त्री, सेनापति, भोज्य (अन्नादि भक्षणीय पदार्थ ), वस्त्रें, शृंगयुक्तप्राणी, निशाचर, शेतीलोक, यज्ञसूत्रजाणणारे याचा चंद्र स्वामी होय ॥८॥

शोणस्यनर्मदायाभीमरथायाश्चपश्चिमार्धस्थाः ।
निर्विंध्यावेत्रवतीसिप्रागोदावरीवेणा ॥ ९ ॥
मंदाकिनीपयोष्णीमहानदीसिंधुमालतीपाराः ।
उत्तरपांड्यमहेंद्राद्रिविंध्यमलयोपगाश्चोलाः ॥१०॥
द्रविडविदेहांध्राश्मकभासापुरकौंकणाःसमंत्रिषिकाः ।
कुंतलकेरलदंडककांतिपुरम्लेच्छसंकरजाः ॥ ११ ॥
(नासिक्यभोगवर्धनविराटविंध्याद्रिपार्श्वगादेशाः ।
येचपिबंतिसुतोयांतापींयेचापिगोमतीसलिलं ॥१२॥)
नागरकृपिकरपारतहुताशनाजीविशस्त्रवार्तानां ।
आटविकदुर्गकर्वटवधकनृशंसावलिप्तानां ॥ १३ ॥
नरपतिकुमारकुंजरदांभिकडिंभाभिघातपशुपानां ।
रक्तफलकुसुमविद्रुमचमूपगुडमद्यतीक्ष्णानां ॥१४॥
कोशभवनाग्निहोत्रिकधात्वाकरशाक्यभिक्षुचौराणां ।
शठदीर्घवैरवन्हाशिनांचवसुधासुतोधिपतिः ॥१५॥

अर्थ–शोणनद, नर्मदानदी, भीमरथानदी यांच्या पश्चिमभागचे देश, निर्विंध्या, वेत्रवती, सिप्रा, गोदावरी, वेणा ॥९॥ गंगा, पयोष्णी, महानदी, सिंधु, मालती, पारा, ह्या सर्व नद्या, उत्तरपाड्यदेशस्थजन, महेंद्रपर्वत, विंध्य, मलय या पर्वतावरील लोक, चोल ॥१०॥ द्रविड, विदेह, आंध्र, अश्मक, भास, पुर, कौंकण, समंत्रिषिक, कुंतल, केरल, दंडकारण्य, कांतिपुर, म्लेंच्छ, संकरजाति ॥११॥ (नासिक, भोगवर्धन, विराटनगरी व विंध्याद्रिपर्वताच्या दोहों बाजूचे देश, तापी व गोमती या नद्यांचें पाणी पिणारे (त्यांच्या कांठीं रहाणारे) ॥१२॥) नगरांत रहाणारे कृपिकर, पारत, सुवर्णकारादि अग्निजीवी, शस्त्रवृत्ति, अरण्यवासी, किल्ला, कर्वटजन, वधरत, घातकपापी, कार्याचाठाईं अस्थिर ॥१३॥ राजे, बाल, हत्ती, दांभिक, डिंभ (शस्त्रावांचून चाललेले युद्धांत घात करणारा किंवा बालघातक), पशुपालक, रक्तफल, रक्तपुष्प, पोंवळें, सेनापति, गुड, मद्य, तीक्ष्ण (मिर्यादि) ॥१४॥ कोशभवन (राजगृह), अग्निहोत्री, गैरिकादि व सुवर्णादि धातु यांचें स्थान, शाक्य (रक्तपट) सन्यासी, चोर, शठ (परकार्यविमुख), दीर्घद्वेषी, फार खाणारा, या सर्वांचा भौम स्वामी होय ॥१५॥

लौहित्यःसिंधुनदःसरयूर्गंभीरिकारथाह्वाच ।
गंगाकौशिक्याद्याःसरितोवैदेहकांबोजाः ॥१६॥
मथुरायाःपूर्वार्धंहिमवद्गोमंतचित्रकूटस्थाः ।
सौराष्ट्रसेतुजलमार्गपण्यविलपर्वताश्रयिणः ॥१७॥
उदपानयंत्रगांधर्वलेख्यमणिरागगंधयुक्तिविदः ।
आलेख्यशब्दगणितप्रसाधकायुष्यशिल्पज्ञाः ॥१८॥
चरपुरुषकुहकजीवकशिशुकविशठसूचकाभिचाररताः ।
दूतनपुंसकहास्यज्ञभूततंत्रेंद्रजालज्ञाः ॥१९॥
आरक्षकनटनर्तकघृततैलस्नेहबीजतिक्तानि ।
व्रतचारिरसायनकुशलवेसराश्चंद्रपुत्रस्य ॥२०॥

अर्थ—लौहित्यनद, सिंधुनद, सरयू, गंभीरिका, रथाव्हा, गंगा, कौशिकी, विपाशा, सरस्वती, चन्द्रभागा, क्षानदा; वैदेहजन, कांबोजजन, मथुरेचें पूर्वार्ध, हिमालय, गोमंत ( गोमितपर्वत ), चित्रकूट या पर्वतांवर रहाणारे लोक; सौराष्ट्रजन, सेतूने व जलमार्गानें जाणारे, व्यापारी, गुहेत राहणारे, पर्वतवासी, उदपान ( तडागवाप्यादिक ), यंत्र, गायन, लिहिणें, रत्नपरीक्षा, रंगयुक्ति, गंधयुक्ति या सर्वांतें जाणणारे; चितारीपणा, व्याकरणशास्त्र, गणित, यांचें साधन करणारे; आयुष्य व शिल्प यांते जाणणारे, गुप्तबातमीदार, गारुडादि कपटानें उपजीवन करणारा, बाल, कवि, शठ (परकार्यविमुख), दुर्जन, जारणमारणादि जाणता, जासूद, नपुंसक, उपहास ( थट्टा ) करणारे, भूततंत्रज्ञ, पिशाचें स्वाधीन ठेवणारे, इंद्रजाल ( गारुडविद्या ) इत्यादि जाणणारे, आरक्षक ( पहारेकरी ), नट, नर्तक, घृत, तैल, तेल काढण्याचीं फळें, निंबादि कडू पदार्थ, व्रतचारी ( ब्रह्मचारीप्रभृति ), रसायण करणारे, वेसर ( खेचर), या सर्वांचा बुध स्वामी होय ॥१६।१७।१८।१९।२०॥

सिंधुनदपूर्वभागोमथुरापश्चार्धभरतसौवीराः ।
स्रुघ्नोदीच्यविपाशासरिच्छतद्रूरमठशाल्वाः ॥२१॥
त्रैगर्तपौरवांबष्ठपारतावाटधानयौधेयाः ।
सारस्वतार्जुनायनमत्स्यार्धग्रामराष्ट्राणि ॥२२॥
हस्त्यश्वपुरोहितभूपमंत्रिमांगल्यपौष्टिकासक्ताः ।
कारुण्यसत्यशौचव्रतविद्यादानधर्मयुताः ॥२३॥

पौरमहाधनशब्दार्थवेदविदुषोभिचारनीतिज्ञाः ।
मनुजेश्वरोपकरणंछत्रध्वजचामराद्यंच ॥२४॥
शैलेयकमांसीतगरकुष्ठरससैंधवानिवल्लीजं ।
मधुररसमधूच्छिष्टानिचोरकश्चेतिजीवस्य ॥२५॥

अर्थ–सिंधु नदाचा पूर्वभाग, मथुरेचें पश्चार्ध, भरतजन, सौवीर, स्रुघ्न, हे देश; उत्तरदिशेस राहणारे लोक, विपाशानदी, शतद्रुनदी, रमठजन, शाल्व, त्रैगर्त, पौरव, आंबष्ठ, पारत, वाटधान, यौधेय, सारस्वत, आर्जुनायन, मत्स्यजन, हत्ती, घोडा, राजपुरोहित, राजा, प्रधान, विवाह, मौंजी इत्यादि मांगल्यकार्यें व पौष्टिककर्में याचाठायीं जे आसक्त ते; दया, सत्य, शौच, व्रत, विद्या, दान, धर्म यांणीं युक्त, पौर ( नागरिक लोक ), महाधन ( ईश्वर ), वैय्याकरण, अर्थज्ञ ( पंडित ), वेदवेत्ते, नीतिज्ञ, राजोपकरण ( शस्त्रोद्योगादि ), छत्र, ध्वज, चामर, इत्यादि; सुगंधिद्रव्य, जटामासी, रस, सैंधव, मुद्गादि वल्लीजधान्य, मधुररस, मेण, चोरक ( सुगंधिद्रव्य ), या सर्वांचा स्वामी गुरु होय. ॥२१।२२।२३।२४।२५॥

तक्षशिलमार्तिकावतबहुगिरिगांधारपुष्कलावतकाः ।
प्रस्थलमालवकैकयदाशार्णोशीनराःशिबयः ॥२६॥
येचपिबंतिवितस्तामिरावतीचंद्रभागसरितंच ।
रथरजताकरकुंजरतुरगमहामात्रधनयुक्ताः ॥२७॥
सुरभिकुसुमानुलेपनमणिवज्रविभूषणांबुरुहशय्याः ।
वरतरुणयुवतिकामोपकरणमृष्टान्नमधुरभुजः ॥२८॥
उद्यानसलिलकामुकयशःसुखौदार्यरूपसंपन्नाः ।
विद्वदमात्यवणिग्जनघटकृच्चित्रांडजास्त्रिफलाः ॥२९॥
कौशेयपट्टकंबलपत्रौर्णिकरोध्रपत्रचोचानि ।
जातीफलागरुवचापिप्पल्यश्चंदनंचभृगोः ॥३०॥

अर्थ–तक्षशिलनगरी, मार्तिकावतदेश, बहुत आहेत पर्वत ज्यामध्यें अशा गांधार देशांतील जन, पुष्कलावतक, प्रस्थल, मालव, कैकय, दाशार्ण, उशीनर, शिबि हे देश, वितस्ता, इरावती, चंद्रभागा या नद्यांचें जे उदक पितात ते ( त्यांच्या कांठीं रहाणारे ), रथ, रजत, आकर ( हिऱ्याच्याखाणी ), हत्ती, अश्व, महामात्र ( महात ), धनवान् , सुगंधिद्रव्य, पुष्पें, अनुलेपन ( गंधादि ), पद्मरागादिमणि,

हिरे, अलंकार, कमळ, शय्या, नर (प्रधान), तरुण, स्त्री, कामोपकरण (विलासयोग्य जे सुगधपुष्पादि पदार्थ ते), मृष्टान्न (स्वच्छ अन्नभोजन करणारे) व मधुर भोजन करणारे, उद्यान (बाग), उदक, कामीपुरुष; यश, सुख, औदार्य, स्वरूप, यानीं युक्त; विद्वान् प्रधान, सावकार, कुंभार, नानाप्रकारचे पक्षी, त्रिफला, कौशेयपट्ट (रेशमाचें वस्त्र), कंबळ, पत्रोर्णिक (धुतलेलें रेशमी वस्त्र), लोध्र, पत्र (तमालपत्र), चोच (दालचिनी), जायफळ, अगरु, नेखड, पिंपळी, चंदन, या सर्वांचा स्वामी शुक्र होय ॥२६।२७।२८।२९।३०॥

आनर्तार्बुदपुष्करसौराष्ट्राभीरशूद्ररैवतकाः।
नष्टायस्मिन्देशेसरस्वतीपश्चिमोदेशः ॥३१॥
कुरुभूमिजाःप्रभासंविदिशावेदस्मृतीमहीतटजाः।
खलमलिननीचतैलिकविहीनसत्वोपहतपुंस्त्वाः॥३२॥
बंधनशाकुनिकाशुचिकैवर्तविरूपवृद्धसौकरिकाः।
गणपूज्यस्खलितव्रतशवरपुलिंदार्थपरिहीनाः ॥३३॥
कटुतिक्तरसायनविधवयोषितोभुजगतस्करमाहिष्यः।
खरकरभचणकवातुलनिष्पावाश्चार्कपुत्रस्य ॥ ३४ ॥

अर्थ—आनर्त, अर्बुद, पुष्कर, सौराष्ट्र, आभीर, शूद्र, रैवतक, या देशांतील लोक; जेथें सरस्वतीनदी गुप्त झाली तो देश, पश्चिमदेश, कुरुदेशस्थजन, प्रभासक्षेत्र, विदिशा, वेदस्मृति ह्या नद्यांच्या तीरीं झालेले लोक; दुर्जन, मलिन, नीच, तेली, निःसत्व, नपुंसक, बंधनस्थ, शाकुनिक (पक्षिघातक), अपवित्रकर्मरत, कैवर्त (कोळी), विरूप, वृद्ध, डुकरें बाळगणारे, समुदायांत मुख्य, चलितनियम, शबर, पुलिंद (म्लेच्छ), द्रव्यहीन (दरिद्री), कटु (निंबादि), तिक्त (मरीच्यादि), रसायन, विधवास्त्रिया, सर्प, चोर, हैस, गर्दभ, उंट, चणे, वातुल (चवळी वगैरे वातुळ पदार्थ), निष्पाव (पावटे), यांचा स्वामी शनि होय ॥३१।३२।३३।३४॥

गिरिशिखरकंदरदरीविनिविष्टाम्लेच्छजातयःशूद्राः।
गोमायुभक्षशूलिकवोक्काणाश्वमुखविकलांगाः ॥३५॥
कुलपांसनहिंस्रकृतघ्नचौरनिःसत्यशौचदानाश्च।
खरचरनियुद्धवित्तीव्ररोषगर्भाशयानीचाः ॥३६॥
उपहतदांभिकराक्षसनिद्राबहुलाश्चजंतवःसर्वे।
धर्मेणचसंत्यक्तामाषतिलाश्चार्कशशिशत्रोः ॥३७॥

अर्थ—पर्वताचें शिखर, कंदर ( दरी ), गुहा, यामध्यें राहणारे, म्लेच्छजाति, शूद्र, कोल्हाखाणारे, त्रिशूल हत्यार वाळगणारे, वोक्काण, अश्वमुख, अंगहीन, कुलास कलंक लावणारे, हिंसाकरणारे, कृतघ्न ( अनुपकारी ), चोर, सत्यरहित, अशुचि, कृपण, गर्दभ, गुप्तगातमोदार, बाहुयुद्ध जाणणारे, फार रागीट, गर्भस्थ, नीच, कुत्सित, दांभिक, राक्षस, बहुत निद्रायुक्तप्राणी, धर्मरहित, माष, तिल, या सर्वांचा राहु स्वामी होय ॥३५।३६।३७॥

गिरिदुर्गपल्हवश्वेतहूणचोलावगाणमरुचीनाः ।
प्रत्यंतधनिमहेच्छव्यवसायपराक्रमोपेताः ॥३८॥
परदारविवादरताःपररंध्रकुतूहलामदोत्सिक्ताः ।
मूर्खाधार्मिकविजिगीषवश्चकेतोःसमाख्याताः ॥३९॥

अर्थ—पर्वतावरील किल्ले, पल्हव, श्वेत, हूण, चोल, अवगाण, मरु, चीन, हे देश; प्रत्यंत ( म्लेच्छदेश ), धनवान् , मोठी इच्छा करणारे, उद्योगी, पराक्रमी, परस्त्रीरत, वादरत, परच्छिद्रानें आनंदपावणारे, मत्त, मूर्ख, धर्मरहित, जिंकण्याची इच्छा करणारे, या सर्वांचा केतु स्वामी होय ॥३८।३९॥

उदयसमयेयःस्निग्धांशुर्महान्प्रकृतिस्थितोय
दिचनहतोनिर्घातोल्कारजोग्रहमर्दनैः।स्वभ
वनगतःस्वोच्चप्राप्तःशुभग्रहवीक्षितःसभवति
शिवस्तेषांयेषांप्रभुःपरिकीर्तितः ॥ ४० ॥

अर्थ—जोग्रह उदयकाळीं निर्मलकिरण, विस्तीर्णबिंब, स्वभावस्थित, असा असून जर निर्घात ( तुफानीवारा ), उल्का ( वीज ), रज ( धूळ ) व ग्रहयुद्ध यांणीं ताडित नसेल, स्वगृहीं किंवा स्वोच्चीं असेल व शुभग्रहांनीं दृष्ट असेल तो ग्रह ज्याचा स्वामी सांगितला त्यांस शुभकारक होतो ॥४०॥

अभिहितविपरीतलक्षणैःक्षयमुपगच्छंतितत्प
रिग्रहः । डमरभयगदातुराजनानरपतयश्चभ
वंतिदुःखिताः ॥ ४१ ॥

अर्थ—मरील श्लोकांत ग्रहांचीं जीं लक्षणें लिहिलीं आहेत तद्विपरीत ग्रहांची लक्षणें असली तर त्याचें फळ वाईट होतें. शस्त्ररहित कलह, भीति, रोग, यांहीं युक्त लोक होतील व राजेही अत्यंत दुःखित होतील ॥४१॥

यदिनरिपुकृतंभयंनृपाणांस्वसुतकृतंनियमा
दमात्यजंवा । भवतिजनपदस्यचाप्यवृष्ट्या
गमनमपूर्वपुराद्रिनिम्नगासु ॥ ४२ ॥

अर्थ—जर राजांस शत्रुकृत भय होणार नाहीं तर, स्वपुत्रकृत किंवा प्रधानकृत भय निश्चयानें होईल. देशास अवर्षणाचें भय झाल्यामुळें सर्व लोक पूर्वी न पाहिलेल्या नगर, पर्वत, नदी याचाठाईं गमन करतील ह्मणजे दुष्काळामुळें देशोदेशीं जातील ॥४२॥

इतिबृहत्संहितायांग्रहभक्तयोनामषोडशोध्यायः ॥१६॥

---

## ॥ अथग्रहयुद्धं ॥

युत्धंयथायदावाभविष्यदादिश्यतेत्रिकालज्ञैः ।
तद्विज्ञानंकरणेमयाकृतंसूर्यसित्धांतात् ॥ १ ॥

अर्थ—त्रिकालज्ञ ( भूत, भविष्य, वर्तमान जाणणारे ) ऋषि, ज्याकाली ज्याप्रकारानें होणारें ताराग्रहाचें युद्ध सांगतात, त्याचें ज्ञान ( साधन ) करणें ( गणितस्कधीं ) सूर्यसिद्धांतानुसारें मी सांगितलें ॥१॥

वियतिचरतांग्रहणामुपर्युपर्यात्ममार्गसंस्थानां ।
अतिदूरात्दृग्विषयेसमतामिवसंप्रयातानां ॥२॥
आसन्नक्रमयोगाद्भेदोल्लेखांशुमर्दनासव्यः ।
युत्धंचतुःप्रकारंपराशराद्यैर्मुनिभिरुक्तं ॥ ३ ॥

अर्थ—आकाशांत फिरणारे, एकावर दुसरा अशाप्रकारें आपल्या मार्गांत रहणारे व अति दुरून दृष्टिगोचर समत्वातें ( बरोबरीतें ) प्राप्त झालेले जे भौमादि ग्रह, त्यांचें फार निकट क्रमयोगानें भेद, उल्लेख, अंशुमर्दन, असव्य, या चार प्रकारचें युद्ध पराशरादि ऋषींनीं सांगितलें. १ किरणानें किरणाचें मर्दन ह्मणजे जेथें दोन्हीं ग्रह एकच दिसतात तें भेदयुद्ध. २ एकाग्रहानें दुसऱ्या ग्रहाच्या बिंबाचा स्पर्श करिजेतो तें उल्लेखयुद्ध. ३ अतिनिकट ग्रहाचे किरण परस्पर हन्यमान

( ताडित ) दिसतात ते अंशुमर्दनयुद्ध. ४ बरोबर होऊन डाव्या अंगानें जाणें ते अपसव्ययुद्ध ॥२॥ ॥३॥

भेदेवृष्टिविनाशोभेदःसुहृदांमहाकुलानांच ।
उल्लेखेशस्त्रभयंमंत्रिविरोधःप्रियान्नत्वं ॥४॥
अंशुविरोधेयुद्धानिभूभृतांशस्त्ररुक्क्षुदवमर्दाः ।
युद्धेचाप्यपसव्येभवंतियुद्धानिभूपानां ॥५॥

अर्थ—भेदसंज्ञक युद्ध झाले तर अवर्षण, मित्राचा परस्पर व महाकुलीनाचा परस्पर भेद होतो. उल्लेखस०. युद्ध झालें तर शस्त्रभय, प्रधानाचा विरोध, दुर्भिक्ष हीं होतात. अंशुविरोधस० ( अंशुमर्दनस० ) युद्ध झालें तर राजाचीं युद्धें, शस्त्र, रोग, क्षुधा, यापासून अतिपीडा हीं होतात. अपसव्ययुद्धीं राजांचीं युद्धें होतात ॥४॥५॥

रविराक्रंदोमध्येपौरःपूर्वेपरेस्थितोयायी ।
पौराबुधगुरुरविजानित्यंशीतांशुराक्रंदः ॥६॥
केतुकुजराहुशुक्रायायिनएतेहताग्रहाहन्युः ।
आक्रंदयायिपौरान्जयिनोजयदाःस्ववर्गस्य ॥७॥

अर्थ—सूर्य समध्यभागीं असता आक्रंदसंज्ञक, पूर्वेकडे अ० पौरस०, पश्चिमेकडे अ० यायीस० होतो. बुध, गुरु, शनि, हे नित्य पौरस० होत. चंद्र नित्य आक्रंदसं० होय. केतु, भौम, राहु, शुक्र हे यायीस० होत. हे ग्रह आक्रंदादिसंज्ञक ग्रहांतें मारतात त्या युद्धांत ज्याचा जय होतो ते आपल्या वर्गाचा जय करितात ॥६॥७॥

पौरेपौरेणहतेपौराःपौरान्नृपान्विनिघ्नंति ।
एवंयाय्यांक्रंदौनागरयायिग्रहाश्चैव ॥८॥

अर्थ—पौरग्रह, पौरग्रहानें हत असता, नगरसंबंधी लोक आपल्या राजाचा नाश करतील. असेंच यायीग्रह आक्रंदग्रहानें हत अ० येणाऱ्या राजाचा नाश. नागर ह० पौरग्रह यायीग्रहानें हत अ०, नगरच्या राजाचा नाश, याप्रकारें जाणावें ॥८॥

दक्षिणदिक्स्थःपरुषोवेपथुरप्राप्यसंनिवृत्तोणुः ।
अधिरूढोविकृतोनिष्प्रभोविवर्णश्चयःसजितः ॥९॥

अर्थ—दक्षिणदिशेस रहाणारा, परुष ( रुखरखीत ), कंपित, दुसऱ्या ग्रहाजवळ न जाता मागें फिरला ( वक्रगतिझाला ), बारीक झालेला, अधिरूढ ( दुसऱ्या ग्रहानें आक्रांत ), विकार पावलेला, तेजहीन झालेला, विवर्ण ( वर्णरहित ), असा जो ग्रह तो जित ( जिंकलेला ) असें जाणावें ॥९॥

उक्तविपरीतलक्षणसंपन्नोजयगतोविनिर्दिष्टः ।
विपुलःस्निग्धोद्युतिमान्दक्षिणदिक्स्थोपिजययुक्तः १०

अर्थ—पूर्वश्लोकोक्त लक्षणाहून विपरीतलक्षणसंपन्न जो ग्रह त्याचा जय झाला असें समजावें. तसाच जो ग्रह विपुल ( मोठें ) बिंब, निर्मल, तेजस्वी तो ग्रह दक्षिणदिशेस असला तरी जयानें युक्त असें जाणावें. ( असें बहुधा शुक्राचें होतें) ॥१०॥

द्वावपिमयूखपृक्तौविपुलौस्निग्धौसमागमेभवतः ।
तत्रान्योन्यप्रीतिर्विपरीतावात्मपक्षघ्नौ ॥११॥

अर्थ—दोघेही ग्रह समागमामध्यें स्वच्छकिरणानीं युक्त, विस्तीर्णबिंब, निर्मल, असे असतील तेथें दोघांची प्रीति आहे असें समजावें. याहून विपरीत अ० आपल्या पक्षाचा नाश करणारे होतात ॥११॥

युद्धंसमागमोवायद्यव्यक्तौतुलक्षणैर्भवतः ।
भुविभूभृतामपितथाफलमव्यक्तंविनिर्देश्यं ॥१२॥

अर्थ—ग्रहाचें परस्पर युद्ध किंवा समागम पूर्वोक्त लक्षणांहीं जर अस्पष्ट होतील तर भूमीवर राजासही तसेंच अस्पष्ट फल सांगावें ॥१२॥

गुरुणाजितेवनिसुतेबाल्हीकायायिनोग्निवार्ताश्च ।
शशिजेनशूरसेनाःकलिंगसाल्वाश्चपीड्यंते ॥१३॥
सौरेणारेविजितेजयंतिपौराःप्रजाश्चसीदंति ।
कोष्ठागारम्लेच्छक्षत्रियतापश्चशुक्रजिते ॥ १४ ॥

अर्थ—गुरूनें मंगळ जिंकला अ० बाल्हीक देशांतील लोक, मार्गस्थ, अग्निजीवी ( सुवर्णकारादिक ), यास पीडा होय. बुधानें मंगळ जिंकल्या अ० शूरसेन, कलिंग, साल्व या देशांत रहाणाऱ्या लोकास पीडा होय. शनैश्वरानें मंगळ

जिंकला अ० नागरिक लोकांचा जय व प्रजांस पीडा होवे. शुक्रानें मगळ जिंकला अ० कोष्ठागार, म्लेच्छ, क्षत्रिय यांस ताप ( दुःख ) होते ॥ १३।१४॥

भौमेनहतेशशिजेवृक्षसरित्तापसाश्मकनरेंद्राः ।
उत्तरदिक्स्थाःक्रतुदीक्षिताश्चसंतापमायांति ॥१५॥
गुरुणाबुधेजितेम्लेच्छशूद्रचौरार्थयुक्तपौरजनाः ।
त्रैगर्तपार्वतीयाःपीड्यंतेकंपतेचमही ॥१६॥
रविजेनबुधेध्वस्तेनाविकयोधाब्जसधनगर्भिण्यः ।
भृगुणाजितेऽग्निकोपःसस्यांबुदयायिविध्वंसः ॥१७॥

अर्थ—भौमानें बुध जिंकला असतां वृक्ष, नद्या, तपस्वी, अश्मकजन, राजे, उत्तर-दिशेस रहाणारे लोक, यज्ञकरणारे, या सर्वांस दुःख होते ॥१५॥ गुरूनें बुध जित अ० म्लेच्छ, शूद्र, चोर, धनवान्, नगरवासी लोक, त्रिगर्त देशांतील लोक, पर्वतवासी लोक या सर्वांस पीडा होय व भूमिकंपही होतो ॥१६॥ शनीनें बुध ध्वस्त ( पराजित ) केला अ० नावाडी, योद्धे, जलजप्राणी, द्रव्यवान्, सगर्भास्त्रिया यांस पीडा होते. शुक्रानें बुध जित अ० अग्निकोप होतो. धान्ये, मेघ, पांथस्थ यांचा नाश होतो ॥१७॥

जीवेशुक्राभिहतेकुलूतगांधारकैकयामद्राः ।
साल्वावत्सावंगागावःसस्यानिनश्यंति ॥१८॥
भौमेनहतेजीवेमध्योदेशोनरेश्वरागावः ।
सौरेणचार्जुनायनवसातियौधेयशिबिविप्राः ॥१९॥
शशितनयेनापिजितेबृहस्पतौम्लेच्छसत्यशस्त्रभृ
तः। उपयांतिमध्यदेशश्चसंक्षयंयच्चभक्तिफलं ॥२०॥

अर्थ—बृहस्पति शुक्रानें जिंकिला असतां, कुलूत, गांधार, कैकय, मद्र, साल्व, वत्स, वंग, हे देश; गाई, धान्यें यांचा नाश होतो ॥१८॥ भौमानें बृहस्पति जित अ० मध्यदेश स० हिमालय व विंध्याद्रि ( सातपुडा ) यांचा मध्यभाग, राजे, गाई यांस पीडा होवे. शनीनें बृहस्पति जित अ० अर्जुनायन लोक, वसाति, योद्धे, शिबिदेशस्थलोक, ब्राह्मण, यांचा नाश होतो ॥१९॥ बुधानें बृहस्पति जित अ० म्लेच्छ, सत्यवादी, शस्त्रधारणकरणारे, मध्यदेश हे सर्व नाश पावतात व जें गुरूचें पूर्वोक्त भक्तिफल तेंही नाश पावतें ॥२०॥

शुक्रेबृहस्पतिहतेयायीश्रेष्ठोविनाशमुपयाति ।
ब्रह्मक्षत्रविरोधःसलिलंचनवासवस्त्यजति ॥२१॥
कोशलकलिंगवंगावत्सामत्स्याश्चमध्यदेशयुताः ।
महतींव्रजंतिपीडांनपुंसकाःशूरसेनाश्च ॥२२॥
कुजविजितेभृगुतनयेबलमुख्यवधोनरेंद्रसंग्रामाः ।
सौम्येनपार्वतीयाःक्षीरविनाशोल्पवृष्टिश्च ॥२३॥
रविजेनसितेविजितेगणमुख्याःशस्त्रजीविनःक्षत्रं ।
जलजाश्चनिपीडयंतेसामान्यंभक्तिफलमन्यत् २४

अर्थ—बृहस्पतीनें शुक्र जित अ० पांयस्थ, श्रेष्ठजन यांचा नाश होतो. ब्राह्मण, क्षत्रिय यांस उपद्रव होतो व अवर्षणही होतें ॥२१॥ कोशल, कलिंग, वंग, वत्स, मत्स्य, मध्यदेश या देशांतील लोकांस महान् पीडा होत्ये. नपुंसक, शूरसेनदेशस्थलोक यांसही पीडा होत्ये ॥२२॥ भौमानें शुक्र जिंकला अ० सेनापतीचा वध व राजांचीं युद्धें होतात. बुधानें शुक्र जिंकला अ० पर्वतवासी लोकाचा व गाईच्या दुधाचा नाश होतो व अल्पवृष्टि होत्ये ॥२३॥ शनीनें शुक्र जिंकला अ० गणश्रेष्ठ, शस्त्रवृत्ति, क्षत्रिय, जलोद्भव प्राणी, या सर्वांस पीडा होत्ये व जें पूर्वोक्त भक्तिफल तें विपरीत होतें ॥२४॥

असितेसितेननिहतेर्घवृद्धिरहिविहगमानिनांपीडा ।
क्षितिजेनटंकणांध्रोड्रकाशिवाल्हीकदेशानां ॥२५॥
सौम्येनपराभूतेमंदेंगवणिग्विहंगपशुनागाः ।
संताप्यंतेगुरुणास्त्रीवहुलामहिपकशकाश्च ॥२६॥

अर्थ—शुक्रानें शनि जिंकला अ० अर्घवृद्धि (द्रव्यांचीं वृद्धि) होते. सर्प, पक्षी, अभिमानी लोक यांस पीडा होते. भौमानें शनि जित अ० टकण, आंध्र, उड्र, काशि, वाल्हीक या देशांस पीडा होते ॥२५॥ बुधानें शनि जित अ० अंगदेशस्थ लोक, व्यापारी, पक्षी, पशु, हत्ती यांस पीडा होते. गुरूनें शनि जिंकला अ० स्त्रीवहुलदेश, महिप, कशक यांस पीडा होते ॥२६॥

अयंविशेषोभिहितोहतानांकुजज्ञवागीशसिता सितानां । फलंतुवाच्यंग्रहभक्तितोन्यद्यथात थाग्रंतिहताःस्वभक्तीः ॥२७॥

अर्थ–युद्धामध्यें जिंकलेलें जे भौम, बुध, गुरु, शुक्र, शनि याचा हा पूर्वोक्तविशेष सांगितला. इतर जें फल तें पूर्वाध्यायोक्त ग्रहभक्तीवरून सांगावें. तें असें की, ज्या प्रकारानें ग्रहाचा पराजय होईल तसा स्वभक्तीचा नाश होईल ॥२७॥

## ॥ इतिबृहत्संहितायांग्रहयुद्धंनामसप्तदशोध्यायः ॥

---

## ॥ अथशशिग्रहसमागमः ॥

**भानांयथासंभवमुत्तरेणयातोग्रहाणांयदिवाशशांकः । प्रदक्षिणंतच्छुभकृन्नराणांयाम्येनयातोनशिवःशशांकः १**

अर्थ–चंद्र, नक्षत्राच्या किंवा ग्रहाच्या यथासंभव (समीपस्थाच्या) उत्तरेकडून जाईल तर तें प्रदक्षिणगमन होतें हें मनुष्यांस शुभकारक होय चंद्र दक्षिणेकडून गेला तर तो अशुभ होय ॥१॥

**चंद्रमायदिकुजस्ययात्युदक्पार्वतीयवलशालि नांजयः । क्षत्रियाःप्रमुदिताःसयायिनोभूरि धान्यमुदितावसुंधरा ॥ २ ॥**

अर्थ–जर चंद्र भौमाच्या उत्तरेकडून जाईल तर पर्वतवासी लोकांचा व बलिष्ठ राजाचा जय होईल. पांथस्थ व क्षत्रिय आनंदित होतील पृथ्वीवर बहुत धान्य होईल ॥२॥

**उत्तरतःस्वसुतस्यशशांक पौरजयायसुभिक्षक रश्च । सस्यचयंकुरुतेजनहार्दिकोशचयंचनरा धिपतीनां ॥ ३ ॥**

अर्थ–चंद्र, बुधाच्या उत्तरेकडून जाईल तर नगरस्थ राजाचा जय व सुभिक्षही होईल धान्याची वृद्धि, लोकांस संतोष, राजाचा कोश (जामदारखाना) याची वृद्धि करितो ॥३॥

**बृहस्पतेरुत्तरगेशशांकेपौरद्विजक्षत्रियपंडितानां । धर्मस्यदेशस्यचमध्यमस्यवृद्धिःसुभिक्षंमुदिताःप्रजाश्च ४**

अर्थ–चंद्र, बृहस्पतीच्या उत्तरेकडून जाईल तर, नागरिकजन, ब्राह्मण, क्षत्रिय, पंडित, धर्म, मध्यदेश यांची वृद्धि, सुभिक्ष, सर्व प्रजांस आनंद, हीं होतात ॥४॥

**भार्गवस्ययदियात्युदक्शशीकोशयुक्तगजवाजिवृद्धिदः॥यायिनांचविजयोधनुष्मतांसस्यसंपदपिचोत्तमातदा ॥५॥**

अर्थ–चंद्र, शुक्राच्या उत्तरेकडून जाईल तर, भांडार, गज, अश्व, यांची वृद्धि होते. शत्रु जिंकण्याची इच्छा करणारे व धनुर्धारी, यांचा जय होतो. धान्यसंपत्तीही उत्तम होते ॥५॥

**रविजस्यशशीप्रदक्षिणंकुर्याच्चेत्पुरभूभृतांजयः ।**
**शकवाल्हिकसिंधुपल्हवासुद्राजोयवनःसमन्विताः६**

अर्थ–चंद्र, शनीच्या उत्तरेकडून जाईल तर, नगरस्थ राजांना जय होईल. शक (यवनविशेष), वाल्हिक, सिंधुदेशांतील लोक, पल्हव, यवन यांस आनंद होतो॥६

**येषामुदग्गच्छतिभग्रहाणांप्रालेयरश्मिर्निरुपद्रवश्च।**
**तद्द्रव्यपौरेतरभक्तिदेशान्पुष्णातियाम्येननिहंतितानि ७**

अर्थ–ज्या नक्षत्रांच्या व ग्रहांच्या उत्तरेकडून उत्पातरहित चंद्र जाईल, त्या नक्षत्रग्रहांचीं प्रागुक्तद्रव्ये, नागरिक लोक, मार्गस्थलोक, पूर्वोक्त भक्तिदेश यांतें तो पुष्ट करील. तोच दक्षिणेकडून जाईल तर त्यांचा नाश करील ॥७॥

**शशिनिफलमुदक्स्थेयदृक्षग्रहस्योपदिष्टंभवतितदपसव्येसर्वमेवप्रतीपं । इतिशशिसमवायाःकीर्तिताभग्रहाणांनखलुभवतियुद्धंसाकमिंदोर्ग्रहर्क्षैः ॥८॥**

अर्थ–चंद्र, ग्रहांच्या उत्तरेकडे असतां, जें फल सांगितलें तें सर्व दक्षिणेकडे असतां विपरीत होतें. याप्रकारेंकरून नक्षत्रें व ग्रह याचे चंद्राबरोबर समागम सांगितले. ग्रह व नक्षत्रें यांबरोबर चंद्राचें युद्ध कधींच होत नाहीं ॥८॥

**॥ इतिबृहत्संहितायांशशिग्रहसमागमोनामाष्टादशोध्यायः ॥ १८ ॥**

# अथग्रहवर्षफलाध्यायः ॥

(संप्राप्तेचैत्रमासेशशिनिकृशतनौवासरेशुक्लपूर्वेयोवा
रोवत्सरस्यप्रभवतिसशिवोऽशोभनोवाफलेशः ।त
द्वर्णसर्वसस्यंफलतिदलयुतंक्षेत्रदेशेस्वकीयेतास्मिन्य
द्यन्हिवृष्टिःक्षपयतिदुरितंसूर्यभौमार्कजानां ॥ १॥
वर्षेयद्यस्यफलंमासेचमुनिप्रणीतमालोक्य ।
तद्वत्तैर्वक्ष्येहंहोरातंत्रोत्तरविधाने ॥२॥)

(हे दोन्ही श्लोक मूळग्रथात नाहींत; परंतु त्यातील अर्थाची गरज पुढील मूळ-श्लोकातील अर्थास आहे ह्मणून टीकेतून घेतले आहेत. त्या दोन्ही श्लोकाचा सं-क्षिप्त अर्थ–चैत्रशुद्ध प्रतिपदेस ज्या ग्रहाचा वार असेल तो ग्रह वर्षाधिपति होय. याचप्रमाणे कोणत्याही महिन्याचे शुक्लप्रतिपदेस ज्याचा वार असेल तो मासाधिपति होय.)

सर्वत्रभूर्विरलसस्ययुतावनानिदैवाह्विभक्षयि
पुदंष्ट्रिसमावृतानि ॥ स्यंदंतिनैवचपयःप्रचुरं
स्रवंत्योरुग्भेपजानिनतथातिबलान्वितानि॥१॥
तीक्ष्णंतपत्यदितिजःशिशिरेपिकालेनात्यंवु
दाजलमुचोचलसंनिकाशाः ॥ नष्टप्रभर्क्षगण
शीतकरंनभश्वसीदंत्तितापसकुलानिसगोकुला
नि ॥२॥ हस्त्यश्वपत्तिमदसह्यवलैरुपेतावा
णासनासिमुशलातिशयाश्वरंति ॥ ग्रंतोनृपा
युधिनृपानुचरैश्चदेशान्संवत्सरेदिनकरस्यदि
नेथमासे ॥३॥

अर्थ–सूर्याचे वर्ष, वार, महिना यामध्ये पुढे सांगितल्याप्रमाणे फलें होतील. सर्व देशामध्ये भूमि स्वल्पधान्ययुक्त होईल. अरण्यें दैवहतास भक्षण करावयास इच्छिणाऱ्या दष्ट्री (सर्प, वृक, वराहादि) यांहीं व्याप्त होतील. नद्यातून बहुत उदक

वाहणार नाही. अत्युत्तमही औषधांनीं रोगशांति होणार नाहीं. थंडीच्या दिवसांतही सूर्यतेज अधिक होईल. पर्वतासारखे ( मोठे ) मेघही अतिवृष्टि करणार नाहींत. नक्षत्रे व चंद्र हे नष्टकांति होतील. तपस्वी व गाई हीं दुःख पावतील. . हत्ती, घोडे, पायदळ हे ज्यामध्ये आहेत अशा पराक्रमी सैन्यानें युक्त व धनुष्य, तरवार, मुसळ यांतें धारण करणारे असे राजे, राजसेवकांनीं युद्धामध्यें जिंकले जातील व ते अनेक देशांपत फिरतील. हीं फलें होतील ॥१।२।३॥

व्याप्तंनभःप्रचलिताचलसंनिकाशैर्व्यालांज नालिगवलच्छविभिःपयोदैः । गांपूरयद्भिर खिलाममलाभिरद्भिरुत्कंठकेनगुरुणाध्वनि तेनचाशाः ॥४॥

तोयानिपद्मकुमुदोत्पलवंत्यतीवफुल्लद्रुमाण्यु पवनान्यलिनादितानि । गावःप्रभूतपयसोन यनाभिरामारामारतैरविरतंरमयंतिरामान्॥५॥

गोधूमशालियवधान्यवरेक्षुवाटाभूःपाल्यतेनृ पतिभिर्नगराकराढ्या । चित्यंकिताक्रतुवरे ष्टिविघुष्टनादासंवत्सरेशिशिरगोरभिसंप्रवृत्ते ॥६॥

अर्थ–चंद्राचा संवत्सर प्रवृत्त झाला असतां, गमन करणारे व पर्वतासारखे मोठे सर्प, कज्जल, भ्रमर, गव्ह्याचें शृंग यांच्या कांतीसारखे ( काळे ) अशा मेघांनीं आकाश व्याप्त होऊन, ते मेघ स्वच्छ उदकांनीं सर्व भूमि पूर्ण करितील व दुःसह अशा मोठ्या शब्दानें दिशा पूर्ण करितील ॥४॥ पद्में ( दिवसा फुलणारीं ), कुमुदें ( रात्रीं फुलणारीं ) यांणीं युक्त उदकें होतील. प्रफुल्लित वृक्ष व भ्रमरांचे शब्द यांहीं युक्त उपवनें ( बाग ) होतील. गाई बहुत दूध देतील. सुंदर स्त्रिया सुरतक्रीडांहीं कामी पतींस रमवितील ॥५॥ गोधूम, शाली, यव, उत्तम धान्यें व उंसांचे फड, नगरें, द्रव्याच्या खाणी यांहीं युक्त अशी; यज्ञस्थानांनीं चिन्हित महान् यज्ञ व पुत्रकाम्यादि इष्टि यांमध्यें जो वेदध्वनि तेणेंकरून युक्त, अशा भूमीचें राजे पालन करतील ह्मणजे धान्यें, नगरें, द्रव्यखाणी, यज्ञ, महान् वेदध्वनि हीं भूमीवर होतील ॥६॥

वातोद्धतश्चरतिवन्हिरतिप्रचंडोग्रामान्वना निनगराणिचसंदिधक्षुः । हाहेतिदस्युगण

पातहतारटंतिनिःस्वीकृताविपशवोभुविम
र्त्यसंघाः ॥७॥
अभ्युन्नतावियतिसंहतमूर्तयोपिमुंचंतिनक्व
चिदपःप्रचुरंपयोदाः । सीम्निप्रजातमपिशो
षमुपैतिसस्यंनिष्पन्नमप्यविनयादपरेहरंति ८
भूपानसम्यगभिपालनसक्तचित्ताःपित्तोत्थरु
क्प्रचुरताभुजगप्रकोपः । एवंविधैरुपहताभव
तिप्रजेयंसंवत्सरेवनिसुतस्यविपन्नसस्या ॥९॥

अर्थ–भौमाच्यावर्षीं, मासीं, दिवसीं, पुढील फळें होतात वान्यानें पेटविलेला फार भयंकर अग्नि, गाव, वनें, नगरें यातें जाळीत फिरतो चोराच्या समुदानें पीडित, निर्धन झालेले, गाई इत्यादि पशुरहित झालेले, असे मनुष्यसमुदाय पृथ्वीवर हाहा कार करितील ॥७॥ आकाशामध्यें उभारलेले, सहतमूर्ति ( दाट ) असेही मेघ कोठेंही बहुत उदक देणार नाहींत जलप्रवेशमार्गीं अथवा नदीच्या तीरीं झालेलेंही धान्य शुष्क होईल. अथवा झालेलें धान्य, अन्यपुरुष अन्यायानें हरण करतील ॥८॥ राजे धर्मानें पालन करणार नाहींत. पित्तापासून रोग उत्पन्न होतील. सर्पांपासून लोकांस पीडा होईल या प्रकारानीं प्रजा नष्ट होईल व धान्यरहितही होईल ॥९॥

मायेंद्रजालकुहकाकरनागराणांगांधर्वलेख्य
गणितास्त्रविदांचवृद्धिः । पिप्रीषयानृपतयो
द्भुतदर्शनानिदित्संतितुष्टिजननानिपरस्परेभ्यः १०
वार्ताजगत्यवितथाविकलात्रयीचसम्यक्चर
त्यपिमनोरिवदंडनीतिः । अध्यक्षरंस्वभि
निविष्टधियोत्रकेचिदान्वीक्षिकीपुचपरंपदमी
हमानाः ॥ ११ ॥
हास्यज्ञदूतकविबालनपुंसकानांयुक्तिज्ञसेतुज
लपर्वतवासिनांच । हार्दिकरोतिमृगलांछन
जःस्वकेब्देमासेथवाप्रचुरतांभुविचौषधीनां ॥ १२ ॥

अर्थ—बुधाचा संवत्सर, मास, दिवस, प्राप्त असतां, मायावी (प्रपंचकुशल), चमत्कार दाखविणारे, दांभिक, द्रव्योत्पत्तिस्थानकुशल, नगरवासी, गायन जाणणारे, चित्रें काढणारे, गणित जाणणारे, शस्त्रवेत्ते, यांची वृद्धि होते. राजे, संतोष उत्पन्न होण्याकरितां परस्परांस संतोषजनक असे आश्चर्य कारक पदार्थ देतील १० लोकांमध्ये वार्ता (कृषि, पशुपालन, व्यापार), सफल होईल. वेदत्रयी संपूर्ण होईल (लोकांमध्ये वेद पठन करतील). मनुसारखी उत्तम दंडनीति होईल. ईश्वराकडे बुद्धि लावणारे असेही कांहीं लोक होतील. आन्वीक्षिकी (तर्कविद्या) इचेठाईं बुद्धि घालून परपद (मोक्ष) इच्छितील ॥११॥ हास्यज्ञ, दूत, कवि, बाल, नपुंसक, युक्तिवेत्ते, सेतु, जल, पर्वत, यांवर रहाणारे यांस सुख होईल. भूमीवर औषधींची वृद्धि होईल ॥१२॥

ध्वनिरुच्चरितोध्वरेद्युगामीविपुलोयज्ञमुषांम
नांसिभिंदन् । विचरत्यनिशंद्विजोत्तमानांहृ
दयानंदकरोध्वरांशभाजां ॥ १३ ॥
क्षितिरुत्तमसस्यवत्यनेकद्विपपत्त्यश्वधनोरु
गोकुलाढ्या । क्षितिपैरभिपालनप्रवृद्धाद्युच
रस्पर्धिजनातदाविभाति ॥ १४ ॥
विविधैर्वियदुन्नतैःपयोदैर्वृतसुर्वीपयसाभित
र्पयद्भिः । सुरराजगुरोःशुभेत्रवर्षेबहुसस्या
क्षितिरुत्तमर्धियुक्ता ॥ १५ ॥

अर्थ—बृहस्पतीचा शुभसंवत्सर, मास, दिवस, प्राप्त झाला असतां, यज्ञामध्यें ब्राह्मणांनीं उच्चारित जो मोठा शब्द (वेदध्वनि) तो, यज्ञाचा विध्वंस करणारे जे राक्षस त्यांच्या मनाचें भेदन करितहोतसाता व देवांच्या हृदयांत आनंद करितहोतसाता, अनिश ह० दिवसास स्वर्गाप्रत जातो ॥ १३ ॥ उत्तमधान्ययुक्त, बहुत गज, पायदळ, घोडे, धन, गाईंचे समुदाय यांहीं युक्त राजांनीं उत्तम पालनानें वाढिवेलेली व देवांबरोबर स्पर्धा करणाऱ्या (बलिष्ठ) लोकांनीं व्याप्त अशी भूमि शोभते ॥१४॥ पृथ्वीवर जळवृष्टि करणाऱ्या नानाप्रकारच्या मोठ्या मेघांनीं आकाश व्याप्त होईल. बहुत धान्यें व उत्तम संपत्ति यांहीं युक्त पृथ्वी होईल ॥१५॥

शालीक्षुमत्यपिधराधरणीधराभधाराधरोज्झितपयः

परिपूर्णवप्रा । श्रीमत्सरोरुहततांबुतडागकीर्णायो
पेवभात्यभिनवाभरणोज्ज्वलांगी ॥१६॥
क्षत्रंक्षितौक्षपितभूरिबलारिपक्षमुद्घुष्टनैकजयशब्द
विराविताशं । संहृष्टशिष्टजनदुष्टविनष्टवर्गांगांपा
लयंत्यवनिपानगराकराढ्यां ॥१७॥
पेपीयतेमधुमधौसहकामिनीभिर्जेगीयतेश्रवणहारि
सुवेणुवीणं । बोभुज्यतेऽतिथिसुहृत्स्वजनैःसहान्न
मब्देसितस्यमदनस्यजयावघोषः ॥१८॥

अर्थ—शुक्राचें वर्ष, मास, दिवस, प्रवृत्त झाले असतां, धान्यें व ऊंस यांहीं युक्त अशी, पर्वतांसारख्या मेघांनीं सोडलेल्या उदकानें पूर्ण आहेत सर्व प्रदेश जीचे अशी, शोभायुक्त कमलांनीं व बहुत उदकांहीं युक्त अशा तळ्यांनीं व्याप्त अशी पृथ्वी, नूतन अलंकारांनीं तेजयुक्त आहे अंग जीचें अशा स्त्रीचेपरी, शोभते १६ नाश केला आहे बलिष्ठ शत्रूंचा ज्याणें असें व उच्चारित मोठ्या जयशब्दानें शोभिवल्या आहेत दिशा ज्याणें असें क्षत्र ( क्षत्रियकुल ) होईल. राजे, शिष्टांस आनंद व दुष्टांचा नाश यांहीं युक्त अशी व नगरें आकर ( रत्नखाणी ) यांहीं युक्त अशी भूमि, इचें पालन करतील ॥१७॥ लोकांनीं वसंतऋतूमध्यें स्त्रियांसहवर्तमान पुष्परस किंवा मद्य वारंवार प्राशन करिजेतें. लोक, वेणु, वीणा यांहींयुक्त व कानांस गोड असें गायन करितात. अतिथि, मित्र, स्वजन यांसहवर्तमान उत्तमान्नभोजन करितात. कामाचा जयशब्द लोकांमध्यें होतो. (अत्यंत कामासक्त प्रजा होतात) ॥१८॥

उद्वृत्तदस्युगणभूरिरणाकुलानिराष्ट्राण्यनेकपशुवित्त
विनाकृतानि । रोरूयमाणहतबंधुजनैर्जनैश्चरोगोत्त
माकुलकुलानिबुभुक्षयाच ॥ १९ ॥
वातोद्धतांबुधरवर्जितमंतरिक्षंआरुग्णनैकविटपंचध
रातलंच्यौः । नष्टार्कचंद्रकिरणातिरजोवनद्धातोया
शयाश्चविजलाःसरितोपितन्व्यः ॥ २० ॥
जातानिकुत्रचिदतोयतयाविनाशमृच्छंतिपुष्टिमपरा
णिजलोक्षितानि । सस्यानिमंदमभिवर्षतिवृत्रशत्रौ

# जगन्मित्र हपिसांत पुस्तकें विकत मिळतात तीं:—

१० श्रीमद्भागवत.
८ यथार्थदीपिका.
४ धर्मसिंधु (ग्रंथकार यांचे घरचे पुस्तकावरून छापिलेला).
४ भारतचंपु सटीक.
४ एकादशीव्रतसार.
३ बृहज्जातक.
२॥ गीतार्थबोधिनी.
२ विक्रमचरित्र.
२ फौजदारी ठराव.
१॥ नारायणभट्टी.
१॥ व्रतोद्यापनकौमुदी.
१।-।॥ दिवाणी व फौजदारी निवडक निवाडे सन १८६४।६५ सालचे.
१। रसमाधव.
१। सर्वार्थचिंतामणि.
१। गोपीचंदराजाचें नाटक मराठी.
१ रुक्मिणीस्वयंवर.
१ बालवैद्य.
१ शिवलीलामृत.
॥।=मुहूर्तगणपति.
॥।•मुहूर्तमार्तंड प्राकृत टीका.
॥। पंचायुधप्रपंचाख्यभा[ण.
•॥। निर्मळमाहात्म्य.
॥। गीतार्थमंजरी
॥= विष्णुसहस्रनामाचा प्राकृत अर्थ.
-॥=पुनर्विवाहाच्या अभ

खतेचा बोधक वाद.
•॥=समश्लोकी गीता.
•॥-प्रतिष्ठामयूख.
•॥ वेताळपंचविशी.
•॥ रत्ना० जि० वर्णन.
.॥. समर्थचिंतामणि.
•।≡लघुजातक.
•।≡माघसर्ग २ रा.
•।≡वनौषधिसंग्रह.
•।= पांडुरंगमाहात्म्य.
•।- भगवद्गीता [आवट.
•।= नवीन पोलिसचा
•।= वर्वोल्डचरित्र.
•।= माघसर्ग १ ला.
•।= माघसर्ग ३ रा.
•।= अपूर्णांक (शिवराम भास्कर काणेकृत)
•।= गुरुदत्तात्रय स्वामीच्या आरत्या (अक्कलकोटचे स्वामींचे तसबिरीसह).
•।- तर्कदीपिका.
•।- कुंडार्क सटीक.
.।॥ इक्ष्वाकुआख्यान.
.।॥ विदुरनीति.
•।• स्फुटज्योतिष.
•।• रघुवंशसर्ग ४ था.
•।• सिंहासनबत्तिशी.
•।• आनंदसागर.
८≡ तीर्थाचीं अष्टकें.
८≡ शनिमाहात्म्य.
८=। पल्लीपतनकारिका.
८=। गणपतिसहस्रनाम.

८- शिवसहस्रनामावलि.
८= प्रातःस्मरण.
८- बभ्रुवाहनआख्यान.
८= रामदासी श्लोक.
८- गोत्रावली (कऱ्हाडे ब्राह्मणांची).
८= विष्णुसहस्रनाम.
८= रामजोशीकृत लावण्या व पदें.
८= केकावलि.
८= रासकृत आरत्या.
८= गायनप्रकार.
८= विधवाविवाह सहारसार.
८= केरोपंती पंचांग शके १७९९ चें.
८= गंगालहरी.
८-॥ विष्णुसहस्रनामावलि.
८-॥ विधवाविवाहखंडण.
८-॥ अंकलिपि.
८-। मेस्तक (तोंडचे हिशेब
८- नलाख्यान आर्या.
८- व्यंकटेशस्तोत्र.
८- रामदासाचे अभंग.
८- स्फुट आर्या व श्लोक.
८- गर्गाचार्यकृत प्रश्नावलि.
८- एकादशीमाहात्म्य.
८- व्याकरणसाह्य.
८॥।• शके १७९९ सालचें पंचांग.
८॥। हरिपाठ.
८॥। पाचें.

वर्षेदिवाकरसुतस्यसदाप्रवृत्ते ॥२१॥

अर्थ–शनैश्वराचें वर्ष, मास, दिवस हे प्रवृत्त झाले असतां, उत्धत चोरांच्या समुदायानें व बहुत युत्धांनीं युक्त, अनेक पशु व द्रव्यें यांहीं रहित, युत्धामध्यें मेले जे बंधु त्यांचा शोक करणाऱ्या लोकांनीं युक्त, क्षुधा व बहुत रोग यांणीं व्याप्त; अशीं राष्ट्रें होतील ॥१९॥ वायूनें कंपित अशा मेघांनीं रहित आकाश होईल. पृथ्वीवर बहुत वृक्ष मोडतील. आकाश बहुत धुळीनें आच्छादित होऊन चंद्रसूर्यकिरण दिसणार नाहींत. तळीं, विहिरी यांचें पाणी आटेल. नद्याही बारीक ( अल्प उदकांच्या ) होतील ॥२०॥ इंद्र अल्पवृष्टि करीत असतां धान्यें कोठेंकोठें झालीं तथापि तीं उदक थोडें यास्तव नाश पावतात व कदाचित् उदक शिंपलें तर उन्हाळचीं धान्यें चांगलीं होतात. याप्रमाणें शनैश्वराच्या वर्षामध्यें होतें ॥२१॥

अणुरपटुमयूखोनीचगोन्यैर्जितोवानसकलफलदातापुष्टिदोतोन्यथायः ॥ यदशुभमशुभेब्देमासजंतस्यवृत्धिःशुभफलमपिचेवंयाप्यमन्योन्यतायां ॥२२॥

अर्थ–जो ग्रह, बारीक झालेला, अस्पष्टकिरण, नीचराशिगत व अन्यग्रहांनीं युत्धांत जिंकलेला असा जो त्याचें शुभफल असलें तरी तो सर्व शुभफल देणारा होत नाहीं. याहून अन्यप्रकारचा ग्रह असला म्हणजे शुभफल देतो. अशुभग्रहाच्या वर्षामध्यें अशुभग्रहाचेंच मासफल येईल, तर फारच अशुभफल होतें. असेंच, वर्षपति व मासपति या दोघांचेंही शुभफल असेल तर मासफल वृत्धिंगत होतें आणि एकाचें शुभ व दुसऱ्याचें अशुभ असेल तर शुभ किंवा अशुभ फल स्वल्प होतें ॥२२॥

इतिबृहत्संहितायांग्रहवर्षफलमेकोनविंशोध्यायः ॥१९॥

---

## ॥ अथग्रहशृंगाटकं ॥

---

यस्यांदिशिदृश्यंतेविशंतितारायहारविंसर्वे ।
भवतिभयंदिशितस्यामायुधकोपक्षुधातंकैः ॥१॥

अर्थ—मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि हे ग्रह ज्या दिशेस दृष्टिगोचर होतात (उदय पावतात) व ज्या दिशेस सूर्यांमत प्रवेश करितात (अस्त होतें) त्या दिशेकडील लोकास युध्द, दुर्भिक्ष, उपद्रव याहींकरून भय होतें ॥१॥

चक्रधनुःशृंगाटकदंडपुरप्रासवज्रसंस्थानाः ।
क्षुदवृष्टिकरालोकेसमरायचमानवेंद्राणां ॥२॥

अर्थ—चक्र, धनुष्य, शृंगाटक (त्रिकोण), दंड, नगर, प्रास (भाला), वज्र (दोनफाळ्याचा), या आकृतींचे ग्रह असले तर ते लोकामध्यें दुर्भिक्ष, अवर्षण, करतील व राजाचें युध्दही होईल ॥२॥

यस्मिन्रवांशेदृश्याग्रहमालादिनकरेदिनांतगते ।
तत्रान्योभवतिनृपःपरचक्रोपद्रवश्चमहान् ॥३॥

अर्थ—सूर्य अस्तास जाण्याचेवेळीं ज्या आकाशभागीं ग्रहांची 'माळा' दिसेल, त्या आकाशभागाच्या खालच्या प्रदेशांत दुसरा राजा होईल, व शत्रुचक्रापासून मोठा उपद्रवही होईल ॥३॥

यस्मिन्नृक्षेकुर्युःसमागमंतज्जनान्ग्रहाहन्युः ।
अविभेदनाःपरस्परममलमयूखाःशिवास्तेषां ॥४॥

अर्थ—ज्या नक्षत्रीं ग्रहाचा समागम ह्म० योग होईल, त्या नक्षत्राचे जन ह्म० लोक (नक्षत्रव्यूहोक्त) यांचा नाश होईल तेच ग्रह परस्पर अविभेदन (छायेछादकत्व) भावें करून राहिले व स्वच्छकिरण आतील तर त्या नक्षत्राचे लोकांचें कल्याण होईल ॥४॥

ग्रहसंवर्तसमागमसंमोहसमाजसंनिपाताख्याः ।
कोशश्चेत्येतेषामभिधास्येलक्षणंसफलं ॥५॥

अर्थ—ग्रहसंवर्त, ग्रहसमागम, ग्रहसंमोह, ग्रहसमाज, ग्रहसंनिपात, ग्रहकोश, या प्रकारें सहा योग होतात त्यांचें लक्षण व फल सांगतों ॥५॥

एकर्क्षेचत्वारःसहपौरैर्यायिनोथवापंच ।
संवर्तोनामभवेच्छिखिराहुयुतःससंमोहः ॥६॥
पौरःपौरसमेतोयायीसहयायिनासमाजाख्यः ।
यमजीवसंगमेन्योयद्यागच्छेत्तदाकोशः ॥७॥

उदितःपश्चादेकःप्राक्चान्योयदिससंनिपाताख्यः ।
अविकृततनवःस्निग्धाविपुलाश्चसमागमेधन्याः॥८॥

अर्थ—एकनक्षत्रीं चार किंवा पांच यायी ग्रह पौरग्रहांशीं संगत असतील तर, तो संवर्तनामक योग होतो. तेथेंच केतु किंवा राहु असेल तर तो संमोहनामक योग होतो. पौरग्रहाचा ( अ० १७ श्लो० ६।७ ) पौरग्रहाशीं अथवा यायी ग्रहाचा यायीग्रहाशीं योग झाला तर, तो समाजाख्य योग होतो. शनि व गुरु यांचा योग झाला असतां, तेथें अन्यग्रह येईल तर, तो कोशसंज्ञक योग होतो ॥७॥ एक ग्रह पश्चिमेकडे उदय ( सूर्यमंडलापासून निघणें ) पावेल. व दुसरा ग्रह पूर्वेस उदय पावेल व ते दोघेही ग्रह एकनक्षत्रीं होतील तेव्हां तो सनिपाताख्य योग होतो. या समागमामध्यें ग्रहांचे तारे विकार न पावलेले, निर्मल, विस्तीर्ण असे असतील तर ते धन्य ( शुभ ) होत ॥८॥

समौतुसंवर्तसमागमाख्यौसंमोहकोशौभयदौप्रजानां ॥
समाजसंज्ञःसुसमःप्रदिष्टोवैरप्रकोपःखलुसंनिपाते ॥९॥

अर्थ—संवर्त व समागम या नावांचे ग्रहयोग सम ( मध्यम ) फल देणारे होत. संमोह व कोश या नावांचे ग्रहयोग लोकांस भय देणारे होत. समाजसंज्ञक ग्रहयोग शुभ होय. संनिपातसंज्ञक ग्रहयोग झाला असतां, लोकांचें परस्पर वैर होतें॥९

इतिबृहत्संहितायांग्रहशृंगाटकंनामविंशतितमोध्यायः २०

---

## ॥अथगर्भलक्षणं॥

---

अन्नंजगतःप्राणाःप्रावृट्कालस्यचान्नमायत्तं ।
यस्मादतःपरीक्ष्यःप्रावृट्कालःप्रयत्नेन ॥१॥

अर्थ—जगताचे प्राण अन्न आहे. तें अन्न वर्षाकालाच्या स्वाधीन आहे यास्तव प्रावृट् ( वर्षा ) कालाची प्रयत्नानें परीक्षा करावी ॥१॥

तल्लक्षणानिमुनिभिर्यानिनिबद्धानितानिदृष्ट्वेदं ।
क्रियतेगर्गपराशरकाश्यपवात्स्यादिरचितानि॥२॥

अर्थ—त्या वर्षाकालाचीं लक्षणें, वसिष्ठादि ऋषींनी जीं बद्ध तीं व गर्ग, पराशर, काश्यप, वात्स्य, इत्यादिकांनीं रचित जीं, तींही पाहून हें बृहत्कालक्षण करितों २

दैवविदवहितचित्तोद्युनिशंयोगर्भलक्षणेभवति ।
तस्यमुनेरिववाणीनभवतिमिथ्यांवुनिर्देशे ॥३॥

अर्थ—जो दैववित् ( ज्योतिषी ) गर्भलक्षणांचाठाईं रात्रदिवस एकाग्रचित्त होतो; त्याची वाणी, वृष्टि सांगण्याविषयीं ( पर्जन्य कधीं पडेल तें सांगण्याविषयीं ) ऋषीप्रमाणें खोटी होत नाहीं ॥३॥

किंवातःपरमन्यच्छास्त्रंज्यायोस्तियद्विदित्वैव ।
प्रध्वंसिन्यपिकालेत्रिकालदर्शीकलौभवति ॥४॥

अर्थ—या गर्भलक्षणशास्त्राहून किंवा ज्योतिःशास्त्राहून दुसरें शास्त्र श्रेष्ठ काय आहे. जें समजूनच, सर्व शास्त्रांचा नाश करणार अशा कलियुगामध्येंही, तो समजणारा पुरुष, भूत, भविष्य, वर्तमान हे त्रिकाळ पाहणारा होतो ॥४॥

केचिद्वदंतिकार्तिकशुक्लांतमतीत्यगर्भदिवसाःस्युः ।
नतुतन्मतंवहूनांगर्गादीनांमतंवक्ष्ये ॥ ५ ॥

अर्थ—कार्तिकशुक्ल पौर्णिमेपुढें ( वद्य प्रतिपदेपासून ) गर्भदिवस होतात असें कोणी ( सिद्धसेनादि ) आचार्य म्हणतात; परंतु तें बहुतांचें मत नाहीं. म्हणून गर्गादि बहुसंमत सांगतों ॥५॥

मार्गशिरशुक्लपक्षप्रतिपत्प्रभृतिक्षपाकरेपाढां ।
पूर्वावासमुपगतेगर्भाणांलक्षणंज्ञेयं ॥ ६ ॥

अर्थ—मार्गशीर्ष शुक्ल प्रतिपदेपासून, ज्या दिवशीं चंद्र पूर्वाषाढानक्षत्रीं असेल त्या दिवसापासून, गर्भाचें लक्षण जाणावें ॥६॥

यन्नक्षत्रमुपगतेगर्भश्चंद्रेभवेत्सचंद्रवशात् ।
पंचनवतेदिनशतेतत्रैवप्रसवमायाति ॥७॥

अर्थ—ज्या नक्षत्रीं चंद्र प्राप्त होऊन, जो गर्भ होतो तो १९५ दिवसांनंतर त्याच नक्षत्रास चंद्र येईल तेव्हां प्रसूति पावतो ॥७॥

सितपक्षभवाःकृष्णेशुक्लेकृष्णाद्युसंभवारात्रौ ।
नक्तंप्रभवाश्चाहनिसंध्याजाताश्चसंध्यायां ॥८॥

अर्थ—शुक्लपक्षी झालेले गर्भ १९५ दिवसानीं कृष्णपक्षीं प्रसव पावतात. कृष्णपक्षीं झालेले गर्भ शुक्लपक्षीं, दिवसास झालेले रात्रीस, रात्रीस झालेले दिवसास, प्रातःसंध्येस झालेले सायंसंध्येस, सायंसंध्येस झालेले प्रातःसंध्येस प्रसव पावतात ॥८॥

मृगशीर्षाद्यागर्भामंदफलाःपौषशुक्लजाताश्च ।
पौषस्यकृष्णपक्षेणनिर्दिशेच्छ्रावणस्यसितं ॥९॥
माघसितोत्थागर्भाःश्रावणकृष्णेप्रसूतिमायांति ।
माघस्यकृष्णपक्षेणनिर्दिशेद्भाद्रपदशुक्लं ॥१०॥
फाल्गुनशुक्लसमुत्थाभाद्रपदस्यासितेविनिर्देश्याः ।
तस्यैवकृष्णपक्षोद्भवास्तुयेतेश्वयुक्शुक्ले ॥११॥
चैत्रसितपक्षजाताःकृष्णेश्वयुजस्यवारिदागर्भाः ।
चैत्रासितसंभूताःकार्तिकशुक्लेभिवर्षंति ॥१२॥

अर्थ—मार्गशीर्षशुक्लपक्षीं झालेले गर्भ अल्पफल देतात. तसेच पौषशुक्लपक्षीं झालेलेही गर्भ अल्पफल देतात. (या गर्भलक्षणीं शुक्लप्रतिपदादि अमावास्यांत महिने जाणावे) पौषकृष्णांत जे गर्भधारण झाले, त्याचा पर्जन्य श्रावणशुक्लांत पडतो ॥९॥ माघशुक्लांत झालेले गर्भाचा पर्जन्य श्रावण कृष्णांत पडतो. माघकृष्णांतले गर्भाचा पर्जन्य भाद्रपदशुक्लांत पडतो ॥१०॥ फाल्गुनशुक्लांतल्या गर्भाचा पर्जन्य भाद्रपदकृष्णांत पडतो. फाल्गुनकृष्णांतल्या गर्भाचा पर्जन्य आश्विनशुक्लांत पडतो ॥११॥ चैत्रशुक्लांतल्या गर्भाचा पर्जन्य आश्विनकृष्णांत पडतो. चैत्रकृष्णपक्षांतल्या गर्भाचा पर्जन्य कार्तिकशुक्लपक्षांत पडतो ॥१२॥

पूर्वोद्भूताःपश्चादपरोत्थाःप्राग्भवंतिजीमूताः ।
शेषास्वपिदिक्ष्वेवंविपर्ययोभवतिवायोश्च ॥१३॥

अर्थ—पूर्वेकडे उत्पन्न झालेले मेघ पश्चिमेकडून येतील व पश्चिमेकडे झालेले मेघ पूर्वेकडून येतील. याप्रमाणेच अन्यदिशांचाही व्यत्यय जाणावा. तसाच वायूचाही व्यत्यय जाणावा. गर्भधारणीं पूर्वेकडील वायु असला तर पर्जन्यसमयीं पश्चिमेकडील होईल असें जाणावें ॥१३॥

स्हादिमृदूदक्शिवशक्रदिग्भवोमारुतोवियद्विमलं ।
स्निग्धसितबहुलपरिवेषपरिवृतौहिममयूखार्कौ ॥१४॥
पृथुबहुलस्निग्धघनंघनसूचीक्षुरकलोहिताभ्रयुतं ।
काकांडमेचकाभंवियद्विशुद्धेंदुनक्षत्रं ॥१५॥
सुरचापमंद्रगर्जितविद्युत्प्रतिसूर्यकाःशुभासंध्या ।
शशिशिवशक्राशास्थाःशांतरवाःपक्षिमृगसंघाः ॥१६॥
विपुलाःप्रदक्षिणचराःस्निग्धमयूखाग्रहानिरुपसर्गाः ।
तरवश्चनिरुपसृष्टांकुरानरचतुष्पदाह्लृष्टाः ॥१७॥
गर्भाणांपुष्टिकराःसर्वेषामेवयोत्रतुविशेषः ।
स्वर्तुस्वभावजनितोगर्भविवृद्धौतमभिधास्ये ॥१८॥

अर्थ—आनंदकारक, मृदु ( सुखस्पर्श ), उत्तर, ईशानी, पूर्व या दिशाकडून वायु सुटेल; आकाश निर्मल होईल; चंद्रसूर्य स्निग्ध, श्वेत, कृष्णवर्ण अशा परिवेषांनीं ( खळ्यांनीं) वेष्टित होतील ॥१४॥ विस्तीर्ण, काळे, स्निग्ध अशा मेघांनीं युक्त आकाश होईल; सूच्याकार अ० क्षुराकार मेघांनें अ० तांबड्या मेघानें युक्त आकाश होईल; कावळ्याच्या आंड्यासारखा अ० मोराचे कंठासारखा वर्ण व चंद्र व नक्षत्रें स्वच्छ ज्यामध्यें असें आकाश होईल ॥१५॥ प्रातःसंध्या किंवा सायंसंध्या इंद्रधनुष्य, मधुरमेघशब्द, वीज, एककालींच द्वितीयसूर्य यांहीं युक्त होईल; पक्षी व अरण्यपशु यांचे समुदाय हे उत्तर, ईशानी, पूर्व या दिशांस असून, मधुरशब्द करतील ॥१६॥ ग्रह विस्तीर्णबिंबाचे, सव्य फिरणारे अ० नक्षत्रांचे उत्तरमार्गानें फिरणारे, स्निग्धकिरण व उपद्रवरहित असे असतील; चांगल्या पल्लवांनीं युक्त वृक्ष होतील; मनुष्य व चतुष्पाद प्राणी आनंदित होतील ॥१७॥ हीं पूर्वोक्त लक्षणें होतील तेव्हां गर्भांची पुष्टि होईल. येथें गर्भवृद्धिविषयीं स्वऋतुस्वभावानें उत्पन्न झालेला विशेष पुढें सांगतों ॥१८॥

पौषेसमार्गशीर्षेसंध्यारागोंबुदाःसपरिवेषाः ।
नात्यर्थंमृगशीर्षेशीतंपौषेतिहिमपातः ॥१९॥
माघेप्रबलोवायुस्तुषारकलुषद्युतीरविशशांकौ ।
अतिशीतंसघनस्यचभानोरस्तोदयौधन्यौ ॥२०॥
फाल्गुनमासेरूक्षश्चंडःपवनोभ्रसंप्लवाःस्निग्धाः ।
परिवेषाश्चासकलाःकपिलस्ताम्रोरविश्चशुभः ॥२१॥

पवनघनवृष्टियुक्ताश्चैत्रेगर्भाःशुभाःसपरिवेषाः।
घनपवनसलिलविद्युत्स्तनितैश्चहितायवैशाखे २२

अर्थ—मार्गशीर्ष व पौष या मासीं संध्याराग (प्रातःसायंसंध्यासमयीं आरक्त होणें), चंद्रसूर्यांस खळें, मेघ; व मार्गशीर्षमासीं थोडी थंडी, पौषमासीं बहुत थंडी १९ माघमासीं बहुत वायु, हिमकांति (थंडतेज) सूर्य, कलुषद्युति (मलिनकांति) चंद्र, बहुत थंडी, मेघयुक्तसूर्याचे अस्तोदय शुभ होत ॥२०॥ फाल्गुनमासीं कठिन व मोठा वायु, सजल मेघोद्भव, सूर्यचंद्रांस मध्यें तुटलेलीं खळीं, पिंगट व ताम्रवर्ण सूर्य शुभ होय ॥२१॥ चैत्रमासीं चंद्रसूर्यांस खळीं व वायु, मेघवृष्टि यांहीं युक्त गर्भ शुभ होत. वैशाखमासीं मेघ, वायु, वृष्टि, वीज, गर्जित हीं शुभ होत२२

मुक्तारजतनिकाशास्तमालनीलोत्पलांजनाभासः।
जलचरसत्वाकारागर्भेषुघनाःप्रभूतजलाः॥२३॥
तीव्रदिवाकरकिरणाभितापितामंदमारुताजलदाः।
रुषिताइवधाराभिर्विसृजंत्यंभःप्रसवकाले॥२४॥

अर्थ—मोतीं व रुपें यांसारखे पांढरे, तमालवृक्ष, नीलकमल, काजळ यांसारखे काळे, जलचर (मासे व कांसवे) या प्राण्यांच्या आकाराचे, असे मेघ गर्भामध्यें बहुत उदक धारण करतात ॥२३॥ अत्यंत तप्त सूर्यकिरणांनीं फार तापलेले, व अल्पवायूनें युक्त, असे गर्भकालीं जे मेघ असतात, ते प्रसवकालीं १९५ दिवसांनंतर, रागें भरल्या सारखे, मोठ्या धारांनीं उदक सोडितात (अतिवृष्टि करितात) २४

गर्भोपघातलिंगान्युल्काशनिपांशुपातदिग्दाहाः।
क्षितिकंपखपुरकीलककेतुग्रहयुद्धनिर्घाताः॥२५॥
रुधिरादिवृष्टिवैकृतपरिघेंद्रधनूंपिदर्शनंराहोः।
इत्युत्पातैरेभिस्त्रिविधैश्चान्यैर्हतोगर्भः॥ २६ ॥

अर्थ—उल्का (आकाशांतून अग्निरूप तारा पडतो तो), वीज, रजोवृष्टि, दिशेचा दाह, भूमिकंप, गंधर्वनगर, तामसकीलक केतु (शेंडेनक्षत्र), ग्रहांचेयुद्ध, मेघगर्जना ॥२५॥ रक्तादि वृष्टिविकार, परिघ (वक्ष्यमाण), इंद्रधनुष्य, चंद्रसूर्यग्रहण, हीं गर्भनाशाचीं चिन्हें होत. यांहींकरून व अन्य त्रिविध उत्पातांहींकरून गर्भ नष्ट झाला असें सांगावें ॥२६॥

**स्वर्तुस्वभावजनितैःसामान्यैर्यैश्चलक्षणैर्वृद्धिः ।**
**गर्भाणांविपरीतैस्तैरेवविपर्ययोभवति ॥ २७ ॥**

अर्थ–पूर्वोक्त ऋतुस्वभावजनित जीं सामान्य लक्षणें, त्यांहींकरून गर्भांची वृद्धि होते व तींच लक्षणें विपरीत झालीं तर विपर्यय ( गर्भनाश ) होतो ॥२७॥

**भद्रपदाद्वयविश्वांबुदैवपैतामहेष्वथर्क्षेषु ।**
**सर्वेष्वृतुषुविवृद्धोगर्भोबहुतोयदोभवति ॥२८॥**

अर्थ–पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, उत्तराषाढा, पूर्वाषाढा, रोहिणी या पाच नक्षत्रांचाठाईं सर्वऋतूमध्यें ( मार्गशीर्षादिमासीं सध्यारागादि लक्षणांनीं ) वाढलेला गर्भ बहुतवृष्टि देणारा होतो ॥२८॥

**शतभिषगाश्लेषार्द्रास्वातिमघासंयुतःशुभोगर्भः ।**
**पुष्णातिबहून्दिवसान्हंत्युत्पातैर्हतस्त्रिविधैः ॥२९॥**

अर्थ–शततारका, आश्लेषा, आर्द्रा, स्वाती, मघा या नक्षत्रीं झालेला गर्भ शुभ होय. तो गर्भ बहुत दिवस वृष्टि करितो. तोच गर्भ त्रिविधउत्पातांनीं हत झाल्यास आपण नाश पावतो ॥२९॥

**मृगमासादिष्वष्टौषट्षोडशविंशतिश्चतुर्युक्ता ।**
**विंशतिरथदिवसत्रयमेकतमर्क्षेणपंचभ्यः ॥३०॥**

अर्थ–शततारकादि पूर्वश्लोकोक्त पाच नक्षत्रांतून कोणत्याही नक्षत्रीं मार्गशीर्ष मासीं गर्भधारण झालें तर त्याची वृष्टि आठ दिवस होईल. पौषमासीं गर्भधारण झालें तर सहा दिवस. माघमासीं १६ दिवस. फाल्गुनमासीं २४ दिवस. चैत्रमासीं २० दिवस. वैशाखमासीं ३ दिवस. वृष्टि होईल. हे वृष्टिदिवस १९५ दिवस गेल्यानंतर असे जाणावे ॥३०॥

**क्रूरग्रहसंयुक्तेकरकाशनिमत्स्यवर्षदागर्भाः ।**
**शशिनिरवौवाशुभसंयुतेक्षितेभूरिवृष्टिकराः ॥३१॥**

अर्थ–गर्भनक्षत्र पापग्रहांनें युक्त असलें तर गारा, वीज, मत्स्य यांहीं युक्त अशी वृष्टि होते. चंद्र किंवा सूर्य, शुभग्रहांनें युक्त किंवा दृष्ट असला तर त्या गर्भाची बहुत वृष्टि होते ॥३१॥

**गर्भसमयेतिवृष्टिर्गर्भाभावायनिर्निमित्तकृता ।**
**द्रोणाष्टांशेभ्यधिकेवृष्टेगर्भःस्रुतोभवति ॥३२॥**

अर्थ–गर्भधारणकालीं, (प्रायोग्रहणा० अ० २९ श्लो० २०) इत्यादि निमित्तावाचून अतिवृष्टि होईल तर त्या गर्भाचा नाश होतो. द्रोण (२०० पले) पल (४ तोळे) द्रोणाचा आठवा हिंसा २५पलें (१०० तोळे) याहून अधिक वृष्टि झाली तर गर्भस्राव झाला असें जाणावें ॥३२॥

**गर्भःपुष्टःप्रसवेग्रहोपघातादिभिर्यदिनवृष्टः ।**
**आत्मीयगर्भसमयेकरकामिश्रंददात्यंभः ॥३३॥**

अर्थ–जो गर्भ, धारणकालीं पुष्ट होऊन १९५ दिवसानंतर, वृष्टिप्रतिबंधक ग्रहाच्या योगानें अथवा उत्पाताच्या योगानें, वर्षला नाहीं, तो आपल्या दुसऱ्या गर्भग्रहणकालीं गारांनीं मिश्रित उदक देतो (वृष्टि होते) ॥ ३३ ॥

**काठिन्यंयातियथाचिरकालधृतंपयःपयस्विन्याः ।**
**कालातीतंतद्वत्सलिलंकाठिन्यमुपयाति ॥३४॥**

अर्थ–जसें बहुत दिवस ओटींत राहिलेलें गाईचें दूध कठिन होतें तसें वृष्टिकाल अतिक्रांत करून राहिलेलें उदक कठिनत्व पावतें (गारा होतात) ॥ ३४ ॥

**पंचनिमित्तैःशतयोजनंतदर्धार्धमेकहान्यातः ।**
**वर्षतिपंचसमंताद्रूपेणैकेनयोगर्भः ॥३५॥**

अर्थ–वायु, वृष्टि, वीज, गर्जना, अभ्र या पांचही निमित्तांनीं युक्त जो गर्भ, तो आसमंताद्भागीं शंभर योजनें वृष्टि करितो चार निमित्तांनीं ५० योजनें, तीन निमित्तांनीं २५ योजनें, दोन निमित्तांनीं १२॥ योजनें, एक निमित्तानें ५ योजनें आसमंताद्भागीं भूमीवर वृष्टि करितो ॥३५॥

**द्रोणःपंचनिमित्तेगर्भेत्रीण्याढकानिपवनेन ।**
**षट्विद्युतानवाभ्रैःस्तनितेनद्वादशप्रसवे ॥३६॥**

अर्थ–पंचनिमित्तांनीं युक्त गर्भ असतां, द्रोणपरिमित वृष्टि होते. वायूनें युक्त गर्भ अ० तीन आढक वृष्टि होते. विजेनें युक्त गर्भ अ० सहा आढक वृष्टि होते अभ्रांनीं ९ आढक वृष्टि गर्जितानें १२ आढक वृष्टि होते ॥ आढकाचें प्रमाण अ० २३ श्लो० २ यांत सांगितलें आहे ॥३६॥

**पवनसलिलविद्युद्गर्जिताभ्रान्वितोयःसभव तिबहुतोयःपंचरूपाभ्युपेतः। विसृजतियदि तोयंगर्भकालेतिभूरिप्रसवसमयमित्वाशीक रांभःकरोति ॥ ३७ ॥**

अर्थ—वायु, उदक, वीज, गर्जना, अभ्र यांहीं युक्त जो गर्भ तो पंचरूपयुक्त बहुत जल देणारा होतो. गर्भकाळीं बहुत वृष्टि होईल तर प्रसवसमय प्राप्त होईल त्या वेळीं बारीक बिंदूची वृष्टि होत्ये ॥३७॥

**॥ इतिबृहत्संहितायांगर्भलक्षणंनामैकविंशोध्यायः ॥२१॥**

---

## ॥ अथधारणाध्यायः ॥

---

**ज्येष्ठसितेष्टम्याद्याश्चत्वारोवायुधारणादिवसाः। मृदुशुभपवनाःशस्ताःस्निग्धघनस्थगितगगनाश्च॥१॥**

अर्थ—ज्येष्ठशुक्लपक्षीं अष्टम्यादि चार दिवशीं वायुधारण होतें त्या दिवशीं, मृदु (सुखस्पर्श) व उत्तर, ईशानी, पूर्व या दिशाकडील वायु प्रशस्त होत तसेंच त्या दिवशीं स्निग्ध (रुक्ष नव्हत) अशा मेघानीं आच्छादित आकाश असेल तर ते दिवस प्रशस्त (शुभ) होत ॥१॥

**तत्रैवस्वात्याद्येवृष्टेभचतुष्टयेक्रमान्मासाः। श्रावणपूर्वाज्ञेयाःपरिस्रुताधारणास्ताःस्युः ॥२॥**

अर्थ—ज्येष्ठशुक्लपक्षींच स्वात्यादि ४ नक्षत्रीं वृष्टि झाली तर अनुक्रमानें श्रावणादि चार महिन्यामध्यें वृष्टि होत नाहीं (ज्येष्ठशुक्लपक्षीं स्वातीनक्षत्रीं वृष्टि झाली तर श्रावणमासीं वृष्टि होत नाहीं विशाखा न० भाद्रपदमासीं, अनुराधान० आश्विन मासीं, ज्येष्ठान० कार्तिकमासीं वृष्टि होत नाहीं) गर्भस्राव झाला असें समजावें २

**यदिताःस्युरेकरूपाःशुभास्ततःसांतरास्तुनशिवाय। तस्करभयदाःप्रोक्ताःश्लोकाश्चाप्यत्रवासिष्ठाः ॥३॥**

अर्थ—जर त्या पूर्वोक्त धारणा चारही दिवशीं एकसारख्या होतील तर शुभ होत व सांतरा: ( एकसारख्या ) न होतील तर अशुभ होय. चोरभय देणाऱ्या होतात. याविषयींच वसिष्ठऋषींचे श्लोक सांगतो ॥३॥

सविद्युतःसपृषतःसपांशूल्करमारुताः ।
सार्कचंद्रपरिच्छन्नाधारणाःशुभधारणाः ॥४॥
यदातुविद्युतःश्रेष्ठाःशुभाशाप्रत्युपस्थिताः ।
तदापिसर्वसस्यानांवृद्धिंब्रूयाद्विचक्षणः ॥५॥
सपांशुवर्षाःसापश्चशुभावालक्रियाअपि ।
पक्षिणांसुस्वरावाचःक्रीडापांशुजलादिषु ॥६॥
रविचंद्रपरिवेषाःस्निग्धानात्यंतदूषिताः ।
वृष्टिस्तदापिविज्ञेयासर्वसस्याभिवृद्धये ॥७॥
मेघाःस्निग्धाःसंहताश्चप्रदक्षिणगतिक्रियाः ।
तदास्यान्महतीवृष्टिःसर्वसस्यार्थसाधिका ॥८॥

अर्थ—विजेनेसहित, जलबिंदुयुक्त, धुळीच्या समुदायानेयुक्त जो वायु त्याणें सहित, सूर्यचंद्रांस जें मेघाचें आच्छादन त्याणें युक्त अशा ज्या धारणा त्या शुभ होत॥४॥ उत्तर, ईशानी, पूर्व या दिशाकडे श्रेष्ठ वीज चमकेल तर सर्वधान्याची वृद्धि होईल ॥५॥ धूळ व उदक यांणीं मुलाची क्रीडा; पक्ष्याचे सुस्वर शब्द व त्याची धूळ, उदक यांमध्ये क्रीडा; सूर्यचंद्रास स्निग्ध व फार अशुभ नव्हत अशीं खळीं, इत्यादि झाले असता सर्व धान्याची वृद्धि करणारी अशी वृष्टि होईल, असें जाणावें ॥६।७॥ मेघ स्निग्ध व दाट असून प्रदक्षिणगति ह्म० पूर्वेस असून दक्षिणेस जाणें, दक्षिणेहून पश्चिमेस, पश्चिमेहून उत्तरेस, उत्तरेहून पूर्वेस असे जातील तर सर्वधान्यांची साधक अशी महान् वृष्टि होईल असें जाणावें ॥८॥

॥ इतिबृहत्संहितायांवायुधारणानामद्वाविंशोध्यायः॥२२॥

## ॥ अथप्रवर्षणाध्यायः ॥

ज्यैष्ठ्यांसमतीतायांपूर्वाषाढादिसंप्रवृष्टेन ।
शुभमशुभंवावाच्यंपरिमाणंचांभसस्तज्ज्ञैः ॥१॥

अर्थ—ज्येष्ठशुद्ध पौर्णिमा अतिक्रांत झाल्यावर, पूर्वाषाढादि सर्वनक्षत्रीं जी वृष्टि होईल तिचें उदक मोजून शुभ किंवा अशुभ सांगावें ॥१॥

हस्तविशालंकुंडकमधिकृत्यांबुप्रमाणनिर्देशः ।
पंचाशत्पलमाढकमनेनमिनुयाज्जलंपतितं ॥२॥

अर्थ—एक हात व्यासाचें तोंडाचें वर्तुळ पात्र करून ते पावसांत ठेवावें व आंत जें पाणी जमेल त्यावरून 'उदकप्रमाण सांगावें.' पन्नास पलें ह्मणजे एक आढक ( चार तोळ्याचें १ पल ) ४ आढकाचा एक द्रोण होतो ॥२॥

येनधरित्रीमुद्राजनितावाबिंदवस्तृणाग्रेषु ।
वृष्टेनतेनवाच्यंपरिमाणंवारिणःप्रथमं ॥३॥

अर्थ—धुरळामात्र मरेल किंवा गवतावर बिंदु दिसतील अशी वृष्टि पूर्वाषाढादि ज्या नक्षत्रीं प्रथम होईल त्या नक्षत्रानें उदकाचें प्रमाण लोकांमध्यें सांगावें. गर्भधारण झालें पुढें वायुधारणही होऊन, या वर्षणकालीं वृष्टि झाली नाहीं तर पुढें प्रसवकालींही वृष्टि होत नाहीं ॥३॥

केचिद्यथाभिवृष्टंदशयोजनमंडलंवदंत्यन्ये ।
गर्गवसिष्ठपराशरमतमेतत्द्वादशान्नपरं ॥४॥

अर्थ—प्रवर्षणकालीं कोणत्याही प्रदेशीं वृष्टि झाली तर वर्षाकालीं पूर्वाषाढादिनक्षत्रीं चांगली वृष्टि होते असें कश्यपादिऋषि ह्मणतात. दहा योजनें मंडलावर प्रवर्षणकालीं वृष्टि झाली तर वर्षाकालीं शुभवृष्टि होते असें देवलादिऋषि ह्मणतात. बारा योजनें मंडलाहून अधिक वृष्टि प्रवर्षणकालीं झाली ह्मणजे वर्षाकालीं शुभवृष्टि होईल असें गर्ग, वसिष्ठ, पराशर ह्मणतात, परंतु याहून कमी नसावी असेंही ह्मणतात ॥४॥

येषुचभेष्वभिवृष्टंभूयस्तेष्वेववर्षतिप्रायः ।
यदिनाप्यादिषुवृष्टंसर्वेषुतदात्वनावृष्टिः ॥५॥

अर्थ—ज्या पूर्वाषाढादि नक्षत्रीं वर्षणकाली वृष्टि होये त्याच नक्षत्रीं वर्षाकालीं पुनः बहुतकरून वृष्टि होसे. जर पूर्वाषाढादि नक्षत्रीं वर्षणकालीं वृष्टि झाली नाहीं तर वर्षाकालीं अनावृष्टि होसे. ( पर्जन्य पडत नाहीं ) ॥५॥

हस्ताप्यसौम्यचित्रापौष्णधनिष्ठासुषोडशद्रोणाः ।
शतभिषगैंद्रस्वातिषुचत्वारःकृत्तिकासुदश ॥६॥
श्रवणेमघानुराधाभरणीमूलेषुदशचतुर्युक्ताः ।
फल्गुन्यांपंचकृतिःपुनर्वसौविंशतिर्द्रोणाः ॥७॥
ऐंद्राग्नाख्येवैश्वेचविंशतिःसार्पभेदशत्र्यधिकाः ।
आहिर्बुध्न्यार्यम्णप्राजापत्येषुपंचकृतिः ॥८॥
पंचदशाजेपुष्येचकीर्तितावाजिभेदशद्वौच ।
रौद्रेष्टादशकथिताद्रोणानिरुपद्रवेष्वेषु ॥९॥

अर्थ—हस्त, पूर्वाषाढा, मृगशीर्ष, चित्रा, रेवती, धनिष्ठा या नक्षत्रीं १६ द्रोण; शततारका, ज्येष्ठा, स्वाती या नक्षत्रीं ४ द्रोण; कृत्तिकानक्षत्रीं १० द्रोण, ॥६॥ श्रवण, मघा, अनुराधा, भरणी, मूल या नक्षत्रीं १४ द्रोण; पूर्वानक्षत्रीं २५ द्रोण; पुनर्वसुनक्षत्रीं २० द्रोण ॥७॥ विशाखा, उत्तराषाढा या नक्षत्रीं २० द्रोण, आश्लेषानक्षत्रीं १३ द्रोण; उत्तराभाद्रपदा, उत्तरा, रोहिणी या नक्षत्रीं २५ द्रोण ॥८॥ पूर्वाभाद्रपदा, पुष्य या नक्षत्रीं १५ द्रोण; अश्विनीनक्षत्रीं १२ द्रोण, आर्द्रानक्षत्रीं १८ द्रोण; याप्रमाणें प्रवर्षणकालीं तीं तीं नक्षत्रें उपद्रवरहित असलीं म्ह० वृष्टि होसे ॥९॥

रविरविसुतकेतुपीडितेभेक्षितितनयत्रिविधा
द्भुताहतेच । भवतिहिनशिवंनचापिवृष्टिःशु
भसहितेनिरुपद्रवेशिवंच ॥१०॥

अर्थ—सूर्य, शनि, राहु, केतु यांणीं नक्षत्र पीडित असता, म्ह० हे त्या नक्षत्रास असता; तसेंच भौम व त्रिविध उत्पात यांणीं नक्षत्र ताडित असता कल्याण होत नाहीं व वृष्टिही होत नाहीं. बुध, गुरु, शुक्र या शुभग्रहानीं युक्त व उत्पातरहित नक्षत्र अ० कल्याण व वृष्टि हीं होतात ॥१०॥

॥ इतिबृहत्संहितायांप्रवर्षणंनामत्रयोविंशोध्यायः ॥२३॥

# ॥ अथरोहिणीयोगः ॥

कनकशिलाचयविवरजतरुकुसुमासंगिमधुकरानुरुते ।
वहुविहगकलहसुरयुवतिगीतमंद्रस्वनोपवने ॥१॥
सुरनिलयशिखरिशिखरेबृहस्पतिर्नारदायययानाह ।
गर्गपराशरकाश्यपमयाश्चयान्शिष्यसंघेभ्यः ॥ २ ॥
तानवलोक्ययथावत्प्राजापत्येंदुसंप्रयोगार्थान् ।
स्वल्पग्रंथेनाहंतानेवाभ्युद्यतोवक्तुं ॥३॥

अर्थ—सुवर्णमय पाषाणसमुदायाच्या विवरामध्यें झालेले जे वृक्ष त्यांच्या पुष्पावर व सणारे जे भ्रमर त्यांचा शब्द आहे ज्यामध्यें अशा व नानाप्रकारच्या पक्ष्यांचा आलाप व देवस्त्रियांच्या ( अप्सरांच्या ) गायनाचा जो मधुर स्वर यांणीं युक्त आहेत बागा ज्यामध्यें, अशा मेरुपर्वताच्या शिखरावर बृहस्पति, नारदातें जे योग सांगता झाला, ते व गर्ग, पराशर, काश्यप, मय हे ऋषि शिष्यसमुदायास जे योग सांगते झाले त्या रोहिणी व चंद्र यांच्या योगातें, यथाशास्त्र अवलोकन करून, या थोडक्या ग्रंथानें मी त्या योगाच्या फलातें सांगतों ॥१।२।३॥

प्राजेशमाषाढतमिस्रपक्षेक्षपाकरेणोपगतंसमीक्ष्य ।
वक्तव्यमिष्टंजगतोऽशुभंवाशास्त्रोपदेशाद्ग्रहचिंतकेन ४
योगोयथानागतएववाच्यःसाधिष्ण्ययोगःकरणेमयोक्तः।
चंद्रप्रमाणद्युतिवर्णमार्गैरुत्पातवातैश्चफलंनिगाद्यं॥५॥

अर्थ—आषाढकृष्णपक्षीं रोहिणी नक्षत्र चंद्रानें युक्त होतें तें पाहून दैवज्ञानें जगताचें शुभाशुभ सांगावें ॥४॥ हा धिष्ण्ययोग मी पंचसिद्धांतिकेमध्यें सांगितला आहे तो पाहून त्याचें फल चंद्राचें प्रमाण, कांति, वर्ण, मार्ग, उत्पात, वायु, यांहीं करून सांगावें ॥५॥

पुरादुदग्यत्पुरतोपिवास्थलंत्र्यहोपितस्तत्रग्रहु
ताशतत्परः । ग्रहान्सनक्षत्रगणान्समालिखे
त्सधूपपुष्पैर्बलिभिश्चपूजयेत् ॥६॥ सरत्नतो
यौषधिभिश्चतुर्दिशंतरुप्रवालापिहितैःसुपूजि

तैः। अकालमूलैःकलशैरलंकृतंकुशास्तृतंस्थं
ण्डिलमावसेत्द्विजः ॥७॥

अर्थ—नगराच्या उत्तरेस किंवा पूर्वेस जें स्थल असेल तेथें तीन दिवस राहून, उपोषितहोत्साता, हवनतत्पर ब्राह्मणानें नक्षत्रासहित ग्रह काढून धूप, पुष्प, बलि यांहींकरून त्यांची पूजा करावी ॥६॥ रत्नें, उदकें, औषधि, यांहींसहित व वृक्षपल्लवांनीं आच्छादित, उत्तम पूजित, काळीं बुडें नाहींत अशा चार दिशास ठेवलेल्या कलशांनीं सुशोभित व दर्भांनीं आच्छादित अशा स्थंडिलाजवळ ब्राह्मणानें बसावें ॥७॥

आलभ्यमंत्रेणमहाव्रतेनवीजानिसर्वाणिनिधायकुंभे।
द्राव्यानिचामीकरदर्भतोयैर्होमोमरुद्वारुणसौम्यमंत्रैः८

अर्थ—नंतर महाव्रतनामक मंत्रानें सर्व बीजांचें अभिमंत्रण करून तीं कुंभामध्यें ठेवावीं; आणि त्या कुंभात सुवर्ण, दर्भ यांहींयुक्त उदक घालावें. नंतर वायु, वरुण, सोम यांच्या मंत्रांनीं अग्नींत होम करावा ॥८॥

श्लक्ष्णांपताकामसितांविदध्याद्दंडप्रमाणांत्रिगुणो
च्छ्रितांच। आदौकृतेदिग्ग्रहणेनभस्वान्ग्राह्यस्त
थायोगगतेशशांके ॥९॥

अर्थ—बारीक वस्त्राची काळी चार हात पताका, बारा हात लांब काष्ठावर बांधून उभारावी. प्रथमच (आरंभींच) दिशासाधन करावें, नंतर रोहिणीचा चंद्राशीं योग ज्यावेळीं होईल त्यावेळीं त्या पताकेनें वायु कोणत्या दिशेस जातो तो पहावा९

तत्रार्धमासाःप्रहरैर्विकल्प्यावर्षानिमित्तंदिव
सास्तदंशैः। सव्येनगच्छन्शुभदःसदैवय
स्मिन्प्रतिष्ठाबलवान्सवायुः ॥१०॥

अर्थ—त्या रोहिणीयोगीं, प्रहरानीं अर्धमास व प्रहरांशानीं दिवस, वर्षाऋतूमध्यें पर्जन्यासाठीं योजावे. वायु सव्य गेला तर निरंतर कल्याणकारक होतो. जो वायु स्थिर राहतो तो बलवान् यास्तव त्यावरून शुभाशुभ सांगावें ॥ (याचें तात्पर्य) रोहिणीयोग आषाढकृष्णपक्षीं ज्या दिवशीं अहोरात्रीं होईल त्या दिवशीं सूर्योदयापासून १ प्रहर पर्यंत जर शुभ (चांगला) वारा वाहील तर श्रावणाच्या पक्षीं चांगली वृष्टि होते. द्वितीयप्रहरीं वाहील तर दुसऱ्या पक्षीं

भाद्रपदाचा प्र. पक्ष. ४ प्रहरीं भा. २ पक्ष रात्रीच्या प्र. प्रहरीं आश्विनाचा प्र. पक्ष. द्वि. प्र. द्वि. पक्ष. तिसऱ्या प्रहरीं कार्तिकाचा प्र.पक्ष. चतुर्थ प्र. द्वि पक्ष. शुभवृष्टि होते. यांत अशुभ वायु वाहला तर या मासीं अनावृष्टि होते. यावरूनच त्रैराशिकानें दिवसही जाणावे ॥१०॥

वृत्तेतुयोगेंकुरितानियानिसंतीहबीजानिधृतानिकुंभे। येषांतुयोंशांकुरितस्तदंशस्तेषांविवृद्धिंसमुपैतिनान्यः ११

अर्थ—रोहिणीयोग होऊन गेल्यावर कुंभामध्यें पूर्वस्थापित बीजातून जीं अंकुरित होतील त्यांची वृध्दि होते, अन्यांची वृध्दि होत नाहीं ॥११॥

शांतपक्षिमृगराविताद्दिशोनिर्मलंवियदनिंदितोनिलः। शस्यतेशशिनिरोहिणीयुतेमेघमारुतफलानिवक्ष्यतः १२

अर्थ—चंद्राचा रोहिणीयोग झाला असतां, त्यावेळीं पक्षि व अरण्यपशु यांच्या मधुर-शब्दांनीं युक्त दिशा, निर्मळ आकाश, शुभवायु हीं प्रशस्त होत. मेघ व वायु यांचीं फलें यापुढें सांगतों ॥१२॥

क्वचिदसितसितैःसितैःक्वचिच्चक्वचिदसितैर्भुजगै रिवांबुवाहैः। वलितजठरपृष्ठमात्रदृश्यैःस्फुरि ततडिद्रसनैर्वृतंविशालैः ॥१३॥ विकसितकम लोदरावदातैररुणकरद्युतिरंजितोपकंठैः। छुरि तमिववियद्घनैर्विचित्रैर्मधुकरकुंकुमकिंशुकाव दातैः ॥ १४ ॥

अर्थ—कोठें श्वेतकृष्ण, कोठें श्वेत, कोठें काळेच असे, वलित उदर व पृष्ठ हीं च आहेत दृश्य ज्यांचीं असे, चंचल विद्युलता ह्याच आहेत जिव्हा ज्यांच्या असे, मोठ्या सर्पांसारख्या मेघांनीं व्याप्त व प्रफुल्लित कमलोदरासारखे श्वेत, आर क्त किरणकांतींनी तांबडे आहेत समीप भाग ज्यांचे असे, भ्रमर, कुंकुम, पळस या सारख्या वर्णांचे ,चित्रवर्णे मेघांनीं रंजित असें आकाश होईल ॥१३।१४॥

असितघननिरुद्धमेववाचलिततडित्सुरचापचि त्रितं। द्विपमहिषकुलाकुलीकृतंवनमिवदावप रीतमंबरं ॥१५॥

अर्थ—कृष्णमेघांनीं व्याप्त, चंचलवीज व इंद्रधनुष्य यांणीं चित्रित, असें आकाश हें, गज, महिष ( गवे ) यांच्या समुदायांनीं व्याप्त केलेलें व वणव्यानें व्याप्त अरण्यासारखें दिसतें ॥१५॥

**अथवांजनशैलशिलानिचयप्रतिरूपधरैःस्थगितं गगनं। हिममौक्तिकशंखशशांककरद्युतिहारिभि रंबुधरैरथवा ॥१६॥**

अर्थ—अथवा आकाश कज्जलपर्वताच्या पाषाणसमूहासारख्या काळ्या मेघांनीं आच्छादित अथवा बर्फ, मोत्यें, शंख, चंद्रकिरण यांच्या कांतीतें हरण करणाऱ्या ह्म० श्वेतमेघानीं व्याप्त असेल ॥१६॥

**तडिद्धेमकक्षैर्वलाकाग्रदंतैःस्रवद्वारिदानैश्चलत्प्रांत हस्तैः । विचित्रेंद्रचापध्वजोच्छ्रायशोभैस्तमाला लिनीलैर्वृतंचाब्दनागैः ॥१७॥**

अर्थ—वीजच आहे सुवर्णमय मध्यबंधनरज्जु ज्यास असे, बगळेपक्षी हेच आहेत वा हेरचे दांत ज्यांला असे, पडणारे उदक हेंच आहे मदोदक ज्यांला असे, चंचल जे प्रांत ( शेवटचे ) भाग तेच आहेत शुंडादंड ज्याचे असे, चित्रवर्ण जीं इंद्रधनुष्यें तींच जे उंच ध्वज त्यांणीं शोभित असे, तमालवृक्ष व भ्रमर यासारखे नीलवर्ण असे मेघ हेच हत्ती यांहीं आकाश व्याप्त असेल ॥१७॥

**संध्यानुरक्तेनभसिस्थितानामिंदीवरश्यामरुचांघनानां । वृंदानिपीतांवरवेष्टितस्यकांतिंहरेश्चोरयतांयदावा ॥१८॥**

अर्थ—संध्यासमयीं आरक्त आकाशामध्यें राहलेले, नीलकमलासारखी श्याम आहे कांति ज्याची अशा मेघांचे समुदाय, पीतांबरानें वेष्टित अशा नारायणाच्या कांतीतें हरण करतात काय असे ज्या आकाशामध्यें असतील ॥१८॥

**सशिखिचातकदर्दुरनिःस्वनैर्यदिविमिश्रित मंद्रपटुस्वनाः । खमवतत्यदिगंतविलंबिनः सलिलदाःसलिलौघमुचःक्षितौ ॥१९॥**

अर्थ–मोर, चातक, बेडूक यांच्या शब्दांनीं मिश्रित, मधुर व सुंदर असे शब्द करणारे मेघ जर आकाशामध्यें विस्तृत होऊन चहूंकडे जातील तर ते बहुत वृष्टि करतील ॥१९॥

निगदितरूपैर्जलधरजालैस्त्र्यहमवरुद्धंद्व्यहमथ वाहः । यदिवियदेवंभवतिसुभिक्षंमुदितजना चप्रचुरजलाभूः ॥२०॥

अर्थ–पूर्वी सांगीतल्या स्वरूपाच्या मेघानीं तीन दिवस किंवा दोन दिवस अथवा एक दिवस जर आकाश व्याप्त असेल तर सुभिक्ष, लोकांस आनंद, बहुत उदक हीं होतील ॥२०॥

रूक्षैरल्पैर्मारुताक्षिप्तदेहैरुष्ट्रध्वांक्षप्रेतशाखा मृगाभैः । अन्येषांवानिंदितानांसरूपैर्मूकै श्चाब्दैर्नोशिवंनापिवृष्टिः ॥२१॥

अर्थ–रूक्ष, अल्प, वायूनें पसरलेले, उंट, काक, प्रेत, वानर यांसारखे अथवा अन्य मार्जाररासभादि निंदितांसारखे, मूक ( गर्जनारहित ) अशा मेघानीं कल्याण होत नाहीं व वृष्टिही होत नाहीं ॥२१॥

विगतघनेवावियतिविवस्वानमृदुमयूखःस लिलकृदेवं । सरइवफुल्लंनिशिकुमुदाढ्यंख मुडुविशुद्धंयदिचसुवृष्ट्यै ॥२२॥

अर्थ–मेघरहित आकाशामध्यें कठोरकिरणांचा सूर्य वृष्टि करणारा होतो. रात्रीस चंद्रविकासी कमलिनीयुक्त, प्रफुल्लित सरोवरासारखें, स्वच्छ नक्षत्रांनीं युक्त आकाश जर दिसेल तर उत्तमवृष्टि होय ॥२२॥

पूर्वोद्भूतैःसस्यनिष्पत्तिरब्दैराग्नेयाशासंभवै रग्निकोपः । याम्येसस्यंक्षीयतेनैर्ऋतेर्धंपश्चा ज्जातैःशोभनावृष्टिरब्दैः ॥२३॥

वायव्योत्थैर्वातवृष्टिःक्वचिच्चपुष्टावृष्टिःसौम्य काष्ठासमुत्थैः । श्रेष्ठंसस्यंस्थाणुदिक्संप्रवृद्धै र्वायुश्चैवंदिक्षुधत्तेफलानि ॥२४॥

अर्थ—पूर्वदिशेकडे उत्पन्न झालेल्या मेघांनीं धान्यसंपत्ति होते. आग्नेयीस उत्पन्न झालल्या मेघांनीं अग्निकोप होतो. दक्षिणेचे मेघांनीं धान्यनाश होतो. नैर्ऋतीचे मेघांनीं अर्ध्या धान्याचा नाश होतो. पश्चिमेचे मेघांनीं चांगली वृष्टि होते ॥२३॥ वायव्यदिशेचे मेघांनीं वातयुक्त वृष्टि क्वचित् होते. उत्तरदिशेचे मेघांनीं परिपूर्ण वृष्टि होते. ईशानीचे मेघांनीं धान्य उत्तम होतें. याप्रमाणेंच वायूचीही दिशापरत्वें फलें होतात ॥२४॥

उल्कानिपातास्तडितोशनिश्चदिग्दाहनिर्घा
तमहीप्रकंपाः । नादामृगाणांसपतत्रिणांच
ग्राह्यायथैवांबुधरास्तथैव ॥२५॥

अर्थ—उल्का, वीज, अशनि, (यांचीं लक्षणें पुढें सांगावयाचीं आहेत) या तिहींचे निपात; दिग्दाह, निर्घात, भूमिकंप, पक्षि व आरण्यपशु यांचे शब्द या सर्वांचीं फलें मेघांसारखीं दिशापरत्वें घ्यावीं ॥२५॥

नामांकितैस्तैरुदगादिकुंभैःप्रदक्षिणंश्रावणमा
सपूर्वैः । पूर्णैःसमासःसलिलस्यदातास्रुतैरवृ
ष्टिःपरिकल्प्यमूनैः ॥२६॥

अर्थ—उदगादि नामांकित जे पूर्वोक्त चार कुंभ त्यांहीं प्रदक्षिण श्रावणादि चार मासांचीं फलें सांगावीं. ज्या महिन्याचा कुंभ उदकपूर्ण असेल त्यांत वृष्टि होईल. ज्याचा पूर्ण नसेल त्यांत वृष्टि होणार नाहीं. याप्रमाणें जितके कमी झाले असती-ल तशी वृष्टि स्वबुद्धीनें सांगावी. चारही कुंभ पूर्ण असतील तर चारही मासांत पर्णवृष्टि होईल ॥२६॥

अन्यैश्चकुंभैर्नृपनामचिन्हैर्देशांकितैश्चाप्यपरैस्त
थैव । भग्नैःस्रुतैर्न्यूनजलैःसुपूर्णैर्भाग्यानिवा
च्यानियथानुरूपं ॥२७॥

अर्थ—तेथें दुसरे, राजनामांकित व देशनामांकितही पूर्ण कुंभ ठेवावे. त्यांतून ज्यां-चे फुटतील त्यांस फार अशुभ. पाझरतील तर उपद्रव, न्यूनजल होतील तर किं-चित् अशुभ. पूर्ण असतील तर शुभ. याप्रमाणें यथायोग्य फलें सांगावीं ॥२७॥

दूरगोनिकटगोथवाशशीदक्षिणेपथियथातथा

स्थितः । रोहिणींयदिमुनक्तिसर्वथाकष्टमेवज
गतोविनिर्दिशेत् ॥२८॥

अर्थ–चंद्र, दुरून, जवळून किंवा दक्षिणमार्गी राहून जर रोहिणीचा योग करील तर लोकास दुर्भिक्षादि अशुभ होतें ॥२८॥

स्पृशन्नुदग्यातियदाशशांकस्तदासुवृष्टिर्बहु
लोपसर्गाः । असंस्पृशन्योगमुदक्समेतःक
रोतिवृष्टिंविपुलांश्रियंच ॥२९॥

अर्थ–चंद्र, ज्याकाळीं रोहिणीला दक्षिणेकडून स्पर्श करून उत्तरेस जातो त्याकाळीं उत्तमवृष्टि व बहुत उपद्रव होतात जेव्हा रोहिणीला स्पर्श न करून उत्तरेकडून जाईल तेव्हा बहुत वृष्टि होईल व लोकास लक्ष्मी प्राप्त होईल ॥२९॥

रोहिणीशकटमध्यसंस्थितेचंद्रमस्यशरणीकृ
ताजनाः । क्कापियांतिशिशुयाचिताशनाःसू
र्यतप्तपिठरांबुपायिनः ॥३०॥

अर्थ–चंद्र, रोहिणीच्या शकटमध्यमार्गी (शकटभेद करून) राहिला असता, रक्षणकर्ता नसल्यामुळें लोक देशोदेशीं जातात व बालकासाठीं अन्न मागणारे व सूर्यानें तापविलेलें भांड्यांतील पाणी पिणारे असे लोक होतात. ह्मणजे उदक नाहींसें होतें ॥३०॥

उदितंयदिशीतदीधितिंप्रथमंपृष्ठतएतिरोहि
णी । शुभमेवतदास्मरातुराःप्रमदाःकामि
वशेवसंस्थिताः ॥३१॥

अर्थ–अगोदर उदयास पावलेल्या चंद्राच्या मागून, रोहिणीचा उदय होईल तर शुभ होय. त्याकाळीं कामानें पीडित स्त्रिया कामीपुरुषाच्या स्वाधीन राहतील ३१

अनुगच्छतिपृष्ठतःशशीयदिकामीवनिताभि
वप्रियां । मकरध्वजबाणपीडिताःप्रमदानां
वशगास्तदानराः ॥३२॥

अर्थ—जसा कामीपुरुष आवडत्या स्त्रीच्या मागून जातो तसा, चंद्र रोहिणीच्या मागून उदय पावेल तर त्यावर्षी कामबाणांनी पीडित असे पुरुष स्त्रियांच्या स्वाधीन होतील ॥३२॥

आग्नेय्यांदिशिचंद्रमायदिभवेत्तत्रोपसर्गोमहान्नैर्ऋत्यांसमुपद्रुतानिनिधनंसस्यानियांतीतिभिः । प्राजेशानिलदिक्स्थितेहिमकरेसस्यस्यमध्यश्रयोयातेस्याणुदिशंगुणाःसुवहवःसस्यार्घवृद्ध्यादयः ॥३३॥

अर्थ—रोहिणीच्या आग्नेयी दिशेस चंद्र असेल तर, त्यावर्षी फार उपद्रव होईल. रोहिणीच्या नैर्ऋतीस असेल तर धान्यें अतिवृष्ट्यादि उपद्रवांनीं युक्त होऊन, नाश पावतील. वायव्येस असेल तर, धान्याची वृधि मध्यम होईल. ईशानीस असेल तर धान्याची वृधि व स्वस्ताई इत्यादिक बहुत गुण होतील ३३

ताडयेद्यदिचयोगतारकामावृणोतिवपुषायदापिवा । ताडनेभयमुशंतिदारुणंछादनेनृपवधोंगनाकृतः ॥३४॥

अर्थ—चंद्र, योगतारेतें (नक्षत्राच्या सर्व तारांमध्यें जी तेजस्वी व मोठी असेल ती योगतारा) ताडन करील ह्मणजे एका टोंकानें स्पर्श करील तर मोठें भय होईल व शरीरानें (बिंबानें) आच्छादन करील तर राजाचा वध स्त्रीचे हातून होईल ३४

गोप्रवेशसमयेग्रतोवृषोयातिकृष्णपशुरेववापुरः । भूरिवारिशवलेतुमध्यमंनोसितेंवुपरिकल्पनापरैः ॥३५॥

अर्थ—गाई वनांतून येऊन, गृहप्रवेशसमयीं (सध्याकाळीं) पुढें बैल जाईल अथवा काळा पशु जाईल तर त्यावर्षी बहुत वृष्टि होईल. काळापांढरा पशु जाईल तर मध्यम वृष्टि होईल. पांढरा पशु जाईल तर वृष्टि होणार नाहीं. इतर वर्णांचा पशु जाईल तर किंचित् किंचित् वृष्टि होईल ॥३५॥ हा श्लोक या प्रकरणांत आहे ह्मणून, रोहिणीयोगाचे दिवशीं या श्लोकास सांगितल्याप्रमाणें होईल तर त्याचीं तशीं फळें समजावीं.

दृश्यतेनयदिरोहिणीयुतश्चंद्रमानभसितोयदावृते ।
रुग्भयंमहदुपस्थितंतदाभूश्चभूरिजलसस्यसंयुता॥३६॥

अर्थ–मेघानीं आच्छादित झाल्यामुळे रोहिणीयुक्त चंद्र दृष्टिगोचर होणार नाहीं तर त्यावर्षी मोठें रोगभय होईल व उदक, धान्य यांहींयुक्त भूमि होईल असें समजावें ॥३६॥

॥इतिबृहत्संहितायांरोहिणीयोगोनामचतुर्विंशोऽध्यायः २४

## ॥ अथस्वातियोगः ॥

यद्रोहिणीयोगफलंतदेवस्वातावपाढासहिते चचंद्रे । आषाढशुक्लेनिखिलंविचिंत्यंयोस्मिन्विशेषस्तमहंप्रवक्ष्ये ॥१॥

अर्थ–चंद्ररोहिणीयोगाचें जें फल सांगितलें तेंच स्वाती व पूर्वाषाढा या नक्षत्रीं चंद्र असतां, आषाढशुक्लपक्षीं पहावें. त्याहून यांत जो विशेष तो मी सांगतो १

स्वातौनिशांशेप्रथमेभिवृष्टेसस्यानिसर्वाण्युपयांति वृद्धिं । भागेद्वितीयेतिलमुद्गमाषाग्रैष्मंतृतीयेस्तिन शारदानि ॥२॥ वृष्टेन्हिभागेप्रथमेसुवृष्टिस्तद्वत्द्वितीयेतुसकीटसर्पा । वृष्टिस्तुमध्यापरभागवृष्टेनिश्छिद्र वृष्टिर्द्युनिशंप्रवृष्टे ॥३॥

अर्थ–आषाढशुक्लपक्षीं जेव्हां स्वातीस चंद्र आईल, त्यादिवशीं रात्रीच्या प्रथमभागीं वृष्टि होईल तर सर्वधान्याची वृद्धि होइल. रात्रीच्या द्वितीयभागीं वृष्टि होईल तर तिल, मूग, उडीद हीं धान्यें होतील तृतीयभागीं वृष्टि होईल तर ग्रैष्म (उन्हाळीं धान्यें) होतील शारदऋतूंतील धान्यें होणार नाहींत ॥२॥ दिवसाच्या प्रथमभागीं वृष्टि झाली तर उत्तम वृष्टि होवे. द्वितीयभागीं झाली तर उत्तम वृष्टि होवे, परंतु कृमि, सर्प हे होतात तृतीयभागीं वृष्टि झाली तर मध्यम वृष्टि होवे स्वातियोगीं रात्रंदिवस वृष्टि झाली तर, (यथाकालीं) निर्दोषवृष्टि होये ॥३॥

समभुत्तरेणताराचित्रायाःकीर्त्यतेअपांवत्सः ।
तस्यासन्नेचंद्रेस्वातेर्योगःशिवोभवति ॥४॥

अर्थ—चित्रानक्षत्राच्या समभागीं उत्तरेकडे किंवा किंचित् तिर्कस उत्तरेकडे जें नक्षत्र दिसतें त्याला अपांवत्स असें ह्मणतात. त्याजवळ चंद्र येईल तर तो स्वातियोग शुभ होतो ॥४॥

सप्तम्यांस्वातियोगेयदिभवतिहिमंमाघमासांधका
रेवायुर्वाचंडवेगःसजलजलधरोवापिगर्जत्यजस्रं ।
विद्युन्मालाकुलंवायदिभवतिनभोनष्टचंद्रार्कतारं
विज्ञेयाप्रावृडेपामुदितजनपदासर्वसस्यैरुपेता ॥५॥

अर्थ—माघकृष्णसप्तमीस स्वातियोग असून त्यादिवशीं बर्फ पडेल अथवा मोठा धारा सुटेल अ० सजलमेघ निरंतर गर्जना करील अ० विजाच्या मालांनीं व्याप्त आकाश होईल अ० चंद्र, सूर्य, नक्षत्रें दिसणार नाहींत तर त्यावर्षी आनंदित लोक होतील व सर्व धान्यांनीं युक्त वर्षाकाल होईल असें जाणावें ॥५॥

तथैवफाल्गुनेचैत्रेवैशाखस्यासितेपिवा ।
स्वातियोगंविजानीयादाषाढेचविशेषतः ॥६॥

अर्थ—तसेंच फाल्गुन, चैत्र, वैशाख यांच्या कृष्णपक्षीं स्वातियोगाचीं फळें जाणावीं; परंतु आषाढामध्यें विशेषेंकरून जाणावीं ॥६॥

॥ इतिबृहत्संहितायांस्वातियोगोनामपंचविंशोध्यायः २५

---

## ॥ अथआषाढीयोगः ॥

आषाढ्यांसमतुलिताधिवासितानामन्येद्युर्य
दधिकतामुपैतिबीजं । तद्वृद्धिर्भवतिनजायते
यदूनंमंत्रोस्मिन्भवतितुलाभिमंत्रणाय ॥१॥

अर्थ—उत्तराषाढानक्षत्रास चंद्र असेल त्यादिवशीं (आषाढीपौर्णिमेस किंवा किंचि त् मागें पुढें ) बरोबर मोजून ठेवलेलीं जीं सर्व बीजें, त्यांतून दुसऱ्या दिवशीं जें बीज अधिक होईल, त्याची वृद्धि त्यावर्षीं होते व जें कमी होईल तें उत्पन्न हो त नाहीं. या तुलाभिमंत्रणाचा मंत्र आहे, त्याणें तराजूचें अभिमंत्रण करावें १

स्तोतव्यामंत्रयोगेनसत्यादेवीसरस्वती ।
दर्शयिष्यसियत्सत्यंसत्येसत्यव्रताह्यसि ॥२॥
येनसत्येनचंद्रार्कौग्रहाज्योतिर्गणास्तथा ।
उत्तिष्ठंतीहपूर्वेणपश्चादस्तंव्रजंतिच ॥३॥
यत्सत्यंसर्ववेदेषुयत्सत्यंब्रह्मवादिषु ।
यत्सत्यंत्रिषुलोकेषुतत्सत्यमिहदृश्यतां ॥४॥
ब्रह्मणोदुहितासित्वमादित्येतिप्रकीर्तिता ।
काश्यपीगोत्रतश्चैवनामतोविश्रुतातुला ॥५॥

अर्थ—या योगमंत्रानें सत्या जी सरस्वती देवी तिची स्तुति करावी. हे सत्ये तू सत्यव्र ता आहेस यास्तव जें खरें तें दाखीव ॥२॥ ज्या सत्यानें चंद्र, सूर्य, ग्रह, नक्षत्र समुदाय हे पूर्वेकडे उदय पावतात व पश्चिमेकडे अस्त पावतात ॥३॥ व जें सत्य सर्व वेदामध्यें व जें सत्य ब्रह्मवादी यामध्यें व त्रैलोक्यामध्यें जें सत्य तें सत्य येथे दाखवावें ॥४॥ हे देवि, तू ब्रम्ह्याची कन्या आहेस. आदित्या असें तुला ह्मणतात काश्यपगोत्र तुझें आहे व तुझें नाव तुला असें प्रसिद्ध आहे ॥५॥

क्षौमंचतुःसूत्रकसंनिबद्धंषडंगुलंशिक्यकवस्त्र मस्याः । सूत्रप्रमाणंचदशांगुलानिषडेवकक्षोभयशिक्यमध्ये ॥६॥

अर्थ—या तुलेचें ( तराजूचें ) वस्त्र ( पडदें ) तागाचें किंवा सणाचें सहा आगळें असावें व तें चार सूत्रांनीं बद्ध असावें. तीं सूत्रें दहा आंगळें असावीं व त्या दोन पडद्याच्या मध्यभागीं सहा आगळें कक्षा ( धरावयाची दोरी ) असावी ६

याम्येशिक्येकांचनंसंनिवेश्यंशेषद्रव्याण्युत्तरे वृनिचैवं । तोयःकौप्यैःस्यंदिभिःसारसैश्चनृ पैर्हीनामध्यमाचोत्तमाच ॥७॥

अर्थ—सुवर्ण मोजावयाचें असल्यास तें दक्षिणपरड्यात ठेवावें. अ पद्रव्ये उत्तर परड्यात ठेवावीं व जल्हीं तसेच मोजावें. त्यात कूपोदक जर अधिक होईल तर अत्यल्पवृष्टि, झऱ्याचें उदक अधिक होईल तर मध्यमवृष्टि, तळ्याचें उदक अधिक होईल तर, उत्तमवृष्टि होईल असें जाणावें. तीनही उदकें कमी झालीं तर अनावृष्टि होईल ॥ ७ ॥

दंतैर्नागागोहयाद्याश्चलोम्नाहेम्नाभूपाःसिक्थ
केनद्विजाद्याः । तद्वद्देशावर्षमासादिशश्चशे
षद्रव्याण्यात्मरूपास्थितानि ॥८॥

अर्थ—हस्तिदंताचे वजनाप्रमाणे हत्ती अधिक किंवा कमी होतील हें जाणावें, तसे च ज्या प्राण्यास लोकर आहे त्याची ऱ्हासवृद्धि लोकरीचे वजनानें समजावी. राजे· सुवर्णानें, ब्राह्मणादि मेणानें—व देशाच्या व पुढें येणारींवर्ष,, मास, दिशा याच्या मेणाच्या प्रतिमा कल्पून, त्या मेणाने । अन्य जे धान्यादि पदार्थ असतील त्याचें प्रत्यक्षच वजन करून त्यावरून क्षयवृद्धि समजावी ॥८॥

हैमीप्रधानारजतेनमध्यातयोरभावेखदिरेण
कार्या । विद्धःपुमान्येनशरेणसावातुला
प्रमाणेनभवेद्वितस्तिः ॥९॥

अर्थ—ती तुला ( दांडी ) सुवर्णाची मुख्य, रजताची मध्यम, हीं दोनही न मिळत तर खैराची करावी. ज्या बाणानें पुरुषाचा वेध झाला त्या बाणाची तुला क· रावी. त्या तुलेचें प्रमाण, वितस्ति ( १२ अंगुळें लांब ) असावें ॥९॥

हीनस्यनाशोभ्यधिकस्यवृद्धिस्तुल्येनतुल्यंतु
लितंतुलायां । एतत्तुलाकोशरहस्यमुक्तंप्राजे
शयोगेपिनरोविदध्यात् ॥१०॥

अर्थ—तुलेमध्ये मोजलेलें द्रव्य पूर्वीपेक्षां कमी होईल तर त्याचा नाश. वृद्धि होई ल तर वृद्धि. बरोबर होईल तर मध्यम त्यावर्षी तें द्रव्य होतें. हे तुलादिव्य, रहस्य रोहिणीयोगींही पहावें ॥१०॥

स्वातावषाढास्वथरोहिणीषुपापग्रहायोगग
तानशस्ताः । ग्राह्यंतुयोगद्वयमप्युपोष्ययदा
धिमासोद्विगुणीकसेति ॥११॥

अर्थ—स्वाती, पूर्वाषाढा, रोहिणी या नक्षत्रीं चंद्रयोगकालीं तेथें पापग्रह असतील तर शुभ नव्हे. ज्यावर्षी आषाढ अधिक असेल त्यावर्षी पूर्वाषाढा व रोहिणी हे योगद्वय दोनही महिन्यात पहावें ॥११॥

त्रयोपियोगाःसदृशाःफलेनयदातदावाच्यम संशयेन । विपर्ययेयत्त्विहरोहिणीजंफलंतदेवाभ्यधिकंनिगद्यं ॥१२॥

अर्थ—ह्या तीनही योगाचें फल जर सारखें येईल तर निःसंशय फल सांगावें. आणि जर भिन्नभिन्न फलें येतील तर रोहिणीचें फल तेंच अधिक सांगावें ॥१२॥

निष्पत्तिरग्निकोपोवृष्टिर्मंदाथमध्यमाश्रेष्ठा । बहुजलपवनापुष्टाशुभाचपूर्वादिभिःपवनैः ॥१३॥

अर्थ—रोहिणीयोगीं पूर्वादि आठ दिशांच्या वायूनीं धान्यनिष्पत्यादि फलें होतात. वा० पूर्वेचा वारा असेल तर सर्व धान्यें होतील. आग्नेयीचा अ० अग्निकोप, दक्षिणेचा अ० अल्प, नैर्ऋतीचा अ० मध्यम, पश्चिमेचा अ० चांगली, वायव्येचा अ० वृष्टि व वायु बहुत होतील, ईशानीचा वायु अ० तर शुभ अशी वृष्टि होईल१३

वृत्तायामाषाढ्यांकृष्णचतुर्थ्यामजैकपादर्क्षे । यदिवर्षतिपर्जन्यःप्रावृट्शस्तानचेन्नततः ॥१४॥

अर्थ—आषाढी पौर्णिमा झाल्यानंतर कृष्णपक्षीं चतुर्थीस पूर्वाभाद्रपदा नक्षत्री पर्जन्यवृष्टि होईल तर, वर्षाकाळ शुभ होतो व त्यादिवशीं वृष्टि न झाली तर वर्षाकाल अशुभ होय ॥१४॥

(आषाढ्यांपौर्णमास्यांतुयदीशानोनिलोभवेत् । अस्तंगच्छतितीक्ष्णांशौसस्यसंपत्तिरुत्तमा ॥१५॥)

अर्थ—आषाढशुद्ध पौर्णमासीस सूर्य अस्तास जावेवेळीं ईशानी दिशेचा वारा सुटेल तर, धान्य उत्तम उत्पन्न होईल ॥१५॥

इतिवृहत्संहितायांआषाढीयोगोनामषड्विंशोध्यायः २६

---

## ॥ अथवातचक्राध्यायः ॥

( हा वातचक्राध्याय आचार्यकृत नव्हे, कारण पूर्वाध्यायातील तेराव्या श्लोकानें वायु सांगितला आहे; परंतु विस्तार यात आहे यास्तव येथें व्याख्या करतो असें टीकाकार ह्मणतात )

( पूर्वःपूर्वसमुद्रवीचिशिखरप्रस्फालनाघूर्णितश्चंद्रा
कांशुसटाभिघातकलितोवायुर्यदाकाशतः । नैकांत
स्थितनीलमेघपटलांशारव्यसंवर्धितांवासंतोल्कटस
स्यमंडिततलांविधात्तदामेदिनीं ॥१॥

अर्थ–आषाढपौर्णमासीस पूर्वसमुद्राच्या लाटा हालविण्यानें कंपित असा, चंद्रसूर्यकिरण हेच मानेवरील केंस, याच्या ताडनानें मिश्रित असा पूर्वदिशेचा वारा जर आकाशांत वाहील तर सर्वत्र वृष्टि होऊन सरदतूतील धान्यें व वसंतऋतूतील धान्यें पृथ्वीवर होतील ॥१

यदाग्नेयोवायुर्मलयशिखरास्फालनपटुःप्लव
त्यस्मिन्योगेभगवतिपतंगेप्रवसति । तदानि
त्योदीप्ताज्वलनशिखरालिंगिततलास्वगात्रो
ष्मोल्लासैर्वमतिवसुधाभस्मनिकरं ॥२॥

अर्थ–या आषाढीयोगीं सूर्यास्तसमयीं मलयपर्वताच्या शिखराचे ताडन करणारा वारा आग्नेयीकडून वाहील तर नित्यश: अग्निशिखानीं आलिंगित अशी भूमि स्वशरीरातून निघालें जें ऊष्मे ( वाफा ) त्याहींकरून बहुत भस्मातें ओकते ( सर्वजळून भस्म होतें ) ॥२॥

तालीपत्रलतावितानतरुभिःशाखामृगान्नर्तयन्योगे
स्मिन्प्लवतिध्वनन्सुपरुषोवायुर्यदादक्षिणः । सर्वो
द्योगसमुन्नताश्वगजवत्तालांकुशैर्घट्टिताःकीनाशाइ
वमंदवारिकणिकान्मुंचंतिमेघास्तदा ॥३॥

अर्थ–या आषाढीयोगीं, सूर्यास्तसमयीं ताडपत्रें, वेलींचा विस्तार व वृक्ष याहींकरून वानरातें नाचविणारा, शब्द करणारा, फार कठिण असा दक्षिणवारा सुटेल

तर सर्व उद्यानांनीं उन्नत व हत्तीसारखे ताडवृक्षरूप अंकुशांनीं रुद्ध वानरांसारखे मेघ अल्पउदकाचे कण सोडतात ( अल्पवृष्टि होते ) ॥३॥

**सूक्ष्मैलालवलीलवंगनिचयान्व्याघूर्णयन्सागरे भानोरस्तमये ब्रुवत्यविरतो वायुर्यदा नैर्ऋतः । क्षुत्तृष्णामृतमानुषास्थिशकलप्रस्तारभारच्छदा मत्ताप्रेतवधूरिवोग्रचपला भूमिस्तदा लक्ष्यते ॥४॥**

अर्थ—आषाढीयोगीं सूर्यास्तीं बारीक एलची, रायआंवळी, लवंग यांच्या समुदायांतें समुद्रामध्यें कांपविणारा असा निर्ऋतिदिशेकडील वारा सुटेल तर क्षुधा तृषा यांहीं मेलेल्या मनुष्यांच्या अस्थिशकलांचा जो बहुत विस्तार तोच आहे मरिश्चनीवस्त्र जिला, अशी भूमि प्रेतस्त्रीसारखी मत्त व तीव्रचापल्ययुक्त अशी होते ह० अन्नपाणी नाहीं यास्तव बहुत लोक मरतात ॥४॥

**यद्यारेणूत्पातैः प्रविकटसटाटोपचपलः प्रवातः पश्चार्धे दिनकरकरापातसमये । तदा सस्योपेता प्रवरनृवरावद्धसमरा धरा स्थाने स्थानेष्वविरतवसामांसरुधिरा ॥५॥**

अर्थ—आषाढीयोगीं, सूर्यास्तसमयीं धूळ उडविणारा अत्यंत चपल असा वायु पश्चिमेकडून वाहील तर, पृथ्वीवर धान्यें होतील. श्रेष्ठमनुष्यांचीं युद्धें होऊन जागोजाग वसा, मांस, रक्त यांहींयुक्त भूमि होईल. ( बहुत युद्धें होतील ) ॥५॥

**आषाढीपर्वकाले यदि किरणपतेरस्तकालोपपन्नो वायव्यो वृत्यवेगः श्वसिति घनरिपुः पन्नगादानुकारी । जानीयाद्वारिधाराप्रमुदितमुदितामुक्तमंडूककंठां सस्योद्भासैकचिन्हां सुखबहुलतया भाग्यसेनामिवोर्वीम् ॥६॥**

अर्थ—आषाढी पौर्णमासीस सूर्यास्तसमयीं फार वेगवान्, मेघांचा शत्रु ( उडविणारा ) गरुडासारखा ( वेगानें जाणारा ) असा वायव्यदिशेकडून वारा सुटेल तर उदकधारांनीं अत्यंत आनंदित, बेडकांच्या शब्दांनीं युक्त व बहुत सुखानें धान्य होण्याचीं चिन्हें समजलीं आहेत जिचीं, अशी भूमि भाग्ययुक्त सेनेप्रमाणें शोभते. असें जाणावें ॥६॥

मेरुग्रस्तमरीचिमंडलतलेग्रीष्मावसानेरवौवा
त्यामोदिकदंबगंधसुरभिर्वायुर्यदाचोत्तरः । वि
द्युद्भ्रांतिसमस्तकांतिकलनामत्तास्तदातोयदाउ
न्मत्ताइवनष्टचंद्रकिरणांगांपूरयंत्यंबुभिः ॥७॥

अर्थ—आषाढीपौर्णमासीस सूर्यास्तकाली अत्यंत सुगंधी, कदंबपुष्पांच्या सुगंधानें सुवासित वायु, उत्तरेकडून वाहील तर, विजांच्या भ्रमणानें सर्व तेजांचें आकलन (आकार ज्ञान) करणारे व मत्त मेघ उन्मत्तासारखे चंद्रकिरण न दिसणाऱ्या भूमीतें उदकधारांनीं पूर्ण करितील (विजा फार लवून अतिवृष्टि होईल) ॥७॥

ऐशानोयदिशीतलोमरगणैःसंसेव्यमानोभवेत्
पुन्नागागुरुपारिजातसुरभिर्वायुःप्रचंडध्वनिः ।
आपूर्णोदकयौवनावसुमतीसंपन्नसस्याकुलाध
र्मिष्ठाःप्रणतारयोनृपतयोरक्षंतिवर्णास्तदा ॥८॥

अर्थ—आषाढपौर्णमासीस सूर्यास्तकालीं, शीतल, देवांनीं घेण्याजोगा, पुन्नाग (सुरंगीचें झाड) कृष्णागरु, पारिजातक यांच्या पुष्पांनीं सुगंधित, मोठा शब्द करणारा असा वायु ईशानीकडून सुटेल तर, उदकपूर्ण, धान्ययुक्त, अशी भूमि होईल. धार्मिष्ठ, शरण येणारे आहेत शत्रु ज्यांस, असे राजे ब्राह्मणादि चारही वर्णांचें रक्षण करतील ॥८॥

( इतिवातचक्रंनामसप्तविंशोध्यायः ॥२७॥ )

---

## ॥ अथसद्योवर्षणं ॥

वर्षाप्रश्नेसलिलनिलयंराशिमाश्रित्यचंद्रोल
ग्नंयातोभवतियदिवाकेंद्रगःशुक्लपक्षे । सौम्यै
र्दृष्टःप्रचुरमुदकंपापदृष्टोल्पमंभःप्रावृट्कालेमृ
जतिनचिराच्चंद्रवद्भार्गवोपि ॥१॥

अर्थ—पर्जन्याविषयीं प्रश्न केल्यास कर्क, मकर, मीन या जलराशीस चंद्र असून तें प्रश्नलग्न असेल अथवा लग्नापासून शुक्लपक्षीं केंद्रीं चंद्र असेल आणि त्यावर शु-

रग्रहाची दृष्टि असेल तर, वर्षाकाळीं शीघ्र बहुत वृष्टि होईल व पापग्रहांची दृष्टि असेल तर अल्पवृष्टि होईल असें सांगावें. चंद्रासारखा शुक्रही होय, म्हणजे शुक्र जलराशीस असून लग्नीं असेल अथवा शुक्लपक्षीं केंद्रीं असेल व तो शुभग्रहदृष्ट असेल तर बहुतवृष्टि, पापदृष्ट असेल तर अल्पवृष्टि वर्षाकालीं शीघ्र होते ॥१॥

आर्द्रद्रव्यंस्पृशतियदिवावारितत्संज्ञकंवातोयासन्नो भवतियदिवातोयकार्योन्मुखोवा । प्रष्टावाच्यःसलिलमचिरादस्तिनिःसंशयेनपृच्छाकालेसलिलमिति वाश्रूयतेयत्रशब्दः ॥२॥

अर्थ—पर्जन्यप्रश्नकालीं, प्रश्नकरणारा रसयुक्त वस्तुविशेषास स्पर्श करील अथवा उदक किंवा जलनावाच्या पदार्थांचा ( क्षीर, पय, नागरमोथा, इत्यादि शब्दवाच्यपदार्थांस ) स्पर्श करील, अ० उदकाजवळ असेल, अ० जलकार्य करीत असेल तर पर्जन्य लवकर पडेल असें निःसंशय सांगावें. अ० प्रश्नकालीं उदकवाचकशब्द श्रवण होतील तर पर्जन्य शीघ्र निःसंशय पडेल असें सांगावें ॥२॥

उदयशिखरिसंस्थोदुर्निरीक्ष्योतिदीप्त्याद्रुत कनकनिकाशःस्निग्धवैडूर्यकांतिः । तदहनि कुरुतेंभस्तोयकालेविवस्वान्प्रतपतियदिवो चैःखंगतोतीवतीक्ष्णं ॥३॥

अर्थ—सूर्य, उदयपर्वतावर असतां अतितेजानें पाहवेना असा होईल व पातळ सुवर्णासारखा व निर्मळ वैडूर्यमण्याच्या कांतीसारखा होईल तर वर्षाकालीं त्यादिवशीं वृष्टि होईल. अथवा आकाशमध्यभागीं जाऊन अत्यंत ताप करील तर त्यादिवशीं वृष्टि होईल ॥३॥

विरसमुदकंगोनेत्राभंवियद्विमलादिशोलव णविकृतिःकाकांडाभंयदाचभवेन्नभः । पव नविगमःपोप्लूयंतेझषाःस्थलगामिनोरसनम सकृन्मंडूकानांजलागमहेतवः ॥४॥

अर्थ—उदकाची गोडी जाईल. गाईच्या नेत्रांसारखें किंवा कावळ्याच्या अंड्यासारखें ( श्वेतनील ) आकाश होईल. दिशा स्वच्छ होतील. मिठामध्यें कांद्यासारखा विकार होईल. वायूचा निरोध होईल. मासे भूमीवर आपल्याच्या इच्छेनें उड्या मारतील. बेडूक वारंवार शब्द करतील तर हीं सर्व शीघ्र पर्जन्य येण्याचीं लक्षणें होत ॥४॥

मार्जारा भृशमवनिं नखैर्लिखंतो लोहानां मलनिचयः सविस्रगंधः । रथ्यायां शिशुनिचिताश्च सेतुबंधाः संप्राप्तं जलमचिरान्निवेदयंति ॥५॥

अर्थ—मार्जरें नखांनीं भूमि खणतील. लोखंडाचा मळ ( ताम ) यास अपक्वमासासारखा गंध येईल. मार्गामध्यें मुलें पूल बांधितील. तर शीघ्र वृष्टि होईल असें समजावें ॥५॥

गिरयोंजनपुंजसन्निभा यदि वा बाष्पनिरुद्धकंदराः । कृकवाकुविलोचनोपमाः परिवेषाः शशिनश्च वृष्टिदाः ॥६॥

अर्थ—पर्वत, काजळाच्या राशींसारखे काळे दिसतील अथवा त्याच्या गुहा उष्म्यानें युक्त होतील. अथवा कोंबड्याच्या नेत्रासारखे ( लाल ) चंद्राचे परिवेष ( खळीं ) होतील तर वृष्टि शीघ्र होईल ॥६॥

विनोपघातेन पिपीलिकानां अंडोपसंक्रांतिरहिव्यवायः । द्रुमाधिरोहश्च भुजंगमानां वृष्टेर्निमित्तानि गवां प्लुतं च ॥७॥

अर्थ—उपद्रवावांचून मुंग्या आपलीं अंडीं दुसऱ्या जागीं नेतील. सर्प मैथुन करतील व झाडावरही चढतील. गाई उड्या मारतील. हीं सर्व शीघ्रवृष्टीचीं कारणें होत ॥७॥

तरुशिखरोपगताः कृकलासा गगनतलस्थितदृष्टिनिपाताः । यदि च गवां रविवीक्षणमूर्ध्वं निपतति वारि तदा नचिरेण ॥८॥

अर्थ—सरडे वृक्षाग्रीं जाऊन आकाशाकडे पहातील, बैल वर सूर्याकडे पहातील, तर शीघ्र वृष्टि होईल ॥८॥

नेच्छंति विनिर्गमं गृहाद्धुन्वंति श्रवणान्खुरानपि । पशवः पशुवच्च कुक्कुरा यद्यंभः पततीति निर्दिशेत् ॥९॥

अर्थ—गाईआदिपशु घरातून बाहेर जाण्याची इच्छा करणार नाहींत व कान, पाय कापवितील तसेंच कुत्रेही करतील तर शीघ्र वृष्टि होईल असें सांगावें ॥९॥

यदास्थितागृहपटलेषुकुकुरारुवंतिवायदिवि
ततंदिवोन्मुखाः । दिवातडिद्यदिचपिनाकि
दिग्भवातदाक्षमाभवतिसमातिवारिणा ॥१०॥

अर्थ–कुत्रे, गृहसमुदायामध्ये किंवा घरावर उभे राहून शब्द करतील अथवा आकाशाकडे पाहून तोंड पसरून शब्द करतील अथवा ईशानीकडे दिवसास वीज चमकेल तर पृथ्वी जलमय होऊन उच्च सखल दिसणार नाहीं ॥१०॥

शुककपोतविलोचनसंनिभोमधुनिभश्चयदा
हिमदीधितिः । प्रतिशशीचयदादिविराज
तेपततिवारितदानचिराद्दिवः ॥११॥

अर्थ–कीर व कपडा यांच्या नेत्रांसारखा ( तांबूस ) अ० मधासारखा चंद्र दिसेल किंवा आकाशामध्ये एक चंद्र असून दुसरा चंद्र दिसेल तर लवकर वृष्टि होईल ॥११॥

स्तनितंनिशिविद्युतोदिवारुधिरनिभायदिदं
डवत्स्थिताः । पवनःपुरतश्चशीतलोयदिस
लिलस्यतदागमोभवेत् ॥१२॥

अर्थ–रात्री गर्जना होतील, दिवसास रक्तासारख्या आरक्त व दंडासारख्या वर खाली विजा चमकतील, पूर्वेकडून थंड वारा वाहील तर वृष्टि लवकर होईल १२

वल्लीनांगगनतलोन्मुखाःप्रवालाःस्नायंतेयदि
जलपांशुभिर्विहंगाः । सेवंतेयदिचसरीसृपा
तृणाग्राण्यासन्नोभवतितदाजलस्यपातः ॥१३॥

अर्थ–वेलींचे नवपल्लव ऊर्ध्वगमन करतील उदक व धुरळा यामध्ये पक्षी स्नान करतील. सर्प तृणाग्रावर चढतील, तर जलवृष्टि जवळ आली ( शीघ्र वृष्टि होईल) असें समजावें ॥१३॥

मयूरशुकचाषचातकसमानवर्णायदाजपाकुसुमपंक
जद्युतिसुपश्चसंध्याघनाः । जलोर्मिनगनक्रकच्छपव
राहमीनोपमाःप्रभूतपुटसंचयानतुचिरेणयच्छंत्यपः१४

जगन्मित्र छापखान्यात पुस्तकें विकत मिळतात तीं:—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ०।।। | रामरक्षा. | | पूजेचे अभंग. | ०।। | द० म० कोष्टकें. |
| ०।।। | गोपिगीत. | ०।।। | सोळा सोमवार कथा | ०।। | चर्पटपंजरिका. |
| ०।।। | रुक्मिणी स्वयंवर व सुभद्राहरण आर्या. | ०।।। | चित्रें. | ०।। | नौकाक्रीडन |
| | | ०।। | मंगलाष्टकें नवग्रहांची | ०।। | कऱ्हाडे ब्राह्मणाचे प्रवर. |
| ०।।। | अंगदशिष्टाई. | ०।। | गुरुचरित्र ओंव्या ५२ | | |
| ०।।। | वास्तुप्रकरणीं कोष्टक | ०।। | ज्ञानेश्वरसाधुकृत खेळ | ०।। | शिवस्तुति |
| ०।।। | ध्रुवाख्यान. | ०।। | भीष्मप्रतिज्ञा. | ०।। | गणपतीचे श्लोक. |
| ०।।। | तुकारामकृत मानस | ०।। | सीतास्वयंवर. | ०। | दुर्गास्तोत्र |

Registered No. 29 of 1873.

# सूचना.

विद्वान् , उदार, परोपकारी आणि श्रीमान् इत्यादि सद्गृहस्थांस आह्मी विनयपूर्वक असें सुचवितों कीं, या ग्रंथाचा राजापासून रंकापर्यंत सर्वांस विशेष उपयोग होईल, असें समजून प्राकृत ( मराठी ) टीकेसह लोकहितो- देशानें हें पुस्तक छापण्याचें काम सुरू केलें आहे. यास वर्गणीद्वारा साह्य करून, तें पूर्ण करणें सुज्ञ देशबांधवांकडे आहे.

वर्गणीचे दर.

| | किमत. | हाशील. |
|---|---|---|
| आगाऊ किंवा एक पौंचनाच हिल्यास दर भकास | ८ आणे. | ६ पै. |
| मागाहून हिल्यास दर भकास | १० आणे. | -६ पै. |

किमतीबद्दल टिकिटा पाठविणें झाल्यास अर्धा आणा दराच्या पाठवाव्या.

मुंबईंत ठाकुरद्वारानजीक हरिबाचे वाडींत रा॰ रा॰ नारोकृष्ण दुमाळे यांजकडे पैसा जमा करून त्याची पावती घ्यावी.

श्री

# बृहत्संहिता

( वराह मिहिरकृत )

मूळश्लोक संस्कृत असून त्यांचा अर्थ प्राकृत (महाराष्ट्र) भाषेत लिहिला आहे.

# THE BRIHATSANHITÁ

[ BY VARAHA-MIHIRA ]

यांत व्यवहारोपयोगी सर्वप्रकारचे विषय आहेत.


पुस्तक १ लें तारीख २५ अकटबर १८७३. अंक ६

VOL I 25th OCTOBER 1873. No. 6



रत्नागिरी

येथें

जनार्दन हरि आठल्ये

यांणीं

आपल्या

जगन्मित्र छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.


प्रत्येक अंकांत मोठ्या तक्तीचे सांच्याचीं चतुष्पत्री ३२ पृष्ठें असून सुमारें ८०० ग्रंथ येत जाईल.

अर्थ—मयूर, शुक, चाष, चातक या पक्ष्यांच्या वर्णासारखे नीलवर्ण, जास्वदीचें पुष्प व आरक्त कमल यांसारखे लोहितवर्ण, उदकांतील भोंवरे, सुसर, कासव, सूकर, मत्स्य यांच्या आकृतीसारख्या आकाराचे असे संध्यासमयीं मेघ दाट असतील तर लवकरच वृष्टि होईल ॥१४॥

**पर्यंतेषुसुधाशशांकधवलामध्येंजनालित्विषःस्निग्धा नैकपुटाःक्षरज्जलकणाःसोपानविच्छेदिनः । माहेंद्रीप्रभवाःप्रयांत्यपरतःप्राक्चांबुपाशोद्भवायेतेवारिमुचस्त्यजंतिनचिरादंभःप्रभूतंभुवि ॥१५॥**

अर्थ—आसमंताद्भागीं, अमृत व चंद्र यांसारखे श्वेत आणि मध्यभागीं काजळ व भ्रमर यांसारखे काळे असे, निर्मल, दाट, बारीक उदकबिंदु सोडणारे, शिडीच्या पायऱ्यांसारखे एकावर एक असे राहणारे, पूर्वेस उत्पन्न होऊन पश्चिमेकडे जाणारे अथवा पश्चिमेस उत्पन्न होऊन पूर्वेस जाणारे असे जे मेघ ते भूमीवर बहुत उदकवृष्टि लवकरच करतात ॥१५॥

**शक्रचापपरिघप्रतिसूर्यारोहितोथतडितःपरिवेषाः । उद्गमास्तसमयेयदिभानोरादिशेत्प्रचुरमंबुतदाशु॥१६॥**

अर्थ—सूर्याच्या उदयास्तकालीं इंद्रधनुष्य, परिघ ( अभ्ररेषा ), एककालीं दोन सूर्य, रोहित ( वक्ष्यमाण ), वीज, खळें, हीं जर होतील तर शीघ्र जलवृष्टि होईल असें जाणावें ॥१६॥

**(यदितित्तिरपत्रनिभंगगनंमुदिताःप्रवदंतिच पक्षिगणाः । उदयास्तमयेसवितुर्द्युनिशंविसृजंतिघनानचिरेणजलं ॥१७॥ )**

अर्थ—सूर्योदयास्तकालीं तित्तिरपक्ष्याच्या पक्षासारखे ( विचित्रवर्ण ) आकाश होईल, पक्षिसमुदाय आनंदानें शब्द करतील, तर रात्रंदिवस जलवृष्टि होईल ( उदयकालीं दिवावृष्टि, अस्तकालीं रात्रीवृष्टि असें यथासंख्य जाणावें ) ॥१७॥

**यद्यमोघकिरणाःसहस्रगोरस्तभूधरकराइवोच्छ्रिताः । भूसमंचरसतेयदांबुदस्तन्महद्भवतिवृष्टिलक्षणं ॥१८॥**

अर्थ—सूर्याचे अमोघाकिरण अस्तपर्वताच्या हस्तांतारसे दीर्घ होतील. (अस्तकाळीं किरण लांब गेलेले दिसतील) मेघ भूमीवरोवर (जवळ) शब्द करील तर तें शीघ्रवृष्टीचें महान् लक्षण होय ॥१८॥

प्रावृषिशीतकरोभृगुपुत्रात्सप्तमराशिगतःशुभदृष्टः ।
सूर्यसुतान्नवपंचमगोवासप्तमगश्चजलागमनाय ॥१९॥

अर्थ—वर्षाकाळीं चंद्र शुक्रापासून सातव्या राशीस असेल आणि त्यावर शुभग्रहाची दृष्टि असेल अथवा चंद्र शनीपासून ९।५।७ इतक्या राशींस असेल आणि त्यावरही शुभग्रहाची दृष्टि असेल,तर पर्जन्यवृष्टि,होईल ॥१९॥

प्रायोग्रहाणामुदयास्तकालेसमागमेमंडलसंक्रमेच ।
पक्षक्षयेतीक्ष्णकरायनांतेवृष्टिर्गतेर्केनियमेनचार्द्रां ॥२०

अर्थ—ग्रहांचे उदय व अस्त याचेवेळीं, भौमादि ग्रहांचा चंद्राशीं संयोग होईल त्यावेळीं, भरण्यादि सप्त मंडलें शुक्रचारामध्यें सांगितलीं,त्यांच्या प्रवेशसमयीं, अमावास्या व पौर्णिमा यांचे अंतीं, सूर्याच्या दक्षिणोत्तरायणाचे अंतीं, सूर्य आर्द्रानक्षत्रीं जातेवेळीं, या सर्वकाळीं बहुतकरून नियमानें वृष्टि होते ॥२०॥

समागमेपततिजलंज्ञशुक्रयोर्ज्ञजीवयोर्गुरुसि
तयोश्चसंगमे । यमारयोःपवनहुताशजंभयं
नदृष्टयोरसहितयोश्चसद्ग्रहैः ॥२१॥

अर्थ—बुध व शुक्र, बुध व गुरु, गुरु व शुक्र यांचा योग झाला असतां बहुतकरून नियमानें वृष्टि होते. तसेंच शनि व भौम यांचा योग झाला असतां वायु व अग्नि यांचें भय होतें; परंतु शुभग्रहांनीं दृष्ट किंवा युक्त असतील तर होणार नाहीं २१

अग्रतःपृष्टतोवापिग्रहाःसूर्यावलंबिनः ।
यदातदाप्रकुर्वंतिमहीमेकार्णवामिव ॥२२॥

अर्थ—सूर्याच्या पुढें किंवा मागें बहुत ग्रह येतील तर त्यावेळीं सर्व पृथ्वी जलमय होईल ॥२२॥

इतिबृहत्संहितायांसद्योवृष्टिलक्षणंनामाष्टाविंशोध्यायः२८

## ॥ अथकुसुमलताध्यायः ॥

**फलकुसुमसंप्रवृद्धिंवनस्पतीनांविलोक्यविज्ञेयं ।**
**सुलभत्वंद्रव्याणांनिष्पत्तिश्चापिसस्यानां ॥१॥**

अर्थ—वृक्षांचीं फळें व पुष्पें यांच्या उत्तम वृद्धीवरून पदार्थांचें सुलभत्व व धान्याची उत्पत्ति हीं जाणावीं ॥१॥

**शालेनकलमशालीरक्ताशोकेनरक्तशालिश्च ।**
**पांडूकःक्षीरिकयानीलाशोकेनसूकरकः ॥२॥**

अर्थ—शाल ( साग किंवा अर्जुनवृक्ष ) वृक्षाच्या फलपुष्पवृद्धीनें कलमशाली ( पांढऱ्या भाताची जात ) चांगली होते. तांबड्या अशोकवृक्षानें तांबडीसाळ किंवा महाडीचें भात हीं चांगलीं होतात. क्षीरिका ( दुधाळवृक्ष ) इणें पांडूक ( शालिवि० ) होतात. नीलअशोकानें सूकरक ( शालिवि० ) होतात ॥२॥

**न्यग्रोधेनतुयवकस्तिंदुकवृध्याचषष्टिकोभवति ।**
**अश्वत्थेनज्ञेयानिष्पत्तिःसर्वसस्यानां ॥३॥**

अर्थ—वटवृक्षानें यवक ( शालि वि० ) होतें. तिंदुक ( टेंभुरणी ) वृक्षाच्या वृद्धीनें षष्टिक ( साठ दिवसांनीं पिकणारे, अवचितें भात ) होतें. पिंपळानें सर्व धान्याची उत्पत्ति चांगली होते ॥३॥

**जंबूभिस्तिलमाषाःशिरीषवृध्याचकंगुनिष्पत्तिः ।**
**गोधूमाश्चमधूकैर्यववृद्धिःसप्तपर्णेन ॥४॥**

अर्थ—जांभळींनीं तिळ व उडीद हे होतात. शिरीष ( शिरसाचें झाड ) वृक्षानें काग होतात. मोहाच्या झाडानें गहू होतात. सातिणानें यव ( सातु ) होतात ४

**अतिमुक्तककुंदाभ्यांकर्पाससर्षपान्वदेदशनैः ।**
**वदरीभिश्चकुलत्थांश्चिरविल्वेनादिशेन्मुद्गान् ॥५॥**

अर्थ—अतिमुक्त ( तिवस, तिवर ) व कुंद यांच्या फलपुष्पवृद्धीनें कापूस होतो. अशन ( असणी, चित्रक ) वृक्षानें सर्षप होतात. बोरीच्या झाडानीं कुळीद होतात. करंजानें मूग होतात ॥५॥

अतसीवेतसपुष्पैःपलाशकुसुमैश्चकोद्रवाज्ञेयाः ।
तिलकेनशंखमौक्तिकरजतान्यथचेंगुदेनशणः ॥६॥

अर्थ—वेतस (वेत) पुष्पांनीं जवस होतात. पळसाच्या पुष्पांनी कोद्रव (हरीक) होतात. तिळानें शंख, मौक्तिक, रुपें हीं होतात. हिंगणबेट्यानें शण (ताग) होतो ॥६॥

करिणश्चहस्तिकर्णैरादेश्यावाजिनोऽश्वकर्णेन ।
गावश्चपाटलाभिःकदलीभिरजाविकंभवति ॥७॥

अर्थ—हस्तिकर्ण (एरंड किंवा पळस) वृक्षानें हत्ती होतात. अश्वकर्ण (साग, राळेचा वृक्ष) या वृक्षानें अश्व होतात. पाटला (तांबडा लोध्रवृक्ष) यानें गाई होतात. केळींनीं शेळ्या, मेंढ्या होतात ॥७॥

चंपककुसुमैःकनकंविद्रुमसंपच्चबंधुजीवेन ।
कुरुवकवृध्यावज्रंवैडूर्यंनंदिकावर्तैः ॥८॥

अर्थ—चंपकपुष्पांनीं सुवर्ण होतें. बंधुजीवें (दुपारी) पुष्पानें पोंवळीं होतात. कोरांट्यानीं हिरे होतात. नंदिकावर्त (नांदरुखी) वृक्षानें वैडूर्यमणि होतात ॥८॥

विंद्याच्चसिंदुवारेणमौक्तिकंकुंकुमंकुसुंभेन ।
रक्तोत्पलेनराजामंत्रीनीलोत्पलेनोक्तः ॥९॥

अर्थ—निर्गुंडीनें मौक्तिकें होतात. कुसुंभ (करडई) वृक्षानें कुंकुम होतें. तांबड्या कमलांनें राजा चांगला होतो. नीलकमलानें प्रधान होतो ॥९॥

श्रेष्ठीसुवर्णपुष्पैःपद्मैर्विप्राःपुरोहिताःकुमुदैः ।
सौगंधिकेनबलपतिरर्केणहिरण्यपरिवृद्धिः ॥१०॥

अर्थ—सुवर्णपुष्पांनीं श्रेष्ठी (कुलपरंपरागतशिल्पज्ञ) याची वृद्धि होते. कमलांनीं ब्राह्मण होतात. चंद्रविकासी कुमुदांनीं पुरोहित (राजोपाध्याय) होतात. सौगंधिकानें (श्वेतरक्त कमलानें) सेनापति होतो. रुईनें धनवृद्धि होते ॥१०॥

आम्रैःक्षेमंभल्लातकैर्भयंपीलुभिस्तथारोग्यं ।
खदिरशमीभ्यांदुर्भिक्षमर्जुनैःशोभनावृष्टिः ॥११॥

अर्थ—आम्रवृक्षांनीं कल्याण होतें. भिलाव्यांनीं भय होतें. पीलु ( अक्रोडाचें झाड ) वृक्षांनीं आरोग्य होतें. खैर व शमी यांहींकरून दुर्भिक्ष होतें, अर्जुनवृक्षांनीं चांगली वृष्टि होत्ये ॥११॥

पिचुमंदनागकुसुमैःसुभिक्षमथमारुतःकपित्थेन ।
निचुलेनावृष्टिभयंव्याधिभयंभवतिकुटजेन ॥१२॥

अर्थ—कडुनिंब व नागकेशरपुष्प यांहीं सुभिक्ष होतें. कंवठीच्या वृक्षानें वायु होतो. निचुलानें ( वेतानें ) अवर्षणभय होतें. कुड्यानें व्याधिभय होतें॥१२॥

दूर्वाकुशकुसुमाभ्यामिक्षुर्वन्हिश्चकोविदारेण ।
श्यामालताभिवृध्यावंधक्योवृद्धिमायांति ॥१३॥

अर्थ—दूर्वा, कुश यांच्या पुष्पांनीं ऊस होतात. कोविदार ( बाहवा ) या वृक्षानें अग्निवृद्धि होत्ये. श्यामालता इणें वेश्यांची वृद्धि होत्ये ॥१३॥

यस्मिन्देशेस्निग्धनिच्छिद्रपत्राःसंदृश्यंतेवृक्ष
गुल्मालताश्च । तस्मिन्वृष्टिःशोभनासंप्रदि
ष्टारूक्षैश्छिद्रैरल्पमंभःप्रदिष्टं ॥१४॥

अर्थ—ज्या देशीं वृक्ष, गुल्म ( झुडपें ), वल्ली ह्या निर्मल व छिद्ररहितपानें अशा असतील त्यादेशीं त्यावर्षी चांगली वृष्टि होईल. तीं जर रूक्ष व छिद्रयुक्तपानांचीं असतील तर अल्पवृष्टि होईल ॥१४॥

॥ इतिबृहत्संहितायांकुसुमलताध्यायएकोनत्रिंशः ॥२९॥

---

## ॥ अथसंध्यालक्षणं ॥

---

अर्धास्तमितानुदितात्सूर्यादस्पष्टभंनभोयावत् ।
तावत्संध्याकालश्चिन्हैरेतैःफलंचास्मिन् ॥१॥

अर्थ—अर्धा सूर्य दिसेनासा झाल्यापासून नक्षत्रें दिसूं लागतपर्यंत सायंसंध्या. म

तेंव फिकट दिसू लागल्यापासून अर्धा सूर्य दिसेपर्यंत प्रातःसंध्या या दोनही संध्याकाळीं, पुढें सांगितलेल्या चिन्हांनीं फलें जाणावीं ॥१॥

**मृगशकुनपवनपरिवेषपरिधिपरिघाभ्रवृक्षसुरचापैः ।**
**गंधर्वनगररविकरदंडरजःस्नेहवर्णैश्च ॥२॥**

अर्थ—आरण्यपशु, पक्षि, वायु, सूर्यचंद्रास खळें, प्रतिसूर्य, परिघ ( सूर्योदयीं किंवा सूर्यास्तीं मेघाच्या तिरकस रेघा ), वृक्षाकारमेघ, इंद्रधनुष्य, गंधर्वनगर, सूर्यकिरण, दंड ( सूर्यकिरण व वायु यांचा समुदाय ) धूळ, स्नेहवर्ण, ( निर्मलवर्ण ) यांहीं-करून संध्याफल सांगावें ॥२॥

**भैरवमुच्चैर्विरुवन्मृगोऽसकृद्ग्रामघातमाचष्टे ।**
**रविदीप्तोदक्षिणतोमहास्वनःसैन्यघातकरः ॥३॥**

अर्थ—मृग ( आरण्यपशु ) उच्चस्वरानें वारंवार भयंकर शब्द करील तर ग्रामनाश होतो. मृग, सेनेच्या दक्षिणेकडे राहून सूर्याभिमुख मोठा शब्द करील तर सैन्याचा नाश होतो ॥३॥

**अपसव्येसंग्रामःसव्येसेनागमःशांते ।**
**मृगचक्रेपवनेवासंध्यायांमिश्रगेवृष्टिः ॥४॥**

अर्थ—संध्याकाळीं मृगसमूह व वायु हे सैन्याच्या वामभागाकडून जातील तर युद्ध होईल, सैन्याच्या दक्षिणेकडून जातील, शांतदिशेस असतील, अर्काभिमुख मधुर-स्वर करतील तर दोहोंसेनेचा स्नेह होईल. तेंच संध्यासमयीं मिश्र असेल तर वृष्टि होईल ॥४॥

**दीप्तमृगांडजविरुताप्राक्संध्यादेशनाशमाख्याति ।**
**दक्षिणदिक्स्थैर्विरुताग्रहणायपुरस्यदीप्तास्यैः ॥५॥**

अर्थ—प्रातःसंध्यासमयीं दीप्तदिशेकडे असून सूर्यसंमुख, रूक्षस्वरानीं मृग किंवा पक्षी यांणीं केलेले शब्द, देशाचा नाश सांगतात. तसेंच पशुपक्षी सूर्याभिमुख नगराच्या दक्षिणदिशेकडे राहून शब्द करतील तर त्या नगराचें शत्रु ग्रहण करतील ( शत्रु घेतील) ॥५॥

**गृहतरुतोरणमथनेसपांशुलोष्टोत्करेनिलेप्रबले ।**
**भैरवरावेरूक्षेखगपातिनिचाशुभासंध्या ॥६॥**

अर्थ—गृह, वृक्ष, तोरण यांतें कांपविणारा; धूळ, मृत्पिंड यांहीं युक्त; मोठा शब्द करणारा, रूक्ष, अंतरिक्षगत पक्ष्यास पाडणारा असा प्रचंडवायु संध्यासमयीं सुटेल तर अशुभ होय ॥६॥

मंदपवनावघट्टितचलितपलाशद्रुमाविपवनावा ।
मधुरस्वरशांतविहंगमृगरुतापूजितासंध्या ॥७॥

अर्थ—मंदवायूनें कंपितपत्र आहेत वृक्ष जीचाठाईं, अशी अथवा वायुरहित, मधुर शब्द व शांत असे आहेत पक्षी व पशु जीचाठाईं, अशी संध्या (संध्यासमय) शुभ होय ॥७॥

संध्याकालेस्निग्धादंडतडिन्मत्स्यपरिधिपरिवेषाः ।
सुरपतिचापैरावतरविकिरणाश्चाशुवृष्टिकराः ॥८॥

अर्थ—दंड (वक्ष्यमाण), वीज, मत्स्य, परिधि (खंडें), परिवेष, इंद्रधनुष्य, ऐरावत (लाल इंद्रधनुष्य), सूर्यकिरण हे संध्यासमयीं जर स्निग्ध होतील तर शीघ्र वृष्टि होईल ॥८॥

विच्छिन्नविपमविध्वस्तविकृतकुटिलापसव्यपरिवृत्ताः।
तनुन्हस्वविकलकलुपाश्चविग्रहावृष्टिदाःकिरणाः ॥९॥

अर्थ—विच्छिन्न (तुटलेले) सम नव्हत, नष्टवर्ण, विकारयुक्त, अस्पष्ट, अपसव्यवेष्टित, सूक्ष्म, न्हस्व, शक्तिहीन, कलुष (अप्रसन्न) संध्यासमयीं किरण असतील तर विरोध व अवर्षण ही होतात ॥९॥

उद्योतिनःप्रसन्नाऋजवोदीर्घाःप्रदक्षिणावर्ताः ।
किरणाःशिवायजगतोवितमस्केनभसिभानुमतः॥१०॥

अर्थ—तेजस्वी, निर्मल, स्पष्ट, दीर्घ, प्रदक्षिण फिरणारे असे सूर्याचे किरण अंधकाररहित आकाशामध्यें दिसतील तर सर्व जगताचें कल्याण होईल ॥१०॥

शुक्लाःकरादिनकृतोदिवादिमध्यांतगामिनःस्निग्धाः ।
अव्युच्छिन्नाऋजवोवृष्टिकरास्तेह्यमोघाख्याः ॥११॥

अर्थ—आकाशाचा आदि, मध्य, अंत यांत गमन करणारे (सर्वव्यापी), स्निग्ध, अखंड, सरळ असे शुभ्र सूर्याचे किरण अमोघसंज्ञक होत. ते वृष्टि करणारे होत

कल्माषबभ्रुकपिलाविचित्रमांजिष्ठहरितशवलाभाः ।
त्रिदिवानुबंधिनोवृष्टयेल्पभयदास्तुसप्ताहात् ॥१२॥

अर्थ—श्वेतकृष्ण, पिंगट, कपिल, विचित्र, आरक्त, हिरवा, शबल, या वर्णाचे सर्वाकाश व्यापून रहाणारे सूर्याचे किरण वृष्टि करणारे होत व सात दिवसानीं थोडें-सें भय करणारे होतात ॥१२॥

ताम्रावलपतिमृत्युंपीतारुणसंनिभाश्चतद्व्यसनं ।
हरिताःपशुसस्यवधंधूम्रसवर्णागवांनाशं ॥१३॥
मांजिष्ठाभाःशस्त्राग्निसंभ्रमंवभ्रवःपवनवृष्टिं ।
भस्मसदृशास्त्ववृष्टिंतनुभावंशवलकल्माषाः ॥१४॥

अर्थ—ताम्रवर्ण सूर्यकिरण असतां सेनापतीस मृत्यु होतो. पीत व तांबडे अ० सेनापतीस दुःख होतें. पोपटीरंगाचे अ० पशु व धान्य याचा नाश होतो. धूम्रवर्ण अ० गाईचा नाश होतो ॥१३॥ मांजिष्ठ ( तांबडा ) वर्ण अ० शस्त्र व अग्नि याचें भय होतें. कपिलवर्ण अ० वायुसहित वृष्टि होते. भस्मवर्ण अ० अवर्षण होतें. कृष्णनीलमिश्रितवर्ण अ० वृष्टि अल्प होते ॥१४॥

बंधूकपुष्पांजनचूर्णसंनिभंसांध्यंरजोभ्येतियदादिवाकरं । लोकस्तदारोगशतैर्निपीड्यते
शुक्लंरजोलोकविवृद्धिशांतये ॥१५॥

अर्थ—बंधूकपुष्प ह्म० दुपारीचें पुष्प यासारिखें अति तांबडें व काजळासारखें अति काळें, सध्याकाळीं रज ( धूळ ) सूर्याप्रत येईल तर शेंकडो रोगांनीं लोक पीडित होतील. तीच शुभ्र धूळ असेल तर लोकाची वृद्धि व शांति होते॥१५

रविकिरणजलदमरुतांसंघातोदंडवत्स्थितोदंडः ।
सविदिक्स्थितोनृपाणामशुभोदिक्षुद्विजातीनां ॥१६॥

अर्थ—सूर्यकिरण, मेघ व वायु एकत्र होऊन त्याचा आकार दंडाकृति असेल तर तो दंड होतो. तो दंड विदिशेस असेल तर राजास अशुभ व तो दंड उत्तरादि दिशेस असेल तर ब्राह्मणादिवर्णास अशुभ होय ॥१६॥

शस्त्रभयातंककरोदृष्टःप्राह्मध्यसंधिषुदिनस्य ।
शुक्लाद्योविप्रादीन्यदभिमुखस्तांनिहंतिदिशं ॥१७॥

अर्थ— दंड, सूर्याचा उदय मध्य अस्त या काली दृष्टिगोचर होईल तर शस्त्र भय व उपद्रव होतो. शुक्ल, रक्त, पीत, कृष्ण या चार वर्णाचा असेल तर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचा अनुक्रमानें नाश होतो. ज्या दिशेचे सन्मुख तो दंड असेल त्यादिशेचा नाश होतो (सूर्याजवळचा त्या दंडाचा भाग तें मूळ व अन्य समूरचा भाग तें मुख जाणावें ) ॥१७॥

**दधिसदृशाग्रोनीलोभानुच्छादीखमध्यगोभ्रतरुः ।**
**पीतच्छुरिताश्चघनाघनमूलाभूरिवृष्टिकराः ॥१८**

अर्थ—दह्यासारख्या अग्राचा, नीलवर्ण, सूर्यास आच्छादणारा, आकाशमध्य भागीं राहणारा, असा मेघवृक्ष व पीतवर्णानें शोभित, सहतमूल ( दाट ) असे मेघ बहुत वृष्टिकारक होतात ॥१८॥

**अनुलोमगेभ्रवृक्षेसमुद्गतेयायिनोनृपस्यवधः ।**
**बालतरुप्रतिरूपिणियुवराजामात्ययोर्मृत्युः ॥१९॥**

अर्थ—मेघवृक्ष, अनुलोम उत्पन्न झाला तर यायी ( स्वारीकरून जाणारा ) राजाचा नाश होतो. बालवृक्षासारखा मेघवृक्ष असता युवराज ( पिता असता राज्यकार भार पाहणारा ) व प्रधान यास मृत्यु होतो ॥१९॥

**कुवलयवैडूर्यांबुजकिंजल्काभाप्रभंजनोन्मुक्ता ।**
**संध्याकरोतिवृष्टिंरविकिरणोद्भासितास्यः ॥२०॥**

अर्थ—निळा, पिंवळानिळा, कमळकेसराप्रमाणें पिंवळा अशा रंगाची वायुरहित, सूर्यकिरणयुक्त अशी संध्या ( संध्यासमय ) तत्काल वृष्टि करिते ॥२०॥

**अशुभाकृतिघनगंधर्वनगरनीहारपांशुधूमयुता ।**
**प्रावृषिकरोत्यवग्रहमन्यतोशस्त्रकोपकरी ॥२१॥**

अर्थ—गर्दभ, उष्ट्र, काक, मार्जार इत्यादिकांच्या आकारासारखे मेघ; गंधर्वनगर, वर्फ, धूळ, धूम यांहीं युक्त संध्यासमय वर्षाकाळीं होईल तर अवृष्टि होईल. अन्यकाळीं होईल तर शस्त्रकोप होतो ॥२१॥

**शिशिरादिषुवर्णाःशोणपीतसितचित्रपद्मरुधिरनिभाः ।**
**प्रकृतिभवाःसंध्यायांस्वर्तौशस्ताविकृतिरन्या ॥२२॥**

अर्थ–शिशिरादि सहा ऋतूमध्ये सध्यासमयीं शोणादि सहा वर्ण आपापल्या ऋतूत स्वाभाविक झाले तर शुभ होत अन्यवर्ण झाले तर अशुभ होत शिशिरऋतूमध्ये शोण ( किर्मिजी ), वसंत० पीत, ग्रीष्म० श्वेत, वर्षा० चित्र, शरत्० पद्म ( कुसुंबा ), हेमंतऋतूमध्ये रक्तासारखा ॥२२॥

आयुधवन्नररूपंछिन्नाभ्रंपरभयायरविगामि ।
सितखपुरेर्कांक्रांतेपुरलाभोभेदनेनाशः ॥२३॥

अर्थ–मेघखंड, शस्त्रधारी पुरुषासारखें सूर्यासमीप दिसेल तर, शत्रुभय उत्पन्न करील. श्वेतवर्ण गंधर्वनगर सूर्याचें आच्छादन करील तर नगरलाभ होईल. सूर्य गंधर्वनगराचें भेदन करील तर नगराचा शत्रु नाश करतील ॥२३॥

सितनितांतघनावरणंरवेर्भवतिवृष्टिकरंयदिसव्यतः । यदिचवीरणगुल्मनिभैर्घनैर्दिवसभर्तुरदीप्तदिगुद्भवैः ॥२४॥

अर्थ–अत्यंतश्वेतमेघाचें आच्छादन दक्षिणभागानें सूर्यास जर होईल तर वृष्टि व्हावी नसेंच वीरण ( काळावाळा ) याच्या समूहासारखे व शांतदिशेस झालेले अशा मेघाचें जर सूर्यास आच्छादन होईल तर वृष्टि होईल ॥२४॥

नृपविपत्तिकरःपरिघःसितःक्षतजतुल्यवपुर्बलकोपकृत् । कनकरूपधरोबलवृद्धिदःसवितुरुद्गमकालसमुत्थितः ॥२५॥

अर्थ–सूर्याच्या उदयकालीं उत्पन्न झालेला परिघ ( तिर्यक् मेघरेषा ) श्वेत दिसेल तर राजास दुःख होईल तोच परिघ रक्तासारखा असेल तर सैन्य राजावर कोपेल सुवर्णासारखा परिघ दिसेल तर सैन्यवृद्धि होईल ॥२५॥

उभयपार्श्वगतौपरिधीरवेःप्रचुरतोयकृतौवपुषान्वितौ । अथसमस्तककुप्परिचारिणःपरिधयोस्तिकणोपिनवारिणः ॥ २६ ॥

अर्थ–दोहीं बाजूनीं विद्यमान, शरीराकारयुक्त असे सूर्याचे परिधि बहुत वृष्टिकारक होत सर्व दिशांत संचार करणारे असे परिधि असतील तर उदकाचा कणही देणार नाहींत ॥२६॥

ध्वजातपत्रपर्वतद्विपाश्वरूपधारिणः । जयाय संध्ययोर्घनारणायरक्तसन्निभाः ॥२७॥ पलाल धूमसंचयस्थितोपमावलाहकाः । वलान्यरूक्ष मूर्तयोविवर्धयंतिभूभृतां ॥२८॥ विलंबिनोद्रु मोपमाःखरारुणप्रकाशिनः । घनाःशिवायसं ध्ययोःपुरोपमाःशुभावहाः ॥२९॥

अर्थ—ध्वज, छत्र, पर्वत, गज, अश्व यासारखे मेघ दोनही संध्यासमयीं राजास किं वा लोकास जयप्रद होनात तेच मेघ आरक्त असले तर युद्धें होतात ॥२७॥ पांस, धूमसंचय यासारखे मेघ रखरखीत नसले तर राजाची सैन्यवृद्धि करितात ॥२८॥ वृक्षासारखे, लोंबणारे, अयत तावडे असे मेघ उभयसंध्यासमयीं होतील तर ते शुभ होत. तसेच नगरासारखेही शुभ होत ॥२९॥

दीप्तविहंगशिवामृगघुष्टादंडरजःपरिघादियुताच । प्र त्यहमर्कविकारयुतावादेशनरेशसुभिक्षवधाय॥३०॥

अर्थ—सूर्याभिमुख पक्षि, भालु, आरण्यपशु याच्या शब्दानीं युक्त, दंड, धूळ, परिघ (तिर्कस सूर्योदयीं मेघरेखा), इंद्रधनुष्य, गंधर्वनगर इत्यादिकानीं युक्त अशी व प्रतिदिवशीं सूर्याच्या विकारानें (स्वल्पांतर) युक्त अशी संध्या देश, राजा, सु भिक्ष याच्या नाशाकारणें होते (नाश करिते) ॥३०॥

प्राचीतत्क्षणमेवनक्तमपरासंध्यात्र्यहाद्वाफलं सप्ताहात्परिवेषरेणुपरिघाःकुर्वंतिसद्योनचेत् । तद्वत्सूर्यकरेंद्रकार्मुकतडित्प्रत्यर्कमेघानिलास्त स्मिन्नेवदिनेष्टमेथविहगाःसप्ताहपाकामृगाः ॥३१॥

अर्थ—प्रात संध्येचें शुभाशुभफल त्याचवेळीं होतें. सायंसंध्येचें शु० रात्रीसहोतें अथवा संध्याफल तीन दिवसानीं होतें परिवेष (खळें), धूळ, तिर्यक्रेषा याचे शुभाशुभफल तत्काल न झालें तर सात दिवसानी होतें. सूर्यकिरण, इंद्रधनुष्य, वीज, प्रतिसूर्य, मेघ, वायु याचेंही फल त्याचवेळीं न झालें तर सात दिवसानीं होतें पक्ष्याच्या शब्दाचें फल आठ दिवसानीं होतें. आरण्यपशूच्या शब्दाचें फल सात दिवसानीं होतें ॥३१॥

एकंदीप्त्यायोजनंभातिसंध्याविद्युद्भासाषट्प्र
काशीकरोति । पंचाब्दानांगर्जितंयातिशब्दो
नास्तीयत्ताकाचिदुल्कानिपाते ॥ ३२ ॥

अर्थ–संध्यासमयाच्या कांतीनें एक योजन (कोस ४) प्रकाश होतो, यास्तव तिचें शुभाशुभफल ४ कोसांतच होतें विजेचें सहा योजनें फल होतें मेघगर्जनेचें पांच योजनें फल होतें उल्कानिपातास कोणताही नियम नाहीं म्ह० सर्वत्र उल्कानिपाताचें फल होतें ॥३२॥

प्रत्यर्कसंज्ञःपरिधिस्तुतस्यत्रियोजनाभापरिघस्यपंच ।
षट्पंचदृश्यंपरिवेषचक्रंदशामरेशस्यधनुर्विभाति ॥३३

अर्थ–प्रत्यर्कसंज्ञक जो परिधि याचें शुभाशुभफल तीन योजनें होतें परिघ (तिर्यक्रेषा) याचें फल पांच योजनें होतें खळें सोळायोजनें फल देतें. इंद्रधनुष्य दहायोजनात फल देतें ॥३३॥

इतिबृहत्संहितायांसंध्यालक्षणंनामत्रिंशत्तमोध्यायः॥३०॥

## ॥ अथदिग्दाहलक्षणं ॥

दाहोदिशांराजभयायपीतोदेशस्यनाशायहु
ताशवर्णः । यश्चारुणःस्यादपसव्यवायु स
स्यस्यनाशंसकरोतिदृष्टः ॥१॥

अर्थ–पीतवर्णे दिग्दाह ( दिशांचा लाल रंग किंवा ज्वाला दिसणें ) राजभय करणारा होतो अग्निवर्ण दिग्दाह देशनाश करितो आरक्त दिग्दाह होईल त्यावेळीं अपसव्य वायु असा झाला तर धान्यनाश होतो ॥१॥

योतीवदीप्त्याकुरुतेप्रकाशंछायामपिव्यंजय
तेर्कवद्यः । राज्ञोमहद्वेदयतेभयंसशस्त्रप्रको
पंक्षतजानुरूपः ॥२॥

अर्थ—जो दिग्दाह अत्यंतकांतीनें प्रकाश करितो व सूर्यासारखी ज्याची छायाही दिसते तो राजास मोठें भय सांगतो व रक्तासारखा असला तर युद्धें होतात २

प्राक्क्षत्रियाणांसनरेश्वराणांप्राग्दक्षिणेशिल्पिकुमारपीडा । याम्येसहोग्रैःपुरुषैस्तुवेश्यादूताःपुनर्भूप्रमदाश्वकोणे ॥३॥ पश्चात्तुशूद्राःकृषिजीविनश्चचौरास्तुरंगैःसहवायुदिक्स्थे । पीडांव्रजंत्युत्तरतश्चविप्राःपाखंडिनोवाणिजकाश्चशार्व्यां ॥ ४ ॥

अर्थ—दिग्दाह पूर्वदिशेस दिसला तर राजे व क्षत्रियजाति यांस पीडा होते. आग्नेयीस दिसला तर शिल्पि व कुमार यांस पीडा. दक्षिणेस दि० वेश्या व उग्रपुरुष यांस पीडा. निर्ऋतीस दि० तर दूत व पुनर्भू स्त्रिया यास पीडा ॥३ पश्चिमेस दि० तर शूद्र व कृषिकरणारांस पीडा. वायव्येस दि० तर चोर व अश्व यास पीडा. उत्तरेस दि० तर ब्राह्मणास पीडा. ईशानीस दि० तर पाखंडी व व्यापारी यांस पीडा होते ॥३॥

नभःप्रसन्नंविमलानिभानिप्रदक्षिणंवातिसदागतिश्च । दिशांचदाहःकनकावदातोहितायलोकस्यसपार्थिवस्य ॥५॥

अर्थ—आकाश निर्मल, नक्षत्रें स्वच्छ, वायु प्रदक्षिणगति, दिग्दाह सुवर्णासारखा, असें हे असले तर राजासहवर्तमान सर्व लोकाचें कल्याण होतें ॥५॥

इतिबृहत्संहितायांदिग्दाहलक्षणंनामैकत्रिंशोध्यायः॥३१॥

---

## ॥ अथभूमिकंपः ॥

क्षितिकंपमाहुरेकेबृहदंतर्जलनिवासिसत्वकृतं । भूभारखिन्नदिग्गजविश्रामसमुद्भवंचान्ये ॥१॥

अर्थ—जलामध्ये रहाणारे जे मोठे प्राणी त्यांणी केलेला भूकंप असें कोणी ऋषि

ह्मणतात. भूमीच्या भारानें दु ख पावलेले जे दिग्गज त्यांच्या विश्रांतीपासून भू-मिकंप होतो असें अन्य गर्गादि ऋषि ह्मणतात ॥१॥

अनिलोनिलेननिहतःक्षितौपतन्सस्वनंकरोत्येके ।
केचित्त्वदृष्टकारितमिदमन्येप्राहुराचार्याः ॥२॥

अर्थ—नभस्थित वायूनें ताडित जो वायु तो भूमीवर पडत असता शब्दासहित भू-मिकंप करितो असें वसिष्ठादिक ह्मणतातः हा भूकंप धर्माधर्माचे प्रजांस शुभाशुभ-सूचक होतो असें कोणी आचार्य ह्मणतात ॥२॥

गिरिभिःपुरासपक्षैर्वसुधाप्रपतद्भिरुत्पतद्भिश्च ।
आकंपितापितामहमाहामरसदसिसव्रीडं ॥३॥
भगवन्नाममयैतत्त्वयाकृतंयदचलेतितन्नतथा ।
क्रियतेचलैश्चलद्भिःशक्ताहंनास्यखेदस्य ॥४॥
तस्याःसगद्गदगिरंकिंचित्स्फुरिताधरंविनतमीषत् ।
साश्रुविलोचनमाननमवलोक्यपितामहःप्राह ॥५॥
मन्युंहरेंद्रधात्र्याःक्षिपकुलिशंशैलपक्षभंगाय ।
शक्रःकृतमित्युक्त्वामाभैरितिवसुमतीमाह ॥६॥
किंत्वनिलदहनसुरपतिवरुणाःसदसत्फलाववो
धार्थं । प्राग्द्वित्रिचतुर्भागेषुदिननिशोःकंपयिष्यंति ७

अर्थ—पृथ्वीवर पडणारे व पृथ्वीपासून आकाशांत उडणारे जे पक्षयुक्त पर्वत त्याहीं कंपित झालेली जी पृथ्वी ती, देवसभेमध्यें जाऊन ब्रह्मदेवाप्रत लज्जायुक्त भा-षण करिती झाली ॥३॥ 'हे भगवन् तुह्मी जें माझें अचला असें नाम दिलें' तें चलन पावणारे जे अचल ( पर्वत ) त्याहीं नाहींसें केलें. तेणेंकरून झालेल्या दु-खातें सहन करण्यास मी समर्थ नाहीं ॥४॥ नंतर गद्गद ( अस्पष्ट ) भाषणानें यु-क्त, थोडेसे कंपित आहेत ओंठ ज्याचाठाईं असें, नेत्रोदकानें युक्त असें तिचें मुख पाहून ब्रह्मदेव इंद्रास ह्मणतात ॥५॥ हे इंद्रा पर्वतपक्षाच्या नाशार्थ वज्र टाक आणि पृथ्वीचा शोक दूर कर. असी ब्रह्मदेवाची आज्ञा होताच तसें केलें असें इंद्र ब्रह्मदेवाप्रत बोलून हे भूमि तू पर्वतांपासून भिऊ नकोस असें भाषण करिता झाला ॥६॥ परंतु वायु, अग्नि, इंद्र, वरुण हे लोकांस होणाऱ्या शुभाशुभ फलाचें ज्ञान पूर्वी व्हावें ह्मणून दिवसरात्र याचे चार भाग करून ते यथाक्रमें चार भागांमध्यें

तुला कापवितील, ( दिवसाच्या पूर्वार्धी वायु कापवील, दि० उत्तरार्धी अग्नि, रात्रीच्या पूर्वार्धी इंद्र, रा० उत्तरार्धी वरुण कापवील ) ॥७॥ वायु, अग्नि, इंद्र हा० आकाश, वरुण हा० उदक हीं चार तत्वें पृथ्वीतत्वाशीं मिळतात तेव्हां भूकंप होतो

चत्वार्यर्यम्णाद्यान्यादित्यंमृगशिरोश्वयुक्चेति । मंडलमेतद्वायव्यमस्यरूपाणिसप्ताहात् ॥८॥
धूमाकुलीकृताशेनभसिनभस्वान्रजःक्षिपन्भौमं ।
विरुजन्द्रुमांश्चविचरतिरविरपटुकरावभासीच ॥९॥
वायव्येभूकंपेसस्यांबुवनौषधीक्षयोभिहितः ।
श्वयथुश्वासोन्मादज्वरकासभवावणिक्पीडा ॥१०॥
रूपायुधभृद्वैद्याःस्त्रीकविगांधर्वपण्यशिल्पिजनाः ।
पीडयंतेसौराष्ट्रककुरुमगधदशार्णमत्स्याश्च ॥११॥

अर्थ—उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाती, पुनर्वसु, मृगशीर्ष, अश्विनी या सात नक्षत्रांचें वायुमंडल होय या नक्षत्रीं दिवसाच्या पूर्वार्धी भूमिकंप झाला तर सात दिवसात हा वक्ष्यमाण चिन्हें होतात ॥८॥ धूमानें व्याप्त दिशा आहेत ज्यामध्यें अशा आकाशात वायु, भूमिमधी धूळ उडवितहोत्साता व वृक्ष मोडितहोत्साता फिरेल. सूर्य शीतकिरण भासेल ॥९॥ वायूनें भूकंप झाला असता धान्यें, उदक, वनौषधि याचा क्षय होतो सूज, श्वास, उन्माद, ज्वर, कास, यापासून वैश्यास पीडा होय ॥१०॥ सुरूप, शस्त्रें धारण करणारे, वैद्य, स्त्रिया, कवि, गायक, व्यापारी, शिल्पी या लोकास पीडा होते व सौराष्ट्र, कुरु, मगध, दशार्ण, मत्स्य या देशासही पीडा होते ॥११॥

पुष्याग्नेयविशाखाभरणीपित्र्याजभाग्यसंज्ञानि ।
वर्गोहौतभुजोयंकरोतिरूपाण्यथैतानि ॥१२॥
तारोल्कापातावृतमादीप्तमिवांवरंसदिग्दाहं ।
विचरतिमरुत्सहायःसप्तार्चिःसप्तदिवसांतः ॥१३॥
आग्नेयेंबुदनाशःसलिलाशयसंक्षयोनृपतिवैरं ।
दद्रूविचर्चिकाज्वरविसर्पिकाःपांडुरोगश्च ॥१४॥

दीप्तौजसःप्रचंडाःपीडयंतेचाश्मकांगबाल्हीकाः ।
तंगणकलिंगवंगद्रविडाःशबराश्चनेकविधाः ॥१५॥

अर्थ—पुष्य, कृत्तिका, विशाखा, भरणी, मघा, पूर्वाभाद्रपदा, पूर्वा हीं नक्षत्रें अग्निमंडल होत. या मंडलीं दिवसाच्या उत्तरार्धीं भूकंप झाला तर त्याचीं चिन्हें पुढें सांगतों ॥१२॥ तारा व उल्का यांच्या पतनानें व्याप्त, दिग्दाहानें प्रदीप्त असें आकाश असता वायुयुक्त अग्नि, सात दिवसांत फिरेल ॥१३॥ अग्निभूकंप झाला असता मेघनाश, उदकसंचयाचा नाश, राजांचें वैर, दद्रू ( गजकर्ण इ० ), विचर्चिका ( खरूज ), ज्वर, विसर्पिका ( त्वग्रोगवि० ), पांडुरोग, हे होतात ॥१४॥ तेजस्वी, क्रोधी, यांस पीडा होते. अश्मक, अंग, बाल्हीक, तंगण, कलिंग, वंग, द्राविड, शबर हे लोक बहुप्रकारच्या पीडा पावतात ॥१५॥

अभिजिच्छ्रवणधनिष्ठाप्राजापत्यैंद्रवैश्वमैत्राणि ।
सुरपतिमंडलमेतद्भवंतिचास्यस्वरूपाणि ॥१६॥
चलिताचलवर्ष्माणोगंभीरविराविणस्तडित्वंतः ।
गवलालिकुलाहिनिभाविसृजंतिपयःपयोवाहाः ॥१७॥
ऐंद्रंश्रुतिकुलजातिख्यातावनिपालगणपविध्वंसि ।
अतिसारगलग्रहवदनरोगकृच्छर्दिकोपाय ॥१८॥
काशियुगंधरपौरवकिरातकीराभिसारहलमद्राः ।
अर्बुदसुवास्तुमालवपीडाकरमिष्टवृष्टिकरं ॥१९॥

अर्थ—अभिजित्, श्रवण, धनिष्ठा, रोहिणी, ज्येष्ठा, उत्तराषाढा, अनुराधा या सात नक्षत्रांचें इंद्रमंडल. यावर भूकंपाचीं चिन्हें होतात तीं सांगतों ॥१६॥ चंचल पर्वतासारखे, गंभीर ( मधुर ) शब्द करणारे, विद्युल्लतेनेयुक्त, महिषशृंग, भ्रमरपंक्ति, सर्प यासारखे काळे, असे मेघ उदकवृष्टि करतील ॥१७॥ हा ऐंद्रमंडलावर भूकंप झाला तर कुलजातीनें प्रसिद्ध, कीर्तियुक्त राजे, समुदायांत मुख्य, याचा नाश होतो. अतिसार, गळाधरणें, मुखरोग, छर्दि ( ओकारी ) हे रोग होतात ॥१८॥ काशि, युगंधर, पौरव, किरात, कीर, अभिसार, हल, मद्र, अर्बुद, सुवास्तु, माळव, या देशांतील लोकास पीडा होते व चांगली वृष्टि होते ॥१९॥

पौष्णाप्याद्रश्लेषामूलाहिर्बुध्न्यवरुणदेवानि ।
मंडलमेतद्वारुणमस्यापिभवंतिरूपाणि ॥२०॥

नीलोत्पलालिभिन्नांजनत्विषोमधुरराविणोबहुलाः ।
तडिदुद्भासितदेहाधारांकुशवर्षिणोजलदाः ॥२१॥
वारुणमर्णवसरिदाश्रितघ्नमतिवृष्टिदंविगतवैरं ।
गोनर्दचेदिकुकुरान्किरातवैदेहकान्हंति ॥२२॥

अर्थ– रेवती, पूर्वाषाढा, आर्द्रा, आश्लेषा, मूल, उत्तराभाद्रपदा, शततारका, हे वारुणमंडळ होय. याचाही सातदिवसापूर्वी चिन्ह होतात ॥२०॥ या नक्षत्रावर भूकंप झाला तर नीलकमल, भ्रमर, फारकाळे काजळ यासारखे, मधुरशब्द करणारे, विजानीं दिसणारे, असे बहुत मेघ मोठ्या धारानीं वृष्टि करतात ॥२१॥ हें वारुणमंडल समुद्र व नद्या याच्या आश्रयानें रहाणाराचा नाश करणारें, अतिवृष्टि करणारें, द्वेषरहित करणारें असें होय. गोनर्द, चेदि, कुकुर, किरात, वैदेह या देशातील लोकाचा नाश करितें ॥२२॥

षड्भिर्मासैःकंपोद्वाभ्यांपाकंचयातिनिर्घातः ।
अन्यानप्युत्पातान्जगुरन्येमंडलैरेतैः ॥२३॥

अर्थ–भूमिकंपाचें फल सहा महिन्यानीं व निर्घात (तुफानतारा किंवा मेघगर्जना) याचें फल दोन महिन्यानी होतें. अन्यही उल्कादि उत्पाताचें फल या वारुणादि मंडलासारखेंच जाणावें असें अन्यगर्गादि मुनि ह्मणतात ॥२३॥

(उल्काहरिश्चंद्रपुररजश्वनिर्घातभूकंपककुप्प्रदाहाः ।
वातोतिचंडोग्रहणंरवींदोर्नक्षत्रताराग्रणवैकृतानि २४
व्यभ्रेवृष्टिर्वैकृतंवातवृष्टिर्धूमोनग्नेर्विस्फुलिंगार्चिषोवा ।
वन्यंसत्वंग्राममध्येविशेद्वारात्राविंद्रेकार्मुकंदृश्यतेवा २५
संध्याविकाराःपरिवेषखंडानद्यःप्रतीपादिवितूर्यनादाः ।
अन्यच्चयत्स्यात्प्रकृतेःप्रतीपंतन्मंडलैरेवफलंनिगाद्यं२६

अर्थ–उल्का, गधर्वनगर, रज, निर्घात, भूकंप, दिग्दाह, प्रचंडवायु, सूर्यचंद्रास ग्रहण, नक्षत्रतारागण यास विकार ॥२४॥ अभ्र नसून वृष्टि, मोठ्या वायानें युक्त वृष्टि, अग्नि नसून धूम, ज्वालाचे विस्फुलिंग, अरण्यातील प्राण्याचा गावात प्रवेश, रात्री इंद्रधनुष्य दिसेल ॥२५॥ संध्यासमयाचे विकार, तुटलेलीं खळीं, नद्याचे प्रतिकूल प्रवाह, स्वर्गामध्यें वाद्यध्वनि, हे उत्पात न होतां जें प्रकृति (स्वाभाविक असणें)

त्यात बदल होणें, हेंही उत्पातरूपच होय. या सर्व उत्पातांचें फल या पूर्वोक्त वाय्वादि मंडलाच्या फलासारखेंच सांगावें॥२६॥)

हंत्यैंद्रोवायव्यंवायुश्चाप्यैंद्रमेवमन्योन्यं ।
वारुणहौतभुजावपिवेलानक्षत्रजाःकंपाः ॥२७॥

अर्थ–वायव्यमंडलावर झालेल्या भूकंपाचा, ऐंद्रमंडलावरील भूकंप नाश करितो. तसाच ऐंद्रम० भूकंपाचा वायु० भूकंप नाश करितो. असे वारुण व अग्नि हेंही परस्पराचा नाश करितात. वेलाभूकंप ( श्लोक ७ ) नक्षत्र भूकंप ( श्लो० ८ ) हे परस्पराचा नाश करितात. ( दिवसाच्या पूर्वार्धी झालेला भूकंप वायव्य व त्याचवेळीं श्रवणनक्षत्र असलें तर तो ऐंद्रभूकंप, असें झालें तर कोणाचेंही फल होत नाहीं ॥ २७ ॥

प्रथितनरेश्वरमरणव्यसनान्याग्नेयवायुमंडलयोः ।
क्षुद्भयमरकानावृष्टिभिरुपताप्यंतेजनाश्चापि ॥२८॥

अर्थ–आग्नेयमंडलीं वायुवेळेवर भूकंप होईल तर प्रख्यात राजास मरण व दुःख प्राप्त होईल व दुर्भिक्ष,महामारी,अवर्षण यांहीकरून सर्व लोकही संतप्त होतील२८

वारुणपौरंदरयोःसुभिक्षशिववृष्टिहार्दयोलोके ।
गावोतिभूरिपयसोनिवृत्तवैराश्चभूपालाः ॥२९॥

अर्थ–वारुणमंडलीं ऐंद्रवेळेवर भूकंप होईल तर सुभिक्ष, कल्याण, वृष्टि, संतोष हीं लोकांमध्यें होतील व गाई बहुत दुग्ध देतील. राजे द्वेष सोडतील ॥२९॥

पक्षैश्चतुर्भिरनिलस्त्रिभिरग्निर्देवराट्चसप्ताहात् ।
सद्यःफलतिचवरुणोयेषुनकालोद्भुतेपूक्तः॥३०॥

अर्थ–ज्या अद्भुताविषयीं फळाचा काळ सांगीतला नाहीं त्या देहस्पंदनादि अद्भुताविषयीं वक्ष्यमाण फलकालनिर्णय घ्यावा वायुमंडलीं अद्भुत झालें तर त्याचें शुभाशुभफल दोन महिन्यानीं होतें अग्निमंडलीं दीड महिन्यानें, ऐंद्रमंडलीं सात दिवसानीं, वरुणमंडलीं तत्काल, अशीं शुभाशुभफलें होतात ॥३०॥

चलयतिपवनःशतद्वयंशतमनलोदशयोजनान्वितं ।
सलिलपतिरशीतिसंयुतंकुलिशधरोभ्यधिकंचषष्टिकं ३१

अर्थ–वायुमंडलामध्ये भूकंप झाला तर भूमि दोनशे योजनें चलन पावत्ये. अग्नि मंडलामध्ये झाला तर एकशें दहा योजने, वरुणमंडलामध्ये झाला तर एकशे ऐंशीं योजनें, ऐंद्रमंडलामध्यें भूकंप झाला तर एकशें साठ योजनें असें भूमिचलन होतें ॥३१॥

त्रिचतुर्थसप्तमदिनेमासेपक्षेतथात्रिपक्षेच।
यदिभवतिभूमिकंपःप्रधाननृपनाशनोभवति ॥३२

अर्थ–भूमिकंप झाल्यापासून दुसरा भूमिकंप, ३।४।७ इतक्या दिवशीं, एक महिन्यानें, पंधरा दिवशीं, दीड महिन्यानें जर होईल तर प्रतिष्ठित राजाचा नाश होईल ॥३२॥

इतिबृहत्संहितायांभूमिकंपलक्षणंनामद्वात्रिंशोध्यायः ३२

---

## ॥ अथउल्कालक्षणं ॥

---

दिविभुक्तशुभफलानांपततांरूपाणियानितान्युल्काः।
धिष्ण्योल्काशनिविद्युत्ताराइतिपंचधाभिन्नाः ॥१॥

अर्थ–स्वर्गामध्ये शुभफल भोगून खालीं पडणारांचीं जीं रूपे ता उल्का होत त्या धिष्ण्या, उल्का, अशनि, विद्युत्, तारा, या भेदानीं पांचप्रकारच्या आहेत ॥१॥

उल्कापक्षेणफलंतद्वद्धिष्ण्याशनिस्त्रिभिःपक्षैः।
विद्युदहोभिःषड्भिस्तद्वत्ताराविपाचयति ॥२॥

अर्थ–उल्का व धिष्ण्या ह्या १९ दिवसानी फल देतात अशनि तीन पंधरवड्यानीं फल देते विद्युत् व तारा सहा दिवसानीं फल देतात ॥२॥

ताराफलपादकरीफलार्धदात्रीप्रकीर्तिताधिष्ण्या।
तिस्त्रःसंपूर्णफलाविद्युदथोल्काशनिश्चेति ॥३॥

अर्थ–तारा उक्तफलाचा चतुर्थांश फल देत्ये. धिष्ण्या उक्तफलाचे अर्धे फल देत्ये विद्युत, उल्का, अशनि ह्या तीन संपूर्ण फल देतात ॥३॥

अशनिःस्वनेनमहतानृगजाश्वमृगाश्मवेश्मतरुपशुषु।
निपततिविदारयंतीधरातलंचक्रसंस्थाना ॥४॥

अर्थ–मोठा शब्द करून मनुष्य, हत्ती, अश्व, आरण्यपशु, पाषाण, गृह, वृक्ष, गवादि पशु याचाठाई चक्रासारखी फिरून पृथ्वीचे विदारण करितहोत्साती जी पडते ती अशनिनामक उल्का होय ॥४॥

विद्युत्सत्वत्रासंजनयंतीतटतटस्वनासहसा ।
कुटिलविशालानिपततिजीवेंधनराशिपुज्वलिता ५

अर्थ–प्राणिमात्रास त्रास करितहोत्साती तटतट शब्द करून वाकडी विस्तीर्ण व प्रज्वलित अशी प्राणी व काष्ठसमुदाय याजवर पडते ती विद्युत् होय ॥५॥

धिष्ण्याकृशाल्पपुच्छाधनूंषिदशदृश्यतेंतराभ्यधिकं ।
ज्वलितांगारनिकाशाद्वौहस्तौसाप्रमाणेन ॥६॥

अर्थ–दुर्बल, थोड्यापुच्छाची, प्रज्वलित निखाऱ्यासारखी, जी प्रथम दोन हात उत्पन्न होऊन मध्ये दहा धनुष्ये ( ४० हात ) अधिक लांब दिसते ती धिष्ण्या होय ॥६॥

ताराहस्तंदीर्घाशुक्लाताम्राब्जतंतुरूपावा ।
तिर्यगधश्चोर्ध्ववायातिवियत्यूह्यमानेव ॥७॥

अर्थ–एकहात लांब, शुभ्र किंवा ताम्रवर्ण, कमलतंतूसारखी (बारीक), ओढून नेल्यासारखी तिर्कस, खाली किंवा वर होऊन आकाशामध्ये जाते ती तारा होय ॥७॥

उल्काशिरसिविशालानिपतंतीवर्धतेप्रतनुपुच्छा ।
दीर्घाभवतिचपुरुषंभेदावहवोभवंत्यस्याः ॥८॥

अर्थ–मस्तकाचाठाई विस्तीर्ण, पडत असता वाढणारी, बारीकपुच्छाची, पुरुषप्रमाण ( साडेतीनहात ) लांब होणारी अशी उल्का होय. इचे बहुत भेद होतात ८

प्रेतप्रहरणखरकरभनक्रकपिदंष्ट्रिलांगलमृगाभाः ।
गोधाहिधूमरूपाःपापायाचोभयशिरस्का ॥९॥

अर्थ–प्रेत, शस्त्र, गर्दभ, उष्ट्र, नक्र, वानर, डुकर, नांगर, मृग यांसारख्या; घोरपड, सर्प, धूम, यांसारख्या उल्का अशुभ व दोहोंकडे मस्तकाची अशी जी उल्का तीहि अशुभ होय ॥९॥

**ध्वजझषकरिगिरिकमलेंदुतुरगसंतप्तरजतहंसाभाः ।**
**श्रीवत्सवज्रशंखस्वस्तिकरूपाःशिवसुभिक्षाः ॥१०॥**

अर्थ–ध्वज, मत्स्य, गज, पर्वत, कमल, चंद्र, अश्व, तापविलेलें रूपें, हंस, यांसारख्या व श्रीवत्स ( विष्णूच्या हृदयावरील चिन्ह ), वज्र, शंख, स्वस्तिक यासारख्या उल्का शुभ व सुभिक्षकारक होत ॥१०॥

**अंबरमध्याद्बव्ह्योनिपतंत्योराजराष्ट्रनाशाय ।**
**बभ्रमतीगगनोपरिविभ्रममाख्यातिलोकस्य ॥११॥**

अर्थ–आकाशमध्यापासून उल्का बहुत पडतील तर राजा व देश यांचा नाश होतो. उल्का आकाशांत जर फिरेल तर लोकास भ्रांति करिते ॥११॥

**संस्पृशतीचंद्रार्कौतद्विसृतावासभूप्रकंपाच ।**
**परचक्रागमनृपवधदुर्भिक्षावृष्टिभयजननी ॥१२॥**

अर्थ–चंद्रसूर्यांस स्पर्श करणारी किंवा चंद्रसूर्यांनीं सोडलेली व भूमि कांपविणारी अशी उल्का शत्रुचक्राचें आगमन, राजाचा वध, दुर्भिक्ष, अवर्षण याचें भय उत्पन्न करते ॥१२॥

**पौरेतरघ्नमुल्कापसव्यकरणंदिवाकरहिमांश्वोः ।**
**उल्काशुभदापुरतोदिवाकरविनिःसृतायातुः ॥१३॥**

अर्थ–उल्का, सूर्यास अप्रदक्षिण करील तर नागरिक लोकांचा व चंद्रास अप्रदक्षिण करील तर नागरिकांहून इतर लोकांचा नाश करिते. जी उल्का सूर्यापासून निघाली ती गमनकरणाऱ्या राजाच्या पुढें पडेल तर शुभ होय ॥१३॥

**शुक्लारक्तापीताकृष्णाचोल्काद्विजादिवर्णघ्नी ।**
**क्रमशश्चैतान्हन्युर्मूर्धोरःपार्श्वपुच्छस्थाः ॥१४॥**

अर्थ–शुक्ल, रक्त, पीत, कृष्ण या वर्णांची उल्का अनुक्रमानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चार वर्णांचा नाश करिते व तशाच अनुक्रमानें मस्तक, उरस्थल,

पार्श्वभाग, पुच्छ या अगानीं पडलेल्या उल्का ब्राह्मणादि चार वर्णांचा नाश क-रितात॥१४॥

उत्तरदिगादिपतिताविप्रादीनामनिष्टदारूक्षा ।
ऋज्वीस्निग्धाखंडानीचोपगताचतद्वृद्ध्यै ॥१५॥

अर्थ—उत्तरादि ४ दिशास पडलेली व रूक्ष ( रखरखीत ) उल्का ब्राह्मणादि चा-र वर्णांस अशुभ होय. ( उत्तरेस पडलेली ब्राह्मणास, पूर्वेस क्षत्रियास, दक्षिणेस वैश्यास, पश्चिमेस शूद्रास अशुभ होय ) ती उल्का सरळ, निर्मळ, अखंड, आ-काशातून खालीं येणारी अशी असून उत्तरादिपतित असेल तर ब्राह्मणादिकास शुभ होते ॥१५॥

श्यामारुणाचनीलासृग्दहनासितभस्मनिभारूक्षा ।
संध्यादिनजावक्रादलिताचपरागमभयाय ॥१६॥

अर्थ—श्याम, आरक्त, नील, रक्तवर्ण, अग्निवर्ण, कृष्ण, भस्म या वर्णांची व रूक्ष, सध्यासमय व दिवस यात झालेली, वक्र, खंडित अशी उल्का शत्रूच्या येण्याचे भय करणारी होते ॥१६॥

नक्षत्रग्रहघातेतद्भक्तीनांक्षयायनिर्दिष्टा ।
उदयेऽस्तेरविंदूपौरेतरमृत्यवेस्तेवा ॥१७॥

अर्थ—नक्षत्रें किंवा ग्रह उल्केनें उपहत ( ताडित ) असता पूर्वोक्त नक्षत्रग्रहव्यू-होक्त भक्तांचा नाश होतो. उदयकालीं किंवा अस्तकालीं सूर्यचंद्रास उल्का जर ताडन करील तर अनुक्रमानें नागरिक व यायी यास मृत्यु होतो. ( सूर्य ताडित असता नागरिकाचा व चंद्र ताडित असता यायींचा नाश ) ॥१७॥

भाग्यादित्यधनिष्ठामूलेषूल्काहतेषुयुवतीनां ।
विप्रक्षत्रियपीडापुष्यानिलविष्णुदेवेषु ॥१८॥
ध्रुवसौम्येषुनृपाणामुग्रेषुसदारुणेषुचौराणां ।
क्षिप्रेषुकलाविदुषांपीडासाधारणेषुहते ॥१९॥

अर्थ—पूर्वा, पुनर्वसु, धनिष्ठा, मूल ह्या नक्षत्रांच्या योगतारा उल्काहत असता स्त्रियास पीडा होते. पुष्य, स्वाती, श्रवण हा नक्षत्रें ताडित अ० ब्राह्मण व [क्षत्रि]यं यास पीडा होते ॥१८॥ रोहिणी, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा,

मृगशीर्ष, चित्रा, अनुराधा, रेवती, हीं नक्षत्रें उल्काहत अ० राजांस पीडा होत्ये. पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभा०, मघा, भरणी, आर्द्रा, आश्लेषा, ज्येष्ठा, मूल हीं नक्षत्रें उल्काहत अ० चोरांस पीडा होत्ये. अश्विनी,पुष्य, हस्त, अभिजित्, कृत्तिका, विशाखा हीं नक्षत्रें उल्काहत असतां, कलाजाणणाऱ्यांस पीडा होत्ये ॥१९॥

कुर्वंत्येताःपतितादेवप्रतिमासुराजराष्ट्रभयं ।
शक्रोपरिनृपतीनांगृहेषुतत्स्वामिनांपीडां ॥२०॥
आशाग्रहोपघातेतद्देश्यानांखलेकृषिरतानां ।
चैत्यतरौसंपतितासत्कृतपीडांकरोत्युल्का ॥२१॥
द्वारिपुरस्यपुरक्षयमथेंद्रकीलेजनक्षयोभिहितः ।
ब्रह्मायतनेविप्रान्विनिहन्याद्गोमिनोगोष्ठे ॥२२॥

अर्थ—ह्या पूर्वोक्त उल्का देवप्रतिमांवर पडल्या तर राजास व लोकांस भय करतात. शक्र(राजा)यावर पडल्या तर राजांस भय. गृहांवर पडल्या तर गृहस्वामींस पीडा २० ( सूर्य, शुक्र, भौम, राहु, शनि, चंद्र, बुध, गुरु हे अनुक्रमानें पूर्वादि दिशांचे स्वामी होत ) या दिक्पतींस उपघात उल्का करील तर अथवा दिशा व ग्रह यावर पडेल तर त्या दिशेस राहणाऱ्या लोकांस व त्या ग्रहांच्या देशांत राहणाऱ्या लोकांस पीडा होत्ये. (धान्य कापून जेथे मळतात तें खळें) त्यावर पडेल तर शेतीलोकांस पीडा होत्ये. चैत्यतरु (गावांतील मोठा वृक्ष) यावर उल्का पडली तर थोरलोकांस पीडा होत्ये ॥२१॥ नगराच्या द्वारावर पडेल तर नगराचा नाश होतो. पुरद्वाराच्या अर्गलेवर (खिळीवर) पडेल तर लोकांचा नाश होतो. ब्रह्मदेवाच्या देवळावर पडेल तर ब्राह्मणांचा नाश होतो. गोठयावर उल्का पडेल तर गुरें वाळगणाराचा नाश होतो ॥२२॥

क्ष्वेडास्फोटितवादितगीतोत्क्रुष्टस्वनाभवंतियदा ।
उल्कानिपातसमयेभयायराष्ट्रस्यसनृपस्य ॥२३॥

अर्थ—वीरांचा सिंहनाद अथवा सिंहाचा शब्द, बाहूंचे अथवा वक्षस्थळांचे ताडनाचा शब्द, वाद्यांचा शब्द, गायनाचा शब्द यांसारखा विजेचा शब्द पडत्येवेळीं होईल तर राजास व राष्ट्रास भय होतें ॥२३॥

यस्याश्चिरंतिष्ठतिखेनुषंगोदंडाकृतिःसानृपते
र्भयाय । याचोह्यतेतंतुधृतेवखस्थायावाम
हेंद्रध्वजतुल्यरूपा ॥२४॥

अर्थ–ज्या उल्केचा संबंध आकाशामध्यें बहुतवेळ राहतो, जी दंडासारखी, आकाशामध्ये तंतु धरून ओढल्यासारखी जाते व जी इंद्रध्वज ( गुढी ) यासारखी, या चार प्रकारची उल्का राजास भयकारक होते ॥२४॥

श्रेष्ठिनःप्रतीपगातिर्यगानृपांगनाः ।
हंत्यधोमुखीनृपान्ब्राह्मणानथोर्ध्वगा ॥२५॥
बर्हिपुच्छरूपिणीलोकसंक्षयावहा ।
सर्पवत्प्रसर्पिणीयोषितामनिष्टदा ॥२६॥
हंतिमंडलापुरंछत्रवत्पुरोहितं ।
वंशगुल्मवत्स्थिताराष्ट्रदोषकारिणी ॥२७॥
व्यालसूकरोपमाविस्फुलिंगमालिनी ।
खंडशोथवागतासस्वनाचपापदा ॥२८॥

अर्थ–उल्का जेथून आली तेथेंच परत गेली तर श्रेष्ठी ( मुख्य ) यांचा नाश करि-ते. उल्का तिर्कस गेली तर राजस्त्रियांचा नाश. अधोमुख गेली तर राजाचा नाश. ऊर्ध्वमुख गेली तर ब्राह्मणाचा नाश ॥२५॥ मयूरपुच्छासारखी उल्का लोकांचा नाश करिते. सर्पासारखी गमनकरणारी उल्का स्त्रियांस अनिष्ट २६ जी उल्का पडली असतां मंडलासारखी होते ती नगराचा नाश करते. जी उल्का छत्रासारखी दिसते ती पुरोहिताचा नाश करते. जी वंशगुल्म ( वेळूचें बेट ) यासारखी दिसते ती राष्ट्राचा नाश करते ॥२७॥ सर्प व डुकर यांसारखी, अग्निकणांच्या माळेसारखी अथवा अनेक प्रकारांनीं गेलेली व शब्दयुक्त अशी उ-ल्का अशुभ होय ॥२८॥

सुरपतिचापप्रतिमाराज्यंनभसिविलीनाज
लदान्हंति । पवनविलोमाकुटिलंयाताग्न
भवतिशस्ताविनिवृत्तावा ॥२९॥

अर्थ–इंद्रधनुष्यासारखी उल्का राज्यनाश करते. जी उल्का आकाशांत उत्पन्न होऊन तेथेंच नाहींशी झाली ती मेघांचा नाश करते. जी वायूला प्रतिकूळ, वांकडी गेली अथवा परत जाऊन पुनः फिरली ती उल्का शुभ नव्हे ॥२९॥

अभिभवतियतःपुरंबलंवाभवतिभयंततएव

पार्थिवस्य । निपततिचययादिशाप्रदीप्ताज यतिरिपूनचिरात्तयाप्रयातः ॥३०॥

अर्थ—ज्या दिशेकडे उल्केपासून नगर किंवा सैन्य पराजय पावते त्या दिशेकडे राजास भय होते. ज्या दिशेकडे प्रदीप्त उल्का पडल्रे त्या दिशेने गेलेला राजा शीघ्र शत्रूस जिंकतो ॥३०॥

॥इतिबृहत्संहितायांउल्कालक्षणंनामत्रयस्त्रिंशोध्यायः ३३

---

## ॥ अथपरिवेषलक्षणं ॥

संमूर्छितारवींद्वोःकिरणाःपवनेनमंडलीभूताः । नानावर्णाकृतयस्तन्वभ्रेव्योम्निपरिवेषाः ॥१॥

अर्थ—पसरलेले, वायूने वर्तुळ झालेले, अनेक रंगाचे व अनेक आकाराचे सूर्यचंद्राचे किरण, थोड्या अभ्राने युक्त अशा आकाशामध्ये दिसतात ते परिवेष होत ॥१॥

तेरक्तनीलपांडुरकापोताभ्राभशबलहरिशुक्लाः । इंद्रयमवरुणनिर्ऋतिश्वसनेशपितामहाग्निकृताः ॥२॥

अर्थ—ते रक्तादिवर्ण परिवेष इंद्रादिकृत होत. जसे० रक्तवर्ण परिवेष इंद्रकृत, नीलवर्ण यमकृत, ईषत्शुक्ल वरुणकृत, काळापांढरा निर्ऋतिकृत, मेघवर्ण वायुकृत, कृष्णश्वेत शिवकृत, हरिद्वर्ण ब्रह्मकृत,शुभ्रवर्ण अग्निकृत, याप्रकारे परिवेष जाणावे २

धनदःकरोतिमेचकमन्योन्यगुणाश्रयेणचाप्यन्ये । प्रविलीयतेमुहुर्मुहुरल्पफलःसोपिवायुकृतः ॥३॥

अर्थ—कुबेर, मयूरकंठाच्या रंगासारखा परिवेष करितो. अन्यही इंद्रादिदेव परस्परांच्या वर्णांचा आश्रय करितात यास्तव ते परिवेष अनेकवर्ण दिसतात. जो परिवेष वारंवार नाहीसा होतो तो वायुकृत अल्पफलदेणारा होय ॥३॥

चापशिखिरजततैलक्षीरजलाभःस्वकालसंभूतः । अविकलवृत्तःस्निग्धःपरिवेषःशिवसुभिक्षकरः ॥४॥

अर्थ—संपूर्णवृत्त, निर्मल, नीलादिवर्णांचा परिवेष शिशिरादि ऋतूमध्ये कल्याण व सुभिक्षकारक होय. हा० नीलवर्ण शिशिरऋतूत, विचित्रवर्ण वसंतात, शुक्लवर्ण ग्रीष्मात, तैलवर्ण वर्षाऋतूत, दुग्धवर्ण शरदृतूत, उदकवर्ण हेमंतऋतूत, हे वर्ण ह्या ऋतूत शुभ होत ॥४॥

सकलगगनानुचारीनैकाभःक्षतजसंनिभोरूक्षः ।
असकलशकटशरासनशृंगाटकवत्स्थितःपापः ॥५॥

अर्थ—सर्व आकाशामध्ये फिरणारा ( उदयापासून अस्तापर्यंत राहणारा ), अनेकवर्ण, रक्तासारखा, रखरखीत, तुटलेला, गाडा व धनुष्य व चतुष्पथ ( चवाठा ) यासारखा, परिवेष अशुभ होय ॥५॥

शिखिगलसमेतिवर्षंबहुवर्णेनृपवधोभयंधूम्रे ।
हरिचापनिभेयुद्धान्यशोककुसुमप्रभेचापि ॥६॥

अर्थ—मयूरकंठसदृश परिवेष असता अतिवृष्टि होते. बहुतवर्णांचा अ० राजवध, धूम्रवर्ण अ० भय, इंद्रधनुष्यासारखा व अशोकपुष्पासारखा अ० युद्धे, ही होतात ६

वर्णेनैकेनयदाबहुलःस्निग्धःक्षुराभ्रकाकीर्णः ।
स्वर्तौसद्योवर्षंकरोतिपीतश्चदीप्तार्कः ॥७॥

अर्थ—शिशिरादि ऋतूमध्ये चापादिवर्ण ( श्लो० ४ ) परिवेष जर एकवर्णाचा, काळा, स्निग्ध, सुऱ्यासारख्या अभ्रांनी व्याप्त, असा असेल तर तत्काळ (त्याचादिवशीं) वृष्टि होते व जो पीतवर्ण व ज्यात तप्तसूर्य असाही परिवेष तत्काल वृष्टि करितो ॥७॥

दीप्तविहंगमृगरुतःकलुषःसंध्यात्रयोत्थितोतिमहान् ।
भयकृत्तडिदुल्काद्यैर्हतोनृपंहंतिशस्त्रेण ॥८॥

अर्थ—ज्या परिवेषकाली सूर्याभिमुखराहून पक्षी व आरण्यपशु रोदनशब्द करीतात तो, गढूळ, उदय मध्याह्न अस्त या तीन संध्यासमयी उत्पन्न झालेला, अतिविस्तीर्ण, असा परिवेष भयकारक होय. वीज व उल्का व त्रिविध उत्पात यांनी ताडित असा परिवेष शस्त्राने राजाचा वध करितो ॥८॥

प्रतिदिनमर्कहिमांश्वोरहर्निशंरक्तयोर्नरेंद्रवधः ।
परिविष्टयोरभीक्ष्णंलग्नास्तमयस्थयोस्तद्वत् ॥९॥

अर्थ–प्रतिदिवशीं दिवसरात्रीं आरक्त व परिवेषयुक्त सूर्यचंद्र असतील तर राजवध होतो. तसेच परिवेषयुक्त चंद्रसूर्य वारंवार राजाच्या जन्मलग्नीं किंवा सप्तमस्थानीं असतील तर त्या राजाचा वध होतो ॥९॥

**सेनापतेर्भयकरोद्विमंडलोनातिशस्त्रकोपकरः ।**
**त्रिप्रभृतिशस्त्रकोपंयुवराजभयंनगररोधं ॥१०॥**

अर्थ–दोन मंडलाचा परिवेष सेनापतीस भय करितो व फार शस्त्रभय करीत नाहीं. तीन चार इत्यादि मंडलाचा परिवेष शस्त्रभय, युवराज (राजा असता राज्यकारभार करणारा राजपुत्र) यास भय व नगराचा रोध शत्रूकडून करितो ॥१०॥

**वृष्टिस्त्र्यहेणमासेनविग्रहोवाग्रहेंदुभनिरोधे ।**
**होराजन्माधिपयोर्जन्मर्क्षेवाशुभोराज्ञः ॥११॥**

अर्थ–तीन चार इत्यादि मंडलाचा परिवेष झाला तर तीन दिवसानीं वृष्टि होत्ये. ग्रह, चंद्र व नक्षत्र याचा परिवेषानें निरोध झाला तर युध्द होतें. राजाचे जन्मलग्न व जन्मराशि याचे स्वामी व जन्मनक्षत्र हीं परिवेषानें रोधिलीं तर राजास अशुभ होय ॥११॥

**परिवेषमंडलगतोरवितनयःक्षुद्रधान्यनाशकरः ।**
**जनयतिचवातवृष्टिंस्थावरकृषिकृन्निहंताच ॥१२॥**
**भौमेकुमारबलपतिसैन्यानांविद्रवोग्निशस्त्रभयं ।**
**जीवेपरिवेषगतेपुरोहितामात्यनृपपीडा ॥१३॥**
**मंत्रिस्थावरलेखकपरिवृध्दिश्चंद्रजेसुवृष्टिश्च ।**
**शुक्रेयायिक्षत्रियराज्ञीपीडाप्रियंचान्नं ॥१४॥**
**क्षुदनलमृत्युनराधिपशस्त्रेभ्योजायतेभयंकेतौ ।**
**परिविष्टेगर्भभयंराहौव्याधिर्नृपभयंच ॥१५॥**

अर्थ–परिवेषमंडलांत शनि असेल तर क्षुद्रधान्य (काग १०) याचा नाश होतो, वातयुक्त वृष्टि होत्ये, वृक्षादि स्थावर व शेतीलोक याचा नाश होतो ॥१२॥ परिवेषगत भौम अ० बालक, सैन्यपति, सैन्यें हीं दुःखी होतात व शस्त्रभय होतें. परिवेषगत बृहस्पति अ० पुरोहित, प्रधान, राजे यास पीडा होत्ये ॥१३॥ परिवेषगत बुध अ० प्रधान, वृक्ष, लेखक, याची वृध्दि होत्ये व उत्तम वृष्टीही होत्ये १४ परि० शुक्र अ० यायी (प्रवासी), क्षत्रिय, राजस्त्री, यांस पीडा व दुर्भिक्ष हीं हो-

तात ॥१४॥ परि० केतु अ० दुर्भिक्ष, अग्नि, मृत्यु, राजा, शस्त्र, यांपासून भय होतें. परि० राहु अ० गर्भभय, रोग, राजभय, हीं होतात ॥१५॥

युद्धानिविजानीयात्परिवेषाभ्यंतरेद्वयोर्ग्रहयोः ।
दिवसकृतःशशिनोवाक्षुदवृष्टिभयंत्रिषुप्रोक्तं ॥१६॥
यातिचतुर्षुनरेंद्रःसामात्यपुरोहितोवशंमृत्योः ।
प्रलयमिवविद्धिजगतःपंचादिषुमंडलस्थेषु ॥१७॥

अर्थ—सूर्याच्या किंवा चंद्राच्या परिवेषामध्ये दोन ताराग्रह असतील तर युद्धें होतील व तीन ग्रह असले तर दुर्भिक्ष, अवर्षण, यांचें भय होईल ॥१६॥ सूर्यचंद्रांच्या परिवेषामध्यें चार ग्रह असले तर प्रधान व उपाध्याय यांसहवर्तमान राजा मृत्युवश होतो. पाच सहा ग्रह सूर्यचंद्रपरिवेषमंडलस्थ असतील तर सर्व जगतास प्रलयासारखें दुःख होईल ॥१७॥

ताराग्रहस्यकुर्यात्पृथगेवसमुत्थितोनरेंद्रवधं ।
नक्षत्राणामथवायदिकेतोर्नोदयोभवति ॥१८॥

अर्थ—चंद्रसूर्यांवांचून निराळाच भौमादिग्रहास किंवा नक्षत्रांस जर परिवेष उत्पन्न होईल तर राजाचा वध होतो. केतूदय झाला तर त्याचेंमात्र फल होतें. तारा-ग्रह व नक्षत्र यांचें वर सांगितलेलें परिवेषफल होत नाहीं ॥१८॥

विप्रक्षत्रियविट्शूद्रहाभवेत्प्रतिपदादिषुक्रमशः ।
श्रेणीपुरकोशानांपंचम्यादिष्वशुभकारी ॥१९॥
युवराजस्याष्टम्यांपरतस्त्रिषुपार्थिवस्यदोषकरः ।
पुररोधोद्वादश्यांसैन्यक्षोभस्त्रयोदश्यां ॥२०॥
नरपतिपत्नीपीडांपरिवेषोभ्युत्थितश्चतुर्दश्यां ।
कुर्यात्तुपंचदश्यांपीडांमनुजाधिपस्यैव ॥२१॥

अर्थ—प्रतिपदादि चार तिथींस परिवेष दिसेल तर अनुक्रमानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचा नाश होतो. पंचमीस एकजातीच्याच लोकांचा, षष्ठीस नगराचा, सप्तमीस जामदारखान्याचा नाश होतो ॥१९॥ अष्टमीस युवराजाचा, नवमी, दशमी, एकादशी या तीन तिथींस राजाचा नाश होतो. द्वादशीस नगररोध, त्रयोदशीस सैन्यक्षोभ होतो ॥२०॥ चतुर्दशीस परिवेष होईल तर राजस्त्रियेचा व पौर्णिमेस राजाचाच नाश होतो ॥२१॥

नागरकाणामभ्यंतरस्थितायायिनांचबाह्यस्था ।
परिवेषमध्यरेखाविज्ञेयाक्रंदसाराणां ॥२२॥
रक्तःश्यामोरूक्षश्चभवतियेषांपराजयस्तेषां ।
स्निग्धःश्वेतोद्युतिमान्येषांभागोजयस्तेषां ॥२३॥

अर्थ–तीनवर्णांच्या परिवेषाच्या तीन रेषा दिसतात त्यामध्यें आतली रेषा नगरसंबधी राजाची, बाह्यरेषा यायी (मार्गस्थ) राजाची, मध्यरेषा आक्रंदसाराची (दुःखितराजाची) होय ॥२२॥ ज्याची रेषा रक्त, श्याम, रूक्ष असेल त्यांचा पराजय व ज्याची स्निग्ध, श्वेत, प्रकाशित असेल त्याचा जय होतो ॥२३॥

इतिबृहत्संहितायांपरिवेषलक्षणंनामचतुस्त्रिंशोऽध्यायः ३४

---

## ॥ अथइंद्रायुधलक्षणं ॥

सूर्यस्यविविधवर्णाःपवनेनविघट्टिताःकराःसाभ्रे ।
वियतिधनुःसंस्थानायेदृश्यंतेतदिंद्रधनुः ॥१॥

अर्थ–वायूनें अवरुद्ध, अनेकरंगाचे सूर्यकिरण, मेघयुक्त आकाशामध्यें धनुष्याकार दिसतात, तें इंद्रधनुष्य होय ॥१॥

केचिदनंतकुलोरगनिःश्वासोद्भूतमाहुराचार्याः ।
तद्यायिनांनृपाणामभिमुखमजयावहंभवति ॥२॥

अर्थ–अनंतनामक नागराजाच्या कुलांतील सर्पांच्या निःश्वासापासून इंद्रधनुष्य उत्पन्न होतें; असें कोणी काश्यपादि आचार्य म्हणतात तें इंद्रधनुष्य शत्रूवर गमन करणाऱ्या राजास सन्मुख असेल तर, पराजयकारक होतें ॥२॥

अच्छिन्नमवनिगाढंद्युतिमत्स्निग्धंघनंविविधवर्णं ।
द्विरुदितमनुलोमंचप्रशस्तमंभःप्रयच्छतिच ॥३॥

अर्थ–तें इंद्रधनुष्य अखंड, भूमीस लागलेलें, तेजस्वी, सुकांति, दाट, नानाप्रकारच्या रंगांनीं युक्त, एकाचाच एक असें दुसरें मार्गस्थराजाच्या इष्टमार्गीं राहिलेलें, अ-सें असेल तर तें शुभ व उदकही देतें ॥३॥

Registered No. 29 of 1873.

# सूचना.

विद्वान् , उदार, परोपकारी आणि श्रीमान् इत्यादि सद्गृहस्थांस आम्ही विनयपूर्वक असें सुचवितों कीं, या ग्रंथाचा राजापासून रंकापर्यंत सर्वांस विशेष उपयोग होईल, असें समजून प्राकृत ( मराठी ) टीकेसह लोकहितो- द्देशानें हें पुस्तक छापण्याचें काम सुरू केलें आहे. यास वर्गणीद्वारा साह्य करून, तें पूर्ण करणें सुज्ञ देशाभिमान्यांकडे आहे.

## वर्गणीचे दर.

| | किंमत. | हाशील. |
|---|---|---|
| आगाऊ किंवा अंक पोंचल्यावर दिल्यास दर अंकास | ८ आणे. | ६ पै. |
| मागाहून दिल्यास दर अंकास | १२ आणे. | ६ पै. |

किंमतीबद्दल टिकिटा पाठविणें झाल्यास अर्धा आणा दराच्या पाठवाव्या.

मुंबईंत ठाकुरद्वारानजीक हरिबाबांचे चाळींत रा० रा० नारोकृष्ण दुमाळे यांजकडे पैसा जमा करून त्यांची पावती घ्यावी.

श्री

# बृहत्संहिता

( वराह मिहिरकृत )

मूळश्लोक संस्कृत असून त्यांचा अर्थ प्राकृत ( महाराष्ट्र ) भाषेत लिहिला आहे.

# THE BRIHATSANHITÁ

[ BY VARÁHA-MIHIRA ]

यांत व्यवहारोपयोगी सर्वप्रकारचे विषय आहेत.


पुस्तक १ लें  तारीख २५ नोवेंबर १८७३.  अंक ७

VOL I  25th NOVEMBER 1873  No. 7



रत्नागिरी

येथें

जनार्दन हरि आठल्ये

यांणीं

आपल्या

जगन्मित्र छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.


प्रत्येक अंकांत मोठ्या तक्तीचे सांच्याचीं चतुष्पत्री ३२ पृष्ठें असून सुमारें ८०० ग्रंथ येत जाईल.

अर्थ–निबिडअंधकारतुल्य धुळीने पर्वत, नगरें, वृक्ष हे दिसेनासे झाले व सर्व दिशाही आच्छादित झाल्या तर राजाचा वध होतो असें ऋषि ह्मणतात ॥१॥

**यस्यांदिशिधूमचयःप्राग्भवतिनाशमेतिवायस्यां ।**
**आगच्छतिसप्ताहात्तत्रैवभयंनसंदेहः ॥२॥**

अर्थ–ज्यादिशेस धूमसमुदाय प्रथम उत्पन्न होईल किंवा ज्यादिशेकडे नाहीसा होईल त्यादिशेकडून सात दिवसांनीं भय येतें यांत संशय नाहीं ॥२॥

**श्वेतेरजोघनौघेपीडास्यान्मंत्रिजनपदानांच ।**
**नचिरात्प्रकोपमुपयातिशस्त्रमतिसंकुलासिद्धिः ॥३॥**

अर्थ–धुळीचा समुदाय श्वेतवर्ण असेल तर प्रधान व लोक यांस पीडा होते व शीघ्र शस्त्रप्रकोप ( युद्ध ) होतो व अतिसंकुल सिद्धीही होते ॥३॥

**अर्कोदयेविजृंभतियदिदिनमेकंदिनद्वयंवापि ।**
**स्थगयन्निवगगनतलंभयमत्युग्रंनिवेदयति ॥४॥**

अर्थ–धूळ सूर्योदयीं पसरून एक किंवा दोन दिवस आकाशातें आच्छादित करील तर, मोठें कठिण भय होतें ॥४॥

**अनवरतसंचयवहंरजनीमेकांप्रधाननृपहंतृ ।**
**क्षेमायचशेषाणांविचक्षणानांनरेंद्राणां ॥५॥**

अर्थ–निरंतर संचयानें वाहणार असें रज एकरात्र राहील तर, मुख्यराजाचा नाश होईल व इतर चतुरराजांचें कल्याण होईल ॥५॥

**रजनीद्वयंविसर्पतियस्मिन्राष्ट्रेरजोघनंबहुलं ।**
**परचक्रस्यागमनंतस्मिन्नपिसंनिबोद्धव्यं ॥६॥**

अर्थ–ज्या राष्ट्रांत दोन रात्री धूळ बहुत पसरेल तेथें शत्रुचक्राचें आगमन होईल असें जाणावें ॥६॥

**निपततिरजनीत्रितयंचतुष्कमप्यन्नरसविनाशाय ।**
**राज्ञांसैन्यक्षोभोरजसिभवेत्पंचरात्रभवे ॥७॥**

अर्थ–तीनरात्री किंवा चाररात्री धूळ होईल तर, अन्न व रस यांचा नाश होतो. पांचरात्री रज होईल तर, राजाच्या सैन्यामध्यें क्षोभ होईल ॥७॥

केत्वाद्युदयविमुक्तंयदारजोभवतितीव्रभयदायि ।
शिशिरादन्यत्रर्त्तौफलमविकलमाहुराचार्याः ॥८॥)

अर्थ–केत्वादिकाच्या उदयीं झालेलें रज मोठें भय देणारें होतें  हें रज शिशिरऋतु ( माघ, फाल्गुन ) याचाचून अन्यऋतूत होईल तर मात्र त्याचें शुभाशुभ फल होतें  असें आचार्य ह्मणतात ॥८॥

(॥ इतिरजोलक्षणं ॥३८॥)

## ॥ अथनिर्घातलक्षणं ॥

पवनःपवनाभिहतोगगनादवनौयदासमापतति ।
भवतितदानिर्घातःसचपापोदीप्तविहगरुतः ॥१॥

अर्थ–वायूनें वायूचें ताडन होऊन जेव्हां आकाशापासून भूमीप्रत पडतो, तेव्हां निर्घात ( मोठाशब्द ) होतो तो निर्घात, सूर्याभिमुख पक्षिशब्दानीं युक्त असेल तर अशुभ होय ॥१॥

अर्कोदयेधिकरणिकनृपधनियोधांगनावणिग्वेश्याः ।
आप्रहरांशेजाविकमुपहन्याच्छूद्रपौरांश्च ॥२॥
आमध्यान्हाद्राजोपसेविनोब्राह्मणांश्चपीडयति ।
वैश्यजलदांस्तृतीयेचौरान्प्रहरेचतुर्थेच ॥३॥
अस्तंयातेनीचान्प्रथमेयामेनिहंतिसस्यानि ।
रात्रौद्वितीययामेपिशाचसंघान्निपीडयति ॥४॥
तुरगकरिणस्तृतीयेविनिहन्याद्यायिनश्चतुर्थेच ।
भैरवजर्जरशब्दोयातियतस्तांदिशंहंति ॥५॥

अर्थ–सूर्योदयी निर्घात होईल तर, अधिकारी, राजा, धनवान् , योद्धा, स्त्री, व्यापारी, वेश्या यांचा नाश होतो  दिवसाच्या प्रथमप्रहरीं निर्घात होईल तर, शेळ्या, मेंढ्या, शूद्र, नागरिकजन यांचा नाश ॥२॥ मध्यान्हपर्यंत ह्म० दुसऱ्या प्रहरीं निर्घात झाला तर, राजाचे सेवक, ब्राह्मण यास पीडा  तिसऱ्याप्रहरीं

वैश्य, मेघ यांस पीडा. चतुर्थप्रहरीं चोरांस पीडा ॥३॥ अस्तमानीं नीचांस पीडा. रात्रीं प्रथमप्रहरीं धान्यांस पीडा. द्वितीयप्रहरीं पिशाचसमुदायांस पीडा ॥४॥ तृतीयप्रहरीं अश्व व गज याचा नाश. चतुर्थप्रहरीं यायी ( जयेच्छु ) याचा नाश होतो. निर्घाताचा भयंकर व फुटक्या भांड्याच्या शब्दासारखा शब्द ज्यादिशेस जाईल, त्यादिशेचा नाश होतो ॥५॥

## इतिबृहत्संहितायांनिर्घातलक्षणंनामैकोनच त्वारिंशोध्यायः॥३९॥

## ॥ अथसस्यजातकं ॥

वृश्चिकवृषप्रवेशेभानोर्येबादरायणेनोक्ताः ।
ग्रीष्मशरत्सस्यानांसदसद्योगाःकृतास्तइमे ॥१॥

अर्थ—वृश्चिक व वृषभ या राशीस सूर्याच्या प्रवेशावरून क्र० या संक्रांति होतात त्या वेळेवरून अनुक्रमानें ग्रीष्म ( उन्हाळी ) धान्यें व शरत् ( पावसाचीं ) धान्यें यांचे शुभाशुभयोग बादरायणाचार्यांनें जे सांगितले ते हे ( वक्ष्यमाण ) मी केले आहेत ॥१॥

भानोरलिप्रवेशेकेंद्रैस्तस्माच्छुभग्रहाक्रांतैः ।
बलवद्भिःसौम्यैर्वानिरीक्षितैर्ग्रैष्मिकविवृद्धिः ॥२॥

अर्थ—सूर्याच्या वृश्चिकप्रवेशकालीं वृश्चिक लग्नापासून केंद्रस्थानीं १।४।७।१० शुभग्रह असतील अथवा बलिष्ठ शुभग्रहांनीं सूर्य दृष्ट असेल तर ग्रीष्मसंबंधी धान्यांची वृद्धि होते ( अक्षीणचंद्र, बुध, गुरु, शुक्र हे शुभग्रह होत. स्वगृहीं, स्वोच्चीं, स्वमित्रगृहीं जो ग्रह असेल तो बलिष्ठ.) ॥२॥

अष्टमराशिगतेर्केगुरुशशिनोःकुंभसिंहसंस्थितयोः ।
सिंहघटसंस्थयोर्वानिष्पत्तिर्ग्रीष्मसस्यस्य ॥३॥

अर्थ—वृश्चिकराशीस सूर्य, गुरु कुंभीं, चंद्र सिंहीं, अथवा गुरु सिंहीं, चंद्र कुंभीं असे असतील तर ग्रीष्मधान्यें उत्पन्न होतील ॥३॥

अर्कात्सितेद्वितीयेबुधेथवायुगपदेववास्थितयोः ।
व्ययगतयोरपितद्वन्निष्पत्तिरतीवगुरुदृष्ट्या ॥४॥

अर्थ–वृश्चिकस्थसूर्यापासून दुसरा शुक्र किंवा बुध असेल अथवा दोघेही एकका र्टीच दुसरे असतील अथवा वृश्चिकस्थसूर्यापासून शुक्र बारावा किंवा बुध बारावा अथवा दोघेही बारावे असतील तर ग्रीष्मधान्याची निष्पत्ति होईल सूर्यावर गुरूची दृष्टि असेल तर, फारच चांगली ग्रीष्मधान्यनिष्पत्ति होईल ॥४॥

**शुभमध्येलिनिसूर्याद्गुरुशशिनोःसप्तमेपरासंपत् ।**
**अल्यादिस्थेसवितरिगुरौद्वितीयेर्धनिष्पत्तिः ॥५॥**

अर्थ–शुभमध्यगत वृश्चिकस्थसूर्यापासून सप्तमस्थानीं गुरु व चंद्र हे असतील तर, धान्यसंपत्ति उत्तम होईल (वृश्चिकस्थसूर्य व त्यापासून दुसरा, बुधशुक्रांतून एक व दुसरा बारावा असे असतील तर, तो सूर्य शुभमध्यगत होतो) वृश्चिकाच्या आरंभीं सूर्य व त्यापासून दुसरा गुरु असेल तर धान्यनिष्पत्ति अर्धी होये ५

**लाभहिबुकार्थयुक्तैःसूर्यादलिगात्सितेंदुशशिपुत्रैः ।**
**सस्यस्यपरासंपत्कर्मणिजीवेगवांचाग्र्या ॥६॥**

अर्थ–वृश्चिकस्थसूर्यापासून अकरावा शुक्र, चवथा चंद्र, दुसरा बुध, असे असतील तर धान्याची उत्तमसंपत्ति होते. पूर्वोक्तयोग असून, त्याच दहावा गुरु असेल तर गाईचीही उत्तमसंपत्ति होते म्ह० धान्य होऊन दुग्धही बहुत होतें ॥६॥

**कुंभेगुरुर्गविशशीसूर्योलिमुखेकुजार्कजौमकरे ।**
**निष्पत्तिरस्तिमहतीपश्चात्परचक्ररोगभयं ॥७॥**

अर्थ–कुंभराशीस गुरु, वृषभास चंद्र, वृश्चिकाच्या प्रथमांशीं सूर्य, भौम व शनि हे मकरराशीस, असे असतील तर धान्याची उत्पत्ति चांगली होईल, परंतु पुढें शत्रुचक्र व रोग यांचें भय होतें ॥७॥

**मध्येपापग्रहयोःसूर्यःसस्यंविनाशयस्यलिगः ।**
**पापःसप्तमराशौजातंजातंविनाशयति ॥८॥**

अर्थ–वृश्चिकस्थसूर्य, भौम व शनि या पापग्रहांच्या मध्यें असेल तर धान्याचा नाश होतो वृश्चिकापासून भौम व शनि यातून एक सप्तम असेल तर धान्य उत्पन्न झालें तरी त्याचा नाश होईल ॥८॥

**अर्धस्थानेक्रूरःसौम्यैरनिरीक्षितःप्रथमजातं ।**
**सस्यंनिहंतिपश्चादुत्तंनिष्पादयेद्वक्तं ॥९॥**

अर्थ—वृश्चिकापासून द्वितीयस्थानीं पापग्रह असेल आणि त्यावर शुभग्रहाची दृष्टि नसेल तर प्रथम झालेलें धान्य नाश पावतें. नंतर पेरलेलें धान्य चांगलें उत्पन्न होतें ॥९॥

**जामित्रकेंद्रसंस्थौक्रूरौसूर्यस्यवृश्चिकस्थस्य ।**
**सस्यविपत्तिंकुरुतःसौम्यैर्दृष्टौनसर्वत्र ॥१०॥**

अर्थ—वृश्चिकस्थसूर्यापासून भौम, शनि या पापग्रहांतून एक सप्तमस्थानीं व दुसरा १।४।१० या स्थानीं असे असतील तर धान्यनाश होतो; परंतु त्या पापग्रहांवर शुभग्रहांची दृष्टि असेल तर सर्व देशामध्ये धान्यनाश होणार नाहीं (क्वचिद्देशीं होईल) ॥१०॥

**वृश्चिकसंस्थादर्कात्सप्तमषष्ठोपगौयदाक्रूरौ ।**
**भवतितदानिष्पत्तिःसस्यानामर्घपरिहानिः ॥११॥**

अर्थ—वृश्चिकस्थितसूर्यापासून भौम, शनि या पापग्रहातून एक सातवा व एक सहावा असे असतील.तर, धान्यनिष्पत्ति चांगली होईल; परंतु मूल्याची हानि होईल म० महागाई होईल ॥११॥

**विधिनानेनैववरविर्वृषप्रवेशेशरत्समुत्थानां ।**
**विज्ञेयःसस्यानांनाशायशिवायवातज्ज्ञैः ॥१२॥**

अर्थ—या पूर्वोक्त प्रकारानेंच सूर्य वृषभराशीस जाईल त्या वेळेवरून शरदृतूत उत्पन्न होणाऱ्या धान्याचा नाश किंवा वृद्धि हीं सस्यजातक समजणाऱ्या पंडितानीं जाणावीं ॥१२॥

**त्रिषुमेषादिषुसूर्यःसौम्ययुतोवीक्षितोपिवाविचरन् ।**
**ग्रैष्मिकधान्यंकुरुतेसमर्घमुभयोपयोग्यंच ॥१३॥**

अर्थ—सूर्य, मेषादि तीन राशींचाठाईं, बुध, गुरु, शुक्र यांणीं युक्त किंवा दृष्ट असेल तर, ग्रीष्मऋतूतील धान्यें समर्घ (स्वस्त) व इहलोकीं मधुवर्गास आणि परलोकीं धर्मार्थ योग्य अशीं होतील ॥१३॥

**कार्मुकमृगघटसंस्थःशारदसस्यस्यतद्वदेवरविः ।**
**संग्रहकालेज्ञेयोविपर्ययःक्रूरदृग्योगात् ॥१४॥**

अर्थ–धन, मकर, कुंभ या राशींस सूर्य सौम्यग्रहयुक्त किंवा दृष्ट असतां, शरदृतूं-तील धान्यांचें फल, ग्रीष्मऋतूंतील धान्यांचें फल पूर्वी सांगितलें, त्याप्रमाणेंच प-हावें. हें फल धान्यसंग्रहकाळीं पहावें; परंतु पापग्रहांच्या दृष्टियोगानें विपर्यय होतो. म्ह० महागाई होते. धान्यविक्रयकाळीं विपर्ययच शुभ होय ॥१४॥

इतिबृहत्संहितायांसस्यजातकंनामचत्वारिंशोध्यायः॥४०॥

---

## ॥ अथद्रव्यनिश्चयः ॥

---

येयेषांद्रव्याणामधिपतयोराशयःसमुद्दिष्टाः ।
मुनिभिःशुभाशुभार्थंतानागमतःप्रवक्ष्यामि ॥१॥

अर्थ–ज्या द्रव्यांचे स्वामी जे मेषादिराशि, कश्यपादि ऋषींनीं द्रव्यांच्या शुभाशु-भार्थ (स्वस्त, महाग यांच्या ज्ञानार्थ) सांगितले; ते शास्त्रावरून सांगतो ॥१॥

वस्त्राविककुतपानांमसूरगोधूमरालकयवानां ।
स्थलसंभवौषधीनांकनकस्यचकीर्तितोमेषः ॥२॥

अर्थ–वस्त्र, आविक (कंबल इ०), कुतप (रानमेंढयाच्या लोकरीचें वस्त्र शाल इ०), मसूर, गोधूम, देवदाराचा चीक (राळ), यव, जलरहितभूमीवर झालेल्या औषधी, सुवर्ण यांचा स्वामी मेषराशि होय ॥२॥

गविवस्त्रकुसुमगोधूमशालियवमहिषसुरभितनयाःस्युः ।
मिथुनेपिधान्यशारदवल्लीशालूककर्पासाः ॥३॥

अर्थ–वस्त्र, पुष्प, गोधूम, शालि (भात), यव, महिष, बैल, यांचा स्वामी वृषरा-शि होय. धान्य, शरदृतूमध्यें झालेले पदार्थ, वेली, कमलकंद, कापूस यांचा स्वा-मी मिथुनराशि होय ॥३॥

कर्किणिकोद्रवकदलीदूर्वाफलकंदपत्रचोचानि ।
सिंहेतुषधान्यरसाः सिंहादीनांत्वचःसगुडाः ॥४॥

अर्थ–हरीक, केळी, दूर्वा, जायफळादि सर्व फळें, कंद, तमालपत्र, दालचिनी, वृ ... नारळ यांचा स्वामी कर्कराशि होय. तुषधान्यें (शाळी), मधुर,

आंबट, खारट, कडू, तिखट, तुरट हे षड्विध रस; सिंह, व्याघ्र, मार्जार इत्यादिकांची कातडीं; मूळ यांचा स्वामी सिंहराशि होय ॥४॥

पष्ठेतसीकलायाःकुलत्थगोधूममुद्गनिष्पावाः ।
सप्तमराशौमाषागोधूमाःसर्षपाःसयवाः ॥५॥

अर्थ—जवस, वाटाणे, कुळीद, गहूं, मूग, पावटे यांचा स्वामी कन्याराशि होय. उडीद, गहू, मोहरी, सातु यांचा स्वामी तूळराशि होय ॥५॥

अष्टमराशाविक्षुःसैक्यंलोहान्यजाविकंचापि ।
नवमेतुतुरगलवणांबरास्त्रतिलधान्यमूलानि ॥६॥

अर्थ—ऊंस, सैक्य ( सिंचनानें झालेलें वल्लीफलादि ), लोह, बकरा, मेंढा, यांचा स्वामी वृश्चिकराशि होय. अश्व, मीठ, वस्त्र, आयुधें ( धनुष्यबाण इ० ), तीळ धान्य इ० कोथिंबीर मूळें, यांचा स्वामी धनराशि होय ॥६॥

मकरेतरुगुल्माद्यंसैक्येक्षुसुवर्णकृष्णलोहानि ।
कुंभेसलिलजफलकुसुमरत्नचित्राणिरूपाणि ॥७॥

अर्थ—वृक्ष, गुल्म ( कांडेंनाहीं मुळाहून फुटणारावृक्ष इ० झुडुपें ), वल्ली, सिंचनानें होणारें, ऊंस, सुवर्ण, काळें लोखंड, यांचा स्वामी मकरराशि होय. उदकानें झालेलें, फल, पुष्प, रत्न, नानाप्रकारचीं रत्नें, यांचा स्वामी कुंभराशि होय ॥७॥

मीनेकपालसंभवरत्नान्यंबुद्भवानिवज्राणि ।
स्नेहाश्चनैकरूपाव्याख्यातामत्स्यजातंच ॥८॥

अर्थ—गजकपालोत्पन्न मोत्यें व शुक्तिसंभवमोत्यें, हिरे, नानाप्रकारचीं तेलें, मत्स्यांपासून झालेलीं मौक्तिकादिकें, यांचा स्वामी मीनराशि होय ॥८॥

राशेश्चतुर्दशार्थायसप्तनवपंचमस्थितोजीवः ।
द्व्येकादशदशपंचाष्टमेषुशशिजश्चवृद्धिकरः ॥९॥
षट्सप्तमगोहानिंवृद्धिंशुक्रःकरोतिशेषेषु ।
उपचयसंस्थाःक्रूराःशुभदाःशेषेषुहानिकराः ॥१०॥

अर्थ—कोणत्याही राशीपासून ४।१०।२।११।७।९।५ या स्थानीं बृहस्पति असेल तर त्या राशीच्या द्रव्यांची वृद्धि होते. २।११।१।१०।५।८ यास्थानीं बुध असेल

तर वृद्धि होते ॥९॥ ६।७ या स्थानीं शुक्र अ० हानि होते. याहून अन्यस्था नीं अ० वृद्धि होते. ३।६।१०।११ या स्थानीं सूर्य, भौम, शनि हे अ० वृद्धि व अन्यस्थानीं अस० हानि होते ॥१०॥

**राशेर्यस्यक्रूराःपीडास्थानेपुसंस्थितावलिनः ।**
**तत्प्रोक्तद्रव्याणांमहार्घतादुर्लभत्वंच ॥११॥**

अर्थ—ज्या राशीच्या पीडास्थानीं (१।२।४।६।७।८।९।१२ या स्थानीं) बलिष्ठ (स्वगृहीं, स्वोच्चीं, मित्रगृहीं, स्वनवांशीं राहिलेले) पापग्रह असतील तर त्या राशी चीं पूर्वोक्त द्रव्यें महाग व दुर्मिळ होतील ॥११॥

**इष्टस्थानेसौम्यावलिनोयेषांभवंतिराशीनां ।**
**तद्द्रव्याणांवृद्धिःसामर्घ्यमदुर्लभत्वंच ॥१२॥**

अर्थ—ज्या राशींच्या पूर्वोक्त शुभस्थानीं (श्लोक ९ व १०) बलिष्ठ शुक्र, गुरु, बुध हे असतील, त्या राशींच्या द्रव्याची वृद्धि होऊन तीं स्वस्त व सुलभ होतात ॥१२

**गोचरपीडायामपिराशिर्वलिभिःशुभग्रहैर्दृष्टः ।**
**पीडांनकरोतितथाक्रूरैरेवंविपर्यासः ॥१३॥**

अर्थ—राशीपासून गोचरीं अशुभस्थानीं ग्रह असेल आणि त्याजवर बलिष्ठ शुभग्रहाची दृष्टि असेल तर तो ग्रह तशी पीडा करणार नाहीं. पापग्रहांची दृष्टि असेल तर शुभाचें अशुभफल होतें ॥१३॥

**इतिबृहत्संहितायांद्रव्यनिश्चयोनामैकचत्वारिंशोध्यायः४१**

---

## ॥ अथअर्घकांडं ॥

**अतिवृष्टयुल्कादंडान्परिवेषग्रहणपरिधिपूर्वांश्च ।**
**दृष्ट्वामावास्यायामुत्पातान्पूर्णमास्यांच ॥१॥**
**ब्रूयादर्घविशेषान्प्रतिमासंराशिपुक्रमात्सूर्ये ।**
**अन्यतिथावुत्पातायेतेडमरार्तयेराज्ञां ॥२॥**

अर्थ—अतिवृष्टि, उल्का, दंड, परिवेष, ग्रहण, परिधि, इत्यादि उत्पात अमावास्येस

किंवा पौर्णिमेस पाहून, धान्यादिकांचे सुभिक्ष किंवा दुर्भिक्ष प्रतिमासीं सूर्यचाराव रून सांगावें. अन्यतिथींस जे उत्पात होतील ते राजास शस्त्रकलह (युद्ध) व पीडा देतात ॥१॥२॥

मेषोपगतेसूर्येग्रीष्मजधान्यस्यसंग्रहंकुर्यात् ।
वनमूलफलस्यवृषेचतुर्थमासेततोलाभः ॥३॥

अर्थ—मेषराशीस सूर्य असतां, अमावास्येस व पौर्णिमेस श्लोक १ व २ यांत सांगि तलेले उत्पात होतील तर ग्रीष्मऋतूत पिकणाऱ्या धान्याचा संग्रह करावा. वृ षभास सूर्य अ० वनोत्पन्नमूलफलांचा संग्रह करावा. ते पदार्थ पुढे महाग हो ऊन या दोहोंच्याही व्यापारात चार महिन्यांनीं लाभ होतो ॥३॥

मिथुनस्थेसर्वरसान्धान्यानिचसंग्रहंसमुपनीय ।
षष्ठेमासेविपुलंविक्रीणन्प्राप्नुयाल्लाभं ॥४॥

अर्थ—मिथुनराशीस सूर्य अ० सर्व मधुरादिरस व धान्यें यांचा संग्रह करून, सहा व्या महिन्यांत विक्रय केला तर बहुत लाभ होतो ॥४॥

कर्किण्यर्केमधुगंधतैलघृतफाणितानिविनिधाय ।
द्विगुणाद्वितीयमासेलब्धिर्हीनाधिकेछेदः ॥५॥

अर्थ—कर्कराशीस सूर्य अ० मध, सुगंधिद्रव्यें, तेल, घृत, काकवी किंवा गूळ हीं घ्यावीं; त्यांची दुसऱ्या महिन्यांत विकल्याने दुपटी होते; परंतु कमजास्ती काळ झाला तर तूट येते ॥५॥

सिंहेसुवर्णमणिचर्मवर्मशस्त्राणिमौक्तिकंरजतं ।
पंचममासेलब्धिर्विक्रेतुरतोन्यथाछेदः ॥६॥

अर्थ—सिंहराशीस सूर्य अ० सुवर्ण, हीरकादिमणि, चर्म, कवच, शस्त्रें, मोत्यें, रुपें हीं घ्यावीं त्यांचा लाभ विकणारास पाचव्या महिन्यांत होतो. इतर काळीं तोटा होतो ॥६॥

कन्यागतेदिनकरेचामरखरकरभवाजिनोक्रेता ।
षष्ठेमासेद्विगुणंलाभमवाप्नोतिविक्रीणन् ॥७॥

अर्थ—कन्याराशीस सूर्य अ० चवऱ्या, गर्दभ, उष्ट्र, अश्व, हीं घ्यावीं. तीं सहा व्या महिन्यात विकणारास दुप्पट लाभ होतो ॥७॥

तौलिनितांतवभांडंमणिकंवलकाचपीतकुसु
मानि । आढ्याद्धान्यानिचपण्मासात्द्विगु
णितावृद्धिः ॥८॥

अर्थ—तूळराशीस सूर्य अ० तांतवभांड ( ततुनिर्मित जे गोधडी इ० ), मणि, क
बल, काच, पीतवर्णपुष्पे, धान्यें, हीं घ्यावीं त्यांचे सहा महिन्यांनीं व्यापारानें
दुप्पट वृद्धि होते ॥८॥

वृश्चिकसंस्थेसवितरिफलकंदकमूलविविधरत्नानि ।
वर्षद्वयमुपितानिद्विगुणंलाभंप्रयच्छंति ॥९॥

अर्थ—वृश्चिकराशीस सूर्य अ० फलें, कद, ( सुरण इ० ), मूल ( औषधिमूलें ), ना
नाप्रकारचीं रत्नें, हीं दोन वर्षे ठेवून विकलीं तर दुप्पट लाभ होतो ॥९॥

चापगतेगृण्हीयात्कुंकुमशंखप्रवालकाचानि । मुक्ता
फलानिचततोवर्षार्धात्द्विगुणतांयांति ॥१०॥

अर्थ—धनुराशीस सूर्य अ० कुंकुम, शख, पोंवळीं, काच, मोत्यें, फलें, घ्यावीं, त्या
व्यापारानें सहा महिन्यात दुपटी होते ॥१०॥

मृगघटगेगृण्हीयाद्दिवाकरेलोहभांडधान्यानि । स्थि
त्वामासंदद्याल्लाभार्थीद्विगुणमाप्नोति ॥११॥

अर्थ—मकर व कुंभ या राशींस सूर्य अ० लोखडी पात्रें व धान्यें हीं घ्यावी ती एक
महिना ठेवून विकावीं असतां दुप्पट लाभ होतो ॥११॥

सवितरिझपमुपयातेमूलफलंकंदभांडरत्नानि । सं
स्थाप्यवत्सरार्धंलाभकमिष्टंसमाप्नोति ॥१२॥

अर्थ—मीनराशीस सूर्य अ० मूलें फलें, कद, नानाप्रकारचीं भाडीं, रत्नें, हीं
घेऊन ठेवावीं. सहामहिन्यानीं विकणाराच्या इच्छेप्रमाणें लाभ होतो ॥१२॥

राशौराशौयस्मिन्शिशिरमयूखःसहस्रकिरणोवा ।
युक्तोधिमित्रदृष्टस्तत्रायंलाभकोदिष्टः ॥१३॥

अर्थ—( पौर्णिमेस किंवा अमावास्येस उत्पात झाले तर पूर्वोक्त वस्तुसंग्रह सांगित

ला ) ज्या ज्या राशीस चंद्र किंवा सूर्य हे मित्राने युक्त व अधिमित्राने दृष्ट असती-ल तेथें हा पूर्वोक्त लाभ होतो अन्यत्र होत नाहीं ॥१३॥

सवितृसहितःसंपूर्णोवाशुभैर्युतवीक्षितः
शिशिरकिरणःसद्योर्घस्यप्रवृद्धिकरःस्मृतः ।
अशुभसहितःसंदृष्टोवाहिनस्त्यथवारविः,
प्रतिगृहगतान्भावान्बुध्वावदेत्सदसत्फलं ॥१४॥

अर्थ—चंद्र, सूर्यसहित ( अमावास्येस ) किंवा संपूर्ण ( पौर्णिमेस ) असून, शुभग्रहां-नीं युक्त किंवा दृष्ट असेल तर, तत्काल मूल्याची वृद्धि होते. तसाच चंद्र पा-पग्रहांनीं युक्त किंवा दृष्ट असेल तर मूल्याचा नाश होतो. अथवा सूर्य शुभग्र-हांनीं युक्त, दृष्ट अ० वृद्धि होते व पापग्रहांनीं युक्त, दृष्ट अ० नाश होतो. या-प्रकारें सर्व भाव ( राशि ) जाणून शुभ किंवा अशुभ फल सांगावें ॥१४॥

इतिबृहत्संहितायांअर्घकांडंनामद्विचत्वारिंशोध्यायः॥४२॥

---

## ॥ अथइंद्रध्वजसंपत् ॥

---

ब्रह्माणमूचुरमराभगवंछक्ताःस्मनासुरान्समरे ।
प्रतियोधयितुमतस्त्वांशरण्यशरणंसमुपयाताः॥१॥

अर्थ—ब्रह्मदेवाप्रत देव भाषण करतात. हेभगवन् आम्ही दैत्यांबरोबर युद्ध क-रण्याविषयीं समर्थ नाहीं. यास्तव हे शरण्य, तुजप्रत शरण आलों ॥१॥

देवानुवाचभगवान्क्षीरोदेकेशवःसवःकेतुं ।
यंदास्यतितंदृष्ट्वानाजौस्थास्यंतिवोदैत्याः ॥२॥

अर्थ—क्षीरसमुद्रामध्यें विष्णु आहे तो तुह्मांस जो केतु देईल त्याला पाहून युद्धामध्यें तुमचे समोर दैत्य उभे रहाणार नाहींत असें ब्रह्मानें देवांस सांगितलें ॥२॥

लब्धवराःक्षीरोदंगत्वातेतुष्टुवुःसुराःसेंद्राः ।
श्रीवत्सांककौस्तुभमणिकिरणोद्भासितोरस्कं ॥३॥

अर्थ—असा पूर्वोक्त ब्रह्मदेवाचा वर प्राप्त झाला असतां, ते इंद्रादि देव, क्षीरसमुद्रामत जाऊन श्रीवत्सचिन्हित, कौस्तुभमण्याच्या किरणांनी प्रकाशित आहे उरस्थल ज्याचें अशा नारायणाची स्तुति करितेझाले ॥३॥

श्रीपतिमचिंत्यमसमंसमंततःसर्वदेहिनांसूक्ष्मं ।
परमात्मानमनादिंविष्णुमविज्ञातपर्यंतं ॥४॥

अर्थ—लक्ष्मीचापति, अचिंत्य, अतुल्य, सर्वांचाठाईं सम, सर्व प्राण्यांस दुर्विज्ञेय, परमात्मा, अनादि, व्यापक, ज्याचा अतही समजत नाहीं ( अनंत ) असा तू आहेस ( अशी भगवताची स्तुति देवांनीं केली ) ॥४॥

तैःसंस्तुतःसदेवस्तुतोयनारायणोददौचैषां ।
ध्वजमसुरसुरवधूमुखकमलवनतुषारतीक्ष्णांशुं॥५॥

अर्थ—या इंद्रादिदेवानीं स्तुति केली असतां, तो नारायणदेव संतुष्ट होऊन, देवांकारणें दैत्यस्त्रियांच्या मुखकमलसमूहास, चंद्रासारखा आकुंचित करणारा व देवस्त्रियांच्या मुखकमलसमूहास, सूर्यासारखा प्रफुल्लित करणारा असा ध्वज देता झाला ॥५॥

तंविष्णुतेजोभवमष्टचक्रेरथेस्थितंभास्वातिरत्नचित्रे ।
देदीप्यमानंशरदीवसूर्यंध्वजंसमासाद्यमुमोदशक्रः॥६॥

अर्थ—विष्णुतेजापासून उत्पन्न झालेला, लखलखीत, रत्नांनीं चित्रविचित्र आठ चाकाच्या रथावर उभारलेला, शरदृतूतील सूर्यासारखा चकचकीत अशा ध्वजातें प्राप्त होऊन, इंद्र आनंद पावता झाला ॥६॥

सकिंकिणीजालपरिष्कृतेनस्रक्छत्रघंटापिटकान्वितेन।
समुच्छ्रितेनामरराट्ध्वजेननिन्येविनाशंसमरेरिसैन्यं७

अर्थ—तो इंद्र, बारीक घंटांनीं सुशोभित व माळा, छत्र, घंटा, पिटक ( भूषण ) यांहीं युक्त अशा उभारलेल्या ध्वजानें युद्धामध्यें शत्रुसैन्याचा नाश करिता झाला ७

उपरिचरस्यामरपोवसोर्ददौचेदिपस्यवेणुमयीं।
यष्टिंतांसनरेंद्रोविधिवत्संपूजयामास ॥८॥

अर्थ—इंद्र, चेदिदेशाचा राजा, उपरिचर ( स्वर्गांवर फिरणारा )जो वसुनामक राजा

त्यास ध्वज देता झाला. तो राजा ध्वजाच्या वेणुमय (वेळूच्या) त्या काठीतें यथाशास्त्र पूजिता झाला ॥८॥

**प्रीतोमहेनमघवान्प्राहैवंयेनृपाःकरिष्यंति ।**
**वसुवद्वसुमंतस्तेभुविसिद्धाज्ञाभविष्यंति ॥९॥**
**मुदिताःप्रजाश्चतेषांभयरोगविवर्जिताःप्रभूतान्नाः ।**
**ध्वजएवचाभिधास्यतिजगतिनिमित्तैःफलंसदसत् १०**

अर्थ—पूजेनें संतुष्ट झालेला इंद्र भाषण करिता झाला. असें पूजन जे राजे क रितील ते वसुराजासारखे द्रव्यवान् होतील व त्यांची आज्ञा भूमीवर सर्व पालन करतील ॥९॥ त्यांच्या प्रजा आनंदित, भय व रोग यांहीं रहित, बहुत अन्नानें युक्त अशा होतील व तो ध्वजच भूमीवर निमित्तानी शुभाशुभफल सांगेल ॥१०

**पूजातस्यनरेंद्रैर्बलवृद्धिजयार्थिभिर्यथापूर्वं ।**
**शक्राज्ञयाप्रयुक्तातामागमतःप्रवक्ष्यामि ॥११॥**

अर्थ—पराक्रम, कुलाची व धनाची वृद्धि, शत्रुपराजय यांतें इच्छिणाऱ्या राजांनीं इं द्राज्ञेनें पूर्वीप्रमाणें प्रयुक्त जशी त्या ध्वजाची पूजा करावी. ती पूजा मी ऋषीं नीं सांगितलेल्या शास्त्रावरून सांगतों ॥११॥

**तस्यविधानंशुभकरणदिवसनक्षत्रमंगलमुहूर्तैः ।**
**प्रास्थानिकैर्वनमियाद्दैवज्ञःसूत्रधारश्च ॥१२॥**

अर्थ—तो ध्वज करण्याचा प्रकार सांगतों. शुभकरण, वार, नक्षत्र, मंगलशकुन व प्रयाणोक्त मुहूर्त पाहून, जोशी व सुतार यांणीं अरण्यांत जावें ॥१२॥

**उद्यानदेवतालयपितृवनवल्मीकमार्गचितिजाताः ।**
**कुब्जोर्ध्वशुष्ककंटकिवल्लीवंदाकयुक्ताश्च ॥१३॥**

**बहुविहगालयकोटरपवनानलपीडिताश्चयेतरवः ।**
**येचस्युःस्त्रीसंज्ञानतेशुभाःशक्रकेत्वर्थे ॥१४॥**

अर्थ—बाग, देवालय, स्मशान, वारूळ, मार्ग, यज्ञभूमि, यांचाठाईं झालेले; कुब्ज (ल्हान), वर सुकलेले, कांट्यांचे, वेलींनीं युक्त, वदांक (बांदे) यांणीं युक्त, ॥१३॥ बहुत पक्ष्यांचे घरटें व ढोली यांणीं युक्त, मोडलेले व जळके व स्त्रीलिंगी ॥ असे वृक्ष इंद्रध्वजार्थ शुभ नाहींत ॥१४॥

श्रेष्ठोर्जुनोश्वकर्णःप्रियकधवोदुंबराश्चपंचैते ।
एतेषामन्यतमंप्रशस्तमथवापरंवृक्षं ॥१५॥

अर्थ—अर्जुन ( सादडा यासच ताम्रान ह्म० ), साग, कळंब, धव ( धावडा ), उं-बर हे पांच वृक्ष शुभ होत. यांतून एकादा वृक्ष अथवा अन्य प्रशस्त वृक्ष इंद्रध्वजास शुभ होय ॥१५॥

गौरासितक्षितिभवंसंपूज्ययथाविधिद्विजःपूर्वं ।
विजनेसमेत्यरात्रौस्पृष्ट्वाब्रूयादिमंमंत्रं ॥१६॥

अर्थ—गौरवर्ण किंवा काळी नव्हे अशा भूमीवर झालेल्या वृक्षाप्रत ब्राह्मणानें प्रथम मनुष्यरहितवेळीं रात्रीं जाऊन, यथाशास्त्र पूजा करून स्पर्श करावा आणि हा वक्ष्यमाण मंत्र ह्मणावा ॥१६॥

यानीहवृक्षेभूतानितेभ्यःस्वस्तिनमोस्तुवः ।
उपहारंगृहीत्वेमंक्रियतांवासपर्ययः ॥१७॥

पार्थिवस्त्वांवरयतेस्वस्तितेस्तुनगोत्तम ।
ध्वजार्थंदेवराजस्यपूजेयंप्रतिगृह्यतां ॥१८॥

अर्थ—जीं या वृक्षावर भूतें असतील त्यांचें कल्याण असो. तुह्मांस नमस्कार असो. हा मी दिलेला बलि यांतें ग्रहण करून अन्यत्र राहण्यास जावेंत ॥१७॥ हे उत्तमवृक्षा, तुझें कल्याण असो. राजा, इंद्रध्वजाकारणें तुझी प्रार्थना करितो. ही पूजा ग्रहण करावी ॥१८॥

छिंद्यात्प्रभातसमयेवृक्षमुदक्प्राङ्मुखोपिवाभूत्वा ।
परशोर्जर्जरशब्दोनेष्टःस्निग्धोघनश्चहितः ॥१९॥

अर्थ—नतर प्रातःकाळीं उदङ्मुख किंवा प्राङ्मुख होऊन, तो वृक्ष तोडावा. तोडत्येवेळीं कुऱ्हाडीचा शब्द व्हावा तसा न होतां निराळाच शब्द होईल तर अशुभ होय. स्निग्ध ( मधुर ), घन ( जोराचा ) शब्द होईल तर शुभ होय ॥१९॥

नृपजयदमविध्वस्तंपतनमनाकुंचितंचपूर्वोदक् ।
अविलग्नंचान्यतरौविपरीतमतस्त्यजेत्पतितं ॥२०॥

अर्थ—मोडल्यावांचून न मुरगळल्यावांचून, पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे, दुसऱ्या वृक्षावर न

लागतां, असा पडलेला वृक्ष राजांस जय देतो. याहून विपरीत पडलेला वृक्ष टाकावा ॥२०॥

छित्वाग्रेचतुरंगुलमष्टौमूलेजलेक्षिपेद्यष्टिं ।
उद्धृत्यपुरद्वारंशकटेननयेन्मनुष्यैर्वा ॥२१॥

अर्थ—नंतर त्या वृक्षाचें चार अंगुलें अग्र तोडावें व आठ अंगुलें मूळ तोडावें आणि ती काठी पाण्यामध्यें टाकावी. नतर पाण्यांतून काढून गाड्यावर घालून न्यावी अथवा मनुष्यांनीं न्यावी ॥२१॥

अरभंगेबलभेदोनेम्यांनाशोबलस्यविज्ञेयः ।
अर्थक्षयोक्षभंगेतथाणिभंगेचवर्धकिनः ॥२२॥

अर्थ—गाड्याचे चाकांतील मध्यकाष्ठ मोडेल तर सैन्याचा भेद होतो. चाकाचा बाहेरचा भाग मोडेल तर सैन्याचा नाश होईल. आंस मोडेल तर द्रव्यनाश होतो. आंसाची खीळ मोडली तर सुताराचा नाश होतो ॥२२॥

भाद्रपदशुक्लपक्षस्याष्टम्यांनागरैर्वृतोराजा ।
दैवज्ञसचिवकंचुकिविप्रप्रमुखैःसुवेषधरैः ॥२३॥
अहतांबरसंवीतांयष्टिंपौरंदरींपुरंपौरैः ।
स्रग्गंधधूपयुक्तांप्रवेशयेच्छंखतूर्यरवैः ॥२४॥

अर्थ—भाद्रपद शुक्लाष्टमीस उत्तमवेष (पोशाग) धारण करणारे नागरिक लोक, दैवज्ञ, प्रधान, अंतःपुराचा पाहरेकरी, ब्राह्मणप्रमुख यांणीं युक्त राजानें ॥२३॥ अहतवस्त्रानें वेष्टित व माल्य, गंध, धूप, यांणीं युक्त अशी इंद्रध्वजसंबंधी काठी नागरिक लोकांकरवीं शंख व वाद्यें यांच्या शब्दांसहित नगरामध्यें आणावी॥२४॥

रुचिरपताकातोरणवनमालालंकृतंप्रहृष्टजनं ।
संमार्जिताचितपथंसुवेषगणिकाजनाकीर्णं ॥२५॥
अभ्यर्चितापणगृहंप्रभूतपुण्याहवेदनिर्घोषं ।
नटनर्तकगेयज्ञैराकीर्णचतुष्पथंनगरं ॥२६॥

अर्थ—सुंदर पताका, तोरण व वनमाला (पत्रपुष्पमाला) यांहीं सुशोभित, आनंदित जनांनीं युक्त, शिंपडलेले व सुशोभित असे आहेत मार्ग ज्यामध्यें असें, सुंदरवेश्यासमूहानें व्याप्त, ॥२५॥ पूजित आहेत बाजारातील गृहें (दुकानें) ज्यांना

ठाईं असें, बहुत मंगलशब्द व वेदघोष हे आहेत ज्यात असें, नट, नर्तक, गायक यांणीं व्याप्त आहेत चतुष्पथ (चवाठे) ज्यात अशा नगराप्रत राजानें ती यष्टि आणावी ॥२६॥

तत्रपताकाःश्वेताविजयायभवंतिरोगदाःपीताः ।
जयदाश्चचित्ररूपारक्ताःशस्त्रप्रकोपाय ॥२७॥

अर्थ—त्या नगरामध्यें उभारलेल्या पताका, श्वेतवर्ण विजय देणाऱ्या, पीतवर्ण रोग देणाऱ्या, चित्रवर्ण जय देणाऱ्या, रक्तवर्ण युद्ध देणाऱ्या अशा होतात ॥२७॥

यष्टिंप्रवेशयंतींनिपातयंतोभयायनागाद्याः ।
बालानांतलशब्देसंग्रामःसत्त्वयुद्धेवा ॥२८॥

अर्थ—नगरामध्यें जाणाऱ्या यष्टीतें गजादिक पशु पाडतील तर भय होतें. मुलांनीं त्यावेळीं हस्तांनीं टाळ्या वाजविल्या तर युद्ध होतें. बैल प्रभृति प्राण्याचें युद्ध झालें तर राजाचें युद्ध होतें ॥२८॥

संतक्ष्यपुनस्तक्षाविधिवद्यष्टिंप्ररोपयेद्यंत्रे ।
जागरमेकादश्यांनरेश्वरःकारयेच्चास्याः ॥२९॥
सितवस्त्रोष्णीषधरःपुरोहितःशाक्रवैष्णवैर्मंत्रैः ।
जुहुयादग्निंसांवत्सरोनिमित्तानिगृह्णीयात् ॥३०॥

अर्थ—सुतारानें ती यष्टि पुनः तासून यथायोग्य यंत्रामध्यें बसवावी (आसनावर काहीं आधार लावून तिर्कस ठेवावी). या यष्टीपुढें राजानें एकादशीस जागरण करावें ॥२९॥ श्वेतवस्त्र व श्वेत उष्णीष (पागोटें) हीं धारण करणाऱ्या पुरोहितानें इंद्रदैवत्य व विष्णुदैवत्य मंत्रांनीं अग्नीमध्यें हवन करावें आणि दैवज्ञानें शुभाशुभ चिन्हें पाहावीं ॥३०॥

इष्टद्रव्याकारःसुरभिःस्निग्धोघनोनलोर्चिष्मान् ।
शुभकृदतोन्योनेष्टोयात्रायांविस्तरोभिहितः ॥३१॥

अर्थ—इष्टद्रव्याच्या आकाराचा, सुंदर, स्निग्ध, निबिडज्वालायुक्त असा अग्नि कल्याणकारक होय. याहून अन्यप्रकारचा अग्नि अशुभ होय. याचा विस्तार यात्राप्रकरणीं सांगितला आहे ॥३१॥

स्वाहावसानसमयेस्वयमुज्ज्वलार्चिःस्निग्धःप्रदक्षि

णशिखोहुतभुङ्नृपस्य । गंगादिवाकरसुताजलचा
रुहारांधात्रींसमुद्ररसनांवशगांकरोति ॥३२॥

अर्थ—पूर्णाहुति देरयेवेळीं प्रयत्न केल्यावांचून स्वतःच प्रज्वलित ( तेजस्वी ) ज्वाला युक्त, निर्मल, प्रदक्षिणज्वालायुक्त, असा अग्नि असेल तर गंगा व यमुना यांचे जल हाच सुंदर हार जिला अशी व समुद्रच आहे कमरपट्टा जिला अशी पृथ्वी रा जाच्या स्वाधीन होते ॥३२॥

चामीकराशोककुरंटकाब्जवैडूर्यनीलोत्पलसं
निभेग्नौ । नध्वांतमंतर्भवनेवकाशंकरोतिर
त्नांशुहतंनृपस्य ॥३३॥

अर्थ—सुवर्ण, अशोकपुष्प, कुरंटपुष्प, कमल, वैडूर्यमणि, नीलकमल, यासारखा पू- र्णाहुतिसमयीं अग्नि असेल तर रत्नांच्या किरणानीं नाशित आहे अंधकार ज्याचा असा राजगृहाच्या मधला अवकाश होईल ( रत्नांनीं पूर्ण राजगृह होईल ) ॥३३॥

येपांरथौघार्णवमेघदंतिनांसमस्वनोग्निर्यदि
वापिदुंदुभेः । तेपांमदांधेभघटाविघट्टिताभ
वंतियानेतिमिरोपमादिशः ॥३४॥

अर्थ—ज्या राजांच्या अग्नीचा शब्द, रथसमूह, समुद्र, मेघ, गज, यांच्या शब्दासा- रखा होईल, त्या राजांच्या गमनकालीं मदांध गजसमूहानें चलित अशा दिशा अं- धकारासारख्या होतात ( त्या राजांच्या पिलखान्यांत बहुत गज होतात) ॥३४॥

ध्वजकुंभहयेभभूभृतामनुरूपेवशमेतिभूभृतां ।
उदयास्तधराधराधराहिमवद्विंध्यपयोधराधरा ॥३५॥

अर्थ—तो अग्नि, ध्वज, कुंभ, अश्व, गज, पर्वत यांसारखा असेल तर, उदयपर्वत व अस्तपर्वत हे आहेत ओष्ठ जिला अशी व हिमालय व विंध्य हे आहेत स्तन जिला अशी पृथ्वी राजाच्या स्वाधीन होते. ॥३५॥

द्विरदमदमहीसरोजलाजैर्घृतमधुनाचहुताशने
सगंधे । प्रणतनृपशिरोमणिप्रभाभिर्भवतिपुर
श्छुरितेवभूर्नृपस्य ॥३६॥

अर्थ—हत्तीचें मदोदक, भूमि, कमल, लाखा, घृत, मध, यांसारखा गंध आलीस येईल तर प्रणतराजांच्या मुकुटमण्यांच्या कांतींनीं प्रकाशित अशी भूमि राजाच्या स्वाधीन होये ( सकल राजे शरण येतात ) ॥३६॥

उक्तंयदुत्तिष्ठतिशक्रकेतौशुभाशुभंसप्तमरीचि
रूपैः । तज्जन्मयज्ञग्रहशांतियात्राविवाहका
लेष्वपिचिंतनीयं ॥३७॥

अर्थ—इंद्रध्वज उचलला असतां जें, शुभाशुभफल अग्निस्वरूपांनीं सांगितलें तें जन्मसमय, यज्ञ, ग्रहशांति, यात्रा, विवाह, इत्यादिकालींही पहावें ( कुल, शील, वृत्त, वित्त यांचा विचार करून जें यथायोग्य असेल तें सांगावें ) ॥३७॥

गुडपूपपायसाद्यैर्विप्रानभ्यर्च्यदक्षिणाभिश्च ।
श्रवणेनद्वादश्यामुत्थाप्योन्यत्रवाश्रवणात् ॥३८॥

अर्थ—गुळ, अनरसे, खीर इत्यादि पक्वान्नें व दक्षिणा यांहींकरून ब्राह्मणाची पूजा करून श्रवणयुक्त द्वादशीस अथवा अन्यत्र श्रवणावर तो इंद्रध्वज उभारावा ( समोर उभाकरावा ) श्रवण नसलें तरी द्वादशीसच उभारावा ॥३८॥

शक्रकुमार्यःकार्याःप्राहमनुःसप्तपंचवातज्ज्ञैः ।
नंदोपनंदसंज्ञेपादेनार्धेनचोच्छ्रायात् ॥३९॥
षोडशभागाभ्यधिकेजयविजयेद्वेवसुंधरेचान्ये ।
अधिकाशक्रजनित्रीमध्येष्टांशेनचैतासां ॥४०॥

अर्थ—शक्रध्वजाच्या शोभार्थ कुमारिका सात किंवा पांच शक्रध्वजविधिज्ञांनीं कराव्या असें मनुराजा सांगता झाला. त्या कुमारिका, इंद्रध्वजाच्या उंचीच्या चतुर्थांशप्रमाण नंदा व अर्धांशप्रमाण उपनंदा, षोडशभागप्रमाण जय, विजय, व दोन वसुधरानामक कराव्या आणि सातवी अष्टांशप्रमाण इंद्रमातानामक कुमारिका करावी. ती या साहांच्या मध्यें ठेवावी ॥३९॥४०॥

प्रीतैःकृतानिविबुधैर्यानिपुराभूषणानिसुरकेतोः ।
तानिक्रमेणदद्यात्पिटकानिविचित्ररूपाणि ॥४१॥

अर्थ—संतुष्ट झालेल्या देवांनीं इंद्रध्वजास पूर्वीं जीं भूषणें केलीं तीं विचित्रस्वरूप भूषणें अनुक्रमानें राजानें द्यावीं ॥४१॥

रक्ताशोकनिकाशंचतुरस्रंविश्वकर्मणाप्रथमं ।
रशनास्वयंभुवाशंकरेणचानेकवर्णधरी ॥४२॥
अष्टाश्रिनीलरक्तंतृतीयमिंद्रेणभूषणंदत्तं ।
असितंयमश्चतुर्थमसूरकंकांतिमद्यच्छत् ॥४३॥
मंजिष्ठाभंवरुणःषडश्रितत्पंचमंजलोर्मिनिभं ।
मायूरंकेयूरंपष्ठंवायुर्जलदनीलं ॥४४॥
स्कंदःस्वंकेयूरंसप्तममदद्दत्ध्वजायबहुचित्रं ।
अष्टममनलज्वालासंकाशंहव्यभुग्दत्तं ॥४५॥
वैडूर्यसदृशमिंदुर्नवमंग्रैवेयकंददावन्यत् ।
रथचक्राभंदशमंसूर्यस्त्वष्टाप्रभायुक्तं ॥४६॥
एकादशमुद्दंशंविश्वेदेवाःसरोजसंकाशं ।
द्वादशमपिचनिवंशंमुनयोनीलोत्पलाभासं ॥४७॥
किंचिदधऊर्ध्वनिर्णतमुपरिविशालंत्रयोदशंकेतोः ।
शिरसिबृहस्पतिशुक्रौलाक्षारससंनिभंददतुः ॥४८॥

अर्थ–तांबड्या अशोकपुष्पासारखा चतुष्कोण अलंकार प्रथम विश्वकर्म्यानें इंद्रध्वजास दिला. ब्रह्मदेवानें व शंकरानें अनेकवर्णांची रशना (कंबरपट्टा) दुसरी दिली ॥४२॥ अष्टकोण नीलरक्तवर्णाचें तिसरें भूषण इंद्रानें दिलें. काळें मसूरकनामक चवथें तेजस्वी भूषण यमानें दिलें ॥४३॥ लोहितवर्ण षट्कोण उदकांतील भोंवऱ्यासारखें पांचवें भूषण वरुण देता झाला. मोराच्या पिसांनीं केलेलें मेघासारखें नीलवर्ण सहावें बाहुभूषण वायु देता झाला ॥४४॥ बहुत चित्रवर्ण, आपलें बाहुभूषण ध्वजाकारणें सातवें भूषण कार्तिकस्वामी देता झाला. अग्निज्वालेसारखें आठवें भूषण अग्नि देता झाला ॥४५॥ वैडूर्यमण्यासारखें दुसरें नववें कंठभूषण चंद्र देता झाला. रथचक्रासारखें तेजस्वी दहावें भूषण त्वष्टानामक सूर्य देता झाला ॥४६॥ कमलासारखें उद्दंशनामक अकरावें भूषण विश्वेदेव देते झाले. नीलकमलासारखें निवंशनामक बारावें भूषण मुनि देते झाले ॥४७॥ थोडेसें खालीवर नमलेलें वर मोठें लाखेच्यारसासारखें आरक्त असें तेरावें छत्राकार भूषण इंद्रध्वजाच्या मस्तकीं बृहस्पति व शुक्र हे देते झाले ॥४८॥

यद्यद्येनविनिर्मितममरेणविभूषणंध्वजस्यार्थे ।
तत्तत्दैवत्यंविज्ञातव्यंविपश्चिद्भिः ॥४९॥

अर्थ—जे जे भूषण ज्या ज्या देवाने इंद्रध्वजासाठी निर्माण केलें त्या भूषणाची देवता निर्माणकर्ता देव होय असें विद्वानांनीं जाणावें ॥४९॥

**ध्वजपरिमाणत्र्यंशःपरिधिःप्रथमस्यभवतिपिटकस्य ।**
**परतःप्रथमात्प्रथमादष्टांशाष्टांशहीनानि ॥५०॥**

अर्थ—ध्वजप्रमाणाचा तिसरा हिस्सा पहिल्या भूषणाचा घेर होतो. पुढील भूषणाचे घेर मागच्या भूषणापेक्षा अष्टमांश कमी असावे ॥५०॥

**कुर्यादहनिचतुर्थेपूरणमिंद्रध्वजस्यशास्त्रज्ञः ।**
**मनुनाचागमगीतान्मंत्रानेतान्पठेन्नियतः ॥५१॥**

अर्थ—अष्टमीपासून चवथ्यादिवशीं (एकादशीस) पूर्वोक्तअलंकारानीं इंद्रध्वजाचें पूरण शास्त्रज्ञानें करावें (अलंकार घालावे). प्रथम, राजानें ओणवें राहून, मनूनें सांगितलेले आगमोक्त मंत्र नियमानें म्हणावे ॥५१॥

**हरार्कवैवस्वतशक्रसोमैर्धनेशवैश्वानरपाशभृद्भिः ।**
**महर्षिसंघैःसदिगप्सरोभिःशुक्रांगिरःस्कंदमरुद्गणैश्च ५२**
**यथात्वमूर्जस्करनैकरूपैःसमर्चितःस्वाभरणैरुदारैः ।**
**तथेहतान्याभरणानिदेवशुभानिसंप्रीतमनागृहाण ५३**
**अजोऽव्ययःशाश्वतएकरूपोविष्णुर्वराहःपुरुषः पुराणः । त्वमंतकःसर्वहरःकृशानुःसहस्रशीर्षाशतमन्युरीड्यः ॥५४॥ कविंसप्तजिह्वंत्रातारमिंद्रमवितारंसुरेशं । ह्वयामिशक्रंवृत्रहणं सुषेणमस्माकंवीराउत्तरेभवंतु ॥५५॥**

अर्थ—शिव, सूर्य, यम, इंद्र, चंद्र, कुबेर, अग्नि, वरुण, महर्षिसमुदाय, दिशा, अप्सरा, शुक्र, बृहस्पति, स्कंद, मरुत्, या सर्वांनीं ॥५२॥ जसें तुझें अनेकप्रकारच्या महान् अलंकारांनीं करून पूजन केलें, तसें येथें हे शुभ अलंकार, संतुष्ट होऊन, ग्रहण कर ॥५३॥ अज, नाशरहित, शाश्वत, एकरूप, विष्णु, वराह, पुराणपुरुष, अंतक, सर्वहरणकर्ता, अग्नि, सहस्रवदन, शतक्रतु, स्तुत्य ॥५४॥ आद्यविद्वान्, सप्तजिव्ह, पालनकर्ता, परमेश्वर, रक्षिता, देवाधिप, वृत्रहंता, शोभनसेनायुक्त, अशा इंद्रातें आमंत्रण करितों. आमचे वीर जयवंत होऊत (हा मंत्राचा अर्थ आहे. हे मंत्र कोणत्यावेळीं राजानें म्हणावे तो प्रकार पुढील श्लोकांत सांगतों) ॥५५॥

प्रपूरणेचोच्छ्रयणेप्रवेशेस्नानेतथामाल्यविधौ विसर्गे । पठेदिमान्नृपतिःसोपवासोमंत्राञ्छु भान्पुरुहूतस्यकेतोः ॥५६॥

अर्थ–इंद्रध्वजास अलंकार घालण्येवेळेस, उभारण्येवेळेस, प्रवेशकाळीं, स्नानकाळीं, पुष्पमालासमर्पणीं, विसर्जनसमयीं उपवासयुक्त राजाने हे शुभमंत्र पठन करावे॥५६॥

छत्रध्वजादर्शफलार्धचंद्रैर्विचित्रमालाकदली क्षुदंडैः । सव्यालसिंहैःपिटकैर्गवाक्षैरलंकृतं दिक्षुचलोकपालैः ॥५७॥ अच्छिन्नरज्जुंदृढका ष्ठमातृकंसुश्लिष्टयंत्रार्गलपादतोरणं । उत्था पयेद्वृक्षमसहस्रचक्षुषःसारद्रुमाभग्नकुमारिका न्वितं ॥५८॥

अर्थ–छत्र, ध्वज, आरसा, फळें, अर्धचंद्र, चित्रवर्णमाळा, केळी, ऊस, सर्प व सिंह व गवाक्षें यांहींयुक्त अशीं भूषणें, अष्टदिशाकडे दिक्पाळांहीं अलंकृत ( हीं सर्वे का- ष्ठाचीं करावीं ) असा ॥५७॥ ध्वजास अष्टदिशाकडे रज्जु बांधावे. ते तुटके नसावे, बळकट काष्ठाच्या दोन मातृका ध्वजाच्या दोन बाजूस कराव्या. चांगलीं आहे त अर्गल व पादतोरण ज्याचीं असा, वृक्षाच्या सादाच्या फुटलेल्या नाहींत अशा कुमारिकानीं युक्त, तो इंद्रध्वज-उभारावा ॥५८॥

अविरतजनरावंमंगलाशीःप्रणामैःपटुपटहमृदंगैःशं खभेर्यादिभिश्च । श्रुतिविहितवचोभिःपाठद्भिश्च विप्रैरशुभरहितशब्दंकेतुमुत्थापयीत ॥५९॥

अर्थ–मंगलशब्द, आशीर्वाद, नमस्कार यांहीं सहित निरंतर जनशब्द युक्त, सुंदरपटह ( रणवाद्य ), मृदंग, शंख, दुंदुभि इत्यादि वाद्यशब्दयुक्त; वेदविहित वाक्यांतें प ठणाऱ्या ब्राह्मणाच्या शब्दांनीं युक्त व शुभशब्दयुक्त ध्वज उभारावा ॥५९॥

फलदधिघृतलाजाक्षौद्रपुष्पाग्रहस्तैःप्रणिपतितशि रोभिस्तुष्टुवद्भिश्चपौरैः । नृतमनिमिषभर्तुःकेतुमी शःप्रजानांअरिनगरनतायंकारयेत्द्विट्वधाय ॥६०॥

अर्थ–फळें, दधि, घृत, लाह्या, मध, पुष्पें, हीं आहेत हस्ताग्रीं ज्यांच्या असे, नम्र आहेत मस्तकें ज्यांचीं असे व स्तुतिकरणाऱ्या नागरिक लोकांनीं वेष्टित असा इंद्रध्वज, राजानें शत्रुवधार्थ शत्रुनगराकडे नम्र आहे अग्र ज्याचें असा करावा ॥६०॥

**नातिद्रुतंनचविलंबितमप्रकंपमध्वस्तमाल्यपिटकादिविभूषणंच । उत्थानमिष्टमशुभंयदतोन्यथास्यात्तच्छांतिभिर्नरपतेःशमयेत्पुरोधाः ॥६१॥**

अर्थ–फार जलद नाहीं, फार विलंबितही नाहीं असें, कंपित नाहीं असें, माळा व भूषणें पडलीं नाहीं असें ध्वजाचें उत्थापन राजास शुभ व याहून अन्यथा अशुभ होय, त्या अशुभाची शांति करून उपाध्यानें शमन करावें ॥६१॥

**क्रव्यादकौशिककपोतककाककंकैःकेतुस्थितैर्महदुशंतिभयंनृपस्य । चापेणचापियुवराजभयंवदंतिश्येनोविलोचनभयंनिपतन्करोति ॥६२॥**

अर्थ–गृध्र, घुवड, कपोत, काक, कंक ( ज्याच्या पिसाचा बाणास पिसारा करितात ), हे पक्षी जर ध्वजावर बसतील तर राजास महद्भय होतें. चाषपक्षी बसेल तर युवराजास भय होतें. श्येन ( ससाणा ) बसेल तर नेत्रपीडा होते ॥६२॥

**छत्रभंगपतनेनृपमृत्युस्तस्करान्मधुकरोतिनिलीनं । हंतिचाप्यथपुरोहितमुल्कापार्थिवस्यमहिषीमशनिश्च ॥६३॥**

अर्थ–ध्वजाच्या छत्राचा भंग किंवा पतन होईल तर, राजास मृत्यु. ध्वजास, मधाचें पोळें धरेल तर चोरभय होतें. उल्का ( अ० ३३ श्लो० ८ ) पात होईल तर पुरोहितवध होतो. अशनि ( अ० ३३ श्लो० ४ ) पात होईल तर राजाच्या मुख्य स्त्रीचा नाश होतो ॥६३॥

**राज्ञीविनाशंपतितापताकाकरोत्यवृष्टिंपिटकस्यपातः । मध्याग्रमूलेषुचकेतुभंगोनिहंतिमंत्रिक्षितिपालपौरान् ॥६४॥**

अर्थ–ध्वजाची पताका पडेल तर राजस्त्रियेचा नाश होतो. पूर्वोक्त भूषणें पडलीं

तर अवृष्टि होते. मध्य, अग्र, मूल याचाठाई केतुभग झाला तर अनुक्रमानें प्रधान, राजा, नागरिकलोक याचा नाश होतो ॥६४॥

धूमावृतेशिखिभयंतमसाचमोहोव्यालैश्चभग्नपति तैर्नभवंत्यमात्याः । ग्लायंत्युदक्प्रभृतिचक्रमशो द्विजाद्याभंगेत्रवंधकिवधःकथितःकुमार्याः ॥६५॥

अर्थ—तो ध्वज धूमावृत ( त्यावेळीं आकाशांत धूम होईल तर ) असतां अग्निभय होतें. अंधकारानें व्याप्त अ० चित्तास मोह होतो. व्याल ( प्राणि विशेष ) हे भग्न होऊन पडले तर प्रधाननाश होतो. उत्तरादि दिशांकडे उत्पात झाले तर अनुक्रमानें ब्राह्मणादिवर्णांचा नाश होतो. पूर्वोक्त इंद्रकुमारिकांचा भग झाला तर वेश्यांचा नाश होतो ॥६५॥

रज्जूत्संगच्छेदनेबालपीडाराज्ञोमातुःपीडनंमातृ कायाः । यद्यत्कुर्युर्बालकाश्चारणावातत्तत्तादृग्भा विपापंशुभंवा ॥६६॥

अर्थ—दोऱ्या तुटल्या तर बालांस पीडा. तोरणाचे बाजूचे काष्ठ फुटलें तर राजमातेस पीडा. लहान मुलें किंवा चारण ( भाट ) जें जें करतील ते सर्व शुभ किंवा अशुभ तसेंच होणार असें समजावें ॥६६॥

दिनचतुष्टयमुत्थितमर्चितंसमभिपूज्यनृपोहनिपं चमे । प्रकृतिभिःसहलक्ष्मविसर्जयेद्बलभिदःस्व बलाभिविवृद्धये ॥६७॥

अर्थ—चार दिवस पूजित नंतर पांचवे दिवशीं उत्थापित असें इंद्राचें चिन्ह ( ध्वज ) याची राजानें पूजा करून प्रधानासहवर्तमान आपल्या बलाची वृद्धि व्हावी एतदर्थ पांचव्यादिवशीं त्याचें उत्थापन करावें ॥६७॥

उपरिचरवसुप्रवर्तितंनृतिभिरप्यनुसंततंकृतं । विधि मिममनुमन्यपार्थिवोनरिपुकृतंभयमाप्नुयादिति ॥६८॥

अर्थ—उपरिचरवसूनें प्रवृत्त केलें व राजांनींही निरंतर केलें असें, हें इंद्रध्वजपूजन जो राजा करील तो शत्रुकृत भयातें प्राप्त होणार नाहीं ॥६८॥

इतिवृहत्संहितायांइंद्रध्वजसंपन्नामत्रिचत्वा रिंशोध्यायः ॥४३॥

## ॥ अथनीराजनविधिः ॥

भगवतिजलधरपक्ष्मक्षपाकरार्केक्षणेकमलनाभे ।
उन्मीलयतितुरंगमकरिजननीराजनंकुर्यात् ॥१॥

अर्थ—मेघ आहेत पक्ष्मे ज्यास असे चंद्रसूर्य हेच आहेत नेत्र ज्याचे असा, कमलनाभि भगवान् नारायण नेत्र उघडीत असता, अश्व, हत्ती, मनुष्य यांस नीराजनविधि अथवा नीराजन ( उदकाचें अंजन ह्मणजे स्पर्श ) विधि करावा ॥१॥

द्वादश्यामष्टम्यांकार्तिकशुक्लस्यपंचदश्यांवा ।
आश्वयुजेवाकुर्यान्नीराजनसंज्ञितांशांतिं ॥२॥

अर्थ—कार्तिकशुक्लपक्षीं, द्वादशी, अष्टमी, पौर्णिमा या तिथींस अथवा आश्विनशुक्लपक्षीं या तिथींस नीराजनसंज्ञक शांति करावी ॥२॥

नगरोत्तरपूर्वदिशिप्रशस्तभूमौप्रशस्तदारुमयं ।
षोडशहस्तोच्छ्रायंदशविपुलंतोरणंकार्यं ॥३॥

अर्थ—नगराच्या ईशानीस शुद्धभूमीच्याठाईं यज्ञवृक्षाचें सोळा हात उंच व दहा हात रुंद असें तोरण करावें ॥३॥

सर्जोदुंबरशाखाककुभमयंशांतिसद्मकुशबहुलं ।
वंशविनिर्मितमत्स्यध्वजचक्रालंकृतद्वारं ॥४॥

अर्थ—सर्ज ( साल्वृक्ष ), उंबर, ककुभ ( अर्जुनसादडा ) या वृक्षाचें, वेळूनें निर्मित जे मत्स्य, ध्वज, चक्रें यांणीं सुशोभित आहे द्वार ज्याचें, असें शांति करण्याकरितां गृह बांधावें ॥४॥

प्रतिसरयातुरगाणांभल्लातकशालिकुष्ठसिद्धार्थान् ।
कंठेपुनिबध्नीयात्पुष्ट्यर्थंशांतिगृहगानां ॥ ५ ॥

अर्थ—प्रतिसर ( कुंकुमरंजित सूत्र अथवा पीतवर्ण सूत्र ) यांणें बिबा, साळी, कोळिंजन, गौरसर्षप, हे बांधून शांतिगृहामध्यें नेलेल्या अश्वांच्या पुष्ट्यर्थ कंठामध्यें, ती माळ बांधावी ॥५॥

रविवरुणविश्वदेवप्रजेशपुरुहूतवैष्णवैर्मंत्रैः ।
सप्ताहंशांतिगृहेकुर्याच्छांतिंतुरंगाणां ॥ ६ ॥

अर्थ—सूर्य, वरुण, विश्वदेव, ब्रह्मा, इंद्र, विष्णु यांच्या मंत्रांनीं सात दिवस शांतिगृहामध्यें ठेविलेले अश्वांची शांति करावी ॥६॥

अभ्यर्चितानपरुषंवक्तव्यानापिताडनीयास्ते ।
पुण्याहशंखतूर्यध्वनिगीतरवैर्विमुक्तभयाः ॥७॥

अर्थ—या पूजित अश्वांस अशुभ शब्द बोलूं नये व ताडनही करूं नये. मांगलिकसूक्तमानें शंख, वाद्य यांचे शब्द व गीतशब्द यांहीकरून ते अश्व भयरहित व्हावे ॥७॥

प्राप्तेऽष्टमेऽन्हिकुर्यादुदङ्मुखंतोरणस्यदक्षिणतः ।
कुशचीरावृतमाश्रमं पुरतोस्यवेद्यांच ॥८॥

अर्थ—अष्टमदिवशीं या पूर्वोक्त तोरणाचे दक्षिणेस उदङ्मुख गृह करून, ते दर्भ व वल्कलें यांहीं वेष्टित करून, त्याचे पुढें वेदीमध्ये अग्निस्थापन करावें ॥८॥

चंदनकुष्ठसमंगाहरितालमनःशिलाप्रियंगुवचाः ।
दंत्यमृतांजनरजनीसुवर्णपुष्पाग्निमंथाश्च ॥९॥
श्वेतांसपूर्णकोशांकटंभरात्रायमाणसहदेवीः ।
नागकुसुमंस्वगुप्तांशतावरींसोमराजींच ॥१०॥
कलशेष्वेतान्कृत्वासंभारानुपहरेद्बलिंसम्यक् ।
भक्ष्यैर्नानाकारैर्मधुपायसयावकप्रचुरैः ॥ ११ ॥

अर्थ—चंदन, कोष्ठकोळिंजन, मंजिष्ठ, हरताळ, मनशीळ, गवला, वेखंड, दांती, गुळवेल, काळीकापशी, हळद, सुवर्णपुष्प, नरवेल ॥९॥ पांदरीगोकर्णी, पूर्णकोशा, पुनर्नवा, त्रायमाण, नागांटीची वेल, पिंवळी जुई, कुडली, शतावरी, सोमवल्ली ॥१०॥ ह्या ओषधि कलशामध्यें घालून, तो मध्यें ठेवून मध, पायस, गहूं हे पदार्थ ज्यांमध्यें बहुत अशा नानाप्रकारच्या भक्ष्यपदार्थांचा यथाविधि बलि द्यावा.

खदिरपलाशोदुंबरकाश्मर्यश्वत्थनिर्मिताःसमिधः ।
स्रुक्कनकाद्रजताद्वाकर्तव्याभूतिकामेन ॥१२॥

अर्थ—खैर, पळस, उंबर, शिवण, अश्वत्थ, याच्या समिधा असाव्या. सोनें किंवा रु पें याची स्रुचि, ऐश्वर्येच्छु राजानें करावी ॥१२॥

पूर्वाभिमुखःश्रीमान्वैय्याघ्रेचर्मणिस्थितोराजा ।
तिष्ठेदनलसमीपेतुरगभिषग्दैववित्सहितः ॥१३॥

अर्थ—अश्व, वैद्य, दैवज्ञ यांणीं सहित श्रीमान् राजानें व्याघ्रचर्मावर पूर्वाभिमुख अग्नि समीप बसावें ॥१३॥

यात्रायांयदभिहितंग्रहयज्ञविधौमहेंद्रकेतौच ।
वेदीपुरोहितानललक्षणमस्मिंस्तदवधार्यं ॥१४॥

अर्थ—यात्रा, ग्रहयज्ञ, इंद्रध्वज याचाठाईं जें वेदी, पुरोहित व अग्नि यांचें लक्षण सांगीतलें आहे तें येथेंही दैवज्ञानें पहावें ॥१४॥

लक्षणयुक्तंतुरगंद्विरदंचैवदीक्षितंस्नातं ।
अहतसितांबरगंधस्रग्धूपाभ्यर्चितंकृत्वा ॥१५॥
आश्रमतोरणमूलंसमुपनयेत्सांत्वयंच्छनैर्वाचा ।
वादित्रशंखपुण्याहनिःस्वनापूरितदिगंतं ॥१६॥

अर्थ—कृतदीक्ष, स्नापित, ताम्रोष्ठतालुवदनादि लक्षणयुक्त अश्व व हत्ती याची अहत ह० कोरें व श्वेतवस्त्र, गंध, माला, धूप इत्यादिकांहीं पूजा करून ॥१५॥ गृहतोरणाच्या जवळ वाणीनें सांत्वन करून ( चुचकारित ) हळूहळू आणावा. त्या वेळीं वाद्यें, शंख, मंगलशब्द यांहीं दिशा पूर्ण कराव्या ॥१६॥

यद्यानीतस्तिष्ठेद्दक्षिणचरणंहयःसमुत्क्षिप्य ।
सजयतितदानरेंद्रःशत्रूनंचिराद्विनायत्नात् ॥१७॥

अर्थ—तो आणलेला घोडा व हत्ती उजवा पाय उचलून उभा राहील तर, तो राजा यत्नावांचून शत्रूतें शीघ्र जिंकील ॥१७॥

त्रस्यन्नेष्टोराज्ञःपरिशेषंचेष्टितंद्विपहयानां ।
यात्रायांव्याख्यातंतदिहविचिंत्यंयथायुक्ति ॥१८॥

अर्थ—तो घोडा व हत्ती त्रास पावेल तर राजास शुभ नव्हे. त्या हत्ती व घोड्यांचें परिशेषलक्षण, यात्रेमध्यें सांगीतलें आहे तें येथें यथायुक्त पहावें ॥१८॥

पिंडमभिमंत्र्यदद्यात्पुरोहितोवाजिनेसयदिजिघ्रेत् ।
अश्नीयाद्वाजयकृद्विपरीतोतोऽन्यथाभिहितः ॥१९॥

अर्थ–पुरोहितानें अन्नाचा पिंड अभिमंत्रण करून घोड्याचे तोंडाजवळ न्यावा; त्या पिंडास घोडा हुंगील किंवा भक्षण करील तर तो घोडा राजास जयकरणारा होतो. हुंगणार नाहीं व भक्षणही करणार नाहीं तर राजाचा पराभव होईल १९

कलशोदकेपुशाखामाम्राव्योदुंबरींस्पृशेत्तुरगान् ।
शांतिकपौष्टिकमंत्रैरेवंसेनांसनृपनागां ॥२०॥

अर्थ–पूर्वी औषधिमिश्रित स्थापितकुंभजलामध्यें उंबराची खांदी भिजवून शांतिकपौष्टिकमंत्रानीं अश्व, राजा, हत्ती, सेना यास स्पर्श करावा ॥२०॥

शांतिंराष्ट्रविवृद्ध्यैकृत्वाभूयोभिचारकैर्मंत्रैः ।
मृन्मयमरिंविभिंद्याच्छूलेनोरस्थलेविप्रः ॥२१॥

अर्थ–ही शांति राज्यवृद्धीकारणें करून, पुनः आभिचारिक आथर्वणमंत्रांहीं मृन्मय शत्रुमूर्ति, ब्राह्मणानें उरस्थलीं काष्ठाचे शूलानें भेदन करावी ॥२१॥

खलिनंहयायदद्यादभिमंत्र्यपुरोहितस्ततोराजा ।
आरुह्योदक्पूर्वांयायान्नीराजितःसबलः ॥२२॥

अर्थ–पुरोहितानें लगाम अभिमंत्रून घोड्यास द्यावी, नंतर राजानें वर बसून, नीराजित ( आरती केलेला ) होत्साता त्यानें सैन्यसहित ईशानीकडे जावें ॥२२॥

मृदंगशंखध्वनिहृष्टकुंजरस्रवन्मदामोदसुगं
धिमारुतः । शिरोमणिव्रातचलत्प्रभाचयैर्ज्व
लन्निवस्वानिवतोयदात्यये ॥२३॥ हंसपं
क्तिभिरितस्ततोद्रिराट्संपतद्भिरिवशुक्लचाम
रैः । मृष्टगंधपवनानुवाहिभिर्धूयमानरुचिर
स्रगंबरः ॥२४॥ नैकवर्णमणिवज्रभूषितैर्भूषि
तोमुकुटकुंडलांगदैः । भूरिरत्नकिरणानुरं
जितःशक्रकार्मुकरुचंसमुद्वहन् ॥२५॥ उत्प
तद्भिरिवखंतुरंगमैर्दारयद्भिरिवदंतिभिर्धरां ।

निर्जितारिभिरिवामरैर्नरैःशक्रवत्परिवृतोत्र
जेन्नृपः ॥२६॥

अर्थ—मृदंग, शंख यांच्या शब्दानीं आनंदित जे हत्ति, त्यांचा गळणारा जो मद, त्याच्या सुगंधानें सुगंधित वायुयुक्त, मस्तकांतील मुकुटमण्यांच्या समुदायानें चंचलप्रभाहीं शारदऋतूतील प्रज्वलित सूर्यासारखा ॥२३॥ इतस्ततः पडणाऱ्या हंसपक्षीनीं जसा पर्वत शोभतो तसा श्वेतचवऱ्यांनीं शोभणारा, गंधयुक्त वाहणाऱ्या वायूनीं कंपित आहेत सुंदर माला व वस्त्रें ज्याचीं असा ॥२४॥ बहुतवर्णांचे मणि व हिरे यांहीं भूषित व मुकुट, कुंडले, बाहुभूषणें यांहींकरून भूषित, नानाप्रकारच्या रत्नकिरणांनीं शोभित इंद्रधनुष्याच्या तेजातें धारण करणारा ॥२५॥ आकाशांप्रत उड्डाणकरणाऱ्या अश्वांनीं व भूमीतें विदारण करणाऱ्या हत्तींनीं, जिंकिले आहेत शत्रु ज्यांणीं अशा देवासारख्या मनुष्यांनीं वेष्टित इंद्रासारखा राजा शत्रूवर गमन करो ॥२६॥

सवज्रमुक्ताफलभूषणोथवासितस्त्रगुष्णीषविले
पनांबरः । धृतातपत्रोगजपृष्ठमाश्रितोघनोपरी
वेंदुतलेभृगोःसुतः ॥२७॥

अर्थ—अथवा हिरे, मौक्तिकें यांहीं भूषित, श्वेतपुष्पमाला, मुकुट, विलेपन, वस्त्र यांहीं युक्त, छत्रयुत, हत्तीवर बसलेला जसा मेघमंडलावर चंद्राचे खालीं शुक्र दिसतो तसा दिसणारा राजा गमन करो ॥२७॥

संप्रहृष्टनरवाजिकुंजरंनिर्मलप्रहरणांशुभा
सुरं । निर्विकारमरिपक्षभीषणंयस्यसैन्यम
चिरात्सगांजयेत् ॥२८॥

अर्थ—आनंदयुक्त आहेत मनुष्य ( शिपाई ), अश्व, हत्ती ज्याचे असें, स्वच्छ आयुधांच्या किरणांनीं देदीप्यमान, निर्विकार ( उत्पातरहित ), शत्रुपक्षास भयंकर दिसणारें, असें ज्या राजाचें सैन्य तो राजा शीघ्र पृथ्वीतें जिंकील (विजयी होईल)२८

इतिबृहत्संहितायांनीराजनविधिर्नामचतुश्चत्वारि
शोध्यायः ॥४४॥

## ॥ अथखंजनदर्शनं ॥

खंजनकोनामायंयोविहगस्तस्यदर्शनेप्रथमे ।
प्रोक्तानियानिमुनिभिःफलानितानिप्रवक्ष्यामि ॥१॥

अर्थ–खंजनकनामक (यासच खजरीट, खजलेट ह्मणतात). [illegible] पक्षी श्रावणादि चार महिने दिसत नाही. यास्तव त्याच्या प्रथमदर्शनी कश्यपादि ऋषींनी जी फळें सांगितली ती सांगतो ॥१॥

स्थूलोभ्युन्नतकंठःकृष्णगलोभद्रकारकोभद्रः ।
आकंठमुखात्कृष्णःसंपूर्णःपूरयत्याशां ॥२॥
कृष्णोगलेस्यबिंदुःसितकरटांतःसरिक्तकद्रिक्तः ।
पीतोगोपीतइतिक्लेशकरःखंजनोदृष्टः ॥३॥

अर्थ–जो खंजनपक्षी शरीराने मोठा, उच्चमानेचा, काळ्याकंठाचा तो भद्रसंज्ञक कल्याणकारक होय. मुखापासून कंठापर्यंत कृष्णवर्ण जो खंजन तो फार कल्याणकारक असून इच्छा पूर्ण करितो ॥२॥ ज्या खंजनाच्या कंठावर काळा बिंदु असतो व ज्याचे गाल श्वेत असतात तो रिक्तसंज्ञक सर्व फल शून्य करितो. पीतवर्ण खंजन गोपीतसंज्ञक तो दृष्टीस पडला तर क्लेशकरणारा होय ॥३॥

अथमधुरसुरभिफलकुसुमतरुषुसलिलाशयेषुपुण्येषु ।
करितुरगभुजगमूर्ध्निप्रासादोद्यानहर्म्येषु ॥४॥
गोगोष्ठसत्समागमयज्ञोत्सवपार्थिवद्विजसमीपे ।
हस्तितुरंगमशालाछत्रध्वजचामराद्येषु ॥५॥
हेमसमीपसितांबरकमलोत्पलपूजितोपलिप्तेषु ।
दधिपात्रधान्यकूटेषुचश्रियंखंजनःकुरुते ॥६॥

अर्थ–गोड व सुगंधि आहेत फळें व पुष्पें ज्या वृक्षाची त्यावर, पवित्र जलाशय ( सरोवरादि ) यांचाठाई, हत्ती, घोडे, सर्प, यांच्या मस्तकावर; देवालयें, उद्यानें ( बाग ), गृहें यांचाठाई, ॥४॥ गाईवर, गोठ्यावर, साधुसमूह, यज्ञ, विवाहादि-उत्सव, राजा, ब्राह्मण, यांच्या समीप; हत्ती, घोडे यांच्या शाला ( गृहें ) यांवर; छत्र, ध्वज, चामर ( चंवरी ), झारी, कुंभ इत्यादिकांवर ॥५॥ सुवर्णानिकट, श्वे

तवस्त्र, कमल, नीलकमल, पूजित व उपलिप्तस्थान यांचाठाईं; दह्याचें भांडें, धान्याच्याराशि, यांचाठाईं खंजनपक्षी प्रथम पाहिला तर, लक्ष्मी प्राप्त होत्ये ॥६॥

पंकेस्वाद्वन्नाप्तिर्गोरससंपच्चगोमयोपगते।
शाद्वलगेवस्त्राप्तिःशकटस्थेदेशविभ्रंशः ॥७॥
गृहपटलेर्थभ्रंशोवध्रेवंधोशुचौभवतिरोगः।
पृष्ठेत्वजाविकानांप्रियसंगममावहत्याशु ॥८॥

अर्थ–खंजनपक्षी चिखलावर बसलेला पाहिला तर चांगलें अन्न मिळेल. गोमयावर पाहिला तर गोरससंपत्ति होत्ये. हिरव्या गवतावर पाहिला तर वस्त्रप्राप्ति होत्ये. गाड्यावर पाहिला तर देशनाश होतो ॥७॥ घरावर पाहिला तर द्रव्यनाश. चर्माच्या रज्जूवर पाहिला तर बंधन. अपवित्रस्थानीं पाहिला तर रोग होतो. बकरा व मेंढा यांच्या पाठीवर पाहिला तर प्रियप्राप्ति शीघ्र होत्ये ॥८॥

महिषोष्ट्रगर्दभास्थिश्मशानगृहकोणशर्करोद्रिस्थः।
प्राकारभस्मकेशेष्वशुभोमरणरुग्भयदः ॥९॥

अर्थ–महिष, उंट, गर्दभ, अस्थि, श्मशान, गृहकोण, वाळूचा पर्वत, प्राकार (दगडादिकांनीं बांधलेलें कुसूं), भस्म, केश, याचाठाईं खंजनपक्षी पाहिला तर अशुभ व मृत्यु, रोग यांचें भय करितो ॥९॥

पक्षौधुन्वन्नशुभःशुभःपिबन्वारिनिम्नगासंस्थः।
सूर्योदयेथशस्तोनेष्टफलःखंजनोस्तमये ॥१०॥

अर्थ–पक्ष हालत असतां खंजन पाहिला तर शुभ नव्हे. नदीवर राहून उदक प्राशन करितांना पाहिला तर शुभ होय. सूर्योदयीं खंजन पाहिला तर शुभ. सूर्यास्तीं पाहिला तर अशुभ होय ॥१०॥

नीराजनेनिवृत्तेययादिशाखंजनंनृपोयांतं।
पश्येत्तयागतस्यक्षिप्रमरातिर्वशमुपैति ॥११॥

अर्थ–नीराजनविधि समाप्त झाल्यावर, ज्या दिशेकडे खंजनपक्षी जातो असें राजा पाहील; त्या दिशेनें राजा गेला तर शीघ्र शत्रु वश होईल (शत्रूस जिंकील) ११

तस्मिन्निधिर्भवतिमैथुनमेतियस्मिन्यस्मिंस्तु
छर्दयतितत्रतलेस्तिकाचः। अंगारमप्युपदि

शांतिपुरीषणेस्यतत्कौतुकापनयनायखनेद्धरित्रीं १२

अर्थ–खंजनपक्षी ज्या स्थळीं मैथुन करील, त्या भूमीमध्ये निधि (द्रव्य) असतें. ज्या स्थळीं ओकेल त्याचे खालीं भूमींत काच असत्ये. जेथें विष्ठा करील तेथें कोळसे खालीं असतात, असें ऋषि सांगतात. याविषयीं प्रत्यक्ष अनुभव पहावा ह्मणजे खात्री होईल ॥१२॥

मृतविकलविभिन्नरोगितःस्वतनुसमानफलप्रदःखगः ।
धनकृदभिनिलीयमानकोवियतिचबंधुसमागमप्रदः १३

अर्थ–मृत, विकलांग, भिन्नशरीर, रोगी असा खंजन दृष्टीस पडेल तर, तो पाहणारास आपल्या शरीरासारखें, फल देतो (मृत पाहील तर, मरतो इ०) आपल्या समोर, घरामध्यें जात आहे, असा पाहिला तर धन देणारा होतो. आकाशामध्यें उडतांना पाहिला तर बंधुसमागम होतो ॥१३॥

नृपतिरपिशुभंशुभप्रदेशेखगमवलोक्यमही
तलेविदध्यात् । सुरभिकुसुमधूपयुक्तमर्घंशु
भमभिनंदितमेवमेतिवृद्धिं ॥१४॥

अर्थ–राजानेंही शुभ खंजनपक्षी शुभदेशीं पाहून, पृथ्वीवर सुगंधिपुष्पें धूप यांहीयुक्त अर्घ करावें. असें केलें ह्मणजे राजा आनंदित होऊन शुभफलवृद्धीतें पावतो ॥१४॥

अशुभमपिविलोक्यखंजनंद्विजगुरुसाधुसुरा
र्चनेरतः । ननृपतिरशुभंसमाप्नुयान्नयदिदि
नानिचसप्तमांसभुक् ॥१५॥

अर्थ–राजा, अनिष्टही खंजनपक्षी पाहून, ब्राह्मण, गुरु, साधु, देव यांच्या पूजेविषयीं तत्पर असेल (पूजाकरील) तर व सात दिवस मांसभक्षण करणार नाहीं तर, त्यास अशुभफल होत नाहीं ॥१५॥

आवर्षात्प्रथमेदर्शनेफलंप्रतिदिनंतुदिनशेषे ।
दिक्स्थानमूर्तिलग्नर्क्षशांतदीप्तादिभिश्चोह्यं ॥१६॥

अर्थ–खंजनाच्या प्रथमदर्शनाचें फल वर्षपर्यंत होतें व दररोजचें दर्शनाचें शुभाशुभफल, तो दिवस शेष आहे तेथपर्यंतच होतें. तें फल दिशा, स्थान, मूर्ति, लग्न, नक्षत्र, शांत, दीप्त इत्यादिकानें शुभाशुभ जाणावें. (पूर्व, उत्तर,

ह्या दिशा शुभ स्थान श्लो० ४ पासून पहावें मूर्ति श्लो० २ व १३. लग्न, (शुभग्रहयुक्त व दृष्ट) ध्रुव, मृदु नक्षत्रें शुभ. क्षिप्र, चर, साधारण, मध्यम उग्र अ शुभ. शांतदिशा शुभ. दीप्तदिशा अशुभ ॥१६॥ (राजरीटपक्षी हा काशी जवळ सांपडतो त्यास शेंडी फुटते व ती त्याचे मस्तकावर आहे तोंपर्यंत तो दिसत नाहीं. ती गळून पडली ह्मणजे तो दिसू लागतो. ती शेंडी मनुष्यास सांपडेल तर ती हातात घेतली असतां मनुष्य अदृश्य होतो. अशी माहिती वृद्ध सांगतात. हा पक्षी दिसत असतो तेव्हां धरून पिंजऱ्यांत बाळगावा त्यास शेंडी फुटली ह्मणजे ती काढून घ्यावी याप्रमाणे करण्यासाठीं काशींतील कि त्येक उद्योगी गृहस्थांनीं पक्षी बाळगिले, परंतु ते जगले नाहींत मरून गेले)

॥ इतिबृहत्संहितायांखंजनदर्शनंनामपंचचत्वा रिंशोध्यायः ॥४५॥

---

## ॥ अथउत्पाताध्यायः ॥

यानत्रेरुत्पातान्गर्गःप्रोवाचतानहंवक्ष्ये ।
तेषांसंक्षेपोयंप्रकृतेरन्यत्वमुत्पातः ॥१॥

अर्थ—गर्गऋषि, ज्या उत्पातांतें अत्रिऋषिकारणें सांगता झाला. त्या उत्पातांतें मी सांगतों. पदार्थांच्या स्वाभाविक गुणांला विकार होणें हा त्या उत्पाताचा संक्षेप होय ॥१॥

अपचारेणनराणामुपसर्गःपापसंचयाद्भवति ।
संसूचयंतिदिव्यांतरिक्षभौमास्तदुत्पाताः ॥२॥

अर्थ—मनुष्यांच्या अविनयानें पापसंचय होऊन त्यापासून उपद्रव होतो. त्या उप द्रवातें दिव्य, अंतरिक्ष, भौम, असे त्रिविध उत्पात सूचवितात ॥२॥

मनुजानामपचारादपरक्तादेवताःसृजंत्येतान् ।
तत्प्रतिघातायनृपःशांतिंराष्ट्रेप्रयुंजीत ॥३॥

अर्थ—मनुष्यांच्या अविनयानें प्रतिकूळ झालेले देव या उत्पातांतें करतात त्या उत्पातांच्या नाशार्थ राजानें राष्ट्रामध्ये शांति करावी ॥३॥

---जगन्मित्र हपिसात पुस्तके विकत मिळतात तीं:---

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ८।।। | रामरक्षा. | | पूर्तेचे अभग. | ८।। | द० म० कोटके |
| ८।।। | गोपिगीत | ८।।। | सोळा सोमवार कथा | ८।। | चर्पटपञ्जरिका. |
| ८।।। | रुक्मिणी स्वयवर व | ८।।। | चित्रे. | ८।। | नौकाक्रीडन |
| | सुभद्राहरण आर्या. | ८।। | मगलाष्टकें नवग्रहाचीं | ८।। | कऱ्हाडे ब्राह्मणाचे |
| ८।।। | अगदशिष्टाई. | ८।। | गुरुचरित्र ओव्या ५२ | | प्रवर. |
| ८।।। | वास्तुप्रकरणी कोष्टक | ८।। | ज्ञानेश्वरसाधुकृत खेळ | ८।। | शिवस्तुति. |
| ८।।। | ध्रुवाख्यान. | ८।। | भीष्मप्रतिज्ञा | ८।। | गणपतीचे श्लोक. |
| ८।।। | तुकारामकृत मानस | ८।। | सीतास्वयवर | ८। | दुर्गास्तोत्र. |

दिव्यंग्रहर्क्षवैकृतमुल्कानिर्घातपवनपरिवेषाः ।
गंधर्वपुरपुरंदरचापादियदांतरिक्षंतत् ॥४॥
भौमंचरस्थिरभवंतच्छांतिभिराहतंशममुपैति ।
नाभसमुपैतिमृदुतांशाम्यतिनोदिव्यमित्येके ॥५॥

अर्थ—ग्रह व नक्षत्रें यास जो विकार तो दिव्य उत्पात होय. उल्का, निर्घात, महावायु, खळें, गंधर्वनगर, इंद्रधनुष्य, हीं होणें हा अंतरिक्ष उत्पात होय ॥४॥ चरस्थिरवस्तूस झालेला भौम उत्पात होय. तो भौम उत्पात शांति केली ह्मणजे शांत होतो; अंतरिक्ष शांतीनें कमी होतो; दिव्यशांतीनें शांत होत नाहीं असें कोणी ऋषि ह्मणतात ॥५॥

दिव्यमपिशममुपैतिप्रभूतकनकान्नगोमहीदानैः ।
रुद्रायतनेभूमौगोदोहात्कोटिहोमाच्च ॥६॥

अर्थ—बहुत सुवर्ण, अन्न, गाई, भूमि, याच्या दानानीं दिव्यही उत्पात शांत होतो. तसाच शिवालयीं व भूमीवर गाईच्या दोहनानें ( दूध काढण्यानें ), कोटिहोमानें ही दिव्य उत्पात शांति पावतो ह्म० शुभ होतो ॥६॥

आत्मसुतकोशवाहनपुरदारपुरोहितेषुलोकेषु ।
पाकमुपयातिदैवंपरिकल्पितमष्टधानृपतेः ॥७॥

अर्थ—दिव्य उत्पात स्वशरीर, पुत्र, भांडागार, अश्वादिवाहन, नगर, स्त्री, पुरोहित, देशांतील लोक व भृत्यवर्ग, या आठाचाठाईं राजास शुभाशुभफल देतो ॥७॥

अनिमित्तभंगचलनस्वेदाश्रुनिपातजल्पनाद्यानि ।
लिंगार्चायतनानांनाशायनरेशदेशानां ॥८॥

अर्थ—शिवाचें लिंग, देवाच्या मूर्ति व स्थानें यांचीं निमित्तावाचून भंग, चलन, घर्म, रोदन, पतन, संभाषण, हसन इत्यादिक होतील तर राजा व देश यांचा नाश होतो ॥८॥

दैवतयात्राशकटाक्षचक्रयुगकेतुभंगपतनानि ।
संपर्यासनसादनसंगाश्चनदेशनृपसुखदाः ॥९॥

अर्थ—देवतोत्सवामध्यें गाड्याचा अक्ष ( मध्यकाष्ठ ), चक्र, युग ( जोखड ), ध्वज, यांचा भंग किंवा पतन अथवा परिवर्तन ( फिरणें ) मज्जन, आसक्ति ( चिकटणें ) हीं होतील तर देश व राजा यास सुख होत नाहीं ॥९॥

ऋषिधर्मपितृब्रह्मप्रोद्भूतंवैकृतंद्विजातीनां ।
यद्रुद्रलोकपालोद्भवंपशूनामनिष्टंतत् ॥१०॥
गुरुसितशनैश्चरोत्थंपुरोधसांविष्णुजंचलोकानां ।
स्कंदविशाखसमुत्थंमांडलिकानांनरेंद्राणां ॥११॥
वेदव्यासेमंत्रिणिविनायकेवैकृतंचमूनाथे ।
धातरिसविश्वकर्मणिलोकाभावायनिर्दिष्टं ॥१२॥
देवकुमारकुमारीवनिताप्रेष्येषुवैकृतंयत्स्यात् ।
तन्नरपतेःकुमारककुमारिकास्त्रीपरिजनानां ॥१३॥
रक्षःपिशाचगुह्यकनागानामेतदेवनिर्देश्यं ।
मासैश्चाप्यष्टाभिःसर्वेषामेवफलपाकः ॥१४॥

अर्थ–ऋषि, धर्मदेश ( जेथें स्वाभाविक कृष्णमृग फिरतात तो ),' पितर, ब्रह्मदेव याचाठाईं झालेलें जें वैकृत ( विकार ) तें ब्राह्मणास अनिष्ट होय. रुद्र ( शिव ) व इंद्रादिलोकपाल यापासून झालेलें जें वैकृत तें पशूस अशुभ होय ॥१०॥ बृहस्पति, शुक्र, शनैश्चर, यापासून झालेलें वैकृत उपाध्यायांस अशुभ. विष्णूपासून झालेलें वैकृत लोकांस अशुभ. स्कंद व विशाख ( देवविशेष ) यापासून झा० वैकृत मांडलिक राजांस अशुभ होय ॥११॥ वेदव्यासापा० झा० वैकृत प्रधानास अशुभ गणपतीस जें वैकृत ते सेनापतीस अशुभ. धाता ( प्रजापति ) व विश्वकर्मा या स जें वैकृत तें लोकांच्या नाशार्थ सांगीतलें ॥१२॥ देवाचे पुत्र, कन्या, स्त्रिया, सेवक यास जें वैकृत तें अनुक्रमानें राजाच्या पुत्र, कन्या, स्त्रिया, सेवक यास अ निष्ट होय ॥१३॥ राक्षस, पिशाच, यक्ष, नाग याच्या पुत्रादि पूर्वोक्तास जें वैकृत तें राजाच्या पुत्रादिकास अशुभ होय. या सर्व उत्पाताचें आठ महिन्यांनीं शु भाशुभफल होतें ॥१४॥

बुध्वादेवविकारंशुचिःपुरोधास्त्र्यहोपितःस्नातः ।
स्नानकुसुमानुलेपनवस्त्रैरभ्यर्चयेत्प्रतिमां ॥१५॥
मधुपर्केणपुरोधाभक्ष्यैर्बलिभिश्चविधिवदुपतिष्ठेत् ।
स्थालीपाकंजुहुयाद्विधिवन्मंत्रैश्चतल्लिंगैः ॥१६॥

अर्थ–देववैकृत जाणून शुद्ध, तीन दिवस उपोषित व स्नान केलेला असा उपाध्या यानें विकार झालेल्या प्रतिमेची स्नान, पुष्पें, गंध, वस्त्र, याहींकरून पूजा करावी

॥१५॥ तसेंच उपाध्यायानें मधुपर्क ( दधि ) भक्ष ( मोदक, पोळिका, अपूपादिक ) व बलि यांहींकरून यथाशास्त्र पूजन करावें. स्थालीपाक ( चरु ) याचें तद्देवतांचे मत्रांनीं यथाशास्त्र हवन करावें ॥१६॥

इतिविबुधविकारेशांतयःसप्तरात्रंद्विजविबुध गणार्चागीतनृत्योत्सवाश्च । विधिवदवनिपालैर्यैःप्रयुक्तानतेषांभवतिदुरितपाकोदक्षिणाभिश्चरुद्धः ॥१७॥

अर्थ–या पूर्वोक्त प्रकारानें देववैकृत झालें असता सात दिवस पूर्वोक्त शांति व ब्राह्मण, देवगण ( गणपतिप्रमुख ) यांचीं पूजा व गीत, नृत्य, उत्साह यांहींकरून रात्रौ जागरण, हीं सर्व ज्या राजांनीं यथाशास्त्र केलीं त्यांस दक्षिणादिकांनीं रोधित ( बंद केलेला ) असा अशुभवैकृताचा पाक ( फळ ) होत नाहीं ॥१७॥

॥ इतिलिंगादिवैकृतं ॥

राष्ट्रेयस्यानग्निःप्रदीप्यतेदीप्यतेचनेंधनवान् । मनुजेश्वरस्यपीडातस्यसराष्ट्रस्यविज्ञेया ॥१८॥

अर्थ–ज्या राजाच्या देशामध्यें, अग्नि नसून ज्वाला दिसेल अथवा काष्ठयुक्त अग्नि असून प्रदीप्त ( ज्वालायुक्त ) होणार नाहीं; तर त्या राजास व त्या देशास पीडा होते ॥१८॥

जलमांसार्द्रज्वलनेनृपतिवधःप्रहरणेरणोरौद्रः । सैन्यग्रामपुरेषुचनाशोवन्हेर्भयंकुरुते ॥१९॥

अर्थ–उदक, माहिषादि मांस व कोणताही ओला पदार्थ यांचें ज्वलन झालें तर राजाचा वध होतो. खड्गादि शस्त्र जर प्रज्वलित होईल तर भयंकर युद्ध होतें. सैन्य, ग्राम, नगर यांत अग्नि नाहींसा होईल तर अग्निभय होतें ॥१९॥

प्रासादभवनतोरणकेत्वादिष्वनलेनदग्धेषु । तडितावाषण्मासात्परचक्रस्यागमोनियमात् ॥२०॥

अर्थ–देवालय, गृह, तोरण ( बाहेरचा दरवाजा ), ध्वज, कोठार इत्यादिक अग्नि नसून दग्ध झालीं अथवा विजेनें दग्ध झालीं तर, सहा महिन्यांनंतर निश्चयानें शत्रुचक्राचें येणें होईल ॥२०॥

धूमोनग्निसमुत्थोरजस्तमश्चान्हिजंमहाभयदं ।
व्यभ्रेनिश्युडुनाशोदर्शनमपिचान्हिदोषकरं ॥२१॥

अर्थ—अग्नीवाचून धूम उत्पन्न होईल व दिवसा धूळ व अंधकार होतील तर मोठें भय होतें. निरभ्ररात्रीस नक्षत्रें दिसणार नाहींत व दिवसास दिसतील तर अशुभ होय ॥२१॥

नगरचतुष्पादांडजमनुजानांभयकरंज्वलनमाहुः ।
धूमाग्निविस्फुलिंगैःशय्यांबरकेशगैर्मृत्युः ॥२२॥

अर्थ—नगर, चतुष्पाद, अंडज, मनुष्य यास अग्नीचें प्रज्वलन, महान् भय देतें. शय्या, वस्त्र, केश याचाठाई धूम, अग्नि ( ज्वाला ), अग्निकण हे पाहिले तर शय्यादिकांच्या स्वामीस मृत्यु होतो ॥२२॥

आयुधज्वलनसर्पणस्वनाःकोशनिर्गमनवेपनानिवा । वैकृतानियदिवायुधेपराण्याशुरौद्र रणसंकुलंवदेत् ॥२३॥

अर्थ—शस्त्राचें ज्वलन, गमन, शब्द, मेणांतून स्वत बाहेर येणें, कंपन अथवा अन्य आयुधाचीं वैकृतें होतील तर भयंकर युद्ध समीप आलें असें सांगावें ॥२३॥

मंत्रैर्वान्हैःक्षीरवृक्षात्समिद्भिर्होतव्योग्निःसर्षपैःसर्पिषाच । अग्न्यादीनांवैकृतेशांतिरेवंदेयंचास्मिन्कांचनंब्राह्मणेभ्यः ॥२४॥

अर्थ—पूर्वोक्त अग्निवैकृत झालें तर क्षीरवृक्षाच्या समिधा, सर्षप, आज्य या द्रव्यांनीं अग्निदैवत्यमंत्रांनीं अग्नीमध्यें हवन करावें व हीं अग्निवैकृतें होतील तर ब्राह्मणांस सुवर्णदानही करावें याप्रकारें अग्न्यादिवैकृतीं शांति सांगीतली ही केली असता शुभ होतें ॥२४॥

॥ इत्यग्निवैकृत ॥

शाखाभंगेकस्माद्वृक्षाणांनिर्दिशेद्रणोद्योगं ।
हसनेदेशभ्रंशंरुदितेचव्याधिबाहुल्यं ॥२५॥

अर्थ—वृक्षांची अकस्मात् खांदी मोडली तर युद्धाचा उद्योग होतो. वृक्षांचे हसन (हंसणें) झाले तर देशनाश होतो. वृक्षांनीं रोदन केलें तर बहुत रोग उत्पन्न होतात ॥२५॥

**राष्ट्रविभेदस्त्वनृतौबालवधोतीवकुसुमितेबाले।**
**वृक्षात्क्षीरस्रावेसर्वद्रव्यक्षयोभवति ॥२६॥**

अर्थ—ज्या ऋतूंत जे वृक्ष फुलावयाचे ते वृक्ष तो ऋतु सोडून अन्यऋतूंत फुलतील तर देशनाश होतो. वृक्ष लहान (थोड्या वर्षांचा) असून फार फुलेल तर बालवध होतो. वृक्षांपासून दुग्धस्राव होईल तर सर्वद्रव्यांचा नाश होतो ॥२६॥

**मद्येवाहननाशःसंग्रामःशोणितेमधुनिरोगः।**
**स्नेहेदुर्भिक्षभयंमहद्भयंनिःसृतेसलिले ॥२७॥**

अर्थ—वृक्षांपासून मद्यस्राव होईल तर अश्वादि वाहनांचा नाश होतो. रक्तस्राव होईल तर युद्ध होतें. मध निघेल तर रोग होतो. तैलादिक निघेल तर दुर्भिक्षभय होतें. उदक निघेल तर मोठें भय होतें ॥२७॥

**शुष्कविरोहेवीर्यान्नसंक्षयःशोषणेचविरुजानां।**
**पतितानामुत्थानेस्वयंभयंदैवजनितंच ॥२८॥**

अर्थ—शुष्कवृक्षांस पल्लव येतील व रोगावांचून वृक्ष शुष्क होतील तर बल व अन्न यांचा नाश होतो. पडलेल्या वृक्षांचें स्वतःच (मनुष्यावांचून) उत्थापन (उभें राहणें) होईल तर दैवकृत भय होईल ॥२८॥

**(पूजितवृक्षेह्यनृतौकुसुमफलंनृपवधायनिर्दिष्टं।**
**धूमस्तस्मिन्ज्वालाथवाभवेन्नृपवधायैव ॥२९॥)**

(अर्थ—प्रधान (मोठा) वृक्षास स्वऋतूवांचून अन्यऋतूंत पुष्पें, फलें येतील अथवा वृक्षावर धूम किंवा ज्वाला होतील तर राजवध होतो ॥२९॥)

**सर्पत्सुतरुषुजल्पत्सुवापिजनसंक्षयोविनिर्दिष्टः।**
**वृक्षाणांवैकृत्येदशभिर्मासैःफलविपाकः ॥३०॥**

अर्थ—वृक्ष चालतील किंवा भाषण करतील तर लोकांचा नाश होतो. वृक्षांच्या विकारांचें फल दहा महिन्यांनीं होतें ॥३०॥

स्रग्गंधधूपांबरपूजितस्यछत्रंनिधायोपरिपाद
पस्य । कृत्वाशिवंरुद्रजपोत्रकार्योरुद्रेभ्यइ
त्यत्रषडंगहोमः ॥३१॥ पायसेनमधुनाचभो
जयेद्ब्राह्मणान्घृतयुतेनभूपतिः । मेदिनीनिग
दितात्रदक्षिणावैकृतेतरुकृतेमहर्षिभिः ॥३२॥

अर्थ–ज्या वृक्षास विकार झाला असेल त्या वृक्षाची माला, सुगंधद्रव्यें, धूप, वस्त्र याहीं पूजा करून त्या वृक्षावर छत्र ठेवून या वृक्षवैकृतीं रुद्रमंत्राचा जप करावा व रुद्रेभ्य स्वाहा असा षडंगांनीं होम करावा ह्मणजे कल्याण होतें ॥३१॥ व घृतयुक्तपायस व मध यांणीं ब्राह्मणभोजन राजानें करावें. येथें (वृक्षवैकृतीं) ब्राह्मणास भूमि दक्षिणा द्यावी असें महर्षीनीं सांगीतलें आहे ॥३२॥

॥ इतिवृक्षवैकृत ॥

नालेब्जयवादीनामेकस्मिन्द्वित्रिसंभवोमरणं ।
कथयतितदधिपतीनांयमलंजातंचकुसुमफलं ॥३३॥

अर्थ–कमल, यव, गोधूम, कगु इत्यादि धान्याच्या एका देंटावर दोन किंवा तीन कणसें येतील तर अथवा पुष्प व फल जुळें होईल तर त्यांच्या स्वामीस मृत्यु होतो.

अतिवृद्धिःसस्यानांनानाफलकुसुमसंभवोवृक्षे ।
भवतिहियद्येकस्मिन्परचक्रस्यागमोकस्मात् ॥३४॥

अर्थ–धान्याची फारच वृद्धि (बहुत) होईल व एका वृक्षावर नानाप्रकारचीं फळें व पुष्पें येतील तर, शत्रूचें अकस्मात् येणें होईल ॥३४॥

अर्धेनयदातैलंभवतितिलानामतैलतावास्यात् ।
अन्नस्यचवैरस्यंतदाचविंद्याद्भयंसुमहत् ॥३५॥

अर्थ–तिळाचें तेल अर्धें होईल अथवा तिळाचे तेलच येणार नाहीं तसेंच रसविरहित अन्न होईल तर मोठें भय होईल असें जाणावें ॥३५॥

विकृतकुसुमंफलंवाग्रामादथवापुराद्बहिःकार्यं ।
सौम्योत्रचरुःकार्योनिर्वाप्योवापशुःशांत्यै ॥३६॥
सस्येचदृष्ट्वाविकृतिंप्रदेयंतत्क्षेत्रमेवप्रथमंद्विजेभ्यः ।
तस्यैवमध्येचरुमत्रभौमंकृत्वानदोषान्समुपैतितज्जान्

अर्थ–विकार पावलेले जे पुष्प किंवा फळ तें गावांतून किंवा नगरांतून बाहेर करावें आणि शास्त्यर्थ सोमदैवत्य चरुहोम करावा अथवा पशूचा निर्वाप इ० बळि करावा ॥३६॥ धान्याचाठाईं विकार पाहून त्या धान्याचें क्षेत्रच प्रथम ब्राह्मणास द्यावें व त्या क्षेत्रामध्येंच सौमदैवत्य चरुहोम करावा. तेणेंकरून त्या वैकृतापासून होणारें अशुभ होत नाहीं ॥३७॥

॥ इतिसस्यवैकृत ॥

दुर्भिक्षमनावृष्ट्यामतिवृष्ट्यांक्षुद्भयंसपरचक्रं ।
रोगोह्यनृतुभवायांनृपतिवधोनभ्रजातायां ॥३८॥

अर्थ–अवर्षण झालें असतां दुर्भिक्ष होतें. अतिवृष्टि झाली तर दुर्भिक्ष व शत्रु यांचें भय होतें. वर्षाऋतुवांचून अन्यऋतूंत अतिवृष्टि होईल तर रोगभय होतें. अभ्र नसून अतिवृष्टि होईल तर राजाचा वध होतो ॥३८॥

शीतोष्णविपर्यासेनोसंम्यगृतुपुसंप्रवृत्तेपु ।
षण्मासाद्राष्ट्रभयंरोगभयंदैवजनितंच ॥३९॥

अर्थ–शिशिरादिक ऋतु गणितागत प्रवृत्त झाले नसतां, थंडी व उष्णता यांचा विपर्यास ह्मणजे शिशिरऋतूंत उष्णता व ग्रीष्मऋतूंत थंडी, असें झालें तर, सहा महिन्यांनीं राष्ट्रभय व दैवकृत रोगभयही होतें ॥३९॥

अन्यर्तौसप्ताहंप्रबंधवर्षेप्रधाननृपमरणं ।
रक्तेशस्त्रोद्योगोमांसास्थिवसादिभिर्मरकः ॥४०॥
धान्यहिरण्यत्वक्फलकुसुमाद्यैर्वर्षितैर्भयंविंद्यात् ।
अंगारपांशुवर्षेविनाशमायातितन्नगरं ॥४१॥

अर्थ–वर्षाऋतूवांचून इतर ऋतूमध्यें सात दिवस अतिवृष्टि होईल तर मुख्यराजास मृत्यु होतो. रक्तवृष्टि होईल तर युद्धभय होतें. मांस, अस्थि, मज्जा, घृत, तैल इत्यादिकांची वृष्टि होईल तर लोकमरण होतें ॥४०॥ धान्य, सुवर्ण, वृक्षसाली, फळें, पुष्पें, पानें इत्यादिकांची वृष्टि होईल तर भय होतें. अंगार (निखारे किंवा कोळसे), धूळ यांची वृष्टि झाली तर जेथें वृष्टि होईल त्या नगराचा नाश होतो॥

उपलाविनाजलधरैर्विकृतावाप्राणिनोयदावृष्टाः ।
छिद्रंवाप्यतिवृष्टौसस्यानामीतिसंजननं ॥४२॥

अर्थ—मेघावाचून उपला ( गारा ) वृष्टि होईल अथवा विकारयुक्त गर्दभ, उष्ट्र, अश्व, मार्जार, कोल्हे इत्यादि प्राण्याची वृष्टि होईल अथवा अतिवृष्टि होईल अथ वा अतिवृष्टि होत असता मध्ये अवर्षण होईल तर धान्यास उपद्रव उत्पन्न होतो ॥४२॥

( क्षीरघृतक्षौद्राणांदध्नोरुधिरोष्णवारिणांवर्षे ।
देशविनाशोज्ञेयोऽसृग्वर्षेचापिनृपयुद्धं ॥४३॥)

( अर्थ—दुग्ध, घृत, मध, दधि, रक्त, उष्णोदक याची वृष्टि होईल तर देशनाश जाणावा. रक्तवृष्टि झाली तर राजाचे युद्धही होते ॥४३॥ )

यद्यमलेर्केछायानदृश्यतेदृश्यतेप्रतीपावा ।
देशस्यतदासुमहद्भयमायातंविनिर्देश्यं ॥४४॥

अर्थ—स्वच्छ सूर्य असून, छाया दिणार नाही अथवा छाया प्रतिकूल ( पूर्वेस सूर्य असता पश्चिमेस छाया असावी ती पूर्वेकडेच ) असेल, तर देशास महद्भय होईल असे जाणावे ॥४४॥

व्यभ्रेनभसीन्द्रधनुर्दिवायदादृश्यतेथवारात्रौ ।
प्राच्यामपरस्यांवातदाभवेत्क्षुद्भयंसुमहत् ॥४५॥

अर्थ— अभ्ररहित आकाशामध्ये, दिवसा किंवा रात्रीं पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे इंद्र-धनुष्य ज्याकाळीं दिसेल त्याकाळीं मोठें दुर्भिक्षभय होईल ॥४५॥

सूर्येंदुपर्जन्यसमीरणानांयागःस्मृतोवृष्टिविका
रकाले । धान्यान्नगोकांचनदक्षिणाश्चदेयास्त
तःशांतिमुपैतिपापं ॥४६॥

अर्थ—सूर्य, चंद्र, पर्जन्य, वायु याचे प्रीत्यर्थ वृष्टिविकारकालीं याग ( होम ) करावा आणि धान्य, अन्न, गाय, सुवर्ण, याची दक्षिणा ब्राह्मणास द्यावी तेणेंकरून पाप ( अशुभ ) शांति ( नाश ) होते ॥४६॥

॥ इतिवृष्टिवैकृतं ॥

अपसर्पणंनदीनांनगरादचिरेणशून्यतांकुरुते ।
शोषश्चाशोष्याणामन्येषांवान्हदादीनां ॥४७॥
स्नेहासृङ्मांसवहाःसंकुलकलुषाःप्रतीपगाश्चापि ।
परचक्रस्यागमनंनद्यःकथयंतिषण्मासात् ॥४८॥

अर्थ—नद्यांचें, नगरापासून, दूर गमन होईल अथवा शुष्क न होणारीं स्थलें किंवा ऱ्हद ( डोह ), तळीं, नद्या हा शुष्क होतील तर नगर शून्य ( मनुष्यरहित ) होई-ल ॥४७॥ नद्यांतून तेल, रक्त, मांस हीं पाण्यासारखीं वाहतील अथवा नद्या थो ड्या गढूळ किंवा आरंभातिकडे परत जातील तर सहा महिन्यांनी शत्रूचें आगमन होईल असें त्या नद्या सांगतात ॥४८॥

ज्वालाधूमक्काथारुदितोत्कुष्टानिचैवकूपानां ।
गीतप्रजल्पितानिचजनमरकायप्रदिष्टानि ॥४९॥

अर्थ—कूपास ज्वाला, धूम, क्काथ ( फेन ), रोदन, उद्घोष ( मोठाशब्द ), गायन, प्रजल्पित ( बडबड ) हीं जर होतील तर लोकांचा नाश होतो ॥४९॥

तोयोत्पत्तिरखातेगंधरसविपर्ययेचतोयानां ।
सलिलाशयविकृतौवामहद्भयंतत्रशांतिरियं ॥५०॥
सलिलविकारेकुर्यात्पूजांवरुणस्यवारुणैर्मंत्रैः ।
तैरेवचजपहोमंशममेवंपापमुपयाति ॥५१॥

अर्थ—खणिल्यावाचून भूमीवर उदक उत्पन्न होईल किंवा उदकाच्या गंधाचा अ-थवा रसाचा विपर्यास ह० दुसऱ्याप्रकारचा गंध किंवा रस होईल अथवा उद-काधारास विकृति ( विहिरींचा तलाव इ० ) होईल तर महद्भय होतें तेथें ही वक्ष्यमाणशांति करावी ॥५०॥ उदकविकारीं वरुणदैवत्यमंत्रांनीं वरुणाची पूजा करावी व त्याच मंत्रांनीं जप, अग्नीमध्ये होम, हे केले असतां, अशुभाची शांति होते ॥५१॥

॥ इतिजलवैकृत ॥

प्रसवविकारेस्त्रीणांद्वित्रिचतुःप्रभृतिसंप्रसूतौवा ।
हीनातिरिक्तकालेचदेशकुलसंक्षयोभवति ॥५२॥

अर्थ–स्त्रियांस प्रसूत झालेल्या अपत्यास विकार ( अन्यप्राणिसादृश्य ) व दोन, तीन, चार इत्यादि अपत्यें एककाली होणें किंवा कमी दिवसांनीं प्रसव अथवा अधिक दिवसांनीं प्रसव, हीं झालीं तर देश व कुल यांचा क्षय होतो ॥५२॥

वडवोष्ट्रमहिषगोहस्तिनीषुयमलोद्भवेमरणमेषां ।
षण्मासात्सूतिफलंशांतौश्लोकौचगर्गोक्तौ ॥५३॥

अर्थ–घोडी, उंटीण, महिषी, गाई, हत्तीण यांस जुंवळ होईल तर त्यांस मरण होतें. हें प्रसूतिफल सहा महिन्यांनीं होतें. याच्या शांतीविषयीं गर्गऋषिप्रोक्त २ श्लोक आहेत ॥५३॥

नार्यःपरस्यविषयेत्यक्तव्यास्ताहितार्थिना ।
तर्पयेच्चद्विजान्कामैःशांतिंचैवात्रकारयेत् ॥५४॥
चतुष्पदाःस्वयूथेभ्यस्त्यक्तव्याःपरभूमिषु ।
नगरंस्वामिनंयूथमन्यथाहिविनाशयेत् ॥५५॥

अर्थ–प्रसूतिवैकृत झालेल्या स्त्रिया हितेच्छूनें अन्यदेशामध्यें पोंचवाव्या. आणि ब्राह्मणभोजन इ० उपप्रमाणें करावें व याविषयीं शांतीही करावी ॥५४॥ घोडी, गाय इ० चतुष्पदांस प्रसूतिवैकृत होईल तर आपल्या समुदायांतून अन्यभूमीवर पोंचवाव्या म्हणजे कल्याण होतें. असें केलें नाहीं तर नगर, स्वामी व यूथ ( कळप ) यांचा नाश होतो ॥५५॥

॥ इतिप्रसववैकृतं ॥

परयोनावभिगमनंभवतितिरश्चामसाधुधेनूनां ।
उक्षाणोवान्योन्यंपिबतिश्वावासुरभिपुत्रं ॥५६॥
मासत्रयेणविंद्यात्तस्मिन्निःसंशयंपरागमनं ।
तत्प्रतिघातायैतौश्लोकौगर्गेणनिर्दिष्टौ ॥५७॥

अर्थ–पशु, पक्षी यांचें, स्वजातीवांचून, अन्ययोनीचाठाई अभिगमन ( मैथुन ) होईल तर तें अशुभ होय. गाय गाईचें, बैल बैलाचें, स्तनपान करील अथवा कुत्रा वृषभाचें स्तनपान करील तर ॥५६॥ तीन महिन्यांनीं शत्रुचक्र निःसंशय येईल असें जाणावें. या अशुभाचा नाश व्हावा म्हणून शांतीचे हे वक्ष्यमाण दोन श्लोक गर्गऋषीनें सांगितले आहेत ॥५७॥

त्यागोविवासनंदानंतत्तस्याशुशुभंभवेत् ।
तर्पयेद्ब्राह्मणांश्चात्रजपहोमांश्चकारयेत् ॥५८॥
स्थालीपाकेनधातारंपशुनाचपुरोहितः ।
प्राजापत्येनमंत्रेणयजेद्बव्हन्नदक्षिणं ॥५९॥

अर्थ—पशुवैकृती, त्या पशूचा त्याग, अन्यदेशीं गमन, ब्राह्मणांस दान हीं करावीं ह्मणजे शीघ्र कल्याण होतें. या पशुवैकृतीं ब्राह्मणसतर्पण (पूजनादि), जप, होम हीही करावीं ॥५८॥ पुरोहितानें चरूनें व पशूनें (छागानें) प्रजापतीचें प्रजापतिदैवत्यमन्त्रानीं यजन करावें. त्यामध्यें बहुत अन्नाची दक्षिणा द्यावी ॥५९॥

॥ इतिचतुष्पदवैकृत ॥

यानंवाहवियुक्तंयदिगच्छेन्नव्रजेच्चवाहयुतं ।
राष्ट्रभयंभवतितदाचक्राणांसादभंगेच ॥६०॥

अर्थ—अश्वादि यान पुरुषादि वाहकावाचून चालेल किंवा वाहकयुक्त असून चालणार नाहीं अथवा चाकें रुपलीं किंवा फुटलीं तर राष्ट्रभय होतें ॥६०॥

अनभिहततूर्यनादःशब्दोवाताडितेपुयदिनस्यात् ।
व्युत्पत्तौवातेपांपरागमोनृपतिमरणंवा ॥६१॥

अर्थ—ताडन केल्यावांचून वाद्याचा शब्द होईल अथवा ताडन केलें असतां शब्द होणार नाहीं किंवा अनेकप्रकारचे शब्द होतील तर शत्रु येईल अथवा राजास मृत्यु होईल ॥६१॥

गीतरवतूर्यनादानभसियदावाचरस्थिरान्यत्वं ।
मृत्युस्तदागदावाविस्वरतूर्येपराभिभवः ॥६२॥

अर्थ—आकाशामध्यें गायनाचा शब्द किंवा वाद्याचा नाद श्रवण होईल अथवा गाडा इ० चरपदार्थ हालणार नाहीं व वृक्षादि स्थिरपदार्थ चालेल तर मृत्यु किंवा रोग होतात. वाद्याचा शब्द विस्वर (दुसऱ्या प्रकारचा) होईल तर शत्रु पराजय करतील ॥६२॥

गोलांगलयोःसंगेदर्वीशूर्पाद्युपस्करविकारे ।
क्रोष्टुकनादेचतथाशस्त्रभयंमुनिवचश्चेदं ॥६३॥

अर्थ–बैल, नगरास संलग्न ( चिकटणे ) शाला अथवा पळी, सूप, उखळ, मुसळ इत्यादि गृहसंबंधी उपकरणें यास विकार ( अन्यस्वरूप किंवा हसन, गायन, रोदन इ० ) होईल अथवा कोल्ह्याच्या शब्दासारखा, पळी इत्यादिकांचा नाद होईल तर शस्त्रभय होतें. या पूर्वोक्त उत्पातीं ऋषिप्रोक्त वक्ष्यमाण शांति आणावी ॥६३॥

वायव्येष्वेपुनृपतिर्वायुंसक्तुभिरर्चयेत् ।
आवायोरितिपंचर्चोजाप्याश्चप्रयतैर्द्विजैः ॥६४॥
ब्राह्मणान्परमान्नेनदक्षिणाभिश्चतर्पयेत् ।
बह्वन्नदक्षिणाहोमाःकर्तव्याश्चप्रयत्नतः ॥६५॥

अर्थ–या वायव्य उत्पातीं राजानें सातूनीं वायुदेवतेचें पूजन करावें व पवित्र ब्राह्मणांनी आवायो' या पाच ऋचांचा जप करावा ॥६४॥ पायसानें ब्राह्मणभोजन करावें व दक्षिणाही बहुत द्यावी. बहुत अन्न, दक्षिणा यांहींकरून मेहनतीनें होमही करावे तेणेंकरून शुभ होतें ॥६५॥

॥ इतिवायव्यवैकृत ॥

पुरपक्षिणोवनचरावन्यावानिर्भयाविशंतिपुरं ।
नक्तंवादिवसचराःक्षपाचरावाचरंत्यहनि ॥६६॥

अर्थ–गावांतील पक्षी वनात जातील व वनातील पक्षी गांवात निर्भय प्रवेश करतील अथवा कावळे इ० दिवसा फिरणारे पक्षी रात्री फिरतील व घुबड इ० रात्रीं फिरणारे दिवसात फिरतील ॥६६॥

संध्याद्वयेपिमंडलमावध्नंतोमृगाविहंगावा ।
दीप्तायांदिश्यथवाक्रोशंतःसंहताभयदाः ॥६७॥

अर्थ–आरण्यपशु किंवा पक्षी सूर्योदयी किंवा सूर्यास्तीं चक्रासारखें मंडळ करतील व जिकडे सूर्य असेल त्या दिशेकडे एकत्र जमून मोठा आक्रोशशब्द करतील तर ते भय उत्पन्न करतील ॥६७॥

श्वानःप्ररुदंतइवद्वारेवाशंतिजंबुकादीप्ताः ।
प्रविशेन्नरेंद्रभवनेकपोतकःकौशिकोयदिवा ॥६८॥
कुक्कुटरुतंप्रदोषेहेमंतादौचकोकिलालापाः ।
प्रतिलोममंडलचराःश्येनाद्याश्चांबरेभयदाः ॥६९॥

अर्थ—कुत्रे(व श्येनपक्षी)रडल्यासारखे द्वारामध्ये शब्द करतील अथवा कोल्हे सूर्याभिमुख शब्द करतील किंवा कवडा अथवा घुबड राजगृहामध्ये प्रवेश करील ॥६८॥ प्रदोषकाली कोंबडा शब्द करील, हेमंतऋतूच्या आरंभीं कोकिला शब्द करतील, श्येनादिक मांस खाणारे पक्षी आकाशामध्ये अप्रदक्षिण मंडळ फिरतील तर, हे सर्व भय देणारे होतात ॥६९॥

गृहचैत्यतोरणेषुद्वारेषुचपक्षिसंघसंपाताः ।
मधुवल्मीकांभोरुहसमुद्भवाश्चापिनाशाय ॥७०॥

अर्थ—गृह, चैत्य ( मोठा वृक्ष ), तोरण, द्वारें यावर पक्षिसमुदाय बसेल अथवा गृहादि पूर्वोक्तावर मधु ( मधाचें पोळें ), वारुळ, कमळ हीं उत्पन्न होतील तर त्या गृहादिकाचा नाश होतो ॥७०॥

श्वभिरस्थिशवावयवप्रवेशनंमंदिरेषुमरकाय ।
पशुशस्त्रव्याहारेनृपमृत्युर्मुनिवचश्चेदं ॥७१॥

अर्थ—कुत्र्यांनीं हाडें, मृतमनुष्याचा अवयव घरामध्यें आणला तर मृत्यु होतो व पशु, शस्त्रें हीं मनुष्यासारखीं बोलतील तर राजास मृत्यु होतो. या मृगपक्ष्यादि वैकृतीं ऋषिप्रोक्त वक्ष्यमाण शांति आहे ॥७१॥

मृगपक्षिविकारेषुकुर्याद्धोमान्सदक्षिणान् ।
देवाःकपोतइतिचजप्तव्याःपंचभिर्द्विजैः ॥७२॥
सुदेवाइतिचैकेनदेयागावश्चदक्षिणा ।
जपेच्छाकुनसूक्तंवामनोवेदशिरांसिच ॥७३॥

अर्थ—पूर्वोक्त मृगपक्षिविकारीं दक्षिणासहित होम करावे. देवाःकपोत या मन्त्राचा पांच ब्राह्मणाकडून जप करवावा ॥७२॥ सुदेवा या मन्त्राचा जप एकब्राह्मणाकडून करवावा. त्या ब्राह्मणास गाई दक्षिणा द्याव्या. शाकुनसूक्ताचा जप करावा अथवा मनोमंत्राचा जप व वेदशिरस् ( अथर्वशीर्ष १० ) याचाही जप करावा ॥७३॥

॥ इतिमृगपक्षिवैकृत ॥

शक्रध्वजेंद्रकीलस्तंभद्वारप्रपातभंगेषु ।
तद्वत्कपाटतोरणकेतूनांनरपतेर्मरणं ॥७४॥

अर्थ–इंद्रध्वज ( अ० ४३ ), इंद्रकील ( दाराची खीळ ), खांब, दार यांचें पतन किंवा फुटणें; तसेंच कपाट ( दाराची दारकस ), तोरण, ध्वज यांचें पतन किंवा फुटणें हीं झालीं तर राजास मृत्यु होतो ॥७४॥

संध्याद्वयस्यदीप्तिर्धूमोत्पत्तिश्चकाननेऽनग्नौ ।
छिद्राभावेभूमेर्दरणंकंपश्चभयकारी ॥७५॥

अर्थ–उदयसंध्या व अस्तसंध्या यावेळीं तेज असेल, अरण्यामध्यें अग्नीवांचून धूम उत्पन्न होईल, छिद्र नसून भूमीचें विदारण होईल व भूमिकंपही होईल तर भय उत्पन्न होतें ॥७५॥

पाखंडानांनास्तिकानांचभक्तःसाध्वाचारप्रोज्झितःक्रोधशीलः । ईर्ष्युःक्रूरोविग्रहासक्तचेतायस्मिन्राजातस्यदेशस्यनाशः ॥७६॥

अर्थ–ज्या देशामध्यें, वेदबाह्य व नास्तिक यांची भक्ति करणारा, चांगला आचार ज्याणें सोडला असा, क्रोधस्वभावी, दुसऱ्याचा द्वेष करणारा, दुष्ट, सर्वकाल युद्धामध्यें ज्याचें चित्त असा, राजा असेल त्या देशाचा नाश होतो॥७६॥

प्रहरहरछिंधिभिंधीत्यायुधकाष्ठाश्मपाणयोबालाः ।
निगदंतःप्रहरंतेतत्रापिभयंभवत्याशु ॥७७॥

अर्थ–जेथें मुलें हातांत शस्त्रें, लाकडें, दगड, घेऊन मारा, ओढा, तोडा, फोडा, असे शब्द करून, एकमेकांस प्रहार करतील तर, तेथेंही शीघ्र भय होतें ॥७७॥

अंगारगैरिकाद्यैर्विकृतप्रेताभिलेखनंयस्मिन् ।
नायकचित्रितमथवाक्षयेक्षयंयातिनाचिरेण ॥७८॥

अर्थ–ज्या गृहीं कोळसे, गेरु इत्यादिकांनीं विरूपप्राणी किंवा मृतप्राणी यांचीं चित्रें लिहिलीं अथवा कोळसे इत्यादिकांनीं गृहस्वामीचें विकृतचित्र लिहिलें तर तें गृह शीघ्र नाश पावेल ॥७८॥

लूतापटांगशबलंनसंध्ययोःपूजितंकलहयुक्तं ।
नित्योच्छिष्टस्त्रीकंचयद्गृहंतत्क्षयंयाति ॥७९॥

अर्थ–लूता ( मालकार, कोळी ) याच्या तंतूंच्या अवयवांनीं ( कोळिष्टकांनीं ) चित्रित, प्रात सायंसंध्यासमयीं पूजित ( शोभित ) नाहीं, नित्य कलहयुक्त, सर्वकाल उच्छिष्टस्त्रियांनीं युक्त, असें जें गृह तें नाश पावतें ॥७९॥

दृष्टेषुयातुधानेषुनिर्दिशेन्मरकमाशुसंप्राप्तं ।
प्रतिघातायैतेषांगर्गःशांतिंचकारेमां ॥८०॥

अर्थ—प्रत्यक्ष राक्षस पाहिले तर जवळ मरण आलें असें समजावें. या सर्व उत्पातांच्या नाशार्थ गर्गऋषीनें वक्ष्यमाण शांति सांगितली ॥८०॥

महाशांत्योथबलयोभोज्यानिसुमहांतिच ।
कारयेतमहेंद्रंचमाहेंद्रीभिःसमर्चयेत् ॥८१॥

अर्थ—या उत्पातीं गणशांतिप्रमुख महाशांति कराव्या व बलि द्यावे. उत्तम उत्तम भोजनार्थ अन्नेंही द्यावीं. आणि इंद्राणीसहवर्तमान इंद्राची पूजा करावी ८१

॥ इतिशक्रध्वजेंद्रकीलकादिवैकृतं ॥

नरपतिदेशविनाशेकेतोरुदयेथवाग्रहेर्केंद्वोः ।
उत्पातानांप्रभवःस्वर्तुभवश्चाप्यदोषाय ॥८२॥

अर्थ—राजाचा नाश व देशाचा नाश ( शत्रूंनीं देश लुटणें ) हे असतां व धूमकेतूचा ( शेंड्येनक्षत्राचा ) उदय झाला अ०, अथवा सूर्यचंद्राचें ग्रहण झालें अ० उत्पात होतील तर त्या उत्पातांचें अशुभफल होत नाहीं व वक्ष्यमाण स्वऋतूंतील उत्पातांचेंही अशुभफल होत नाहीं ॥८२॥

येचनदोषान्जनयंत्युत्पातास्तानृतुस्वभावकृतान् ।
ऋषिपुत्रकृतैःश्लोकैर्विद्यादेतैःसमासोक्तैः ॥८३॥

अर्थ—जे ऋतुस्वभावकृत उत्पात, ज्या ऋतूमध्यें अशुभफल करीत नाहींत, ते ऋषिपुत्रकृत वक्ष्यमाण संक्षिप्त श्लोकांनीं जाणावे ॥८३॥

वज्राशनिमहीकंपसंध्यानिर्घातनिःस्वनाः ।
परिवेषरजोधूमरक्तार्कास्तमनोदयाः ॥८४॥
द्रुमेभ्योन्नरसस्नेहबहुपुष्पफलोद्गमाः ।
गोपक्षिमदवृद्धिश्चशिवायमधुमाधवे ॥८५॥

अर्थ—वज्र ( वीज ), अशनि ( पाषाणवृष्टि किंवा उल्काभेद ) ( अ० ३३ श्लोक ४ ) भूमिकंप, संध्या ( अ० ३० ), निर्घातशब्द ( अ० ३९ ), परिवेष ( खळें ), धूलि, अरण्यामध्यें धूम, आरक्त सूर्याचे अस्त व उदय, ॥८४॥ वृक्षापासून अन्न, मद्यरस, तैलादिस्नेह, बहुत पुष्पें व फलें ही उत्पन्न होणें; गाई व वृषभ व पक्षी यांस मदवृद्धि ( कामोत्पत्ति ) हीं चैत्र व वैशाख यामध्यें ( वसंतऋतूंत ) शुभ होत ॥८५॥

तारोल्कापातकलुषंकपिलार्केंदुमंडलं ।
अनग्निज्वलनस्फोटधूमरेण्वनिलाहतं ॥८६॥
रक्तपद्मारुणंसांध्यंनभःक्षुब्धार्णवोपमं ।
सरितांचांबुसंशोषंदृष्ट्वाग्रीष्मेशुभंवदेत् ॥८७॥

अर्थ—तारा व उल्का ( अ० ३३ श्लो० ७।८ ) यांच्या पतनानें कलुष ( गढूळ ) झालेलें पिंगटवर्ण आहे सूर्यमंडळ ज्यामध्यें असें, अग्निवांचून ज्वाला, तेणेंकरून शब्द, धूम, धूळ, वायु यांणीं आसमंतात् व्याप्त असें ॥८६॥ तांबड्या कमलासारखें ताम्रवर्ण, क्षुब्धसमुद्रासारखें, असें संध्यासमयीं आकाश व, नद्यांचीं उदकें शुष्क होणें असें पाहून ग्रीष्मऋतूमध्यें शुभ सांगावें ॥८७॥

शक्रायुधपरीवेषविद्युच्छुष्कविरोहणं ।
कंपोद्वर्तनवैकृत्यंरसनंदरणांक्षितेः ॥८८॥
सरोनद्युदपानानांवृद्ध्यूर्ध्वतरणप्लवाः ।
सरणंचाद्रिगेहानांवर्षासुनभयावहं ॥८९॥

अर्थ—इंद्रधनुष्य, परिवेष ( खळें ), वीज, शुष्कवृक्षास पल्लव फुटणें, भूमीचें कंपन, परिवर्तन ( फिरणें ), अन्यस्वरूप, शब्द, गमन, हीं होणें; सरोवरांची वृद्धि, नद्यांचें ऊर्ध्वगमन, वापीकूपादिकांचें प्लवन ( तरणें किंवा बुडीमारणें ), पर्वत व गृहें यांचें सरण ( गमन ) हीं वर्षाऋतूमध्यें भयप्रद होत नाहींत ॥८८।८९॥

दिव्यस्त्रीभूतगंधर्वविमानाद्भुतदर्शनं ।
ग्रहनक्षत्रताराणांदर्शनंचदिवांबरे ॥९०॥
गीतवादित्रनिर्घोषावनपर्वतसानुषु ।
सस्यवृद्धिरपांहानिरपापाःशारदिस्मृताः ॥९१॥

अर्थ—अप्सरा, गंधर्व, विमान, आश्चर्य, यांचें दर्शन; ग्रह, नक्षत्रतारा यांचें दिवसास आकाशामध्यें दर्शन ॥९०॥ वन, पर्वत शिखरें यांचाठाईं गायन व वाद्यें यांचा शब्द होणें; धान्याची वृद्धि व उदकांची हानि ( अल्पत्व ) हीं शरदृतूमध्यें शुभ होत ॥९१॥

शीतानिलतुषारत्वंनर्दनंमृगपक्षिणां ।
रक्षोयक्षादिसत्वानांदर्शनंवागमानुषी ॥९२॥

दिशोधूमांधकाराश्वसनभोवनपर्वताः ।
उच्चैःसूर्योदयास्तौचहेमंतेशोभनाःस्मृताः ॥९३॥

अर्थ–मही, वायु, बर्फ ही होणें; आरण्यपशु व पक्षी याचा शब्द; राक्षस, यक्ष, भूत, प्राणी याचें दर्शन; मनुष्यावाचून भाषण ॥९२॥ आकाश, वन, पर्वत, दिशा हीं धूम व अंधकार यांनीं व्याप्त होणें; सूर्याचे उदय व अस्त हे उच्चस्थानापासून होणें हीं सर्व हेमंतऋतूमध्यें शुभ होत ॥९३॥

हिमपातानिलोत्पाताविरूपाद्भुतदर्शनं ।
कृष्णांजनाभमाकाशंतारोल्कापातपिंजरं ॥९४॥
चित्रगर्भोद्भवाःस्त्रीपुगोजाश्वमृगपक्षिपु ।
पत्रांकुरलतानांचविकाराःशिशिरेशुभाः ॥९५॥

अर्थ–बर्फ पडणें, वायु सुटणें, विरूप व आश्चर्य यांचें दर्शन, काळ्या काजळासारखें व तारा, उल्का यांच्या पतनानें चित्रित, असें आकाश होणें ॥९४॥ स्त्रिया, गाई, मेंढे, अश्व, आरण्यपशु, पक्षी यांचाठाईं नानाप्रकारचे ल० बहुत गर्भ होणें, वृक्षांचीं पानें, अंकुर, वल्ली यांस विकार होणें; हे सर्व शिशिरऋतूमध्यें शुभ हो॥९५

ऋतुस्वभावजाह्येतेदृष्टाःस्वर्तौशुभप्रदाः ।
• ऋतोरन्यत्रचोत्पातादृष्टास्तेभृशदारुणाः ॥९६॥

अर्थ–ऋतुस्वभावज हे उत्पात त्या त्या ऋतूमध्यें पाहिले तर शुभ होत. स्वऋतूवाचून अन्यऋतूंत पाहिले तर हे उत्पात फार अशुभफल देतात ॥९६॥

उन्मत्तानांचयागाथाःशिशूनांभाषितंचयत् ।
स्त्रियोयच्चप्रभाषंतेतस्यनास्तिव्यतिक्रमः ॥९७॥

अर्थ–उन्मत्तांच्या ज्या गाथा ( प्राकृत भाषणें ) तीं, शिशूंचीं जीं भाषणें तीं व स्त्रिया जें भाषण करतील तें, या सर्व भाषणांचा व्यतिक्रम होत नाहीं ल० तें सत्य होतें ॥९७॥

पूर्वंचरतिदेवेषुपश्चाद्गच्छतिमानुषान् ।
नाचोदितावाग्वदतिसत्याह्येषासरस्वती ॥९८॥

अर्थ–ही वाणी प्रथम देवांमध्ये होते, नंतर मनुष्यांप्रत येते. ही वाणी अप्रेरित बोलत नाहीं याकरितां ही सरस्वती ( वाग्देवता ) सत्य आहे ॥९८॥

उत्पातान्गणितविवर्जितोपिवुध्वाविख्यातो भवतिनरेंद्रवल्लभश्च । एतन्मुनिवचनंरहस्य मुक्तंयज्ज्ञात्वाभवतिनरस्त्रिकालदर्शी ॥९९॥

अर्थ—या उत्पातांतें ग्रहगणितावांचूनही जो पुरुष जाणतो तो कीर्तिमान व राजा स प्रिय होतो. हें गोप्यही मुनिवचन सांगीतलें, जें जाणणारा मनुष्य, त्रिकालदर्शी (भूत, भविष्य, वर्तमान या तीन काळाचा जाणणारा) असा, होतो ॥९९॥

॥इतिबृहत्संहितायांउत्पातलक्षणंनामषट्चत्वारिंशोध्यायः ॥४६॥

## ॥ अथमयूरचित्रकं ॥

दिव्यांतरिक्षाश्रयमुक्तमादौमयाफलंशस्तमशोभनंच । प्रायेणचारेषुसमागमेषुयुद्धेषुमार्गादिषुविस्तरेण ॥१॥ भूयोवराहमिहिरस्यनयुक्तमेतत्कर्तुंसमासकृदसावितितस्यदोषः । तज्ज्ञैर्नवाच्यमिदमुक्तफलानुगीतियद्वर्हिचित्रकमितिप्रथितंवरांगं ॥२॥ स्वरूपमेवतस्यतत्प्रकीर्तितानुकीर्तनं । ब्रवीम्यहंनचेदिदंतथापिमेत्रवाच्यता ॥३॥

अर्थ—मी प्रथम दिव्य (ग्रहनक्षत्राश्रय) व अंतरिक्ष (उल्कानिर्घाताद्याश्रय) असें शुभाशुभफल बहुतकरून सूर्यादि ग्रहचार, चारग्रहयोग, ग्रहयुद्ध, ग्रहमार्ग इत्यादिकांमध्यें विस्तारानें सांगीतलें ॥१॥ हें पूर्वोक्त सर्व पुन: सांगणें वराह मिहिराचार्यांस योग्य नव्हे; कारण हा आचार्य संक्षेप करणारा आहे. वास्तव ही त्यास दोष आहे असें पंडितांनीं बोलूं नये. हें जें श्रेष्ठ मयूरचित्रक तें उक्तफलाचेंच कथन असें प्रसिद्ध आहे ॥२॥ त्या मयूरचित्रकाचें स्वरूप, पूर्वोक्ताचेंच कथन करणें हेंच आहे. वास्तव मी हें मयूरचित्र न सांगीतलें तथापि माझी याविषयीं वाच्यता (अपकीर्ति) होईल ॥३॥

उत्तरवीथिगताद्युतिमंतःक्षेमसुभिक्षशिवायस
मस्ताः । दक्षिणमार्गगताद्युतिहीनाःक्षुद्भयत
स्करमृत्युकरास्ते ॥४॥

अर्थ—नागा, गजा, ऐरावता ( अ० ९ श्लोक १ ) या उत्तरमार्गांत रहाणारे व तेजस्वी असे सर्व ग्रह असतील तर कल्याण, सुभिक्ष, सुख हीं होतात. मृगा, अजा, दहना, या दक्षिणमार्गांत रहाणारे व तेजरहित सर्व ग्रह असतील तर ते दुर्भिक्ष, चोर, मृत्यु यांतें करतात. वृषभा, गो, जरद्गवा या मध्यमार्गांत सर्व ग्रह असतील तर मध्यम फल होतें ॥४॥

कोष्ठागारगतेभृगुपुत्रेपुष्यस्थेचगिरांप्रभविष्णौ ।
निर्वैराःक्षितिपाःसुखभाजःसंहृष्टाश्चजनागतरोगाः ५

अर्थ—कोष्ठागार ( मघा ) नक्षत्रीं शुक्र व पुष्यनक्षत्रीं गुरु असे असतील तर राजे गतवैर व सुखी होतील. लोक आनंदित व रोगरहित होतील ॥५॥

पीडयंतियदिकृत्तिकांमघांरोहिणींश्रवणमैंद्रमेववा ।
प्रोह्यसूर्यमपरेग्रहास्तदापश्चिमादिगनयेनपीडयते।६॥

अर्थ—सूर्यावांचून सर्व ग्रह जर कृत्तिका, मघा, रोहिणी, श्रवण, ज्येष्ठा या नक्षत्रांतें दक्षिणमार्गगमनानें, योगतारेच्या आच्छादनानें किंवा भेदनानें पीडा करतील तर पश्चिमदिशा अनीतीनें पीडित होते ह० पश्चिमदिशेकडे अन्याय होतात ॥६॥

प्राच्यांचेत्ध्वजवदवस्थितादिनांतेप्राच्यानांभ
वतिहिविग्रहोनृपाणां । मध्येचेद्भवतिहिम
ध्यदेशपीडारूक्षैस्तैर्नतुरुचिरैर्मयूखवद्भिः ॥७॥

अर्थ—सायंकालीं पूर्वेकडे सर्व ग्रह ध्वजाकारखे असतील तर पूर्वदिशेकडील राजांचें युद्ध होईल. आकाशमध्यभागीं असतील तर मध्यदेशास पीडा होईल; परंतु ते ग्रह रूक्ष ( रखरखीत ) असतील तर निर्मल व किरणयुक्त असतील तर पूर्वोक्त युद्ध न पीडा होणार नाहीं ॥७॥

दक्षिणांककुभमाश्रितैस्तुतैर्दक्षिणापथपयोमु
चांक्षयः । हीनरूक्षतनुभिश्चविग्रहःस्थूलदेह
किरणान्वितैःशुभं ॥८॥

अर्थ–ते सर्व ग्रह दक्षिणदिशेकडे असतील तर दक्षिणदिशेकडील मेघांचा नाश होतो. ते ग्रह अल्प व कलुषबिंब असतील तर युद्धें होतील व स्थूलबिंब तेजस्वी असतील तर कल्याण होईल ॥८॥

**उत्तरमार्गेस्पष्टमयूखाःशांतिकरास्तेतन्नृपतीनां ।**
**ऱ्हस्वशरीराभस्मसवर्णादोषकराःस्युर्देशनृपाणां ॥९॥**

अर्थ–ते ग्रह उत्तरमार्गी तेजस्वी असतील तर राजांस सुखकारक होतात व अल्पबिंब, भस्मासारखे असतील तर देश व राजे यांस अशुभकारक होतात ॥९॥

**नक्षत्राणांतारकाःसग्रहाणांधूमज्वालाविस्फु**
**लिंगान्विताश्चेत् । आलोकंवानिर्निमित्तंनयां**
**तियातिध्वंसंसर्वलोकःसभूपः ॥१०॥**

अर्थ–नक्षत्रांच्या योगतारा व ग्रहांच्या तारा धूम, ज्वाला, अग्निकण यांहीं युक्त असतील अथवा अभ्रादि निमित्तावांचून दृष्टिगोचर होणार नाहीत तर राजासहवर्तमान सर्व लोकांचा नाश होतो ॥१०॥

**दिविभातियदातुहिनांशुयुगंद्विजवृद्धिरतीवत**
**दाशुशुभा । तदनंतरवर्णरणोर्कयुगेजगतःप्र**
**लयस्त्रिचतुःप्रभृति ॥११॥**

अर्थ–ज्याकाळीं स्वर्गामध्यें दोन चंद्र भासतील त्याकाळीं ब्राह्मणांची अयत वृद्धि शीघ्र होते. दोन सूर्य भासतील तर क्षत्रियांचें युद्ध होतें. तीन चार इत्यादि सूर्य भासतील तर जगताचा प्रलय होतो ॥११॥

**मुनीनभिजितंध्रुवंमघवतश्चभंसंस्पृशन्शि**
**खीघनविनाशकृत्कुशलकर्महाशोकदः । भु**
**जंगभमथस्पृशेद्भवतिवृष्टिनाशोध्रुवंक्षयंव्रज**
**तिविद्रुतोजनपदश्चबालाकुलः ॥१२॥**

अर्थ–सप्तऋषि, अभिजिन्नक्षत्रतारा, ज्येष्ठानक्षत्रतारा यांतें धूमकेतु ( शेंडेनक्षत्र ) स्पर्श करील तर अवर्षण, शुभकर्मनाश, शोक हीं होतील. धूमकेतु आश्लेषानक्षत्रास स्पर्श करील तर निश्चयानें अवर्षण होईल व बालांसह पळून जाऊन लोक नाश पावतील ॥१२॥

प्राग्द्वारेषुचरन्रविपुत्रोनक्षत्रेषुकरोतिचवक्रं ।
दुर्भिक्षंकुरुतेभयमुग्रंमित्राणांचविरोधमवृष्टिं ॥१३॥

अर्थ– पूर्वेकडील कृत्तिकादि सात नक्षत्रीं शनि असून, वक्रगति होईल तर दुर्भिक्ष, मोठें भय, मित्रांचा परस्पर विरोध, अवर्षण हीं करितो ॥१३॥

रोहिणिशकटमर्कनंदनोयदिभिनत्तिरुधिरोथवाशिखी।
किंवदामियदनिष्टसागरेजगदशेषमुपयातिसंक्षयं १४

अर्थ–रोहिणीशकटातें, शनि किंवा भौम अथवा केतु, हे ग्रह भेदन करतील तर दुःखसागरामध्यें सर्व जगत् नाश पावेल, यांत काय आश्चर्य ॥१४॥

उदयतिसततंयदाशिखीचरतिभचक्रमशेषमेववा ।
अनुभवतिपुराकृतंतदाफलमशुभंसचराचरंजगत् १५.

अर्थ–धूमकेतु निरंतर उदय पावेल व सर्व नक्षत्रचक्रामध्यें फिरेल तर, सर्व जगत् पूर्वजन्मार्जित पापाचें फळ अनुभवितें ॥१५॥

धनुःस्थायीरूक्षोरुधिरसदृशःक्षुद्भयकरोबलो
योगंचेंदुःकथयतिजयंज्यास्यचयतः । अवा
क्शृंगोगोघ्नोनिधनमपिसस्यस्यकुरुतेज्वलन्
धूमायन्वानृपतिमरणायैवभवति ॥१६॥

अर्थ–धनुष्यासारखा, रूक्ष ( अनिर्मल ), रक्तवर्ण असा चंद्र दुर्भिक्ष, सैन्याचा उद्योग ( युद्ध ) कारक होय. धनुष्याकृति चंद्राची दोरी जिकडे असेल तिकडील राजांचा जय होतो. चंद्राचीं खालीं शृंगें असतील तर गाईंचा नाश व धान्यनाश होतो. ज्वाला व धूम यांणीं युक्त चंद्र असेल तर राजास मृत्यु होतो ॥१६॥

स्निग्धःस्थूलःसमशृंगोविशालस्तुंगश्चोदग्विच
रन्नागवीथ्यां । दृष्टःसौम्यैरशुभैर्विप्रयुक्तोलो
कानंदंकुरुतेतीवचंद्रः ॥१७॥

अर्थ–निर्मल, स्थूल, समशृंग, विस्तीर्ण, उच्च, उत्तरेकडे नागवीथींत ( अ० ९ श्लोक १ ) गमन करणारा, शुभग्रहांनीं दृष्ट, पापग्रहरहित असा चंद्र लोकांस अमित आनंद करितो ॥१७॥

पित्र्यमैत्रपुरुहूतविशाखात्वाष्ट्रमेत्यचयुन क्तिशशांकः । दक्षिणेनन शुभोहितकृत्स्याद्युदकूचरतिमध्यगतोवा ॥१८॥

अर्थ–मघा, अनुराधा, ज्येष्ठा, विशाखा, चित्रा, या नक्षत्रीं चंद्र येऊन दक्षिणदिशेकडून या नक्षत्रांशीं योग करील तर शुभ नव्हे. उत्तरेकडून किंवा मधून योग करील तर शुभ होय ॥१८॥

परिघइतिमेघरेखायातिर्यग्भास्करोदयेस्तेवा । परिधिस्तुप्रतिसूर्योदंडस्त्वृजुरिंद्रचापनिभः ॥१९॥

अर्थ–सूर्याच्या उदयीं किंवा अस्तीं जी अभ्रांची तिर्कस रेषा ती परिघ होय. एक सूर्य असून दुसरा सूर्य दिसतो तो परिधि होय. तो परिधि स्पष्ट व इंद्रधनुष्याचे रंगासारखा असेल तर दंडसंज्ञक होय ॥१९॥

उदयेस्तेवाभानोर्येदीर्घारश्मयस्त्वमोघास्ते । सुरचापखंडमृजुयद्रोहितमैरावतंदीर्घं ॥२०॥

अर्थ–सूर्योदयीं किंवा अस्तीं जे लांब किरण ते अमोघसंज्ञक होत. तुटलेलें व स्पष्ट जें इंद्रधनु तें रोहितसं० होय व लांब इंद्रधनुष्य तें ऐरावतसंज्ञक होय ॥२०॥

अर्धास्तमयात्संध्याव्यक्तीभूतानतारकायावत् । तेजःपरिहानिमुखाद्भानोरर्धोदयंयावत् ॥२१॥ तस्मिन्संध्याकालेचिन्हैरेतैःशुभाशुभंवाच्यं । सर्वैरेतैःस्निग्धैःसद्योवर्षंभयंरूक्षैः ॥२२॥

अर्थ–सूर्याच्या अर्धास्तापासून नक्षत्रें स्पष्ट दिसतपर्यंत सायंसंध्या व नक्षत्रें तेजहीन झाल्यापासून सूर्याचा अर्धोदय होईपर्यंत प्रातःसंध्या होय ॥२१॥ या संध्यासमयीं या वक्ष्यमाणचिन्हांनीं शुभाशुभ बोलावें. हे पूर्वोक्त परिघादि सर्व स्निग्ध असतील तर तत्काल वृष्टि होते व रूक्ष असतील तर भय होतें ॥२२॥

अच्छिन्नःपरिघोवियच्चविमलंश्यामामयूखा रवेःस्निग्धादीधितयःसितंसुरधनुर्विद्युच्चपूर्वोत्तरा । स्निग्धोमेघतरुर्दिवाकरकरैरालिंगितो

**वायदावृष्टिःस्याद्यदिवार्कमस्तसमयेमेघोम हांश्छादयेत् ॥२३॥**

अर्थ–अखंड परिघ, आकाश निर्मल, सूर्याचे किरण श्यामवर्ण, अमोघसंज्ञक किरण स्निग्ध, श्वेत इंद्रधनुष्य, पूर्वोत्तरदिशांकडे वीज, मेघवृक्ष स्निग्ध व सूर्यकिरणांनीं आलिंगित असे हे असतील तर वृष्टि होते अथवा मोठा मेघ, अस्तमानकालीं सूर्याचें आच्छादन करील तर वृष्टि होते ॥२३॥

**खंडोवक्रःकृष्णोन्ह्रस्वःकाकाद्यैर्वाचिन्हैर्विद्धः। यस्मिन्देशेरूक्षश्चार्कस्तत्राभावःप्रायोराज्ञः॥२४॥**

अर्थ–ज्या देशीं खंडित, वांकडा, कृष्णवर्ण, अल्पबिंब, काकादिचिन्हांनीं विद्ध, रूक्ष असा सूर्य दिसेल त्या देशीं बहुतकरून राजाचा नाश होतो ॥२४॥

**वाहिनींसमुपयातिपृष्ठतोमांसभुक्खगगणोयुयुत्सतः। यस्यतस्यबलविद्रवोमहानग्रगैस्तुविजयोविहंगमैः २५**

अर्थ–मांसभक्षक पक्षिसमुदाय ज्या युद्धेच्छु राजाच्या सेनेच्या पाठीमागून जाईल त्या राजाचें सैन्य पळेल ( पराजय होईल ). तेच पक्षी सेनेच्या पुढें असतील तर राजाचा जय होईल ॥२५॥

**भानोरुदयेयदिवास्तमयेगंधर्वपुरप्रतिमाध्वजिनी। विंबनिनिणद्धितदानृपतेःप्राप्तंसमरंसभयंप्रवदेत् २६**

अर्थ–सूर्याच्या उदयीं किंवा अस्तीं गंधर्वनगरासारखी सेना सूर्यबिंब रोधील ( आच्छादील ) तर राजास युद्ध व भय प्राप्त झालें असें सांगावें ॥२६॥

**शस्ताशांतद्विजमृगघुष्टासंध्यास्निग्धामृदुपवनाच। पांशुध्वस्ताजनपदनाशंधत्तेरूक्षारुधिरनिभावा ॥२७॥**

अर्थ–शांत असे पक्षी व आरण्यपशु यांचे शब्द, स्निग्ध ( निर्मल ), अल्पवायु अशी संध्या ( उदयास्तसंध्यासमय ) असेल तर शुभ होय. धुरळ्यानें युक्त, रूक्ष ( मलिन ), रक्तवर्ण अशी संध्या लोकाचा नाश करते ॥२७॥

**यद्विस्तरेणकथितंमुनिभिस्तदस्मिन्सर्वमया निगदितंपुनरुक्तवर्जं। श्रुत्वापिकोकिलरुतंव**

लिभुग्विरौतियत्तत्स्वभावकृतमस्यपिकंनजेतुं २८

अर्थ—गर्गादि ऋषींनीं जें मयूरचित्रकं विस्तरानें सांगीतलें तेंच येथें मी पुनरुक्तिवर्ज्य सर्व सांगीतलें. कोकिळेचा शब्द श्रवण करून कावळाही शब्द करितो. तें त्याचें करणें स्वाभाविकच आहे. कोकिळेला जिंकण्याकरितां नव्हे. तद्वत् हें माझें बोलणें आहे ॥२८॥

॥ इतिवृ०मयूरचित्रकंनामसप्तचत्वारिंशोध्यायः ॥४७॥

## ॥ अथपुष्यस्नानं ॥

मूलंमनुजाधिपतिःप्रजातरोस्तदुपघातसंस्कारात् ।
अशुभंशुभंचलोकेभवतियतोतोनृपतिचिंता ॥१॥

अर्थ—प्रजारूपवृक्षाचें राजा हें मूल होय; यास्तव त्याच्या नाशानें प्रजांचा नाश होतो व राजाच्या वृद्धीनें लोकांचें कल्याण होतें. यास्तव नृपतिवृद्ध्यर्थ चिंता अवश्य करावी ॥१॥

यात्व्याख्याताशांतिःस्वयंभुवासुरगुरोर्महेंद्रार्थे ।
तांप्राप्यवृद्धगर्गःप्राहयथाभागुरेःशृणुत ॥२॥

अर्थ—ब्रह्मदेवानें इंद्रप्रीत्यर्थ बृहस्पतीस जी शांति सांगीतली त्या शांतीतें वृद्धगर्गऋषि प्राप्तहोऊन, भागुरिनामक शिष्यास सांगता झाला. ती शांति श्रवणकरा २

पुष्यस्नानंनृपतेःकर्तव्यंदैववित्पुरोधाभ्यां ।
नातःपरंपवित्रंसर्वोत्पातांतकरमस्ति ॥३॥

अर्थ—दैवज्ञ व उपाध्याय यांणीं राजास पुष्यस्नान करवावें. या पुष्यस्नानाहून दुसरें पवित्र व सर्व उत्पातांचें नाश करणारें नाहीं ॥३॥

श्लेष्मातकाक्षकंटकिकटुतिक्तविगंधिपादपविहीने ।
कौशिकगृध्रप्रभृतिभिरनिष्टविहगैःपरित्यक्ते ॥४॥
तरुणतरुगुल्मवल्लीलताप्रतानावृतेवनोद्देशे ।
निरुपहतपत्रपल्लवमनोज्ञमधुरद्रुमप्राये ॥५॥

अर्थ—भोकरी, बिब्बा, खदिरादि काट्यांचे वृक्ष, मरीच्यादि कटु, निंबादि तिक्त, सुगंधिरहित अशा वृक्षांनीं रहित, घुबड, गृध्र, इत्यादि अशुभपक्ष्यांनीं त्यक्त ॥४॥ नवीन वृक्षाच्या खांद्या, वेलींच्या समुदायानी वेष्टित व चांगल्या पानांनीं सुंदर व मधुर असे आहेत वृक्ष बहुत ज्यामध्यें अशा वनामध्यें पुष्यस्नान करावें ॥५॥

कृकवाकुजीवजीवकशुकशिखिशतपत्रचापहारीतैः ।
क्रकरचकोरकपिंजलवंजुलपारावतश्रीकैः ॥६॥
कुसुमरसपानमत्तद्विरेफपुंस्कोकिलादिभिश्चान्यैः ।
विरुतेवनोपकंठेक्षेत्रागारेशुचावथवा ॥७॥

अर्थ—कोंबडा, जीवजीवक ( पक्षिवि० ) शुक, मयूर, शतपत्र ( चंदनीपोपट, ) चाष, हारीत ( हिरवाखबुदर, ) क्रकर ( पक्षिवि० ) चकोर, कपिंजल ( पक्षिवि० ) वंजूल ( पक्षिवि० ) पारवा, श्रीक ( पक्षिवि० ) या पक्ष्यांनीं युक्त ॥६॥ पुष्परसा च्या पानानें मत्त जे भ्रमर व कोकिळ व अन्यही पक्ष्यांनीं शब्दित ( नादित ) अशा अरण्याजवळ अथवा शुद्धक्षेत्रीं गृहामध्यें पुष्यस्नान करावें ॥७॥

ऱ्हदिनीविलासिनीनांजलखगनखविक्षतेषुरम्येषु ।
पुलिनजघनेषुकुर्याद्दृङ्मनसोःप्रीतिजननेषु ॥८॥

अर्थ—अथवा नद्या ह्याच स्त्रिया यांच्या जलपक्ष्यांच्या नखांनीं क्षतें केलेलीं सुंदर, चक्षु व मन यास आनंदकारक अशीं तीरें हींच जघनें ( कटिप्रदेश ) यांचाठाईं पुष्यस्नान करावें ॥८॥

प्रोत्प्लुतहंसच्छत्रेकारंडवकुररसारसोद्गीते ।
फुल्लेंदीवरनयनेसरसिसहस्त्राक्षकांतिधरे ॥९॥

अर्थ—अथवा उडणारे हंस हेच आहेत छत्रें ज्याचेठाईं असें, कारंडव, कुरर, सारस या पक्षिविशेषांचें आहे गायन ज्याचाठाईं असें, फुलेलीं कमळें आहेत नयनें ज्या चीं असें, इंद्राच्या तेजातें धारण करणारें असें जें सरोवर त्याचाठाईं पुष्यस्नान करावें ॥९॥

प्रोत्फुल्लकमलवदनाःकलहंसकलस्वनप्रभाषिण्यः ।
प्रोत्तुंगकुड्मलकुचायस्मिन्नलिनीविलासिन्यः ॥१०॥

अर्थ—अथवा प्रफुल्लित कमलें हींच आहेत मुखें ज्यांची अशा, कलहंसपक्ष्यांचे मधुर

अर्थ—आवाहित देवतांची पूजा करून दैवज्ञ, अमात्य, पुरोहित यांणीं त्या रात्री शुभाशुभस्वप्न पहाण्यासाठीं तेथें रहावें. तो स्वप्नविधि यात्राप्रकरणीं सांगितला आहे ॥२२॥

अपरेऽहनिप्रभातेसंभारानुपहरेद्यथोक्तगुणान् ।
गत्वावनिप्रदेशेश्लोकाश्चाप्यत्रमुनिगीताः ॥२३॥

अर्थ—दुसऱ्यादिवशीं प्रातःकाळीं यथोक्तगुण ( जशी सांगितली तशी ) सामग्री (साहित्य) मिळवावी आणि पूर्वोक्त पवित्रस्थळीं जाऊन काय करावें याविषयीं गर्गऋषींनें श्लोक सांगितले आहेत ॥२३॥

तस्मिन्मंडलमालिख्यकल्पयेत्तत्रमेदिनीं ।
नानारत्नाकरवतींस्थानानिविविधानिच ॥२४॥
पुरोहितोयथास्थानंनागान्यक्षान्सुरान्पितॄन् ।
गंधर्वाप्सरसश्चैवमुनीन्सिद्धांश्चविन्यसेत् ॥२५॥
ग्रहांश्चसहनक्षत्रैरुद्रांश्चसहमातृभिः ।
स्कंदंविष्णुंविशाखंचलोकपालान्सुरस्त्रियः ॥२६॥
वर्णकैर्विविधैःकृत्वाहृद्यैर्गंधगुणान्वितैः ।
यथास्वंपूजयेद्विद्वान्गंधमाल्यानुलेपनैः ॥२७॥
भक्ष्यैरन्यैश्चविविधैःफलमूलामिषैस्तथा ।
पानकैर्विविधैर्हृद्यैःसुराक्षीरासवादिभिः ॥२८॥

अर्थ—त्या पवित्र स्थळीं मंडल करून भूमि पुण्यस्नानाविषयीं कल्पावी. ती अनेक रत्नसमुदायांनीं युक्त असावी. तेथें अनेक देवतेंचीं स्थानें करावीं ॥२४॥ पुरोहितानें यथायोग्यस्थानीं नाग, यक्ष, देव, पितर, गंधर्व, अप्सरा, मुनि, सिद्ध, हे स्थापावे ॥२५॥ तसेंच अश्विन्यादि नक्षत्रसहित नवग्रह, मातृगणासहवर्तमान एकादशरुद्र, स्कंद, विष्णु, विशाख, इंद्रादिलोकपाल, देवस्त्रिया, या देवतेंचें स्थापन करून ॥२६॥ नानाप्रकारच्या वर्णांना, मनोहर व सुगंधयुक्त, सुगंधमाल्यें, अनुलेपनें यांहींकरून विद्वान्पुरोहितानें यथास्थानीं पुजा करावी ॥२७॥ नानाप्रकारचीं भक्ष्य फळें, मूळें, मांसें, तशींच नानाप्रकारची मनोहर सुरा, क्षीर, मद्य यांणीं पूजा करावी ॥२८॥

कथयाम्यतःपरमहंपूजामस्मिन्यथाभिलिखितानां ।

ग्रहयज्ञेयःप्रोक्तोविधिर्महाणांसकर्तव्यः ॥२९॥
मांसौदनमद्याद्यैःपिशाचदितितनयदानवाःपूज्याः ।
अभ्यंजनांजनतिलैःपितरोमांसौदनैश्चापि ॥३०॥
सामयजुर्भिर्मुनयस्त्वृग्भिर्गंधैश्चधूपमाल्ययुतैः ।
अश्लेषकवर्णैस्त्रिमधुरेणचाभ्यर्चयेन्नागान् ॥३१॥
धूपाज्याहुतिमाल्यैर्विबुधान्रत्नैःस्तुतिप्रणामैश्च ।
गंधर्वानप्सरसोगंधैर्माल्यैश्चसुसुगंधैः ॥३२॥
शेषांस्तुसार्ववर्णिकबलिभिःपूजांन्यसेच्चसर्वेषां ।
प्रतिसरवस्त्रपताकाभूषणयज्ञोपवीतानि ॥३३॥

अर्थ—या मंडळीं स्थापित देवतांचें पूजन यानंतर मी सांगतों. यात्राप्रकरणीं ग्रहयज्ञामध्यें जो ग्रहांचा विधि ( पूजादि) सांगितला तो येथें करावा ॥२९॥ मांस, ओदन, मद्य इत्यादिकेंकरून पिशाच, देव, दैत्य यांची पूजा करावी. तैलाभ्यंग, कज्जल, तिळ व मांसौदन यांहींकरून पितरांची पूजा करावी ॥३०॥ साम, यजुष्, ऋग् या तीन वेदांतील मत्रांनीं व गंध, धूप, माल्य यांणीं ऋषींची पूजा करावी. बहुत रंगांचा संयोग नाहीं अशा रंगांनीं व त्रिमधुर (मध, घृत, शर्करा ) यांहीं करून सर्पांची पूजा करावी ॥३१॥ धूप, घृताहुति, माल्य, रत्नें, स्तुति, नमस्कार यांहींकरून देवांची पूजा करावी. गंध, सुगंधिपुष्पें यांहींकरून गंधर्व, अप्सरा यांची पूजा करावी ॥३२॥ सर्व पदार्थांचा बळि यांणें शेष राहिलेले जे यक्षादिक त्यांची पूजा करावी. रंगवलेलें वस्त्र, पताका, अलंकार, यज्ञोपवीत हीं सर्व देवतांस द्यावीं ॥३३॥

मंडलपश्चिमभागेकृत्वाग्निंदक्षिणेथवावेद्यां ।
आदद्यात्संभारान्दर्भान्दीर्घानगर्भांश्च ॥३४॥
लाजाज्याक्षतदधिमधुसिद्धार्थकगंधसुमनसोधूपान् ।
गोरोचनांजनतिलान्स्वर्तुजमधुराणिचफलानि ॥३५॥
सघृतस्यपायसस्यचतत्रशरावाणितैश्चसंभारैः ।
पश्चिमवेद्यांपूजांकुर्यात्स्नानस्यसावेदी ॥३६॥

अर्थ—मंडलाच्या पश्चिमेकडे अथवा दक्षिणेकडे वेदीवर अग्निस्थापन करून साहित्य आणावें. लांब व निरनिराळे केलेले असे दर्भ ॥३४॥ लाह्या, घृत, अक्षता,

दधि, मध, सर्षप, गंध, पुष्पें, धूप, गोरोचन, कज्जल, तिल, त्या ऋतूंतील मधुर फलें ॥३५॥ घृतसहित पायस भरलेलीं मृन्मय पात्रें, हें सर्व साहित्य तेथें आणावें आणि त्या समारंभानें ( साहित्यानें ) पश्चिमवेदीचाठाईं देवतांची पूजा करावी. तीवेदी पुष्यस्नानाची होय ॥३६॥

तस्याःकोणेषुदृढान्कलशान्सितसूत्रवेष्टितग्रीवान् ।
सक्षीरवृक्षपल्लवफलापिधानान्व्यवस्थाप्य ॥३७॥
पुष्यस्नानविमिश्रेणापूर्णानंभसासरत्नांश्च ।
पुष्यस्नानद्रव्याण्यादयाद्गर्गगीतानि ॥३८॥

अर्थ—त्या वेदीच्या कोनावर दृढ ( अच्छिद्र ), पांढरें सूत गळ्यास बांधलेलें असे, दृढ इत्यादि क्षीरवृक्षाचे पल्लव व फलें यांणीं आच्छादित असे कलश ठेवावे ३७ व त्या कलशांत पुष्यस्नानाचीं द्रव्यें घालून उदकानें पूर्ण करून ते रत्नांनीं युक्त करावे. । पुष्यस्नानाचीं द्रव्यें गर्गऋषीनें सांगीतलीं आहेत तीं आणावीं. ( तीं गर्गोक्त द्रव्यें पुढें सांगतों ) ॥३८॥

ज्योतिष्मतींत्रायमाणामभयामपराजितां ।
जीवांविश्वेश्वरींपाठांसमंगांविजयांतथा ॥३९॥
सहांचसहदेवींचपूर्णकोशांशतावरीं । अरि
ष्टिकांशिवांभद्रांतेषुकुंभेषुविन्यसेत् ॥४०॥
ब्राह्मींक्षेमामजांचैवसर्वबीजानिकांचनं । मंग
ल्यानियथालाभंसर्वौषध्योरसांस्तथा ॥४१॥
रत्नानिसर्वगंधांश्चबिल्वंचसविकंकतं । प्रश
स्तनाम्न्यश्चौषध्योहिरण्यंमंगलानिच ॥४२॥

अर्थ—माल्कांगोणी, त्रायमाणा, हरडा, शमी, बेसड, विश्वेश्वरी ( व. वि. ), गुग्गुळ, रक्तमांजिष्ठ, रक्तरेलड, सहा ( रानमूग ), बाघाटी, पूर्णकोशा ( व. वि. ), शतावरी, कडुनिंब, शिवा ( पुनर्नवा ), भद्रा ( शिवण, सोमलता ), ब्राह्मी, चोरओंवा, अजा ( एडकाक्षी ), सर्वबीजें, सुवर्ण, दध्यक्षतादि मंगलद्रव्यें ( मिळतील तीं ) सर्वौषधि, सर्व रस, रत्नें, सर्वगंध, बिल्वफल, विकंकतफल, शुभनामक औषधि, सुवर्णादि धातु, गोरोचनादि मंगल औषधि, हे सर्व पदार्थ पूर्वस्थापित कुंभामध्यें घालावे ॥३९॥४०॥४१॥४२॥

आदावनडुहश्चर्मजरयासंहतायुपः । प्रशस्त
लक्षणभृतःप्राचीनग्रीवमास्तरेत् ॥४३॥
ततोवृषस्ययोधस्यचर्मरोहितमक्षतं । सिंह
स्याथतृतीयंस्याद्व्याघ्रस्यचततःपरं ॥४४॥
चत्वार्येतानिचर्माणितस्यांवेद्यामुपास्तरेत् ।
शुभेमुहूर्तेसंप्राप्तेपुष्ययुक्तेनिशाकरे ॥४५॥

अर्थ—ज्ञातारा होऊन मेलेला, गोलक्षणोक्त शुभलक्षणयुक्त अशा बैलाचें कातडें पूर्वेकडे मान करून प्रथम वेदीवर घालावें ॥४३॥ तदनंतर युध्दकरणाऱ्या बैलाचें लोहितवर्ण व अच्छिद्र असें दुसरें कातडें घालावें. तिसरें सिंहाचें कातडें घालावें. चवथें व्याघ्राचें कातडें घालावें ॥४४॥ हीं चार कातडीं पुष्यनक्षत्रीं चंद्र असून शुभमुहूर्तीं वेदीवर घालावीं ॥४५॥

भद्रासनमेकतमेनकारितंकनकरजतताम्राणां ।
क्षीरतरुनिर्मितंवाविन्यस्यंचर्मणामुपरि ॥४६॥
त्रिविधस्तस्योच्छ्रायोहस्तःपादाधिकोर्धयुक्तश्च ।
मांडलिकानंतरजित्समस्तराज्यार्थिनांशुभदः ॥४७

अर्थ—सुवर्ण, रुपें, तांबें यातून एकाद्या धातूचें अथवा क्षीरवृक्षाचें भद्रासन करून त्या चर्मावर ठेवावें ॥४६॥ त्या भद्रासनाची तीनप्रकारची उंची असावी मांडलिक राजास हस्तपरिमित, सवाहात ( अंगुळे ३० ) जयेच्छुराजास, दीड हात सर्व राज्य इच्छिणारास, असें त्रिविध भद्रासन शुभसूचक होतें ॥४७॥

अंतर्धायहिरण्यंतत्रोपविशेन्नरेश्वरःसुमनाः ।
सचिवाप्तपुरोहितदैवपौरकल्याणनामवृतः ॥४८॥

अर्थ—त्या भद्रासनीं मध्यें सुवर्ण घालून शुद्ध मन करून व प्रधान, आप्त, पुरोहित, दैवज्ञ, नागरिक जन हे शुभ नावाचे ( जयराज, सिंहराज, व्याघ्रराज इ० ) यांहीं वेष्टित अशा राजानें त्या भद्रासनावर बसावें ॥४८॥

वंदिजनपौरविप्रप्रघुष्टपुण्याहवेदनिर्घोषैः ।
समृदंगशंखतूर्यैर्मंगलशब्दैर्हतानिष्टः ॥४९॥

अर्थ—स्तुतिपाठक, नागरिक लोक, ब्राह्मण यांनीं केलेला जो शुभशब्द व वेदघोष यांहींकरून व मृदंग, शंख, वाद्यें व मंगलशब्द यांहींकरून नष्ट झालें आहे अशुभ ज्याचें अशा राजानें भद्रासनावर बसावें ॥४९॥

अहतक्षौमनिवसनंपुरोहितःकंवलेनसंछाद्य ।
कृतवलिपूजंकलशैरभिषिंचेत्सर्पिषापूर्णैः ॥५०॥

अर्थ—नवें क्षौम (रेशीम) वस्त्र धारण केलेला, बलि व पूजा केली ज्याणें अशा राजास, शालीनें आच्छादन करून पुरोहितानें घृतपूर्णकलशांनीं अभिषेक करावा५०

अष्टावष्टाविंशतिरष्टशतंवापिकलशपरिमाणं ।
अधिकेधिकेगुणोत्तरमयंचमंत्रोत्रमुनिगीतः ॥५१॥

अर्थ—आठ, अठ्ठावीस, अष्टाधिकशत इतके कलश असावे. जितके अधिक असतील तितके गुणाधिक्य जाणावें. या आज्याभिषेकीं हा वक्ष्यमाण मंत्र गर्गऋषीनें सांगीतला आहे ॥५१॥

आज्यंतेजःसमुद्दिष्टमाज्यंपापहरंपरं ।
आज्यंसुराणामाहारआज्येलोकाःप्रतिष्ठिताः ५२
भौमांतरिक्षदिव्यंचयत्तेकिल्बिषमागतं ।
सर्वंतदाज्यसंस्पर्शात्प्रणाशमुपगच्छतु ॥५३॥

अर्थ—घृत हें देवांचें तेज होय. घृत अत्यंत पापहरण करणारें होय. घृत देवांचा आहार होय. घृताचाठाईं भूर्भुवादि लोक प्रतिष्ठित (स्थापन केले) ॥५२॥ ग्रहनक्षत्रादिकांपासून झालेलें दिव्य, उल्कादिकांपासून झालेलें अंतरिक्ष, चरस्थिरापासून झालेलें भौम असें त्रिविध प्राप्त झालेलें अशुभ तें सर्व घृतस्पर्शानें नाशाप्रत पावो (हा मंत्रार्थ) ॥५३॥

कंवलमपनीयततःपुष्यस्नानांबुभिःसफलपुष्पैः ।
अभिषिंचेन्मनुजेंद्रंपुरोहितोनेनमंत्रेण ॥५४॥

अर्थ—घृताभिषेकानंतर शाल काढून फलपुष्पानीं सहित अशा पुष्यस्नानाच्या उदकानीं राजाप्रत पुरोहितानें या वक्ष्यमाणमंत्रांनीं अभिषेक करावा ॥५४॥

सुरास्त्वामभिषिंचंतुयेचसिद्धाःपुरातनाः ।
ब्रह्माविष्णुश्चशंभुश्चसाध्याश्चसमरुद्गणाः ॥५५॥

जगन्मित्र छापखान्यांत पुस्तकें विकत मिळतात तीं —

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ≈॥। | रामरक्षा | | पूजेचे अभंग. | ≈॥ | द० म० कोष्टकें |
| ≈॥। | गोपिगीत. | ≈॥। | सोळा सोमवारकथा | ≈॥ | चर्पटपंजरिका |
| ≈॥। | रुक्मिणी स्वयंवर व सुभद्राहरण आर्या | ≈॥। | चित्रें. | ≈॥ | नौकाक्रीडन |
| | | ≈॥ | मंगलाष्टकें नवग्रहाची | ≈॥ | कऱ्हाडे ब्राह्मणाचे प्रवर. |
| ≈॥। | अंगदशिष्टाई. | ≈॥ | गुरुचरित्र ओंव्या ६२ | | |
| ≈॥। | वास्तुप्रकरणी कोष्टक | ≈॥ | ज्ञानेश्वरसाधुकृत खेळ | ≈॥ | शिवस्तुति |
| ≈॥। | ध्रुवाख्यान | ≈॥ | भीष्मप्रतिज्ञा | ≈॥ | गणपतीचे श्लोक |
| ≈॥। | तुकारामकृत मानस | ≈॥ | सीतास्वयंवर | ≈। | दुर्गास्तोत्र. |

Registered No 29 of 1873

# सूचना.

विद्वान्, उदार, परोपकारी आणि श्रीमान् इत्यादि सद्गृहस्थांस आम्ही विनयपूर्वक असें सुचवितों की, या ग्रंथाचा राजापासून रंकापर्यंत सर्वांस विशेष उपयोग होईल, असें समजून प्राकृत ( मराठी ) टीकेसह लोकहितो- देशानें हें पुस्तक छापण्याचें काम सुरू केलें आहे. यास वर्गणीद्वारा साह्य करून, ते पूर्ण करणें सुज्ञ देशाभिमान्यांकडे आहे.

वर्गणीचे दर

| | किमत | हाशील |
|---|---|---|
| आगाऊ किंवा अंक पोंचतांच दिल्यास दर अंकास | ८ आणे | ६ पै |
| मागाहून दिल्यास दर अंकास | १० आणे | ६ पै |

किमतीबद्दल टिकिटा पाठविणे झाल्यास अर्धा आणा दराच्या पाठवाव्या.

मुंबईंत ठाकुरद्वारानजीक हरिबाबाचे चाळींत रा० रा० नारोकृष्ण दुमाल्ये याजकडे पैसा जमा करून त्याची पावती घ्यावी.

---

## आश्रयदात्यांस विनंती.

---

**या अंकासुद्धां या पुस्तकाचे आठ अंक निघाले. ज्याणीं जाहिरातीप्रमाणें आगाऊ किंमत जमा केली नाहीं, त्याणी हा अंक पोंचतांच आठ अंकांबद्दल किंमत रुपये ५ व हांशिलाबद्दल ४ आणे एकूण सव्वापांच रुपये कृपाकरून लौकर पाठवावे.**

श्री

# बृहत्संहिता

(वराह मिहिरकृत)

मूळश्लोक संस्कृत असून त्यांचा अर्थ प्राकृत (महाराष्ट्र) भाषेंत लिहिला आहे.

# THE BRIHATSANHITA

[BY VARAHA-MIHIRA]

यांत व्यवहारोपयोगी सर्वप्रकारचे विषय आहेत.

पुस्तक १ लें. तारीख २५ जानेवारी १८७४. अंक ९

VOL I 25th JANUARY 1874. No. 9

रत्नागिरी

येथे

जनार्दन हरि आठल्ये

यांणी

आपल्या

जगन्मित्र छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केले.

---

प्रत्येक अंकांत मोठ्या तक्तीचे सोप्या अक्षरांनी १२ पृष्ठें असून सुमारे ८०० ग्रंथ येत आहे.

आदित्यावसवोरुद्राअश्विनौचभिषग्वरौ।
अदितिर्देवमाताचस्वाहासिद्धिःसरस्वती ॥५६॥
कीर्तिर्लक्ष्मीर्धृतिःश्रीश्चसिनीवालीकुहूस्तथा।
दनुश्चसुरसाचैवविनताकद्रुरेवच ॥५७॥
देवपत्न्यश्चयानोक्तादेवमातरएवच।
सर्वास्त्वामभिषिंचंतुदिव्याश्चाप्सरसांगणाः ॥५८॥
नक्षत्राणिमुहूर्ताश्चपक्षाहोरात्रसंधयः।
संवत्सरादिनेशाश्चकलाःकाष्ठाःक्षणालवाः ॥५९॥
सर्वेत्वामभिषिंचंतुकालस्यावयवाःशुभाः।
वैमानिकाःसुरगणामनवःसागरैःसह ॥६०॥
सप्तर्षयःसदाराश्चध्रुवस्थानानियानिच।
मरीचिरत्रिःपुलहःपुलस्त्यःक्रतुरंगिराः ॥६१॥
भृगुःसनत्कुमारश्चसनकोथसनंदनः।
सनातनश्चदक्षश्चजैगीषव्योभगंदरः ॥६२॥
एकतश्चद्वितश्चैवत्रितोजाबालिकश्यपौ।
दुर्वासादुर्विनीतश्चकण्वःकात्यायनस्तथा ॥६३॥
मार्कंडेयोदीर्घतपाःशुनःशेफोविदूरथः।
ऊर्वःसंवर्तकश्चैवच्यवनोत्रिःपराशरः ॥६४॥
द्वैपायनोयवक्रीतोदेवराजःसहानुजः।
एतेचान्येचमुनयोवेदव्रतपरायणाः ॥६५॥
सशिष्यास्तेभिषिंचंतुसदाराश्चतपोधनाः।
पर्वतास्तरवोवल्यःपुण्यान्यायतनानिच ॥६६॥
सरितश्चमहाभागानागाःकिंपुरुषास्तथा।
वैखानसामहाभागाद्विजावैहायसाश्चये ॥६७॥
प्रजापतिर्दितिश्चैवगावोविश्वस्यमातरः।

वाहनानिचदिव्यानिसर्वलोकाश्चराचराः ॥६८॥
अग्निश्चःपितरस्ताराजीमूताःखंदिशोजलं ।
एतेचान्येचबहवःपुण्यसंकीर्तनाःशुभाः ॥६९॥
तोयैस्त्वामभिषिंचंतुसर्वोत्पातनिवर्हणैः ।
कल्याणंतेप्रकुर्वंतुआयुरारोग्यमेवच ॥७०॥

अर्थ--( या अभिषेकमंत्रश्लोकाचा अर्थ सुबोध आहे तथापि मदबुद्धींस समजण्या करितां कांहीं सांगतो ) हेराजा, देव तुजप्रत अभिषेक करोत. जे सिद्धदेव, पुरातन ब्रह्मा, विष्णु, शिव, साध्यदेव, मरुद्गण, ॥५५॥ द्वादशादित्य, अष्टवसु, एकादशरुद्र, वैद्यश्रेष्ठ दोन अश्विनीकुमार, देवमाता अदिति, स्वाहा, सिद्धि, सरस्वती, ॥५६॥ कीर्ति, लक्ष्मी, धृति, श्री, सिनीवाली, कुहू, दनु, सुरसा, विनता, कद्रु, ॥५७॥ अनुक्त ज्या देवस्त्रिया त्या, देवांच्या माता, दिव्य अप्सरोगण, या सर्व तुजप्रत अभिषेक करोत ॥५८॥ अश्विन्यादि नक्षत्रें, मुहूर्त, पक्ष, अहोरात्र, संध्या, संवत्सर, दिनेश (वार), कला, काष्ठा, क्षण, लव, ॥५९॥ हे सर्व शुभकालाचे अवयव, तुजप्रत अभिषेक करोत. वैमानिक देवगण, मनु, समुद्र, ॥६०॥ स्त्रियांसहवर्तमान सप्तर्षि, स्थिरस्थानें, मरीचि, अत्रि, पुलह, पुलस्त्य, क्रतु, अंगिरा, ॥६१॥ भृगु, सनत्कुमार, सनक, सनंदन, सनातन, दक्ष, जैगीषव्य, भगंदर, ॥६२॥ एकत, द्वित, त्रित, जाबालि, कश्यप, दुर्वास, दुर्विनीत, कण्व, कात्यायन, ॥६३॥ मार्कंडेय, दीर्घतपा, शुनःशेफ, विदूरथ, ऊर्व, संवर्तक, च्यवन, अत्रि, पराशर, ६४ व्यास, यवक्रीत, इंद्र, इंद्रानुज ( वामन ), हे व अन्यही वेदव्रताविषयीं तत्पर, तपस्वी, असे ऋषि शिष्यांसहवर्तमान व स्त्रियांसहवर्तमान तुला अभिषेक करोत. पर्वत, वृक्ष, वल्ली, पवित्रस्थानें, ॥६५॥६६॥ नद्या, महाभागसर्प, किंपुरुष, वैखानस, ब्राह्मण, वैहायस, ॥६७॥ प्रजापति, दिति, सर्व जगताच्या माता अशा गाई, दिव्यवाहनें, चराचर सर्व लोक, ॥६८॥ अग्नि, पितर, तारा ( नक्षत्र ), मेघ, आकाश, दिशा, जल, हे व सर्व पुण्यकीर्तन, पवित्र, ॥६९॥ सर्व उत्पातांचीं नाशकारक अशा उदकांनीं तुजप्रत अभिषेक करोत आणि तुझें कल्याण व आयुष्य व आरोग्य करोत ॥७०॥

इत्येतैश्चान्यैश्चाप्यथर्वकल्पोद्भवैःसरुद्रगणैः ।
कौष्मांडमहारौहिणकुवेरहृद्यैःसमृद्ध्याच ॥७१॥

अर्थ--हे पूर्वोक्त मंत्र व अन्यही अथर्वकल्पांतील मंत्र, रुद्रगणमंत्र, कौष्मांडमंत्र, महारौहिणकुबेरहृदयमंत्र, समृद्धिमंत्र यांहींकरून अभिषेक करावा ॥७१॥

आपोहिष्ठातिसृभिर्हिरण्यवर्णेतिचतसृभिर्जलैः ।
कार्पासिकवस्त्रयुगंबिभृयात्स्नातोनराधिपतिः ॥७२
पुण्याहशंखशब्दैराचांतोभ्यर्च्यदेवगुरुविप्रान् ।
छत्रध्वजायुधानिचततःस्वपूजांप्रयुंजीत ॥७३॥

अर्थ—आपोहिष्ठा इत्यादि ३ ऋचा व हिरण्यवर्णा इ० ४ ऋचा यांहीं अभिमंत्रित अशीं कार्पासवस्त्रें २ राजानें स्नान करून धारण करावीं ॥७२॥ नंतर आचमन करून मंगलशब्द व शंखशब्द यांहीं युक्त देव, गुरु, ब्राह्मण, यांची व छत्र, ध्वज, आयुधें यांची पूजा करून नंतर आपल्या इष्टदेवतेची पूजा करावी ॥७३॥

आयुष्यंवर्चस्यंरायस्पोषाभिर्ऋग्भिरेताभिः ।
परिजप्तंवैजयिकंनवंविदध्यादलंकारं ॥७४॥

अर्थ—आयुष्यंवर्चस्यरायस्पोष इत्यादि सहा ऋचांनीं अभिमंत्रित विजय देणारा असा नवा अलंकार राजानें धारण करावा ॥७४॥

गत्वाद्वितीयवेदींसमुपविशेच्चर्मणामुपरिराजा ।
देयानिचैवचर्माण्युपर्युपर्येवमेतानि ॥७५॥
वृषस्यवृषदंशस्यरुरोश्चपृषतस्यच ।
तेषामुपरिसिंहस्यव्याघ्रस्यचततःपरं ॥७६॥

अर्थ—नंतर राजानें दुसऱ्या वेदीप्रत जाऊन चर्मांवर बसावें; तेथें पाहिलें चर्म बैलाचें, दुसरें मार्जाराचें, तिसरें रुरूचें ( मृगविशेषाचें ), चवथें पृषत ( मृगविशेष ) याचें, त्यावर सिंहाचें, त्यावर व्याघ्राचें अशीं हीं कातडीं एकावर एक घालावीं आणि त्यावर राजानें बसावें ॥७५॥७६॥

मुख्यस्थानेंजुहुयात्पुरोहितोग्निसमित्तिलघृताद्यैः ।
त्रिनयनशक्रबृहस्पतिनारायणनित्यगतिऋग्भिः ॥७७

अर्थ—मुख्यस्थानीं ( दक्षिणवेदीवर ) अग्नींत समिधा, तिल, आज्य, व श्रीफल इत्यादिकें करून पुरोहितानें रुद्र, इंद्र, बृहस्पति, विष्णु, वायु यांच्या मंत्रांनीं हवन करावें ॥७७॥

इंद्रध्वजानिर्दिष्टान्यग्निनिमित्तानिदैवविद्ब्रूयात् ।
कृत्वाशेषसमाप्तिंपुरोहितःप्रांजलिर्ब्रूयात् ॥७८॥

अर्थ–इंद्रध्वजाध्यायांत सांगितलेलीं ( अ० ४३ श्लोक ३१ पासून ३६ पर्यंत ) जीं अग्नीचीं शुभाशुभलक्षणें तीं ज्योतिष्यानें सांगावीं. उपाध्यायानें सर्वकर्मांची समाप्ति करून हात जोडून हें वक्ष्यमाण बोलावें ॥७८॥

यांतुदेवगणाःसर्वेपूजामादायपार्थिवात् ।
सिद्धिंदत्वासुविपुलांपुनरागमनायवै ॥७९॥

अर्थ–राजापासून ( राजानें केलेली ) पूजा घेऊन, राजास बहुत सिद्धि देऊन पुन कार्यांत येण्याकरितां सर्व देवगण जावोत असें उपाध्यायानें हात जोडून म्हणावें ॥७९॥

नृपतिरतोदैवज्ञंपुरोहितंचार्चयेद्धनैर्बहुभिः ।
अन्यांश्चदक्षिणीयान्यथार्हतःश्रोत्रियप्रभृतीन् ८०

अर्थ–नंतर राजानें ज्योतिषी व पुरोहित यांची पूजा बहुत द्रव्यानें करावी व अन्यही दक्षिणा देण्यास योग्य, हवन करणारे किंवा अग्निहोत्री इत्यादि ब्राह्मणांस यथायोग्य ( कुलशीलपाठश्रुतानुसार ) दक्षिणा द्यावी ॥८०॥

दत्वाभयंप्रजानामाघातस्थानगान्विसृज्यपशून् ।
बंधनमोक्षंकुर्यादभ्यंतरदोषकृद्वर्जं ॥८१॥

अर्थ–नंतर राजानें प्रजास अभय देऊन मारण्याच्याजागीं नेलेल्या मेषादि पशूंस सोडावें. तसेंच बंदींत घातलेले लोकही सोडावे, परंतु राजाच्या शरीरास दुःख देणारे किंवा अंतःपुरामध्यें दोष करणाऱ्या लोकांवाचून बंदींतले लोक सोडावे ८१

एतत्प्रयुज्यमानंप्रतिपुष्यंसुखयशोर्थवृद्धिकरं ।
पुष्यंविनार्धफलदापौषीशांतिःपराप्रोक्ता ॥८२॥

अर्थ– हें सांगितलेलें पुष्यस्नान प्रतिमहिन्याच्या पुष्यनक्षत्रीं केलें तर सुख, यश, द्रव्य यांची वृद्धि होते. पुष्यनक्षत्रावाचून केलें तर अर्धें फल देतें. पुष्यनक्षत्रानें किंवा पौषपौर्णिमेस केलेली ही पुष्यस्नानरूप शांति उत्कृष्ट होय ॥८२॥

राष्ट्रोत्पातोपसर्गेषुराहोःकेतोश्चदर्शने ।
ग्रहावमर्दनेचैवपुष्यस्नानंसमाचरेत् ॥८३॥

अर्थ–राष्ट्रांत दिव्यभौमांतरिक्ष उत्पात, उपद्रव ( रोगादि ), ग्रहण व धूमकेतु यांचें दर्शन, ग्रहयुद्ध हीं झालीं असतां पुष्यस्नान करावें ॥८३॥

नास्तिलोकेसउत्पातोयोह्यनेनेनशाम्यति ।
मंगलंचापरंनास्तियदस्मादतिरिच्यते ॥८४॥

अर्थ-जो उत्पात पुष्पस्नानाने शांत होत नाहीं असा उत्पात लोकांमध्ये होत नाहीं व या पुष्पस्नानाहून अधिक असें मंगलकारकही दुसरे नाहीं ॥८४॥

अधिराज्यार्थिनोराज्ञःपुत्रजन्मचकांक्षतः ।
तत्पूर्वमभिषेकेचविधिरेषप्रशस्यते ॥८५॥

अर्थ-अधिराज्य ( श्रेष्ठराज्य ) किंवा पुत्रजन्म इच्छिणाऱ्या राजास पुष्पस्नानपूर्वक अभिषेकीं हाच विधि प्रशस्त होय ॥८५॥

महेंद्रार्थमुवाचेदंबृहत्कीर्तिर्बृहस्पतिः ।
स्नानमायुःप्रजावृद्धिसौभाग्यकरणंपरं ॥८६॥

अर्थ-मोठा कीर्तिमान् बृहस्पति, इंद्राकारणें, आयुष्य, संतति, वृद्धि, सौभाग्य यांतें करणारें उत्कृष्ट हें स्नान सांगता झाला ॥८६॥

अनेनैवविधानेनहस्त्यश्वंस्नापयीतयः ।
तस्यामयविनिर्मुक्तंपरांसिद्धिमवाप्नुयात् ॥८७॥

अर्थ-याच विधानेंकरून हत्ती, घोडे यास जो स्नान घालतो त्याचे ते हस्त्यश्व रोगनिर्मुक्त होऊन उत्तम सिद्धि पावतात ॥८७॥

॥ इतिबृहत्संहितायांपुष्पस्नानंनामाष्टाचत्वारिंशोध्यायः ॥४८॥

---

## ॥ अथपट्टलक्षणं ॥

विस्तरशोनिर्दिष्टंपट्टानांलक्षणंयदाचार्यैः ।
तत्संक्षेपःक्रियतेमयात्रसकलार्थसंपन्नः ॥१॥

अर्थ-कश्यपादि आचार्यांनी मुकुटाचें लक्षण विस्तारानें जें सांगितलें तें मी सर्व अर्थानें युक्त संक्षेपानें सांगतों ॥१॥

पट्टःशुभदोराज्ञांमध्येष्टावंगुलानिविस्तीर्णः ।
सप्तनरेंद्रमहिष्याःषड्युवराजस्यनिर्दिष्टः ॥२॥
चतुरंगुलविस्तारःपट्टःसेनापतेर्भवतिमध्ये ।
द्वेचप्रसादपट्टःपंचैतेकीर्तिताःपट्टाः ॥३॥
सर्वेद्विगुणायामामध्यादर्धेनपार्श्वविस्तीर्णाः ।
सर्वेचशुद्धकांचनविनिर्मिताःश्रेयसोवृद्ध्यै ॥४॥

अर्थ–राजाचा मुकुट मध्ये आठ अंगुळें विस्तीर्ण शुभ होय. राजस्त्रियेचा मुकुट सात अंगुळें विस्तीर्ण, युवराजाचा मुकुट सहा अंगुळें विस्तीर्ण शुभ होय ॥ २ ॥ सेनापतीचा मुकुट मध्ये चार अंगुळें विस्तीर्ण शुभ होय प्रसादमुकुट दोन अंगुळें शुभ होय. हे पाच मुकुट सांगीतले ॥३॥ हे सर्व मुकुट विस्ताराच्या दुप्पट लांब असावे, मध्यविस्ताराच्या अर्धानें पार्श्वभाग विस्तीर्ण असावे. सर्व मुकुट शुद्ध सुवर्णानें निर्मित कल्याणवृध्यर्थ होतात ॥४॥

पंचशिखोभूमिपतेस्त्रिशिखोयुवराजपार्थिवमहिष्योः ।
एकशिखःसैन्यपतेःप्रसादपट्टोविनाशिखया ॥५॥

अर्थ–राजाचा मुकुट पंचशिख करावा युवराज व राजस्त्री यांचा त्रिशिख, सैन्यपतीचा एकशिख मुकुट असावा आणि प्रसादमुकुट शिखेवाचून करावा ॥५॥

क्रियमाणंयदिपत्रंसुखेनविस्तारमेतिपट्टस्य ।
वृद्धिंजयौभूमिपतेस्तथाप्रजानांचसुखसंपत् ॥६॥

अर्थ–मुकुटाचा करावयाचा जो पत्रा तो अनायासानें विस्तृत होईल तर राजास वृद्धि, जय हे प्राप्त होतात व प्रजास सुख, संपत्ति ही प्राप्त होतात ॥६॥

जीवितराज्यविनाशंकरोतिमध्येव्रणःसमुत्पन्नः ।
मध्येस्फुटितस्त्याज्योविघ्नकरःपार्श्वयोःस्फुटितः ॥७॥

अर्थ–करावयाच्या मुकुटास मध्यें छिद्र उत्पन्न झालें तर, आयुष्य व राज्य यांचा नाश होतो मध्यें फुटला तर तो टाकावा- बाजूस फुटला तर विघ्नकारक होतो ७

अशुभनिमित्तोत्पत्तौशास्त्रज्ञःशांतिमादिशेद्राज्ञः ।
शस्तनिमित्तःपट्टोनृपराष्ट्रविवृद्धयेभवति ॥८॥

अर्थ–मुकुट करतेवेळीं अशुभ लक्षणें उत्पन्न झालीं तर पट्टशास्त्रज्ञानें राजास शांति सांगावी. शुभनिमित्तांनीं युक्त जो पट्ट ( मुकुट ) तो राजास व राष्ट्रास वृद्धि करितो ॥८॥

॥ इतिबृहत्संहितायांपट्टलक्षणंनामएकोनपंचाशोध्यायः॥

## ॥ अथखड्गलक्षणं ॥

अंगुलशतार्धमुत्तमऊनःस्यात्पंचविंशतिःखड्गः।
अंगुलमानाज्ज्ञेयोव्रणोशुभोविषमपर्वस्थः ॥१॥

अर्थ–खड्ग ( तलवार ) (पन्नासपासून पचवीस अगुलेंपर्यंत लांब असावी. ) पन्नास अंगुळें लांब उत्तम, पचवीस अगुळें कनिष्ठ होय. खड्गावर व्रण ( वळगे इ० ) अंगुलमानानें विषम ( १।३।५ इ० ) अंगुलावर असेल तर तो अनिष्ट जाणावा १

श्रीवृक्षवर्धमानातपत्रशिवलिंगकुंडलाब्जानां ।
सदृशाव्रणाःप्रशस्ताध्वजायुधस्वस्तिकानांच ॥२॥

अर्थ–बिल्ववृक्ष, वर्धमान ( शराव, परोळ ), छत्र, शिवलिंग, कुंडल, कमल, ध्वज, खड्गादि आयुध, स्वस्तिक यासारखे व्रण ( वळगे ) शुभ होत ॥२॥

कृकलासकाककंकक्रव्यादकबंधवृश्चिकाकृतयः ।
खड्गेव्रणानशुभदावंशानुगताःप्रभूताश्च ॥३॥

अर्थ–सरडा, काक, कंक, मांसभक्षक गृध्रादिक, छिन्नमस्तक पुरुष, विंचू यांच्या आकारासारखे व खड्गाच्या मध्यभागीं व बहुत व्रण (खाचा, वळगे) शुभ नव्हत.

स्फुटितोन्हस्वःकुंठोवंशच्छिन्नोनदृङ्मनोनुगतः।
अस्वनइतिचानिष्टःप्रोक्तविपर्यस्तइष्टफलः ॥४॥

अर्थ–स्फुटित ( फुटलेला ), प्रमाणहीन, अतीक्ष्ण, मध्यभागीं तुटल्यासारखा, चक्षु व मन यांस प्रिय नव्हे, मारला असतां शब्द होत नाहीं असा खड्ग अशुभ होय. याहून अन्यप्रकारचा खड्ग शुभ होय ॥४॥

क्वणितंमरणायोक्तंपराजयायप्रवर्तनंकोशात् ।
स्वयमुद्गीर्णेयुद्धंज्वलितेविजयोभवतिखड्गे ॥५॥

अर्थ–खड्गाचा स्वतःच शब्द होईल तर खड्गस्वामीस मरण होतें. कोश (मेण) यापासून खड्ग निघणार नाहीं तर पराजय होतो. खड्ग स्वतःच कोशांतून निघेल तर युद्ध होतें. खड्ग ज्वलित होईल तर विजय होतो ॥५॥

नाकारणंविवृणुयान्नविघटयेच्चपश्येन्नतत्रव
दनंनवदेच्चमूल्यं। देशंनचास्यकथयेत्प्रतिमा
नयेच्चनैवस्पृशेन्नृपतिरप्रयतोसियष्टिं ॥६॥

अर्थ–खड्ग (पान) कारणावांचून मेणांतून काढूनये व चाळवूंनये. पानामध्यें मुख पाहूंनये. कारणावांचून खड्गाची किंमत बोलूनये. खड्गाची जाति सांगूनये. खड्ग अंगुलांनीं मोजूंनये. राजानें अपवित्र असतां, पानास स्पर्श करूंनये ॥६॥

गोजिव्हासंस्थानोनीलोत्पलवंशपत्रसदृशश्च।
करवीरपत्रशूलाग्रमंडलाग्राःप्रशस्ताःस्युः ॥७॥

अर्थ–गाईच्या जिभेसारखा, नीलकमल, बांबूचेंपान, कण्हेरीचेंपान, शूलाचेंअग्र यांसारखे मंडलाग्र (खड्ग) शुभ होत ॥७॥

निष्पन्नोनच्छेद्योनिकषैःकार्यःप्रमाणयुक्तःसः।
मूलेम्रियतेस्वामीजननीतस्याग्रतश्छिन्ने ॥८॥

अर्थ–तयार झालेला खड्ग प्रमाणाधिक होईल तर, तोडूंनये, घांसून प्रमाणयुक्त करावा त्याचें मूळ तोडलें तर स्वामीस मृत्यु. अग्र तोडलें तर त्या स्वामीचे आईस मृत्यु होतो ॥८॥

यस्मिन्त्सरुप्रदेशेव्रणोभवेत्तद्वदेवखड्गस्य।
वनितानामिवतिलकोगुह्येवाच्योमुखेदृष्ट्वा॥९॥

अर्थ–ज्या खड्गमुष्टिप्रदेशीं व्रण असेल त्याच खड्गप्रदेशीं व्रण आहे असें सांगावें. म्ह० मुष्टिमूलीं व्रण असेल तर खड्गमूलीं व्रण आहे. मध्यभागीं असेल तर खड्गमध्यभागीं, अग्रभागीं अ० तर खड्गाग्रीं व्रण आहे असें सांगावें जसें स्त्रीच्या मुखावर तिलक पाहून गुह्यावर आहे, असें समजतें तसेंच हें समजावें.॥९

अथवास्पृशतियदंगंप्रष्टानिस्त्रिंशभृत्तदवधार्य।
कोशस्थस्यादेश्योव्रणोस्तिशास्त्रंविदित्वेदं ॥१०॥

अर्थ—अथवा शस्त्रधारण करून विचारणारा ज्या अंगास स्पर्श करील तें पाहून, व हें वक्ष्यमाण खड्गशास्त्र जाणून, तसा मेणांतील खड्गास व्रण आहे असें सांगावें ॥१०॥

शिरसिस्पृष्टेप्रथमेंगुलेद्वितीयेललाटसंस्पर्शे ।
भ्रूमध्येचतृतीयेनेत्रेस्पृष्टेचतुर्थेच ॥११॥

अर्थ— पृच्छक मस्तकावर स्पर्श करील तर खड्गास पहिल्या अंगुलीं व्रण आहे असें सांगावें. ललाटास स्पर्श करील तर दुसऱ्या अं०, भ्रूमध्यास स्पर्श० तर तिसऱ्या अं०, नेत्रांस स्पर्श करील तर चवथ्या अंगुलीं व्रण आहे असें सांगावें ११

नासौष्ठकपोलहनुश्रवणग्रीवांसकेपुपंचाद्याः ।
उरसिद्वादशसंस्थस्त्रयोदशेकक्षयोर्ज्ञेयः ॥१२॥

अर्थ—पृच्छक नासिका, ओष्ठ, गाल, हनवटी, कान, कंठ, अंस यांस स्पर्श करील तर अनुक्रमें खड्गाच्या पांच, सहा, सात, आठ, नऊ, दहा, अकरा या अंगुलांवर व्रण आहे. उरास स्पर्श करील तर बारा अंगुलांस, कांखेस स्पर्श० तर तेरा अंगुलांवर व्रण आहे असें सांगावें ॥१२॥

स्तनहृदयोदरकुक्षीनाभीपुचतुर्दशादयोज्ञेयाः ।
नाभीमूलेकट्यांगुह्येचैकोनविंशतितः ॥१३॥
ऊर्वोर्द्वाविंशेस्यादूर्वोर्मध्येव्रणस्त्रयोविंशे ।
जानुनिचचतुर्विंशेजंघायांपंचविंशेच ॥१४॥
जंघामध्येगुल्फेपार्ष्ण्यांपादेतदंगुलीष्वपिच ॥
षट्विंशतिकाद्यावत्त्रिंशदितिमतेनगर्गस्य ॥१५॥

अर्थ—पृच्छक स्तन, हृदय, उदर, कुक्षी, नाभि, यांस स्पर्श करील तर अनुक्रमें १४।१५।१६।१७।१८ या अंगुलीं, नाभिमूल, कटी, गुह्य यांस स्पर्श करील तर १९।२०।२१ या अंगुलीं ॥१३॥ मांड्यांस स्पर्श क० तर २२ अंगुलीं, मांड्यांच्या मध्यें स्पर्श० तर २३ अंगुलीं, जानूंस स्प० २४ अंगुलीं, पोटऱ्यांस स्पर्श० २५ व्या अंगुलीं, ॥१४॥ पोटऱ्यांच्यामध्यें, गुल्फ, खोट, पाय व त्यांच्या अंगुली यांस स्पर्श करील तर अनुक्रमानें २६।२७।२८।२९।३० व्या अंगुलांवर खड्गास व्रण आहे असें समजावें. असें गर्गऋषींचें मत आहे ॥१५॥

पुत्रमरणंधनाप्तिर्धनहानिःसंपदश्चबंधश्च ।

एकाद्यंगुलसंस्थैर्व्रणैःफलंनिर्दिशेत्क्रमशः ॥१६॥

अर्थ—एकादि अंगुलीं खड्गास जे व्रण त्यांचीं हीं वक्ष्यमाण फलें अनुक्रमानें जाणा वीं. १अंगुलीं पुत्रमरण, २धनप्राप्ति, ३ धननाश, ४ संपत्ति, ५वध [redacted] फलें होत ॥१६॥

सुतलाभ·कलहोहस्तिलब्धयःपुत्रमरणधनलाभौ ।
क्रमशोविनाशवनिताप्तिचित्तदुःखानिषट्प्रभृति ॥१७

अर्थ—६ सुतलाभ, ७ कलह, ८ गजलाभ, ९ पुत्रमरण, १० धनलाभ, ११वि नाश, १२ स्त्रीप्राप्ति, १३ चित्तास दुःख, [redacted] सहा अंगुलांपासून अनुक्रमें फलें होत ॥१७॥

लब्धिर्हानिःस्त्रीलब्धयोवधोवृद्धिमरणपरितोषाः ।
ज्ञेयाश्चतुर्दशादिषुधनहानिश्चैकविंशेस्यात् ॥१८॥

अर्थ—१४ लाभ, १५ हानि, १६ स्त्रीलाभ, १७ वध, १८ वृद्धि, १९ मरण, २० संतोष, हीं फलें चवदांपासून जाणावीं. २१धनहानि होय ॥१८॥

वित्ताप्तिर्निर्वाणंधनागमोमृत्युसंपदोस्वत्वं ।
ऐश्वर्यमृत्युराज्यानिचक्रमात्रिंशदितियावत् ॥१९॥
परतोनविशेषफलंविषमसमस्थास्तुपापशुभफलदाः ।
कैश्चिदफलाःप्रदिष्टास्त्रिंशत्परतोग्रमितियावत् ॥२०॥

अर्थ—२२ द्रव्यप्राप्ति, २३ मृत्यु, २४ धनप्राप्ति, २५ मृत्यु, २६ संपत्ति, २७ नि र्धनत्व, २८ ऐश्वर्य, २९ मृत्यु, ३०राज्य, [redacted] फलें तीसपर्यंत जाणावीं ॥ १९ ॥ तीस अंगुलापुढें व्रणाचें विशेष फल नाहीं. विषम अंगुलीं अशुभफल व सम अं-गुलीं शुभफल जाणावें कोणी आचार्य तीस अंगुलांपुढें अग्रापर्यंत फलच नाहीं असें ह्मणतात ॥२०॥

करवीरोत्पलगजमदघृतकुंकुमकुंदचंपकसगंधः ।
शुभदोनिष्टोगोमूत्रपंकमेदःसदृशगंधः ॥२१॥
कूर्मवसासृक्क्षारोपमश्चभयदुःखदोभवतिगंधः ।
वैडूर्यकनकविद्युत्प्रभोजयारोग्यवृद्धिकरः ॥२२॥

अर्थ–कण्हेरपुष्प, कमल, हत्तीचा मद, घृत, कुंकुम, कुंदपुष्प चंपकपुष्प, यांसारखा खड्गाचा गंध शुभ होय. गोमूत्र, चिखल, मेंदु यांसारखा खड्गगंध अशुभ होय ॥२१॥ कांसव, वसा ( चरबी ), रक्त, क्षार यांसारख्या गंधाचा खड्ग भय व दुःख देतो. वैडूर्यमणि, सुवर्ण, वीज यांसारखा तेजस्वी खड्ग जय, आरोग्य व वृद्धि करतो ॥२२॥

इदमौशनसंचशस्त्रपानंरुधिरेणश्रियमिच्छतःप्रदीप्तं । हविषागुणवत्सुताभिलिप्सोःसलिलेनाक्षयमिच्छतश्चवित्तं ॥२३॥ वडवोष्ट्रकरेणुदुग्धपानंयदिपापेनसमीहतेर्थसिद्धिं । झषपित्तमृगाश्ववस्तदुग्धैःकरिहस्तच्छिदयेसतालगर्भैः ॥२४॥

अर्थ–हें वक्ष्यमाण शस्त्रपान ( शस्त्रास पाणी देणें ) शुक्रानें सांगीतलें. उज्वल लक्ष्मी इच्छिणाऱ्याच्या खड्गास रक्तानें पाणी द्यावें. गुणवान् पुत्रेच्छूच्या खड्गास घृतानें पाणी द्यावें. अक्षय द्रव्येच्छूच्या खड्गास उदकानें पाणी द्यावें ॥२३॥ नर पापानें ( वधादिकानें ) अर्थसिद्धि इच्छील तर घोडी, उंटीण, हत्तीण यांच्या दुधानें पाणी द्यावें. हत्तीची सोंडा तोडण्यातें इच्छिणाऱ्याच्या खड्गास मत्स्यपित्त मृगी, घोडी शेळी यांचें दुग्ध व तालगर्भ (ताडी) हीं एकत्र करून पाणी द्यावें २४

आर्कपयोहुडुविषाणमषीसमेतंपारावताखुशकृताचयुतंप्रलेपः । शस्त्रस्यतैलमथितस्यततोस्यपानंपश्चाच्छितस्यनशिलासुभवेद्विघातः २५.

अर्थ–रुईचें दुग्ध ( चीक ) मेंढ्याच्या शिंगाची राख करून तिणें युक्त करावें व पारवा, उंदीर यांच्या विष्ठेनें युक्त करून त्याचा लेप तैलमर्दितशस्त्रास करावा नंतर पाणी द्यावें नंतर घांसून तीक्ष्ण करावा म्हणजे तो खड्ग दगडावर मारला तरी मोडत नाहीं ॥२५॥

क्षारेकदल्यामथितेनयुक्तेदिनोषितेपायितमायसंयत् । सम्यक्छितंचाश्मनिनैतिभंगंनचान्यलोहेष्वपितस्यकौंठयं ॥२६॥

अर्थ–केळीचा क्षार ( राख ) ताकानें युक्त करून अहोरात्र ठेवून तें पाणी ज्या लोखंडास दिलें व उत्तम पाजवलें तें दगडावरही नाश पावत नाहीं व अन्य लोखंडावरही तें कुंठित होत नाहीं ॥२६॥

॥ इतिबृहत्संहितायांखड्गलक्षणंनामपंचाशोध्यायः ॥५०॥

---

## ॥ अथअंगविद्या ॥

---

दैवज्ञेनशुभाशुभंदिगुदितस्थानात्हृतानीक्षतावा
च्यंप्रष्टृनिजापरांगघटनांचालोक्यकालंधिया ।
सर्वज्ञोहिचराचरात्मकतयासौसर्वदर्शीविभु
श्चेष्टाव्याह्रतिभिःशुभाशुभफलंसंदर्शयत्यर्थिनां ॥ १

अर्थ–पूर्वादि दिशा, पृच्छकाचें भाषण, स्थान, पृच्छकानें काहीं आणलेला पदार्थ, यांतें पाहणाऱ्या ज्योतिष्यानें, पृच्छक, अन्यमनुष्य याच्या अंगाची घटना ( स्पर्शादिक ) हीं व काल ( वेळा ) यांतें पाहून, पृच्छकास शुभाशुभ सांगावें. ज्या कारणास्तव, हा काल स्थावरजंगमजगताचा आत्मा आहे ह्मणून सर्व जाणणारा, सर्व पाहणारा, सर्वव्यापक आहे. यास्तव प्रश्नकर्त्यास स्पर्शादि चेष्टा व भाषण यां हींकरून शुभाशुभफल दाखवितो ॥१॥

स्थानंपुष्पसुहासिभूरिफलभृत्सुस्निग्धकान्तिच्छ
दासत्पक्षिच्युतशास्तसंज्ञिततरुच्छायोपगूढंसमं।
देवर्षिद्विजसाधुसिद्धनिलयंसत्पुष्पसस्योक्षितं
सत्स्वादूदकनिर्मलत्वजनिताल्हादंचसच्छाद्बलं॥२॥

अर्थ–प्रफुल्लित पुष्पानीं हास्य करणारे, बहुत फलानीं युक्त, ओली साल व पानें यांनीं युक्त, काकोलूकादि अशुभपक्षिरहित, असे पळस, पिंपळ, वट इत्यादि शुभनावाचे जे वृक्ष त्याच्या छायेनें आच्छादित; सम ( उच सखल नाहीं ), देव, ऋषि, ब्राह्मण, साधु, सिद्ध यांचें राहण्याचें स्थान, उत्तमपुष्प व धान्य यांनीं युक्त गोड पाण्याच्या निर्मलत्वानें आनंदोत्पादक, दूर्वादि हिरव्या तृणानें युक्त असें स्थान प्रश्नकर्त्यास शुभ होय ॥२॥

छिन्नभिन्नकृमिखातकंटकिप्लुष्टरूक्षकुटिलैर्नस
स्कुजैः । क्रूरपक्षियुतनिंद्यनामभिःशुष्कशी
र्णबहुपर्णचर्मभिः ॥३॥ श्मशानशून्यायतनं
चतुष्पथंतथामनोज्ञंविषमंसदोषरं । अवस्क
रांगारकपालभस्मभिश्चितंतुषैःशुष्कतृणैर्नशो
भनं ॥४॥

अर्थ—छिन्न, भिन्न, कीडलागलेला, कांट्यांचा, जळलेला, रूक्ष, वांकडा, काका दि क्रूरपक्ष्यांनीं युक्त, बिभीतकादि निंद्यनामक, शुष्क व गळलीं आहेत बहुत पर्णे व त्वचा ज्यांच्या अशा वृक्षांनीं युक्तस्थान प्रश्नास शुभ नव्हे ॥३॥ श्मशान, शून्य (उद्ध्वस्त) देवगृह, चवाठा, आनंदकारक नव्हे, उंचसखल, सर्वकाळ रेतीनें युक्त, अवस्कर (विष्ठा, केरकचरा), कोळसे, हाडें, भस्म यांणीं व्याप्त, धान्यत्वचा (कोंडा) व शुष्कतृण यांणीं व्याप्त असें स्थान प्रश्नास शुभ नव्हे ॥४॥

प्रव्रजितनग्ननापितरिपुवंधनसूनिकैस्तथाश्वपचैः ।
कितवयतिपीडितैर्युतमायुधमाध्वीकविक्रयैर्नशुभं ॥५॥

अर्थ—तपस्वी, नग्न, नापित, शत्रु, बंधनशाला, पशुघाती, चांडाल, कपटी, सन्यासी, रोगी, आयुधगृह, मद्यविक्रय, यांणीं युक्तस्थान प्रश्नास शुभ नव्हे ॥५॥

प्रागुत्तरैशाश्चदिशःप्रशस्ताःप्रष्टुर्नवाय्वंबुयमाग्निरक्षः ।
पूर्वाण्हकालेस्तिशुभंनरात्रौसंध्याद्वयेप्रश्नकृतोपराण्हे ६

अर्थ—पूर्व, उत्तर, ईशानी या दिशाकडे प्रश्नकर्त्याचें मुख असेल तर शुभ होय. वायव्य, पश्चिम, नैर्ऋत्य याकडे असेल तर अशुभ होय. दिवसाच्या प्रथमभागीं प्रश्न शुभ होय. रात्रीं, प्रात सायसंध्यासमयीं व अपराण्हीं अशुभ होय ॥६॥

यात्राविधानेहिशुभाशुभंयत्प्रोक्तंनिमित्तंतदि
हापिवाच्यं । दृष्टापुरोवाजनताहृतंवाप्रष्टुः
स्थितंपाणितलेथवस्त्रे ॥७॥

अर्थ—यात्राप्रकरणीं जें शुभाशुभ शकुननिमित्त सांगितलें तेंही प्रश्नसमयीं पहावें व आपल्या पुढील पदार्थ व लोकांनी आणलेला पदार्थ व प्रश्नकर्त्याच्या हातांत अथवा वस्त्रांत असलेला पदार्थ पाहून शुभाशुभ सांगावें ॥७॥

अथांगान्यूवौष्ठस्तनवृषणपादंचदशनाभुजौ हस्तौगंडौकचगलनखांगुष्ठमपियत् । सशंखं कक्षांसश्रवणकुदसंधीतिपुरुषेस्त्रियांभ्रूनासा स्फिग्वलिकटिसुलेखांगुलिचयं ॥८॥ जिव्हा ग्रीवापिंडिकेपार्ष्णियुग्मंजंघेनाभिःकर्णपाली ककाटी । वक्रंपृष्ठंजत्रुजान्वस्थिपार्श्वेहृत्तालव क्षीमेहनोरस्त्रिकंच ॥९॥ नपुंसकास्यंचशिरो ललाटंआश्वायसंज्ञैरपरैश्चिरेण । सिद्धिर्भवे ज्जातुनपुंसकैर्नोरूक्षक्षतैर्भग्नकृशैश्चपूर्वैः ॥१०॥

अर्थ—मांड्या, ओष्ठ, स्तन, वृषण, पाद, दंत, भुज, हस्त, गाल, केश, कंठ, नखें, हस्तपादांगुष्ठ, कांख ( बाहुमूल ), स्कंध ( खांदा ), कान, गुद, सर्वांगाच्यासंधि, शंख हे सर्व अवयव पुरुषसंज्ञक होत. भिवया, नासिका, कुले, वलि ( उदरा दिकांवरील त्रिवली ), कमर, हस्तादिकांवरील उत्तमरेषा, अंगुलिसमूह, ॥८॥ जिव्हा, मान, पोटरीचा गोळा, दोन लोटा, पोटऱ्या, नाभि, कानाच्या पाळी, ककाटी ( मानेचा सरळभाग ), हे अवयव स्त्रीसंज्ञक होत. मुख, पृष्ठ, जत्रु ( बाहू व कंठ यांचा संधि, सरी ), ढोपर हाडें, पार्श्व ( बरगड्या ), हृदय, तालु, नेत्र, शिश्न, वक्षस्थल, त्रिक, ( पाठीचे कण्याखाली मिळालेलीं जीं तीन हाडें तीं, माकडहाड ); ॥९॥ शिर, ललाट, हे अवयव नपुंसकसंज्ञक होत. आद्य अ० पुरुषसं० अवयवांनीं शीघ्र कार्यसिद्धि होते. अपर अ० स्त्रीसंज्ञकांनीं बहुत कालानें कार्यसिद्धि. नपुंसकांनीं सिद्धि होत नाहीं व रूक्ष, क्षत, भग्न, कृश असे पुरुषसंज्ञक व स्त्रीसंज्ञक अवयव असले तर सिद्धि होत नाहीं. ( हें फल स्पर्शादिकाचें होय ) ॥१०॥

स्पृष्टेवाचालितेवापिपादांगुष्ठेक्षिरुग्भवेत् ।
अंगुल्यांदुहितुःशोकंशिरोघातेनृपाद्भयं ॥११॥

अर्थ—पायांच्या आंगठ्यास स्पर्श केला किंवा हालिवला तर पृच्छकास नेत्ररोग होतो. अंगुलीस स्पर्शकरून विचारील तर कन्येचा शोक होतो. मस्तकास ताडन करून विचारील तर राजापासून पृच्छकास भय होतें ॥११॥

विप्रयोगमुरसिस्वगात्रतःकर्पटास्फुतिरनर्थदा

भवेत् । स्यात्प्रियाप्तिरभिगृह्यकर्पटंपृच्छतश्च
रणपादयोजितुः ॥१२॥

अर्थ—पृच्छकानें उरास स्पर्शकरून प्रश्न केला तर कोणाचा तरी वियोग होतो. स्वशरीरापासून वस्त्र टाकलें तर अनर्थ होतो. वस्त्र घेऊन पायांवर पाय ठेवून पृच्छक प्रश्न करील तर प्रियवस्तूची प्राप्ति होईल असें सांगावें ॥१२॥

पादांगुष्ठेनविलिखेद्भूमिंक्षेत्रोत्थचिंतया ।
हस्तेनपादौकंडूयेत्तस्यदासीमयाचसा ॥१३॥

अर्थ—पादांगुष्ठानें भूमीवर रेघा काढील तर त्या पृच्छकास क्षेत्रोत्पन्न चिंता सांगावी. हातानें पाय खाजवील तर त्यास दासीकृत चिंता सांगावी ॥१३॥

तालभूर्जपटदर्शनेंशुकंचिंतयेत्कचतुषास्थिभ
स्मगं । व्याधिराश्रयतिरज्जुजालकंवल्कलं
चसमवेक्ष्यबंधनं ॥१४॥

अर्थ—ताडपत्र व भूर्जपत्र यांचें दर्शन झालें तर पृच्छकास वस्त्राची चिंता सांगावी. केश, तुष, हाडें, भस्म, यांचें दर्शन झालें तर व्याधि होतो. दोरी, जाळें, वल्कल हीं प्रश्नकालीं पाहिलीं तर बंधन होतें ॥१४॥

पिप्पलीमरिचशुंठिवारिदैरोध्रकुष्ठवसनांबुजीरकैः ।
गंधमांसिशतपुष्पयावदेत्पृच्छतस्तगरकेणचिंतनं॥१५॥
स्त्रीपुरुषदोषपीडितसर्वाध्वसुतार्थधान्यतनयानां ।
द्विचतुष्पदक्षितीनांविनाशतःकीर्तितैर्दृष्टैः ॥१६॥

अर्थ—प्रश्नसमयीं पिंपळी पाहिली तर सदोषस्त्रीविषयक चिंता, मिरीं किंवा मिरची पा०तर सदोषपुरुषविष० चिंता, सुंठ पा० व्याधित किंवा मृतविष० चिंता, नागरमोथा पा० तर सर्व नाशवि० चिंता, लोध्र पा० मार्गनाशवि० चिंता, कुष्ठ कोळिंजन पा० पुत्रनाशवि० चिंता, वस्त्र पा० अर्थनाशवि० चिंता, उदक पाहि० धान्यनाशकृतचिंता, जिरें पा० पुत्रानाशकृतचिंता, जटामांसी पाहि० द्विशफनाशकृत चिंता, शतपुष्पा ( बडिशेप ) पाहिली तर चतुष्पादनाशकृत चिंता, तगर पाहिलें तर भूमिनाशकृत चिंता, या चिंता प्रश्नकर्त्यास आहेत असें सांगावें ॥१५॥१६॥

न्यग्रोधमधुकतिंदुकजंबुप्लक्षाम्रबदरिजातिफलैः ।

**धनकनकपुरुषलोहांशुकरूप्योदुंबराप्तिरपिकरगैः ॥१७॥**

अर्थ–प्रश्नकर्त्याच्या हातांत वडाचें फळ असेल तर धनप्राप्ति, मोहाचें फळ असेल तर सुवर्णप्राप्ति, टेंभुरणीचें फळ अ० पुरुषप्राप्ति, आंवळ अ० लोखंडप्राप्ति, प्लक्ष ( पिंपळ किंवा पिंपरी ) इचें फल अ० वस्त्रप्राप्ति, आम्रफळ असे० रौप्यप्राप्ति, जायफळ अ० ताम्रप्राप्ति होईल असें सांगावें ॥१७॥

**धान्यपरिपूर्णपात्रंकुंभःपूर्णःकुटुंबवृद्धिकरौ ।**
**गजगोशुनांपुरीषंधनयुवतिसुहृद्विनाशकरं ॥१८॥**

अर्थ–प्रश्नकर्त्याच्या हातांत धान्यानें भरलेलें पात्र किंवा उदकपूर्ण कुंभ असेल तर कुटुंबाची वृद्धि होते. हत्तीची विष्ठा असेल तर धननाश, गाईची विष्ठा अ० स्त्रियांचा व्यभिचार, कुत्र्याची विष्ठा अ० मित्रनाश, हे होतात असें सांगावें १८

**पशुहस्तिमहिषपंकजरजतव्याघ्रैर्लभेतसदृष्टैः ।**
**अविधननिवसनमलयजकौशेयाभरणसंघातं ॥१९**

अर्थ–प्रश्नकाळीं पशु दृष्टीस पडेल तर कंबलादि लाभ, हत्ती दृष्टी० धनलाभ, महिष दृष्टी० वस्त्रलाभ कमल दृष्टी० मलयज (चंदन) लाभ, रुपें दृष्टी० कौशेयवस्त्र ( पीतांबर ) लाभ, व्याघ्र दृष्टीस पडेल तर अलंकारलाभ, हे प्रश्नकर्त्यास मिळतील असें सांगावें ॥१९॥

**पृच्छावृद्धश्रावकसुपरिव्राड्दर्शनेनृभिर्विहिता ।**
**मित्रद्यूतार्थभवागणिकानृपसूतिकार्थकृता ॥२०॥**

अर्थ–प्रश्नकाळीं वृद्धश्रावक ( कापालिक जैनमती ) यांचें दर्शन झालें तर मित्रार्थ किंवा द्यूतार्थ, पुरुषांनीं, प्रश्न केला. उत्तम संन्यासी दृष्टीस पडला तर वेश्या, राजा, सूतिका ( बाळंतीण ) यांविषयीं प्रश्न केला असें सांगावें ॥२०॥

**शाक्योपाध्यायार्हतनिर्ग्रंथनिमित्तनिगमकैवर्तैः ।**
**चौरचमूपतिवणिजांदासीयोधापणस्थवध्यानां ॥२१॥**

अर्थ–शाक्य ( बौद्धमतस्थापनकर्ता ) दृष्टीस पडला तर चोरविषयक प्रश्न, उपाध्याय दृष्टी० सेनापति वि०, अर्हत ( बौद्धमतानुसारी ) दृष्टी० व्यापारविष०, निर्ग्रंथ ( दिगंबर साधु ) दृष्टी० दासी विष०, निमित्त ( दैवज्ञ, ज्योतिषी ) दृष्टीस० योद्धावि०, निगम ( व्यापाऱ्यांचा समूह, काफला ) दृष्टी० आपणस्थ ( कुलपरंपरागत शिल्पज्ञ किंवा बाजारांत रहाणारा ) विषयक०, कोळी दृष्टीस पडला तर वध्यप्राणिविषयक प्रश्न आहे असें सांगावें ॥२१॥

तापसेश्चौंडिकेदृष्टेप्रोपितःपशुपालनं ।
दृष्टेव्रतंपृच्छकस्यस्यादुंछवृत्तौविपन्नता ॥२२॥

अर्थ—प्रश्नसमयीं तपस्वी दृष्टीस पडेल तर कोणी प्रवासास गेलेल्याची चिंता प्रश्नकर्त्याच्या मनांत आहे, मद्यपी दृष्टी० पशुपालनकृत चिंता, उच्छवृत्ति ( शेत्यानें शेत कापून नेल्यावर खालीं भूमीवर पडलेले धान्य निवडून उपजीविका करणारा) दृष्टीस पडला तर विपत्ति झालेल्याविषयीं चिंता पृच्छकाच्या मनांत आहे असें सांगावें ॥२२॥

इच्छामिप्रष्टुंभणपश्यत्वार्यःसमादिशेत्युक्ते ।
संयोगकुटुंबोत्थालाभैश्वर्योद्भवाचिंता ॥२३॥

अर्थ—प्रश्न करावयास इच्छितों असें प्रश्नकर्ता भाषण करील तर संयोग ( भेटणें) विषयकचिंता, भण ( सांग ) असें बोलेल तर कुटुंबोत्पन्न चिंता, पश्यतु आर्यः ( सत्पुरुष पाहू ) असें बोलेल तर लाभोत्पन्न चिंता, समादिश ( आज्ञाकरा) असें बोलेल तर ऐश्वर्योत्पन्न चिंता प्रश्न कर्त्याच्या मनांत आहे असें सांगावें ॥२३॥

निर्दिशेतिगदितेजयाध्वजाप्रत्यवेक्ष्यममचिं
तितंवद । आशुसर्वजनमध्यगंत्वयादृश्यता
मितिचबंधुचौरजा ॥२४॥

अर्थ—निर्दिश ( स्पष्टसांग ) असें पृच्छक भाषण करील तर जयार्थ किंवा मार्गविषयक चिंता, प्रत्यवेक्ष्य मम चिंतितं वद ( पाहून माझें चिंतित सांग) असें० बो० तर बंधुविषयक चिंता, सर्वजनमध्यगत पदार्थात्त्याप्रत आशुत्वयादृश्यता ( शीघ्रत्वांपहावें ) असें विचारील तर चौरविषयक चिंता प्रश्नकर्त्यास आहे असें सांगावें २४

अंतस्थेंगेस्वजनउदितोवाह्यजेबाह्यएवंपादांगुष्ठांगु
लिकलनयादासदासीजनःस्यात् । जंघेप्रेष्योभव
तिभगिनीनाभितोऽस्त्स्वभार्यापाण्यंगुष्ठांगुलिचय
कृतस्पर्शनेपुत्रकन्ये ॥२५॥ मातरंजठरेमूर्ध्निगुरुंद
क्षिणवामकौ । बाहूभ्रातायतत्पत्नीस्पृष्ट्वेवंचौरमा
दिशेत् ॥२६॥

अर्थ–प्रश्नसमयीं प्रश्नकर्ता अंतरंग ( गुप्त ) अंगाला स्पर्श करील तर स्वजन चोर सांगितला. बाह्य अंगास स्पर्श करील तर, बाहेरचा चोर सांगितला. पादांगुष्ठस्पर्शानीं दास; पादांगुलिस्प० दासी; पोटऱ्यांच्यास्प० सेवक; नाभिस्प० भगिनी; हृदयस्प० स्त्री; हस्तांगुष्ठस्प० पुत्र; हस्तांगुलिस्प० स्वकन्या; ॥२५॥ उदरस्प० आई; शिरस्प० गुरु; दक्षिणबाहुस्प० भ्राता; वामबाहुस्प० भ्रातृपत्नी; या प्रमाणें स्पर्शावरून चोर सांगावे ॥२६॥

अंतरंगमवमुच्यवाह्यगस्पर्शनंयदिकरोतिपृच्छकः । श्लेष्ममूत्रशकृतस्त्यजन्नधःपातयेत्करतलस्थवस्तुचेत् ॥२७॥ भृशमवनामितांगपरिमोटनतोप्यथवाजनधृतरिक्तभांडमवलोक्यच चोरजनं । हृतपतितक्षतास्मृतविनष्टविभग्नगतोन्मुषितमृतायनिष्टरवतोलभतेनहृतं ॥२८॥

अर्थ–प्रश्नकर्ता, अंतरंग ( गुप्त ) अवयव सोडून बाह्य अवयवास प्रश्नकालीं स्पर्श करील; अथवा श्लेष्मा ( कफ ), मूत्र, विष्ठा हीं खालीं सोडील; किंवा हस्तांतील काही वस्तु खालीं पाडील ॥२७॥ अंगपरिमोटन म्ह० आंग मोडून हाडें मोडील, लोकांनीं धरिलेलें रिकामें भांडें किंवा चोर यास पाहील; अथवा नेलें, पडलें, छत, विसरलें, नाडलें, मोडलें, गेलें, उपटून नेलें, मेलें हे शब्द किंवा अशा अर्थाचे तिन्हीलिंगी अनिष्टशब्द प्रश्नकर्त्यास ऐकू येतील तर नष्टवस्तु सांपडणार नाहीं २८

निगदितमिदंयत्तत्सर्वंतुषास्थिविषादिकैः सहमृतिकरंपीडार्तानांसमंरुदितक्षुतैः । अवयवमपिस्पृष्ट्वांतःस्थंदृढंमरुदाहरेदति वहुतदाभुक्त्वान्नंसंस्थितःसुहितोवदेत् ॥ २९ ॥

अर्थ–२७।२८ श्लोकांत नष्टवस्तुविषयीं सांगितलें तें सर्व, तुष ( धान्याचा कोंडा ), हाडें, विष, रोदन, शिंक, यासहित असेल तर, रोग्यास ( रोगिविषयक प्रश्न असतां ) मृत्युकारक होतें. अंतःस्थ स्थिर अवयवास स्पर्श करून, वायु बाहेर टाकितहोत्साता, प्रश्न करील तर, प्रश्नकर्ता बहुत अन्न खाऊन तृप्तहोत्साता, प्रश्न करितो, असें सांगावें ॥२९॥

ललाटस्पर्शनाच्छूकदर्शनाच्छालिजौदनं । उरःस्पर्शात्षष्टिकान्नंग्रीवास्पर्शेचयावकं ॥३०॥

अर्थ–प्रश्नकर्ता, ललाटास स्पर्श करील, किंवा शुक (कुसळे) धान्य पाहील तर साळीचा भात भक्षण करून, प्रश्न करितो, उरास स्पर्श करील तर साठके ता दुळांचें अन्न व मानेस स्पर्श करील तर यवान्न भक्षण केले असें सांगावें ॥३०॥

**कुक्षिकुचजठरजानुस्पर्शेमाषाःपयस्तिलयवाग्वः। आस्वादयतश्चौष्ठौलिहतोमधुरंरसंज्ञेयं ॥३१॥**

अर्थ–कुक्षि, स्तन, उदर, जानु यास स्पर्श करील तर अनुक्रमानें माष, दुग्ध, तिल, यवागू ( पातळ भात, आटवल, कांजी ) हीं भक्षण केलीं व ओष्ठ आस्वादन ( गोडी घेणें ) करील किंवा चाटील तर गोडरस प्रश्नकर्त्यानें भक्षण केला असें सांगावें ॥३१॥

**विस्पृक्केस्फोटयेज्जिव्हामाम्लेवक्रंविकूणयेत्। कटुतिक्तकषायोष्णैर्हिक्केत्ष्ठीवेच्चसैंधवे ॥३२॥**

अर्थ–जीभ चावील तर विरघळ [illegible] पदार्थ खाल्ला तोंड वाकडें करील तर आंबट खा० उचकी येईल, तर तिखट, कडू व कडलेले पदार्थ खाल्ले आहेत थुकेल तर सैंधव किंवा खारट पदार्थ खालेले आहेत असें सांगावें ॥३२॥

**श्लेष्मत्यागेशुष्कतिक्तंतदल्पंश्रुत्वाक्रव्यादंप्रेक्ष्यवामांसमिश्रं। भ्रूगंडौष्ठस्पर्शनेशाकुनंतद्भुक्तंतेनेत्युक्तमेतन्निमित्तं ॥३३॥**

अर्थ–पृच्छक श्लेष्मा टाकील तर, शुष्क व कडु असें अल्प भक्षण केलें मांसभक्षणकर्त्या प्राण्यास पाहिला किंवा श्रवण केला तर मांसयुक्त भक्षण केलें भिवया, गाल, ओंष्ठ यास स्पर्श करील तर पाक्षिमांस पृच्छकानें भक्षण केलें असें हें निमित्त ( चिन्ह ) सांगितलें ॥३३॥

**मूर्धगलकेशहनुशंखकर्णजंघंवस्तिंचस्पृष्ट्वा। गजमहिषमेषशूकरगोशशमृगमांसयुग्भुक्तं ॥३४॥**

अर्थ–मस्तक, गळा, केश, हनु, शंख, कान, पोटरी, बस्ति ( नाभीच्या खालचा भाग, गर्भाशय ) यांस स्पर्श करील तर, अनुक्रमानें, गज, महिष, मेंढा, सूकर, गो, ससा, मृग, यांच्या मांसानें युक्त भोजन पृच्छकानें केलें असें सांगावें ॥३४॥

दृष्टेश्रुतेप्यशकुनेगोधामत्स्यामिषंवदेद्भुक्तं ।
गर्भिण्यागर्भस्यचनिपतनमेवंप्रकल्पयेत्प्रश्ने ॥३५॥

अर्थ—दुःशकुन पाहिला किंवा ऐकिला तर, प्रश्नकर्त्याने घोरपड किंवा मत्स्य यांचें मांस भक्षण केलें असें सांगावें. गर्भिणीच्या प्रश्नाविषयींही असेंच कल्पावें. म्ह० दुःशकुन दृष्ट, श्रुत असतां गर्भपात होईल, असें पृच्छकास सांगावें ॥३५॥

पुंस्त्रीनपुंसकाख्येदृष्टेनुमितेपुरःस्थितेस्पृष्टे ।
तज्जन्मभवतिपानान्नपुष्पफलदर्शनेचशुभं ॥३६॥

अर्थ—गर्भप्रश्नसमयीं, पुरुष दृष्ट, अनुमित, पुरःस्थित किंवा स्पृष्ट असेल तर पुरुषजन्म, स्त्री दृष्टादि असेल तर स्त्रीजन्म, नपुंसक दृष्टादि असेल तर नपुंसकजन्म होईल असें प्रश्नकर्त्यास सांगावें. मद्य, अन्न, पुष्प, फळ हीं प्रश्नसमयीं असतील तर सुखानें प्रसूति होईल असें सांगावें ॥३६॥

अंगुष्ठेनभ्रूदरंवांगुलिंवास्पृष्ट्वापृच्छेद्गर्भचिंतातदास्यात् । मध्वाज्याद्यैर्हेमरत्नप्रवालैरग्रस्थैर्वामातृधात्र्यात्मजैश्च ॥३७॥

अर्थ—स्त्री, अंगुष्ठेकरून, भिवया अथवा उदर किंवा अंगुलि यांतें स्पर्श करून प्रश्न करील तर, गर्भाविषयीं प्रश्न असें सांगावें; अथवा मध, घृत, पुरुषनामक उत्तम फळ, सुवर्ण, रत्न, पोंवळें, माता, धात्री ( दायी ), पुत्र हीं पुढें असतील आणि प्रश्न करील तर गर्भाविषयीं प्रश्न असें सांगावें ॥३७॥

गर्भयुताजठरेकरगेस्याद्दुर्निमित्तवशात्तदुदासः ।
कर्षतितज्जठरंयदिपीठोत्पीडनतःकरगेचकरेपि ॥३८॥

अर्थ—गर्भयुक्त स्त्री उदरावर हात ठेवून प्रश्न करील आणि त्याचवेळीं शिंक इत्यादि दुर्निमित्तें होतील तर गर्भपात होईल असें सांगावें; अथवा आसनाचें मर्दन करून, उदर खाजवील, किंवा हातानें हात धरून प्रश्न करील तर, गर्भपात होईल असें सांगावें ॥३८॥

प्राणायादक्षिणेद्वारेस्पृष्टेमासोत्तरंवदेत् ।
वामेह्वौकर्णएवंमाह्निचतुर्भिःश्रुतिस्तने ॥३९॥

अर्थ—नाकाच्या उजव्या नाकपुडीस स्पर्श करून स्त्री, गर्भाविषयीं प्रश्न करील तर एक महिन्यापुढें गर्भग्रहण होईल, डाव्या नाकपुडीस स्पर्श करील तर दोन वर्षांनीं, डाव्या कानास स्पर्श करील तर दोन वर्षांनीं, उजव्या कानास स्प० दोन महिन्यांनीं, स्तनांस स्पर्श करील तर चार महिन्यांनीं गर्भधारण होईल असें सांगावें ॥३९॥

वेणीमूलेत्रीन्सुतान्कन्यकेद्वेकर्णेपुत्रान्पंचह
स्तेत्रयंच । अंगुष्ठांतेपंचकंचानुपूर्व्यापादां
गुष्ठेपार्ष्णियुग्मेपिकन्यां ॥४०॥

अर्थ—स्त्री, वेणीमूलास स्पर्श करून प्रश्न करील तर, तीन पुत्र व दोन कन्या होतील; कानांस स्पर्श क० पांच पुत्र; हातानें हातास स्पर्श करील तर तीन पुत्र; हाताच्या कनिष्ठिकेस स्पर्श क० १ पुत्र, अनामिकेस २ पुत्र, मध्यमेस ३ पुत्र, तर्जनीस ४ पुत्र, अंगुष्ठास स्पर्श करील तर पांच पुत्र होतील. पायांचा अंगुष्ठ, दोनही खोटा, यांस स्पर्श करील तर १ कन्या होईल असें सांगावें ॥४०॥

सव्यासव्योरुसंस्पर्शेसूतेकन्यासुतद्वयं ।
स्पृष्टेललाटमध्यांतेचतुस्त्रितनयाभवेत् ॥४१॥

अर्थ—डाव्या किंवा उजव्या मांडीस स्पर्श करील तर दोन कन्या व दोन पुत्र होतील. ललाटाच्या मध्यें स्पर्श करील तर ४ पुत्र, ललाटाच्या अंतीं स्पर्श करील तर तीन पुत्र होतील असें सांगावें ॥४१॥

शिरोललाटभ्रूकर्णगंडहनुरदागलं । सव्या
पसव्यस्कंधश्चहस्तौचिबुकनालकं ॥४२॥
उरःकुचंदक्षिणमप्यसव्यंहृत्पार्श्वमेवंजठरं
कटिश्च । स्फिक्पायुसंध्यूरुयुगंचजानूजंघेथ
पादावितिकृत्तिकादौ ॥४३॥

अर्थ—प्रश्नसमयीं गर्भिणी स्त्री, शिरादि अवयवांस स्पर्श करील तर, ती स्त्री कृत्तिकादि नक्षत्रीं प्रसूत होईल असें जाणावें. शिरस्पर्श करील तर कृत्तिका; ललाटस्प० रोहिणी; भ्रुकुटिस्प० मृगशीर्ष; कर्ण० आर्द्रा; गाल० पुनर्वसु; हनवटी० पुष्य; दंत० आश्लेषा; कंठ० मघा; उजवा खांद० पूर्वा; डावा खांद० उत्तरा; हात० हस्त; चिबुक० (ओठाचा खालचा भाग) चित्रा; कंठाची नळी० स्वाती;

॥४२॥ उर० विशाखा; उजवा स्तन० अनुराधा; डावा स्तन० ज्येष्ठा; हृदय० मूळ; दक्षिणपार्श्व० (उजवी कूस) पूर्वाषाढा; डावी कूस० उत्तराषाढा; उदर० श्रवण; कमर धनिष्ठा; कुले व गुद याची संधि किंवा योनि० शततारका; उजवी मांडी० पूर्वाभाद्रपदा; डावी मांडी० उत्तराभाद्रपदा; गुडघे० रेवती; पोटऱ्या० अश्विनी; पाय० भरणी याप्रमाणे जाणावें ॥४३॥

इतिनिगदितमेतद्गात्रसंस्पर्शलक्ष्मप्रकटमभि
मताप्त्यैवीक्ष्यशास्त्राणिसम्यक् । विपुलम
तिरुदारोवेत्तियःसर्वमेतन्नरपतिजनताभिःपू
ज्यतेसौसदैव ॥४४॥

अर्थ—याप्रकारेंकरून बहुत शास्त्रें पाहून इच्छितमनोरथांची प्राप्ति व्हावी या-स्तव शरीरस्पर्शलक्षण स्पष्ट सांगितलें हें सर्व, बहुत बुद्धिमान् व उदार (निर्लोभी) असा जो ज्योतिषी जाणतो तो राजास व बहुत लोकास, सर्वकाल पूज्य होतो ॥४५॥

॥ इत्यंगविद्यानामैकपंचाशत्तमोध्यायः ॥५१॥

## ॥ अथपिटकलक्षणं ॥

सितरक्तपीतकृष्णाविप्रादीनांक्रमेणपिटकाये ।
तेक्रमशःप्रोक्तफलावर्णानांनाग्रजातानां ॥१॥

अर्थ—ब्राह्मणादि चार वर्णांस अनुक्रमानें श्वेत, रक्त, पीत, कृष्ण, या रंगाचे पिटक (फोड, पुटकुळ्या) सांगितले ते अनुक्रमानें क्षत्रियादि तीन वर्णांस फल देतात. ब्राह्मणास फल देत नाहींत स्प० श्वेत, रक्त क्षत्रियांस; श्वेत, रक्त, पीत वैश्यास-श्वेत, रक्त, पीत, कृष्ण शूद्रास फल देतात ॥१॥

सुस्निग्धव्यक्तशोभाःशिरसिधनचयंमूर्भिसौ
भाग्यमाराद्दौर्भाग्यंभ्रूयुगोत्थाःप्रियजनघट
नामाशुदुःशीलताच । तन्मध्योत्थाश्वशोकं
नयनपुटगतानेत्रयोरिष्टदृष्टिंप्रव्रज्यांशंखदे
शेश्रुजलनिपतनस्थानगाश्चातिचिंतां ॥२॥

अर्थ—मस्तकावर, स्निग्ध ( अरूक्ष ) व स्फटकाति असे पिटक होतील तर धनवृद्धि करतील. मूर्धि ( मुखपृष्ठ किंवा केशांत ) यावर शीघ्र सौभाग्यप्राप्ति, दोनही भिवयांवर दौर्भाग्य, भिवयांच्या मध्ये होतील तर प्रियजनाचा योग व शीघ्र दुःखभाव, नेत्राच्छादनांवर ( पापण्यांवर ) शोक, नेत्रांवर इष्टदर्शन, शखदेशावर प्रव्रज्या ( सर्वसंगपरित्याग ), नेत्रोदक पडतें त्या स्थळीं अतिचिंता, हीं फलें या स्थानीं फोड झाले तर होतात ॥२॥

घ्राणागंडेवसनसुतदाश्चोष्ठयोरन्नलाभंकुर्युस्त
द्वच्चिबुकतलगाभूरिवित्तंललाटे । हन्वोरेवं
गलकृतपदाभूषणान्यन्नपानेश्रोत्रेतद्भूषणग
णमपिज्ञानमात्मस्वरूपं ॥३॥

अर्थ—नासिकेवर पिटक होतील तर वस्त्रलाभ, गालांवर पुत्रप्राप्ति, ओष्ठांवर अन्नलाभ, अधरोष्ठाच्या खालच्या भागावरही अन्न लाभ, ललाटावर बहुत द्रव्यलाभ, हनुवटीवरही द्रव्यलाभ, गळ्यावर अलंकार व अन्नपान यांची प्राप्ति, कानावर कर्णभूषणें व आत्मस्वरूपज्ञान हीं प्राप्त होतात ॥३॥

शिरःसंधिग्रीवाहृदयकुचपार्श्वोरसिगताअयोघा
तंघातंसुततनयलाभंशुचमपि । प्रियप्राप्तिंस्कंधे
प्यटनमथभिक्षार्थमसकृद्धिनाशंकक्षोत्थाविदधति
धनानांवहुविधं ॥४॥

अर्थ—शिरःसंधि, मान, हृदय, स्तन, कुशी, उर यांवर फोड झाले तर अनुक्रमानें, लोहानें ताडन, घात, सुतलाभ, पुत्रलाभ, शोक, मित्रलाभ, हीं फलें होतात. स्कंधावर वारंवार भिक्षार्थ फिरणें, काखेवर धनाचा अनेकप्रकारें नाश, हीं फलें होतात ॥४॥

दुःखशत्रुनिचयस्यविघातंपृष्ठवाहुयुगजारचयंति ।
संयमंचमणिवंधनजाताभूषणाद्यमुपवाहुयुगोत्थाः॥५॥

अर्थ—पाठीवर फोड झाले तर दुःखांचा नाश, दोनी बाहूंवर झाले तर शत्रूंचा नाश करितात. मणिबंध ( हस्तमूल ) यावर झाले तर हस्तबंधन करितात, बाहुसमीप झाले तर भूषणें ( अलंकार ) मिळतील ॥५॥

धनाप्तिंसौभाग्यंशुचमपिकरांगुल्युदरगाःसुपा
नान्नंनाभौतदधइहचौरैर्धनत्द्दतिं । धनंधा
न्यंवस्तौयुवतिमथमेढ्रेसुतनयान्धनंसौभाग्यं
वागुदवृषणजाताविदधति ॥६॥

अर्थ–हस्तगत फोड, धनप्राप्ति, अगुलिगत, सौभाग्य; उदरगत, शोक; नाभिगत, उत्तम अन्न व पान; नाभीच्या खालीं, चोरांनीं द्रव्यहरण; बस्ति ( गर्भाशय ) या वर धन व धान्य; शिश्नावर, स्त्रीलाभ व पुत्रलाभ; गुदावर धन; वृषणावर सौभाग्य; हीं फलें होतात ॥६॥

ऊर्वोर्यानांगनालाभंजान्वोःशत्रुजनात्क्षतिं ।
शस्त्रेणजंघयोर्गुल्फेष्ववंधक्लेशदायिनः ॥७॥

अर्थ–मांड्यावर फोड झाले तर, वाहन व स्त्री यांचा लाभ; ढोंपरावर शत्रुजनापासून नाश; पोटर्‍यावर शस्त्रानें नाश; गुल्फावर फोड झाले तर मार्गामध्यें बंधन प्राप्त होतें ॥७॥

स्फिक्पार्ष्णिपादजाताधननाशागम्यगमनमध्वानं ।
वंधनमंगुलिनिचयेंगुष्ठेचज्ञातिलोकतःपूजां ॥८॥

अर्थ–कुल्यांवर फोड झाले तर धननाश, खोंटेवर अगम्यागमन, पायावर मार्ग हे होतात. अंगुलिसमूहावर बंधन, अंगुष्ठावर फोड झाले तर स्वजातिलोकापासून सन्मान होतात ॥८॥

उत्पातगंडपिटकादक्षिणतोवामतस्त्वभीघाताः ।
धन्याभवंतिपुंसांतद्विपरीतास्तुनारीणां ॥९॥

अर्थ–अगस्फुरणादि उत्पात, तिलकादिचिन्ह, फोड हे उजव्या अंगावर व प्रहार, अलम इत्यादि डाव्या अंगावर पुरुषास शुभ होत. याहून विपरीत स्त्रियास शुभ होत म० अंगस्फुरणादि डाव्या अंगावर व प्रहारादि उजव्या अंगावर स्त्रियांस शुभ होत ॥९॥

इतिपिटकविभागःप्रोक्तआमूर्धतोयंव्रणतिल
कविभागोप्येवमेवप्रकल्प्यः । भवंतिमशक

लक्ष्मावर्तजन्मापितद्वन्निगदितफलकारिप्रा
णिनांदेहसंस्थं ॥१०॥

अर्थ—या पूर्वोक्त प्रकारानें फोडांचा प्रकार मस्तकापासून पायांपर्यंत सांगितला. जखम व तिलक यांचाही प्रकार फोडाप्रमाणेंच कल्पावा. प्राण्यांच्या अंगावर रहाणारें मशक (चिन्ह), लक्ष्म (केशवेण्याची जागा नसून केशसमुदाय येणें), आवर्त (केशांचा भोंवरा) हीं जन्मकालींच जरी असलीं तथापि त्यांचीं फलें फोडांसारखींच होतात ॥१०॥

॥ इतिपिटकलक्षणंनामद्विपंचाशत्तमोध्यायः ॥ ५२ ॥

## अथवास्तुविद्या.

वास्तुज्ञानमथातःकमलभवान्मुनिपरंपरायातं ।
क्रियतेधुनामयेदंविदग्धसांवत्सरप्रीत्यै ॥१॥

अर्थ—आतां पंडितज्योतिष्यांच्या प्रीत्यर्थ ब्रह्मदेवापासून गर्गादिमुनिपरंपरेनें प्राप्त झालेलें हें वास्तुज्ञान (गृहबांधणें इ० ज्ञान) मी सांगतों ॥१॥

किमपिकिलभूतमभवद्रुंधानंरोदसीशरीरेण ।
तदमरगणेनसहसाविनिगृह्याधोमुखंन्यस्तं ॥२॥
यत्रचयेनगृहीतंविबुधेनाधिष्ठितःसतत्रैव ।
तदमरमयंविधातावास्तुनरंकल्पयामास ॥३॥

अर्थ—शरीरानें पृथ्वी व स्वर्ग यांतें व्याप्त करणार असे कोणी एक भूत (प्राणी) होतें झालें. तें देवांनीं अकस्मात् धरून अधोमुख (खालीं मुख करून) ठेविलें २ ज्या देवानें जेथें तें धरलें तो देव तेथें बसला. त्या देवमय भूतातें ब्रह्मदेव वास्तुपुरुष अशी कल्पना करिता झाला ॥३॥

उत्तममष्टाभ्यधिकंहस्तशतंनृपगृहंपृथुत्वेन ।
अष्टाष्टोनान्येवंपंचसपादानिदैर्घ्येण ॥४॥

अर्थ—राजाचें गृह रुंदीनें एकशेंआठ हात उत्तम होय. अन्य चार राजगृहें आठ आठ हात कमी असावी. (दुसरें १०० हात, ति० ९२, चवथें ८४, पांचवें

७६ हात ) अशीं पाच राजगृहें रुंदीच्या चतुर्थांशानें अधिक लांबेचीं असावीं. ( १०८ रुंदीस १३५ हात लांबी; १०० रु० १२५ लां०; ९२ रु० ११५ लां०, ८४ रु० १०५ लां०; ७६ रु० ९५ लां०; ) ॥४॥

षड्भिःषड्भिर्हीनासेनापतिसद्मनांचतुःषष्टिः ।
पंचैवंविस्तारात्षड्भागसमन्वितादैर्घ्यं ॥५॥

अर्थ–सेनापतीच्या गृहांची रुंदी ६४ हात उत्तम होय. यांत सहासहा हात कमी अशीं पाच गृहें करावीं. ( पहिलें ६४ हात, दु० ५८, ति० ५२, च० ४६, पां० ४० ). या रुंदीचा साहावा हिंसा अधिक लांबी असावी. ( उत्तम पहिल्या गृहाची लांबी ७४ हात, १६ अंगुळें अशी पुढें साहावा हिंसा अधिक लांबी जाणावी)॥५॥

षष्टिश्चतुर्विहीनावेश्मानिभवंतिपंचसचिवस्य ।
स्वाष्टांशयुतादैर्घ्यंतदर्धतोराजमहिषीणां ॥६॥

अर्थ–प्रधानाचें गृह उत्तम ६० हात. यांत चारचार हात कमी अशीं पाच असावीं. ( पहिलें ६०, दु० ५६, ति० ५२, च० ४८, पां० ४४ हात. ) व याची लांबी, रुंदीचा अष्टमांश अधिक असावी. ( ६७ हात १२ अंगुळें इ० ), राजाच्या स्त्रियांचीं गृहें प्रधानाच्या अर्धानें असावीं ( ५०, ३०, २८, २६, २४, २२ हात रुंदी व अष्टमांश अधिक लांबी असावी) ॥६॥

षड्भिःषड्भिश्चैवंयुवराजस्यापवर्जिताशीतिः ।
त्र्यंशान्विताचदैर्घ्यंपंचतदर्धैस्तदनुजानां ॥७॥

अर्थ–युवराजाचें गृह ८० हात रुंद उत्तम. यांत सहासहा हात कमी अशीं पाच गृहें होत. ( प० ८०, दु० ७४, ति० ६८, च० ६२, पां० ५६ ) याचा तृतीयांश अधिक लांबी ( १०६ हात १६ अंगुळें इ० ) त्या युवराजाच्या बंधूचीं गृहें निमे हात असावीं ॥७॥

नृपसचिवांतरतुल्यंसामंतप्रवरराजपुरुषाणां ।
नृपयुवराजविशेषःकंचुकिवेश्याकलाज्ञानां ॥८॥

अर्थ–राजगृह व प्रधानगृह यांच्या रुंदीच्या अंतरतुल्य (१८ हात ) रुंदी व लांबीच्या अंतरतुल्य १७॥ हात लांबी, मांडलिक राजे व श्रेष्ठ राजपुरुष यांच्या गृहाची असावी. राजगृह व युवराजगृह यांच्या अंतरतुल्य भालदार, वेश्या, गायनादिकला जाणणारे यांच्या गृहाची लांबी व रुंदी असावी ॥८॥

अध्यक्षाधिकृतानांसर्वेषामेवकोशरतितुल्यं ।
युवराजमंत्रिविवरंकर्मांताध्यक्षदूतानां ॥९॥

अर्थ—अश्वशालादि सर्व अधिकार चालविणारा व मुख्य यांचीं गृहें वक्ष्यमाण कोश व रतिगृहतुल्य असावीं. युवराज व प्रधान यांच्या गृहांतरतुल्य कर्मशालाधिकारी व दूत यांचीं गृहें करावीं ॥९॥

चत्वारिंशद्धीनाचतुश्चतुर्भिस्तुपंचयावदिति ।
षड्भागयुतादैर्घ्यंदैवज्ञपुरोधसोर्भिषजः ॥१०॥

अर्थ—दैवज्ञ, पुरोहित, वैद्य, यांच्या गृहांची रुंदी ४० हात उत्तम. यांत चार चार हात कमी अशीं पांच करावीं. व त्या रुंदीचा सहावा हिस्सा अधिक लांबी करावी. (पहिलें ४०, दु० ३६, ति० ३२, च० २८, पां० २४ अशी रुंदी व ४६ हात १६ अंगुळें ४० लांबी.) ॥१०॥

वास्तुनियोविस्तारःसएवचोच्छ्रायनिश्चयःशुभदः ।
शालैकेषुगृहेष्वपिविस्ताराद्द्विगुणितंदैर्घ्यं ॥११॥

अर्थ—गृहाची जितकी रुंदी तितकीच उंची शुभकारक होय. हा प्रकार चौसोपी सल्याचे वाड्याचा होय. एकसोपी गृहांचाठाईं रुंदीच्या दुप्पट लांबी शुभ होय.

चातुर्वर्ण्यव्यासोद्वात्रिंशत्स्याच्चतुश्चतुर्हीनाः ।
आषोडशादितिपरंन्यूनतरमतीवहीनानां ॥१२॥
सदशांशंविप्राणांक्षत्रस्याष्टांशसंयुतंदैर्घ्यं ।
षड्भागयुतंवैश्यस्यभवतिशूद्रस्यपादयुतं ॥१३॥

अर्थ—ब्राह्मणादि चार वर्णांच्या गृहांची रुंदी अनुक्रमानें ३२,२८,२४,२० हात उत्तम. त्यांत चारचार हात कमी अशीं १६ हस्तापर्यंत रुंदीचीं गृहें असावीं. (ब्रा० प० ३२, दु. २८, ति. २४, च. २०, पां. १६; क्षत्रियाचें प. २८, दु. २४, ति. २०, च. १६; वैश्याचें प. २४, दु. २०, ति. १६; शूद्राचें प. २०, दु. १६.) यांहून अति कमी हस्तप्रमाण गृहें चांडालादि हीन जातींचीं असावीं ॥१२॥ ब्राह्मणांच्या गृहांची लांबी, रुंदीच्या दशांश अधिक, क्षत्रियांच्या अष्टांश, वैश्यांच्या षष्ठांश, शूद्रांच्या चतुर्थांश अधिक असावी ॥१३॥

नृपसेनापतिगृहयोरंतरमानेनकोशरतिभवने ।
सेनापतिचातुर्वर्ण्यविवरतोराजपुरुषाणां ॥१४॥

अर्थ–राजा व सेनापति यांचे गृहमान ( श्लो. ४।५ ) याच्या अंतरातर्की कोश गृह व क्रीडागृह हीं असावीं. सेनापतिगृह ( श्लो. ५ ) व चातुर्वर्ण्यगृह (श्लो. १,२) यांच्या अतराइतके राजपुरुषांच्या गृहांचें मान असावें (राजपुरुष ब्राह्मण असल्यास ३२ हात, क्षत्रिय. २८, वैश्य. २४, शूद्र. १० इ० चातुर्वर्ण्यगृह घ्यावें) १४

अथपारसवादीनांस्वमानसंयोगदलसमंभवनं ।
हीनाधिकंस्वमानादशुभकरंवास्तुसर्वेषां ॥१५॥

अर्थ–पारसव ( ब्राह्मणापासून शूद्रीच्याठाई झालेला पुत्र ) पारसवादि संकरजातींचे गृह आई व बाप यांच्या गृहमानांचें ऐक्य करून त्याचे अर्धाइतकें गृहमान करावें. हे राजादि पारसवांत गृहमान सांगीतलें, याहून कमी किंवा जास्ती गृह सर्वांस अशुभकारक होतें ॥१५॥

पश्वाश्रमिणाममितंधान्यायुधवन्हिरतिगृहाणांच ।
नेच्छंतिशास्त्रकाराहस्तशतादुच्छ्रितंपरतः ॥१६॥

अर्थ–पशु, आश्रमी ( संन्यासी ), धान्य, शस्त्र, अग्नि, क्रीडा यांच्या गृहांस प्रमाण नाहीं ( अपरिमित हेंच प्रमाण ). शंभर हस्तांपेक्षां अधिक उंच गृह नसावें असें वास्तुशास्त्रज्ञ ह्मणतात ॥१६॥

सेनापतिनृपतीनांसप्ततिसहितेद्विधाकृतेव्यासे ।
शालाचतुर्दशहृतेपंचत्रिंशद्धृतेलिंदः ॥१७॥

अर्थ–सेनापति, राजा इत्यादि, चातुर्वर्ण्यवर्जित, गृहांच्या रुंदीस सत्तर मिळवून ते दोहोंजागीं मांडावे आणि पहिले १४ नीं भागावे जें लब्ध येईल तितकी शाला; व दुसरे ३५ नीं भागावे जें लब्ध येईल तितका अलिंद, असी करावी. शाला ह्म० गृहाचा आंतील भाग ( दालन ). अलिंद ह्म० घराचाच भिंतीबाहेरील पडवीसारखा भाग आंगण्यासमोर करितात तो ॥१७॥

हस्तद्वात्रिंशादिषुचतुश्चतुस्त्रित्रिकत्रिकाःशालाः ।
सप्तदशत्रितयतिथित्रयोदशकृतांगुलाभ्यधिकाः १८
त्रित्रिद्विद्विद्विसमाःक्षयक्रमादंगुलानिचैतेषां ।
व्येकाविंशतिरष्टौविंशतिरष्टादशत्रितयं ॥१९॥

अर्थ–ब्राह्मणादि चार वर्णांच्या ३२ इत्यादि रुंदीच्या पांच गृहांचाठाई अनुक्रमानें ४।४।३।३।३ हात व १७।३।१५।१३।४ अंगुलें अनुक्रमानें शाला होत.

( ३२ हात रुंदीच्या गृहास ४ हात १७ अंगुलें शाळा करावी ). ॥१८॥ तसेंच ३२ इत्यादि रुंदीच्या गृहानुक्रमानें ३।३।२।२।२ हात व १९।८।२०।१८।३ अंगुलें अनुक्रमानें अलिंद होय. ( ३२ हात रुंदीच्या गृहास ४ हात १७ अंगुलें शाळा व ३ हात १९ अंगुलें अलिंद इत्यादि जाणावें ) ॥१९॥

**शालात्रिभागतुल्याकर्तव्यावीथिकावहिर्भवनात् ।**
**यद्यग्रतोभवतिसासोष्णीपंनामतद्वास्तु ॥ २०॥**
**सायाश्रयमितिपश्चात्सावष्टंभंतुपार्श्वसंस्थितया ।**
**सुस्थितमितिचसमंताच्छास्त्रज्ञैःपूजिताःसर्वाः ॥२१॥**

अर्थ—शालेच्या तीन भागांइतकी गृहाच्या बाहेर वीथिका ( मार्ग ) करावी. ती पूर्वेकडे असेल तर सोष्णीषनामक तें वास्तु होय ॥२०॥ पश्चिमेकडे असेल तर सायाश्रयनामक, बाजूस असेल तर सावष्टंभनामक, चोहों बाजूंनीं असेल तर सुस्थितनामक वास्तु होतें. या सर्व वीथिका वास्तुशास्त्रज्ञांनीं शुभ केल्या आहेत २१

**विस्तारषोडशांशःसचतुर्हस्तोभवेद्गृहोच्छ्रायः ।**
**द्वादशभागेनोनोभूमौभूमौसमस्तानां ॥ २२ ॥**

अर्थ—रुंदीचे षोडशांशास चार हात मिळवून जितके हात होतील तितकी खालच्या मजल्याची उंची होय. त्यावरच्या मजल्याची उंची खालच्या मजल्याचा द्वादशांश कमी असावी. याचे वरील मजल्याची उंची याच्या द्वादशांश कमी करावी. याप्रमाणें सर्व मजल्यांची उची पूर्वमजल्यापेक्षां द्वादशांश कमी कमी करावी.

**व्यासात्षोडशभागःसर्वेषांसद्मनांभवतिभित्तिः ।**
**पक्वेष्टकाकृतानांदारुकृतानांतुसविकल्पः ॥२३॥**

अर्थ—सर्व गृहांच्या भिंती, भाजलेल्या इटांच्या केल्या तर, त्यांचे प्रमाण रुंदीचा षोडशांश होय. काष्ठकृत असतील तर त्यांस नियम नाहीं. त्या यथेच्छ कराव्या२३

**एकादशभागयुतःसससतिर्नृपवलेशयोर्व्यासः ।**
**उच्छ्रायोंगुलतुल्योद्वारस्यार्धेनविष्कंभः ॥२४॥**

अर्थ—चातुर्वर्ण्यरहित, राजा, सेनापति इत्यादि गृहांच्या रुंदीचा एकादशांश रुंदींत मिळवून, त्यास ७० मिळवावे आणि जितके हात होतील, तितकीं अंगुलें द्वाराची उंची करावी. द्वाराचे उंचीचे अर्धाइतकी द्वाराची रुंदी करावी ॥२४॥

विप्रादीनांव्यासात्पंचांशोष्टादशांगुलसमेतः ।
साष्टांशोविष्कंभोद्वारस्यद्विगुणउच्छ्रायः ॥२५॥

अर्थ—ब्राह्मणादि चार वर्णांच्या गृहांच्या रुंदीचा पंचमांश घेऊन, त्यास १८ अंगुलें मिळवून, पुनः रुंदीच्या अष्टमांशानें युक्त करावा ह्मणजे जितके अंक येतील तितकीं अंगुलें द्वाराची रुंदी व रुंदीचे दुप्पट उंची करावी ॥२५॥

उच्छ्रायहस्तसंख्यापरिमाणान्यंगुलानिबाहुल्यं ।
शाखाद्वयेपिकार्यंसार्धंतत्स्यादुदुंबरयोः ॥२६॥
उच्छ्रायात्सप्तगुणादशीतिभागःपृथुत्वमेतेषां ।
नवगुणितेशीत्यंशःस्तंभस्यदशांशहीनोग्रे ॥२७॥

अर्थ—द्वाराच्या उंचीच्या हस्तपरीमित अंगुळें बाजूच्या काष्ठांचें बाहुल्य (जाडी) असावें व त्याचें दीडपट जाडी दोनही उंबरठे करावे ॥२६॥ द्वाराची उंची सप्तगुणित करून त्याचा ८० व्या हिंशाइतकी शाखा व उंबरठे यांची रुंदी करावी. स्तंभाची उंची नवांनीं गुणून त्याचा ८० व्या हिंशाइतकें स्तंभाचें खालचें पृथुत्व (जाडी) व त्यांत दशांश कमी करून जें येईल तितकें वरचें पृथुत्व स्तंभाचें करावें ॥२७॥

समचतुरस्रोरुचकोवज्रोष्टाश्रिर्द्विवज्रकोद्विगुणः ।
द्वात्रिंशतातुमध्येप्रलीनकोवृत्तइतिवृत्तः ॥२८॥

अर्थ—जो स्तंभ मध्यभागीं समचतुरस्र तो रुचकसंज्ञक, जो मध्यभागीं अष्टास्रि तो वज्रसंज्ञक, जो मध्यभागीं षोडशास्रि तो द्विवज्रक, जो बत्तिसास्रि तो प्रलीनस०, जो मध्यें वर्तुल तो वृत्तस० जाणावा ॥२८॥

स्तंभंविभज्यनवधावहनंभागोघटोस्यभागोन्यः ।
पद्मंतथोत्तरोष्ठंकुर्याद्भागेनभागेन ॥२९॥

अर्थ—स्तंभाचे नऊ भाग करून त्याचा पहिला खालचा भाग वहन, दुसरा घट, तिसऱ्यापासून सातपर्यंत भागपंचक समचतुरस्र व अष्टमभाग कमलाकार, नवमभाग उत्तरोष्ठ करावा. अशी ९ भागाची व्यवस्था करावी ॥२९॥

स्तंभसमंबाहुल्यंभारतुलानामुपर्युपर्यासां ।
भवतितलोपतुलानामूनंपादेनपादेन ॥३०॥

अर्थ—स्तंभांतरके भारतुलाचें पृथुत्व असावें. (भारतुला म्ह० स्तंभांवर तिर्यक् काष्ठ, भार सहन करण्याकरितां, देतात तें.) याचे वर वर तुला व उपतुला यांचें पृथुत्व चतुर्थांश कमी असावें ॥३०॥

अप्रतिपिद्धालिंदंसमंततोवास्तुसर्वतोभद्रं ।
नृपविबुधसमूहानांकार्यंद्वारैश्चतुर्भिरपि ॥ ३१॥

अर्थ—ज्या गृहीं अलिंदाचा नियम नाहीं सर्व दिशांस अलिंद होतात तें गृह सर्वतोभद्रसंज्ञक होय. हें गृह चार दिशेस चार द्वारांनीं युक्त राजे व देवसमूह यांचें करावें ॥३१॥

नंद्यावर्तमलिंदैःशालाकुड्यात्प्रदक्षिणांतगतैः ।
द्वारंपश्चिममस्मिन्विहायशेषाणिकार्याणि ॥३२॥

अर्थ—शालाभिंतीपासून प्रदक्षिण केलेल्या अलिंदानीं नंद्यावर्तसं० गृह होतें. त्यास पश्चिमेकडे द्वार न करितां तीन दिशांस तीन करावीं ॥३२॥

द्वारालिंदोंतगतःप्रदक्षिणोन्यःशुभस्ततश्चान्यः ।
तद्वच्चवर्धमानेद्वारंतुनदक्षिणंकार्यं ॥३३॥

अर्थ—मुख्यवास्तूचें जें द्वार तेथें जो अलिंद तो द्वारालिंद. तो दक्षिणोत्तर शालामध्यें त्यास संलग्न करावा. अन्य अलिंद त्याच्या प्रदक्षिणगत असावे. असे चार ज्या गृहास असतील तें वर्धमानसं० या गृहीं दक्षिणेकडे द्वार न करावें ॥३३॥

अपरोंतगतोलिंदःप्रागंतगतौतदुत्थितौचान्यौ ।
तदवधिविवृतश्चान्यःप्राग्द्वारंस्वस्तिकेशुभदं ॥३४॥

अर्थ—स्वस्तिकसं० गृहीं पश्चिमेकडील अलिंद दक्षिणोत्तरशालासंलग्न करावा व दक्षिणोत्तर दोन अलिंद त्यांपासून आरंभून पूर्वेकडील शालासंलग्न करावे व पूर्वेकडील अलिंद दक्षिणोत्तरांच्या मध्यें करावा. अशा स्वस्तिक गृहीं पूर्वेकडे द्वार शुभकारक होय ॥३४॥

प्राक्पश्चिमावलिंदावंतगतौतदवधिस्थितौशेषौ ।
रुचकेद्वारंनशुभदमुत्तरतोन्यानिशस्तानि ॥३५॥

अर्थ—पूर्व व पश्चिम अलिंद दक्षिणोत्तरशालासंलग्न करावे व दक्षिणोत्तर अलिंद पूर्वपश्चिम अलिंदसंलग्न करावे तें रुचकसं० गृह होय. या गृहीं उत्तरेकडे द्वार शुभ नव्हे. अन्य दिशेकडे द्वारें शुभ होत ॥३५॥

श्रेष्ठंनंद्यावर्तंसर्वेषांवर्धमानसंज्ञंच ।
स्वस्तिकरुचकेमध्येशेषंशुभदंनृपादीनां ॥३६॥

अर्थ—नंद्यावर्त व वर्धमानसं० गृहें सर्व वर्णांस प्रशस्त होत. स्वस्तिक व रुचक मध्यम होत. शेष सर्वतोभद्रसं० गृह राजे व देव यास शुभद होय ॥३६॥

उत्तरशालाहीनंहिरण्यनाभंत्रिशालकंधन्यं ।
प्राक्शालयावियुक्तंसुक्षेत्रंवृद्धिदंवास्तु ॥३७॥
याम्याहीनंचुल्लीत्रिशालकंवित्तनाशकरमेतत् ।
पक्षघ्नमपरयावर्जितंसुतध्वंसवैरकरं ॥३८॥

अर्थ—उत्तरेकडे शालारहित जें त्रिशालगृह तें हिरण्यनामसं० शुभ होय. पूर्वेकडील शालेनें रहित जें त्रिशालगृह तें सुक्षेत्रसं० पुत्रादिकांची वृद्धि करणारें होय ३७ दक्षिणेकडील शालारहित जें त्रिशालगृह तें चुल्लीसं० द्रव्यनाश करणारें होय. पश्चिमेकडील शालाविहीन त्रिशाल जें गृह तें पक्षघ्नसं० पुत्रनाश व वैर करणारें होय ॥३८॥

सिद्धार्थमपरयाम्येयमसूर्यपश्चिमोत्तरेशाले ।
दंडाख्यमुदक्पूर्वेवाताख्यंप्राग्युतायाम्या ॥३९॥
पूर्वापरेतुशालेगृहंचुल्लीदक्षिणोत्तरेकाचं ।
सिद्धार्थेर्थावाप्तिर्यमसूर्येगृहपतेर्मृत्युः ॥४०॥
दंडवधोदंडाख्येकलहोद्वेगःसदैववाताख्ये ।
वित्तविनाशश्चुल्यांज्ञातिविरोधःस्मृतःकाचे ॥४१॥

अर्थ—ज्या गृहीं दक्षिणेकडे व पश्चिमेकडे शाला असतील तें सिद्धार्थसं०, पश्चिमेस व उत्तरेस शाला असतील तें गृह यमसूर्यसंज्ञक, उत्तरेकडे व पूर्वेकडे शाला असतील तें गृह दंडसंज्ञक, पूर्वेस व दक्षिणेस शाला असेल तें गृह वातसंज्ञक ॥३९ पूर्वेस व पश्चिमेस शाला असेल तें गृह चुल्लीनामक, दक्षिणेस व उत्तरेस शाला असेल तें गृह काचसंज्ञक होय. सिद्धार्थसं० गृहीं धनप्राप्ति, यमसूर्य गृहीं गृहस्वामीस मृत्यु ॥४०॥ दंडाख्यगृहीं दंडानें वध, वाताख्यगृहीं निरंतर कलहानें चित्तशोक, चुल्लीसंज्ञक गृहीं द्रव्यनाश, काचसं० गृहीं ज्ञातीचा विरोध, हीं फलें या गृहीं होतात ॥४१॥

जगन्मित्र छापखान्यांत पुस्तकें विकत मिळतात तीः—

०।।। रामरक्षा.
०।।। गोपिगीत.
०।।। रुक्मिणी स्वयंवर व सुभद्राहरण आर्या.
०।।। अंगदशिष्टाई.
०।।। वास्तुप्रकरणीं कोष्टक
०।।। ध्रुवाख्यान.
०।।। तुकारामकृत मानस-पूजेचे अभंग.
०।।। सोळा सोमवार कथा
०।।। चित्रें.
०।। मंगलाष्टकें नवग्रहांचीं
०।। गुरुचरित्र ओंव्या ५२
०।। ज्ञानेश्वरसाधुकृतखेळ
०।। भीष्मप्रतिज्ञा.
०।। सीतास्वयंवर.
०।। द० म० कोष्टकें.
०।। चर्पटपंजरिका.
०।। नौकाक्रीडन.
०।। कऱ्हाडे ब्राह्मणांचे प्रवर.
०।। शिवस्तुति.
०।। गणपतीचे श्लोक.
०। दुर्गास्तोत्र.

## जगन्मित्र छपिसांत पुस्तकें विकत मिळतात तीं:—

| | | |
|---|---|---|
| १० श्रीमद्भागवत. | स्त्रतेचा बोधक वाद. | ८— शिवसहस्रनामावलि. |
| ८ यथार्थदीपिका. | ॥=समश्लोकी गीता. | ८— प्रातःस्मरण. |
| ४ धर्मसिंधु (ग्रंथकार याचे घरचे पुस्तकाव रून छापिलेला). | ॥—प्रतिष्ठामयूख. | ८— बभ्रुवाहनआख्यान. |
| | ॥ वेताळपचविशी. | ८— रामदासी श्लोक. |
| | ॥ रत्ना० शि० वर्णन. | ८— गोत्रावली (कऱ्हाडे ब्राह्मणाची). |
| ४ भारतचंपु सटीक. | ॥ स्मर्तचिंतामणि. | |
| ४ एकादशीव्रतसार. | ।=रघुजातक. | ८— विष्णुसहस्रनाम. |
| ३ बृहज्जातक. | ।=माघसर्ग २ रा. | ८— रामजोशीकृत लावण्या व पदें. |
| २॥ गीतार्थबोधिनी. | ।=वनौषधिसंग्रह. | |
| २ विक्रमचरित्र. | ।= पांडुरंगमाहात्म्य. | ८— केकावलि. |
| २ फौजदारी ठराव. | ।— भगवद्गीता (आक्ट. | ८— संस्कृत आर्या. |
| १॥ नारायणभट्टी. | ।= नवीन पोलिसचा | ८— गायनप्रकार. |
| १॥ व्रतोद्यापनकौमुदी. | ।= बर्थोल्डचरित्र. | ८— विधवाविवाह सहार सार. |
| १।—॥दिवाणी व फौजदारी निवडक निवाडे सन १८६२।६९ सालचे. | ।= माघसर्ग १ ला. | |
| | ।= माघसर्ग ३ रा. | ८— केरोपंती पंचांग शके १७९९ चें. |
| | ।= अपूर्णांक (शिवराम भास्कर काळेकृत) | ८— गंगालहरी |
| १। रसमाधव. | ।= गुरुदत्तात्रय स्वामीच्या आरत्या (अक्कलकोटचे स्वामींचे तसबिरीसह). | ८—॥ विष्णुसहस्रनामावलि |
| १। सर्वार्थचिंतामणि. | | ८—॥ विधवाविवाहखंडण. |
| १। गोपीचंदराजाचें नाटक मराठी. | | ८—॥ अंकलिपि. |
| | | ८—॥ प्राकृत आरत्या. |
| १ रुक्मिणीस्वयंवर. | ।— तर्कदीपिका | ८—॥ रामहृदय व रामगीता. |
| १ बालवैद्य. | ।— कुंडार्क सटीक. | |
| १ शिवलीलामृत. | ।॥ लवाकुशाख्यान. | ८—। मेस्तक (तोंडचे हिशेब |
| ॥=मुहूर्तगणपति. | ।॥ विदुरनीति. | ८— नलाख्यान आर्या. |
| ॥ मुहूर्तमार्तंड प्राकृत टीका. | ।॥ स्फुटज्योतिष. | ८— व्यंकटेशस्तोत्र. |
| | ।॥ रघुवंशसर्ग ४ था. | ८— रामदासाचे अभंग. |
| ॥ पंचायुधपंचाख्यभाषण. | ।॥ सिंहासनबत्तिशी. | ८— स्फुट आर्या व श्लोक. |
| ॥ निर्मळमाहात्म्य. | ।॥ आनंदसागर. | ८— गर्गाचार्यकृत प्रश्नावळि. |
| ॥ गीतार्थमंजरी. | ८= तीर्थांचीं आरतें. | |
| ।= विष्णुसहस्रनामाचा प्राकृत अर्थ. | ८= शनिमाहात्म्य. | ८— एकादशीमाहात्म्य. |
| | ८=। पल्लीपतनकारिका. | ८— महिम्न. |
| ।=पुनर्विवाहप्रश्न आधा- | ८=। गणपतिसहस्रनाम. | ८— व्याकरणसार. |

पूर्व

# वास्तु कोष्टक ८१ पदाचा श्लोक ४२ पासून ५० पर्यंत

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| शिखी १ मस्तक | पर्जन्य २ नयन | जयंत ३ कर्ण | इंद्र ४ उर | सूर्य ५ स्कंध | सत्य ६ भुज | भृश ७ भुज | अंतरिक्ष ८ भुज | अनिल ९ भुज |
| दिति ३२ वामनयन | आप ४२ मुख | जयंत कर्ण | इंद्र उर | सूर्य स्कंध | सत्य भुज | भृश भुज | सावित्र ४६ हस्त | पूषा १० भुज |
| अदिति ३१ कर्ण | अदिति कर्ण | आपवत्स ४१ उर | अर्यमा स्तन | अर्यमा ३४ स्तन | अर्यमा स्तन | सविता ४५ हस्त | वितथ पार्श्वभाग | वितथ ११ पार्श्वभाग |
| भुजग ३० उर | भुजग उर | पृथ्वीधर स्तन | ब्रह्मा | ब्रह्मा | ब्रह्मा | विवस्वान् ३५ जठर | गृहक्षत पार्श्वभाग | गृहक्षत १२ पार्श्वभाग |
| सोम २९ स्कंध | सोम स्कंध | पृथ्वीधर ४० स्तन | ब्रह्मा | ब्रह्मा ३३ | ब्रह्मा | विवस्वान् जठर | यम ऊरु | यम १३ ऊरु |
| भल्लाट २८ भुज | भल्लाट भुज | पृथ्वीधर स्तन | ब्रह्मा | ब्रह्मा | ब्रह्मा | विवस्वान् जठर | गंधर्व जानु | गंधर्व १४ जानु |
| मुख्य २७ भुज | मुख्य भुज | राजयक्ष्मा ३९ हस्त | मित्र जठर | मित्र ३८ जठर | मित्र जठर | इंद्र ३७ लिंग | भृंगराज जंघा | भृंगराज १५ जंघा |
| अहि २६ भुज | रुद्र ४५ हस्त | शोष पार्श्वभाग | असुर पार्श्वभाग | अंबुपति ऊरु | कुसुमदंत जानु | सुग्रीव जंघा | जय ४४ लिंग | मृग १६ गुल्फ |
| रोग २५ भुज | पापयक्ष्मा २४ भुजे | शोष २३ पार्श्वभाग | असुर २२ पार्श्वभाग | अंबुपति २१ ऊरु | कुसुमदंत २० जानु | सुग्रीव १९ जंघा | दौवारिक १८ गुल्फ | पितर १७ पाय |

पूर्व

# वास्तुकोष्ठक ६४ पदांचा श्लोक ५५।५६ देवता ४५

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| शिखी १ / दिति ३२ | पर्जन्य २ | जयंत ३ | इंद्र ४ | सूर्य ५ | सत्य ६ | भृश ७ | अंतरिक्ष ८ / अनिल ९ |
| अदिति ३१ | पर्जन्य / अदिति | जयंत | इंद्र | सूर्य | सत्य | भृश / पूषा | पूषा १० |
| भुजग ३० | भुजग | आप ३९ / आपवत्स [illegible] | अर्यमा ३४ | अर्यमा | सावित्र ४२ / ३५ सविता | वितथ | वितथ ११ |
| सोम २९ | सोम | पृथ्वीधर | ब्रह्मा | ब्रह्मा | विवस्वान् | गृहक्षत | गृहक्षत १२ |
| भल्लाट २८ | भल्लाट | ४० पृथ्वीधर | ब्रह्मा ३३ | ब्रह्मा | ३६ विवस्वान् | यम | यम १३ |
| मुख्य २७ | मुख्य | रुद्र ४५ / ४६ राजयक्ष्मा | मित्र ३७ | मित्र | जय ४४ / इंद्र ४३ | गंधर्व | गंधर्व १४ |
| अहि २६ | अहि / रोग | असुर | जलपति | कुसुमदंत | सुग्रीव | दौवारिक / भृंगराज | भृंगराज १५ |
| रोग २५ / २४ पाप यक्ष्मा | २३ शोष | २२ असुर | २१ जलपति | २० कुसुमदंत | १९ सुग्रीव | १८ दौवारिक | पितर १७ / मृग १६ |

कोणगत सूत्राचे सपान

रोगापासून वायुपर्यंत }
पितर — शिखी — } वंशसंज्ञक सूत्रे २

वितथ — शोष —
मुख्य — भृश —
जयंत — भृंग —
अदिति — सुग्रीव — } रज्जुसंज्ञक सूत्रे ५

एकाशीतिविभागेदशदशपूर्वोत्तरायतारेखाः ।
अंतस्त्रयोदशसुराद्वात्रिंशद्बाह्यकोष्ठस्थाः ॥४२॥

अर्थ–एक्यायशीं विभाग कोष्ठकास, पूर्वपश्चिमरेषा १० व दक्षिणोत्तररेषा १० काढाव्या ह्मणजे एक्यायशीं कोष्ठक क्षेत्र उत्पन्न होतें. ह्यामध्यें आतील तेरा कोष्ठकात १३ देव व बाह्य ३२ कोष्ठकात ३२ देव रहातात त्यांचीं नावें पुढील श्लोकात आहेत ॥४२॥

शिखिपर्जन्यजयंतेंद्रसूर्यसत्याभृशोंतरिक्षश्च ।
ऐशान्याद्याःक्रमशोदक्षिणपूर्वोनिलःकोणे ॥४३॥
पूषावितथबृहत्क्षतयमगंधर्वाख्यभृंगराजमृगाः ।
पितृदौवारिकसुग्रीवकुसुमदंतांबुपत्यसुराः ॥४४॥
शोषोथपापयक्ष्मारोगःकोणेततोहिमुख्यौच ।
भल्लाटसोमभुजगास्ततोदितिर्दितिरितिक्रमशः ४५

अर्थ–१ शिखी २ पर्जन्य ३ जयंत ४ इंद्र ५ सूर्य ६ सत्य ७ भृश ८ अंतरिक्ष हे ८ ईशानीपासून आग्नेयीकडे आठव्या कोष्ठकात मांडावे व आग्नेयकोणीं ९ अनिल रहातो ॥४३॥ १० पूषा ११ वितथ १२ बृहत्क्षत १३ यम १४ गंधर्व १५ भृंगराज १६ मृग १७ पितर १८ दौवारिक १९ सुग्रीव २० कुसुमदंत २१ अंबुपति २२ असुर ॥४४॥ २३ शोष २४ पापयक्ष्मा २५ रोग ( हा वायव्य कोणीं ) २६ अहि २७ मुख्य २८ भल्लाट २९ सोम ३० भुजग ३१ अदिति ३२ दिति या क्रमानें बाह्यकोष्ठकात देवता रहतात ॥४५॥

मध्येब्रह्मानवकोष्ठकाधिपोस्यार्यमास्थितःप्राच्यां ।
एकांतरात्प्रदक्षिणमस्मात्सवितावियस्वांश्च ॥ ४६ ॥
विबुधाधिपतिस्तस्मान्मित्रोन्योराजयक्ष्मनामाच ।
पृथ्वीधरापवत्साविव्येतेब्रह्मणःपरिधौ ॥ ४७ ॥
आपोनामैशानेकोणेहोताग्नेचसावित्रः ।
जयइतिचनैर्ऋतेरुद्रआनिलेभ्यंतरपदेषु ॥ ४८ ॥

अर्थ–मध्यें नऊ कोष्ठकांचा स्वामी ब्रह्मा, याच्या पूर्वेस अर्यमा, सविता आग्नेयकोणीं, दक्षिणेस विवस्वान, नैर्ऋत्यकोणीं इंद्र, पश्चिमेस मित्र, वायव्यकोणीं राजय

क्ष्मा, उत्तरेस पृथ्वीधर, ईशानकोणीं आपवत्स हे ब्रह्माच्या परिधीस ( सभोंवते ) स्थापावे. त्याचे ईशानकोणी आप, आग्नेयकोणीं सावित्र, नैर्ऋत्यकोणीं जय, वायव्यकोणीं रुद्र, हे आंतील पदांच्या कोणीं जाणावे ॥४६॥४७॥४८॥

आपस्तथापवत्सःपर्जन्योग्निर्दितिश्चवर्गोयं ।
एवंकोणेकोणेपदिकाःस्युःपंचपंचसुराः ॥४९॥
बाह्याद्विपदाःशेपास्तेविबुधाविंशतिःसमाख्याताः ।
शेषाश्चत्वारोन्येत्रिपदादिक्ष्वर्यमाद्यास्ते ॥५०॥

अर्थ–आप, आपवत्स, पर्जन्य, अग्नि, दिति, हा एक पांचांचा वर्ग ईशानकोणीं, याप्रकारे पांचपांच देव कोणाकोणाचाठाई एकपदिक ( एके कोष्ठकांत एक असे ) होतात. सविता, सावित्र, अंतरिक्ष, अनिल, पूषा, हे आग्नेयकोणीं; विबुधाधि-पति ( इंद्र ), जय, दौवारिक, पिता, मृग, हे नैर्ऋत्यकोणीं; राजयक्ष्मा, रुद्र, पापयक्ष्मा, रोग, अहि, हे वायव्यकोणीं; असे एकपदिक देव २० सांगीतले आहेत. शेष बाह्य २० द्विपद ( दोनदोन कोष्ठकांत एक देव ) जाणावे. शेषअन्य, अर्यमादि, चार ते पूर्वादिदिशांचाठाई त्रिपद जाणावे ॥४९॥५०॥

पूर्वोत्तरदिङ्मूर्धापुरुषोयमवाङ्मुखोस्यशिरसिशिखी ।
आपोमुखेस्तनेस्यार्यमाह्युरस्यापवत्सश्च ॥ ५१ ॥
पर्जन्याद्याबाह्याद्दक्श्रवणोरःस्थलांसगादेवाः ।
सत्याद्याःपंचभुजेहस्तेसविताससावित्रः ॥ ५२ ॥
वितथोबृहत्क्षतयुतःपार्श्वेजठरेस्थितोविवस्वांश्च ।
ऊरुजानूजंघेस्फिगितियमाद्यैःपरिगृहीताः ॥ ५३ ॥
एतेदक्षिणपार्श्वस्थानेष्वेवंचवामपार्श्वस्थाः ।
मेढ्रेशक्रजयंतौहृदयेब्रह्मापितांघ्रिगतः ॥ ५४ ॥

अर्थ–पूर्वोत्तर ( ईशानी ) दिशेस मस्तक व खालीं मुख ( उपडा ) असा वास्तुपुरुष राहतो. याचे शिराचेठाई अग्नि, मुखीं आप, स्तनीं अर्यमा, उरस्थलीं आपवत्स. ॥५१॥ पर्जन्यादि बाह्यकोष्ठस्थ चार देव नयनादिकीं राहतात. ( नयनीं पर्जन्य, कर्णी जयंत, उरस्थलीं इंद्र, स्कंधीं सूर्य, ) सत्यादिक पांच भुजीं, सावित्र व सविता हस्तीं. ॥५२॥ बृहत्क्षत व वितथ हे पार्श्वभागीं, विवस्वान् जठरीं, ऊरुप्रदेशीं यम, जानूस गंधर्व, जंघेस भृंगराज, स्फिक् ( कुले ) प्रदेशीं मृग. ॥५३॥ हे दक्षिणबाजूस. असेच वामबाजूसही जाणावे. ते असेः–वामस्तनीं पृथ्वीधर, नयनीं

दिति, श्रवणीं अदिति, उरस्थलीं भुजग, स्कंधीं सोम, भल्लाट, मुख्य, अहि, रोग, पापयक्ष्मा; भुजीं रुद्र व राजयक्ष्मा, हस्तीं, शोष, असुरपार्श्वभागीं; ऊरुप्रदेशीं वरुण, जानुप्रदेशीं कुसुमदत्त, जंघाप्रदेशीं सुग्रीव, स्फिक्प्र० दौवारिक; हे वामपार्श्वभागीं; लिंगदेशीं शक्र व जय, हृदयीं ब्रह्मा, पादस्थानीं पितर राहतात. या एकाशीतिपदांनीं नगर, ग्राम, गृह यांच्या वास्तुपुरुषाचा विभाग जाणावा ॥५४॥

अष्टाष्टकपदमथवाकृत्वारेखाश्चकोणगास्तिर्यक् ।
ब्रह्माचतुःपदोस्मिन्नर्धपदाब्रह्मकोणस्थाः ॥ ५५ ॥
अष्टौचबहिःकोणेष्वर्धपदास्तदुभयस्थिताःसार्धाः ।
उक्तेभ्योयेशेषास्तेद्विपदाविंशतिस्तेच ॥ ५६ ॥

अर्थ—अथवा ६४ कोष्टक करावे. आडव्याउभ्या नऊनऊ रेषा काढून ४ कोनांवर तिर्कस रेषा काढाव्या. त्यात ब्रम्हास ४ पदें, ब्रह्मकोणस्थ आठ देवांस अर्धपद, ॥५५॥ त्याचे बाहेरचे कोणांस अर्धपद चार देव व त्याचे बाहेरील कोणास.अर्धपद आठदेव, याचे बाजूचे आठ देव दीड्पदिक, यांहून जे राहिलेले चवीस देव ते द्विपद जाणावे ॥५६॥

संपातावंशानांमध्यानिसमानियानिचपदानां ।
मर्माणितानिविंद्यान्नतानिपरिपीडयेत्प्राज्ञः ॥ ५७ ॥

अर्थ—कोणगत सूत्रांचे जे संपात ( पूर्वापर सूत्रांशीं मिलाफ ) ते, व सर्व पदांचीं ( कोष्ठकांचीं ) जीं सममध्यपदें तीं ह्या वास्तुपुरुषाचीं मर्मे होत; त्यांस सुज्ञपुरुषानें पीडा करूनये ॥५७॥

तान्यशुचिभांडकीलस्तंभाद्यैःपीडितानिशल्यैश्च ।
गृहभर्तुस्तत्तुल्येपीडामंगेप्रयच्छंति ॥५८॥

अर्थ—तीं पूर्वोक्त वास्तुपुरुषाचीं मर्मे, अपवित्रभांडीं, खिळे, स्तंभ, पाषाणादिशल्यें ( भूमींतला अशुद्ध पदार्थ ) यांहीं पीडित असलीं तर, तत्तुल्य गृहस्वामीच्या अंगीं रोग होतो ॥५८॥

कंडूयतेयदंगंगृहपतिनायत्रवामराहुत्यां ।
अशुभंभवेन्निमित्तंविकृतिर्वाग्नेःसशल्यंतत् ॥५९॥

अर्थ—गृहस्वामी होमकालीं किंवा प्रश्नकालीं, जे अंग खाजवील, त्या वास्तुपुरुषाचे अंगीं शल्य आहे. अथवा एकाशीतिपद वास्तुचक्रीं शिख्यादि देवता ( श्लो०

४३ पासून ) आहेत त्यांत ज्या देवतेच्या होमकाली शंका, रोदनादि अशुभ होईल अथवा अग्नीस स्फुलिंगादि विकार होईल त्या देवतेच्या पदीं शल्य आहे असें समजावें ॥५९॥

धनहानिर्दारुमयेपशुपीडारुग्भयानिचास्थिकृते ।
(लोहमयेशस्त्रभयंकपालकेशेषुमृत्युःस्यात् ॥६०॥
अंगारेस्तेनभयंभस्मनिचविनिर्दिशेत्सदाग्निभयं ।
शल्यंहिमर्मसंस्थंसुवर्णरजतादृतेत्यशुभं ॥६१॥
मर्मण्यमर्मगोवारुणत्ध्यर्थागमंतुषसमूहः ।)
अपिनागदंतकोमर्मसंस्थितोदोषकृद्भवति ॥६२॥

अर्थ–काष्ठमय शल्य असतां धनहानि; अस्थिकृतशल्य अ० पशूंस पीडा व रोगभय; लोहमयशल्य अ० शस्त्रभय; कपाल व केशमय शल्य अ० मृत्यु; ॥६०॥ कोळशांचेंशल्य अ० चोरभय; भस्ममयशल्य अ० अग्निभय; हीं होतात; सुवर्णरजतांवांचून मर्म ( श्लो० ५७ ) स्थित शल्य फार अशुभ होय ॥६१॥ मर्मस्थित किंवा मर्मांवांचूनही रहाणार जें तुषसमूहरूपशल्य तें द्रव्यप्राप्तीचा रोध करितें. हस्तिदंतशल्य जरीं शुभ आहे तथापि मर्मस्थित अ० अशुभ होय ॥६२॥

रोगाद्वायुंपितृतोहुताशनंशोषसूत्रमपिवितथात् ।
मुख्याद्भृशंजयंताच्चभृंगमदितेश्चसुग्रीवं ॥६३॥
तत्संपातानवयेतान्यतिमर्माणिसंप्रदिष्टानि ।
यश्चपदस्याष्टांशस्तत्प्रोक्तंमर्मपरिमाणं ॥६४॥

अर्थ–रोगापासून वायुपर्यंत, पितरांपा० अग्निप०, वितथापा० शोषाप०, मुख्यापा० भृशाप०, जयंतापा० भृंगप०, अदितिपा० सुग्रीवपर्यंत रेषा काढाव्या ॥६३॥ त्यांचे संयोग जे नऊ तीं अतिमर्मे सांगितलीं. जो पदाचा अष्टमांश तें मर्माचें प्रमाण सांगितलें ॥६४॥

पदहस्तसंख्ययासंमितानिवंशांगुलानिविस्तीर्णः ।
वंशाव्यासोध्यर्धःशिराप्रमाणंविनिर्दिष्टं ॥६५॥

अर्थ–पदाची जितकी हस्तसंख्या तितकीं अंगुलें वंश ( रोगाद्वायुमित्यादि सूत्रपट्क ) विस्तार जाणावा. वंशाचें व्यासार्ध शिरा ( पूर्वापर व दक्षिणोत्तर दशदश रेषा ) प्रमाण सांगितलें ॥६५॥

सुखमिच्छन्ब्रह्माणंयत्नाद्रक्षेद्गृहीगृहांतस्थं ।
उच्छिष्टाद्युपघाताद्गृहपतिरुपतप्यतेतस्मिन् ॥६६॥

अर्थ—गृहस्वामी सुख इच्छील तर यत्नानें गृहमध्यस्थ ब्रह्मदेवाचें रक्षण करावें. त्यास उच्छिष्टादिकाचा उपद्रव झाला तर गृहस्वामीस दुःख होतें ॥६६॥

दक्षिणभुजेनहीनेवास्तुनरेर्थक्षयोंगनादोषाः ।
वामेर्थधान्यहानिःशिरसिगुणैर्हीयतेसर्वैः ॥६७॥
स्त्रीदोषाःसुतमरणंप्रेष्यत्वंचापिचरणवैकल्ये ।
अविकलपुरुषेवसतांमानार्थयुतानिसौख्यानि ॥६८॥

अर्थ—वास्तुपुरुष, उजव्या भुजानें रहित असतां धनक्षय, स्त्रीकृत दोष हे होतात. डाव्या भुजानें रहित अ० द्रव्य, धान्य, यांची हानि होते. मस्तकहीन अ० सर्व आरोग्यादि गुणांनीं गृहपति हीन होतो ॥६७॥ पादभागहीन अ० स्त्रीकृत दोष, पुत्रमरण, दासत्व हीं होतात. वास्तुपुरुष परिपूर्णावयव अ० सन्मान, द्रव्य, यांनीं युक्त सौख्यें त्या गृहांत रहाणाऱ्या पुरुषास होतात ॥६८॥

गृहनगरग्रामेषुचसर्वत्रैवंप्रतिष्ठितादेवाः ।
तेषुचयथानुरूपंवर्णाविप्रादयोवास्याः ॥६९॥

अर्थ—याच प्रकारानें गृह, नगर, ग्राम, इत्यादि सर्व स्थळीं देव राहतात. त्याचाठाईं यथायोग्य ब्राह्मणादिकांस ठेवावें ॥६९॥

वासगृहाणिचविंद्याद्विप्रादीनामुदग्दिगाद्यानि ।
विशतांचयथाभवनंभवंतितान्येवदक्षिणतः ॥७०॥

अर्थ—चतुःशालगृह, नगर, ग्राम याचाठाईं ब्राह्मणादि चार वर्णांचीं वासगृहें उत्तरादि प्रदक्षिण चार दिशांस अनुक्रमानें करावीं. तीं गृहाप्रत प्रवेश करणारास उजव्या भागानें होत अशीं असावीं. ( प्राङ्मुखागण गृहाचें द्वार उत्तराभिमुख; दक्षिणमुखां० पूर्वाभि०; पश्चिममुख० दक्षिणाभि०; उत्तरमुख० पश्चिमाभि० अशीं असावीं ) ॥७०॥

नवगुणसूत्रविभक्तान्यष्टगुणेनाथवाचतुःषष्टेः ।
द्वाराणियानितेषामनलादीनांफलोपनयः ॥७१॥

अर्थ—नवगुणित सूत्रानें विभक्त ( एकाशीतिपद ) अथवा अष्टगुणित सूत्रानें विभक्त ( चतुःषष्टिपद ) यांचीं जीं द्वारें अग्न्यादिक त्याचें फल पुढील श्लोकांत सांगितलें आहे ॥७१॥

अनलभयंस्त्रीजन्मप्रभूतधनतानरेंद्रवात्सल्यं ।
क्रोधपरतानृतत्वंक्रौर्यंचौर्यंचपूर्वेण ॥७२॥

अर्थ—शिखिदेवस्थित, ईशानद्वारीं अग्निभय, कन्याजनन, बहुद्रव्यप्राप्ति, राजप्रियत्व, क्रोधस्वभाव, असत्य भाषण, क्रूरत्व, चौर्य, हिं फलें पूर्वेकडील द्वारीं होतात ॥७२

अल्पसुतत्वंप्रैष्यंनीचत्वंभक्ष्यपानसुतवृद्धिः ।
रौद्रंकृतघ्नमधनंसुतवीर्यघ्नंचयाम्येन ॥७३॥

अर्थ—अनिलद्वारीं १ अल्पपुत्रत्व २ दासत्व ३ नीचत्व ४ भक्ष्य, पान, पुत्र याची वृद्धि ५ रौद्र ( अशुभ ) ६ कृतघ्न ७ अधन ८ पुत्र, बलनाश, हीं फलें दक्षिणेस होतात ॥७३॥

सुतपीडारिपुवृद्धिर्नधनसुताप्तिःसुतार्थबलसंपत् ।
धनसंपन्नृपतिभयंधनक्षयोरोगइत्यपरे ॥७४॥

अर्थ—पित्र्यद्वारीं १ पुत्रपीडा २ शत्रुवृद्धि ३ धन व पुत्र यांचे प्राप्तीचा अभाव ४ पुत्र, अर्थ, बल यांची संपत्ति ५ धनसंपत्ति ६ राजभय ७ धनक्षय ८ रोग हीं फलें पश्चिमेकडील द्वारीं होतात ॥७४॥

वधबंधौरिपुवृद्धिर्धनसुतलाभःसमस्तगुणसंपत् ।
पुत्रधनाप्तिर्वैरंसुतेनदोषाःस्त्रियानैःस्वं ॥ ७५ ॥

अर्थ— रोगाख्यद्वारीं १ वध व बंध २ शत्रुवृद्धि ३ धन व पुत्र यांचा लाभ ४ सर्वगुणसंपत्ति ५ पुत्र व धन यांची प्राप्ति ६ पुत्रवैर ७ स्त्रीदोष ८ निर्धनत्व हीं उत्तरेकडील द्वारफलें होत ॥७५॥

मार्गतरुकोणकूपस्तंभभ्रमविद्धमशुभदंद्वारं ।
उच्छ्रायाद्विगुणमितांस्त्यक्त्वाभूमिंनदोषाय ॥७६॥

अर्थ—मार्ग, वृक्ष, कोन, विहीर, स्तंभ, भ्रम ( पाण्याचा नळ, पाट इ० ) यांणीं विद्ध द्वार शुभ नव्हे द्वाराचे उंचीच्या दुप्पट भूमि सोडून मार्गादि वेध दोषप्रद ( अशुभ ) होत नाहींत ॥७६॥

रथ्याविद्धंद्वारंनाशायकुमारदोषदंतरुणा ।
पंकद्वारेशोकोव्ययोंबुनिस्राविणिप्रोक्तः ॥७७॥
कूपेनापस्मारोभवतिविनाशश्चदेवताविद्धे ।
स्तंभेनस्त्रीदोषाःकुलनाशोब्रह्मणोभिमुखे ॥७८॥

अर्थ–मार्गानें विद्ध द्वार गृहस्वामीचा नाश करितें. वृक्षानें वि० बालकनाश करितें. चिखलानें विद्ध द्वार असतां शोक होतो जलनिर्गममार्गानें विद्ध अ० धनव्यय होतो ॥७७॥ विहिरीनें विद्ध अ० अपस्मार ( फेंपरें ) रोग होतो. देवालयानें विद्ध अ० नाश होतो. स्तभानें विद्ध अ० स्त्रिया दुष्ट होतात. ब्रह्मास्था अभिमुख द्वार असतां स्वामिकुलनाश होतो ॥७८॥

उन्मादःस्वयमुद्घाटितेथपिहितेस्वयंकुलविनाशः ।
मानाधिकेनृपभयंदस्युभयंव्यसनदंनीचं ॥७९॥
द्वारंद्वारस्योपरियत्तन्नशिवायसंकटंयञ्च ।
आव्यात्तक्षुद्भयदंकुब्जंकुलनाशनंभवति ॥८०॥
पीडाकरमतिपीडितमंतर्विनतंभवेदभावाय ।
बाह्यविनतेप्रवासोदिग्भ्रांतेदस्युभिःपीडा ॥८१॥

अर्थ–द्वार स्वतः उघडणारें असेल तर अतिचिंता, स्वतः मिटणारें असेल तर कुलनाश, प्रमाणापेक्षां अधिक असेल तर राजभय, प्रमाणापेक्षां कमी असेल तर चोरभय व दुःख देणारें असे होतें ॥७९॥ द्वारावर जें दुसरें द्वार ( मजल्याचें ) तें शुभ नव्हे. संकट ( फारच ल्हान ) द्वार जें तेंही शुभ नव्हे. मध्यमविस्तृत द्वार क्षुद्भय देतें. कुब्ज ( असपट अ० उघडण्यास कठिण जातें ) द्वार कुलनाशक होतें ॥८०॥ अतिपीडित ( उबन्यास टेंकतें ) द्वार असतां, गृहस्वामीस पीडा करितें. आत ( गृहाकडे ) तोललेलें अ० मरण होतें. बाहेर तोललेलें अ० गृहस्वामीस प्रवास होतो. दिग्भ्रांत ( दिशाहीन ) द्वार अ० चोरकृत पीडा होते ॥८१॥

मूलद्वारंनान्यैर्द्वारैरतिसंदधीतरूपर्ध्या ।
घटफलपत्रप्रमथादिभिश्चतन्मंगलैश्चिनुयात् ॥८२॥

अर्थ–मूलद्वार ( मुख्यद्वार ) अन्यद्वाराच्या रूपसमृद्धीनें सम नसावें. तें मुख्यद्वार कलश, श्रीफलादिफलें, अश्वादिवाहनें, पानें, वेली, प्रमथादिगण, सिंह, सर्प, हंस,

चकोर इ० मांगलिकांनीं युक्त करावे. (त्या द्वारांवर . पूर्वोक्तांसारखीं चित्रें करावीं ) ॥८२॥

ऐशान्यादिषुकोणेषुसंस्थिताबाह्यतोगृहस्यैताः ।
चरकीविदारिनामाथपूतनाराक्षसीचेति ॥ ८३ ॥

अर्थ—ईशान्यादि चार कोणांचाठाई गृहाच्या बाहेर चरकी, विदारी, पूतना, राक्षसी ह्या चार देवता अनुक्रमानें राहतात. (ईशानीस चरकी, आग्नेयीस विदारी, नैर्ऋतीस पूतना, वायव्येस राक्षसी याप्रमाणें ) ॥८३॥

पुरभवनग्रामाणांयेकोणास्तेषुनिवसतांदोषाः ।
श्वपचादयोंत्यजात्यास्तेष्वेवविवृद्धिमायांति ॥८४॥

अर्थ—नगर, गृह, ग्राम, यांचे जे कोन त्यांचाठाई रहाणारांचें अशुभ होतें. परंतु चांडालादि अंत्यज कोणांवर राहिले तर तेथेंच त्यांची वृद्धि होय ( त्यांचें कल्याण होतें ) ॥८४॥

याम्यादिष्वशुभफलाजातास्तरवःप्रदक्षिणेनैते ।
उदगादिषुप्रशस्ताःप्लक्षवटोदुंबराश्वत्थाः ॥८५॥

अर्थ—प्लक्ष, ( पिंपर ) वट, उंबर, अश्वत्थ हे चार वृक्ष दक्षिणादि दिशेकडे, प्रदक्षिण अनुक्रमानें होतील तर अशुभ होत. उत्तरादि दिशाकडे होतील तर प्रशस्त होत. ( उत्तरेस प्लक्ष, पूर्वेस वट, दक्षिणेस उंबर, पश्चिमेस पिंपळ असे शुभ होत ॥८५॥

आसन्नाःकंटकिनोरिपुभयदाःक्षीरिणोर्थनाशाय ।
फलिनःप्रजाक्षयकरादारूण्यपिवर्जयेदेषां ॥८६॥
छिंद्याद्यदिनतरूंस्तान्तदंतरेपूजितान्वपेदन्यान् ।
पुन्नागाशोकारिष्टवकुलपनसान्शमीशालौ ॥८७॥

अर्थ—गृहाचे समीपभागीं खदिरादि कंटकवृक्ष असतील तर शत्रुभय, रुवी इत्यादि चिकाचे वृक्ष अ० तर द्रव्यनाश, आम्रादि फलवान् अ० तर संततिक्षय, हीं फळें होतात. यांचीं गृहास काष्ठेंही नसावीं ॥८६॥ जर हे असलेले वृक्ष तोडवत नाहींत तर यांचेमध्यें उंडीण सुरंगी कडुनिंब, अशोक, बकुल, फणस, शमी, साग हे पूजितवृक्ष लावावे ॥८७॥

**शस्तौषधिद्रुमलतामधुरासुगंधास्निग्धासमान सुषिराचमहीनराणां । अप्यध्वनिश्रमविनोदमुपागतानांधत्तेश्रियंकिमुतशाश्वतमंदिरेषु ८८**

अर्थ—जया, जयंती इत्यादि औषधी; पिप्पलादि यज्ञियवृक्ष व वल्ली यांहींकरून प्रशस्त; ज्या जमिनीस मधुर म्ह० गोड रुचि आहे. सुगंधयुक्त, स्निग्ध म्ह० चिकणाईची, सम म्ह० सखगे व उचवटे नाहीत अशी, अंतःसार म्ह० कठिण अशी भूमि मनुष्यांस घर बांधण्यास शुभ होय. अशी पूर्वोक्त भूमि मार्गामध्ये श्रम पावलेल्यांसही श्रम परिहार करून शोभा देते मग स्थिरगृहास लक्ष्मी देईल यांत आश्चर्य काय. शोभा देईलच ॥८८॥

**सचिवालयेर्थनाशोधूर्तगृहेसुतवधःसमीपस्थे । उद्वेगोदेवकुलेचतुष्पथेभवतिचाकीर्तिः ॥८९॥**
**चैत्येभयंग्रहकृतंवल्मीकश्वभ्रसंकुलेविपदः । गर्तायांतुपिपासाकूर्माकारेधनविनाशः ॥९०॥**

अर्थ—प्रधानाचे गृह समीप असतां द्रव्यनाश, धूर्ताचे गृह समी० पुत्रमरण, देवगृह समी० चित्तोद्वेग, चवाठा समी० अपकीर्ति, हीं फलें होतात ॥८९॥ चैत्य (पिंपळादि अत्युच्चवृक्ष ) समीप असता, ग्रह व पिशाचकृत भय होतें. वारूळ किंवा सळगा समी० विपत्ति, खंदक समी० तृषा, कूर्माकार ( कासवाचे पाठीसारखी ) भूमि समीप असतां, धननाश हीं फलें होतात ॥९०॥

**उदगादिप्लवमिष्टंविप्रादीनांप्रदक्षिणेनैव । विप्रःसर्वत्रवसेदनुवर्णमथेष्टमन्येषां ॥९१॥**

अर्थ—ब्राह्मणादि चार वर्णांस अनुक्रमानें उत्तरादि प्लव ( उतरती ) भूमि प्रदक्षिण शुभ होय. ( उत्तरेस उतरती ब्राह्मणास; पूर्वेस उत० क्षत्रियास; दक्षिणप्लव वैश्यास; पश्चिमप्लव शूद्रास; ) ब्राह्मणानें सर्वत्र रहावें. अन्यांनी आपल्या वर्णानुक्रमे रहाणें शुभ होय ॥९१॥

**गृहमध्येहस्तमितंखात्वापरिपूरितंपुनःश्वभ्रं । यदूनमनिष्टंतत्समेसमंधन्यमधिकंयत् ॥९२॥**

अर्थ—गृहामध्ये हस्तपरिमित लांब, रुंद, उंच सळगा खणून त्याच मातीनें पुनः भरावा माती कमी होईल तर अनिष्ट, बरोबर होईल तर मध्यम, अधिक होईल तर शुभ अशी भूमि जाणावी ॥९२॥

श्वभ्रमथवांवुपूर्णंपदशतमित्वागतस्ययदिनोनं ।
तद्धन्यंयच्चभवेत्पलानिपांस्वाढकंचतु षष्टिः ॥९३॥

अर्थ–अथवा तेंच श्वभ्र ( खळगा ) उदकपूर्ण करून, शभर पावलें जाऊन पुरत येईपर्यंत, त्यांतील उदक कमी होणार नाहीं तर शुभ, अन्यथा अशुभ होय अथवा खळग्यांतून निघालेल्या मातीतील माती एक आढक ह्म० पायली भर घेऊन तिचें वजन करावें तें वजन ६४ पलें ह्म० २५६ तोळे येईल तर ती भूमि शुभ. अन्यथा अशुभ होय ॥९३॥

आमेवामृत्पात्रेश्वभ्रस्थेदीपवर्तिरभ्यधिकं ।
ज्वलतिदिशियस्यशस्तासाभूमिस्तस्यवर्णस्य ९४

अर्थ–अथवा अपक्व मृत्पात्र ( कच्चे मातीची मोठी पणतीवगैरे ) श्वभ्रात ठेवून त्यांत चार दिशांस वाती प्रज्वलित कराव्या त्यापैकीं ज्या दिशेकडील वात अधिक प्रज्वलित होईल त्या दिशेकडील पूर्वोक्त ( अंक ७० ) ब्राह्मणादि वर्णांस ती भूमि शुभ होय ॥९४॥

श्वभ्रेपितंनकुसुमंयस्मिन्प्रम्लायतेनुवर्णसमं ।
तत्तस्यभवतिशुभदंयस्यचयस्मिन्मनोरमते ॥९५॥

अर्थ–ब्राह्मणादि वर्णानुक्रमानें पांढरें, तांबडें, पिवळें, काळें, अशीं चार पुष्पें रात्रीं खळग्यामध्यें घालावीं आणि तीं प्रातःकाळीं पहावीं त्यांत ज्या रंगाचें पुष्प म्लान होणार नाहीं त्याच्या वर्णांचें तेथें कल्याण होईल अथवा ज्याचें जथें चित्त रमेल तेथें त्यानें गृह बांधून रहावें विचार करू नये ॥९५॥

सितरक्तपीतकृष्णाविप्रादीनांप्रशस्यतेभूमिः ।
गंधश्चभवतियस्याघृतरुधिरान्नाद्यमद्यसमः ॥९६॥
कुशयुक्ताशरबहुलादूर्वाकाशावृताक्रमेणमही ।
अनुवर्णवृद्धिकरीमधुरकषायाम्लकटुकाच ॥९७॥

अर्थ–ब्राह्मणादि चार वर्णांस श्वेत, रक्त, पीत, कृष्ण या रंगाची भूमि अनुक्रमानें प्रशस्त होय तशीच घृत, रक्त अन्न, मद्य. यांसारख्या गंधाची भूमि वर्णानुक्रमानें शुभ होय ॥९६॥ दर्भ, शर ( तृणवि० ), दूर्वा, काश ( माळ ), यांणीं युक्त भूमि ब्राह्मणादि वर्णानुक्रमानें शुभ होय गोड, तुरट, आंबट, तिखट, अशी भूमि वर्णानुक्रमानें वृद्धि करणारी होय ॥९७॥

कृष्टांप्ररूढबीजांगोध्युपितांब्राह्मणैःप्रशस्तांच ।
गत्वामहींगृहपतिःकालेसांवत्सरोद्दिष्टे ॥९८॥
भक्ष्यैर्नानाकारैर्दध्यक्षतसुरभिकुसुमधूपैश्च ।
दैवतपूजांकृत्वास्थपतीनभ्यर्च्यविप्रांश्च ॥९९॥
विप्रःस्पृष्ट्वाशीर्षंवक्षश्चक्षत्रियोविशश्चोरू ।
शूद्रःपादौस्पृष्ट्वाकुर्याद्रेखांगृहारंभे ॥१००॥

अर्थ—नांगराने नांगरलेली, भात पिकलेली, गाई राहलेली, ब्राह्मणांनीं प्रशंसित अशा भूमीप्रत ज्योतिर्वेत्त्यांनीं सांगितलेल्या मुहूर्ती गृहपतीनें जावें ॥९८॥ आणि नानाप्रकारचे अपूप मोदकादि भक्ष्यपदार्थ, दधि, अक्षता, सुगंधपुष्पें, धूप, दीप इत्यादिकांनीं क्षेत्राधिपतीची पूजा करून नंतर ब्राह्मण व शिल्पविद्याजाणते सुतार यांची पूजा करावी ॥९९॥ ब्राह्मणानें मस्तकास, क्षत्रियांनें वक्षस्थलास, वैश्यानें मांड्यास, शूद्रानें पायांस असा आपले शरीरास स्पर्श करून गृहारंभीं रेषा करावी ॥१००॥

अंगुष्ठकेनकुर्यान्मध्यांगुल्याथवाप्रदेशिन्या ।
कनकमणिरजतमुक्तादधिफलकुसुमाक्षतैश्चशुभं ॥१०१
शस्त्रेणशस्त्रमृत्युर्वधोलोहेनभस्मनाग्निभयं ।
तस्करभयंतृणेनचकाष्ठोल्लिखिताचराजभयं ॥१०२॥
वक्रापादालिखिताशस्त्रभयक्लेशदाविरूपाच ।
चर्मांगारास्थिकृतादंतेनचकर्तुरशिवाय ॥१०३॥
वैरमपसव्यलिखिताप्रदक्षिणंसंपदोविनिर्देश्याः ॥
वाचःपरुषानिष्ठीवितंक्षुतंचाशुभंकथितं ॥१०४॥

अर्थ—गृहपतीनें ती रेषा अंगुष्ठ, मध्यांगुलि, तर्जनी, सुवर्ण, मणि, रुपें, मोतीं, दधि, फल, पुष्प, अक्षता, यांहींकरून केली तर शुभ होय ॥१०१॥ शस्त्रानें करील तर शस्त्रेंकरून मृत्यु, लोखंडानें क० वध, भस्मानें क० अग्निभय, तृणानें क० चोरभय, काष्ठानें करील तर राजभय, हीं होतात ॥१०२॥ वांकडी किंवा पायानें काढलेली, विरूप अशी जी रेषा तीही शस्त्रभय व क्लेशदेणारी, कातडें, कोळसे, हाडें, दंत यांहीं केलेली रेषा गृहकर्त्यास अशुभकारक होय ॥१०३॥ रेषा अपसव्य काढिली तर वैर होतें. प्रदक्षिण काढिली तर संपत्ति होतात. तशीं

च त्यावेळीं कठोर भाषणें, निष्ठीवित ( तोंडानें थुंकणें ), शिंक हीं व गुदशब्द होईल तर गृहकर्त्यास अशुभ सांगितलें ॥१०४॥

अर्धनिचितंकृतंवाप्रविशन्स्थपतिर्गृहेनिमित्तानि ।
अवलोकयेत्गृहपतिःक्वसंस्थितःस्पृशतिकिंचांगं॥१०५
रविदीप्तोयदिशकुनिस्तस्मिन्कालेविरौतिपरुषरवः ।
संस्पृष्टांगसमानंतस्मिन्देशेऽस्थिनिर्देश्यं ॥१०६॥

अर्थ–पाया अर्धा किंवा सर्व झाल्यावर त्यामध्यें गृहपति प्रवेश करीत असता तो वास्तुपुरुषाच्या कोणत्या अवयवावर उभा राहिला व आपल्या कोणत्या अंगास स्पर्श करितो ती चिन्हें स्थपतीनें ( सुताराने ) पहावीं ॥१०५॥ त्या गृहप्रवेश समयीं दीप्तदिशेकडे अथवा सूर्याभिमुख पक्षि राहून रूक्ष शब्द करील तर, गृहपतीनें स्पृष्ट अंगसमान (त्या अंगासारखें ) उभा राहिला त्यादेशीं भूमीमध्यें हाड आहे असें सांगितलें आहे ( ईशान्यादि दिशा सूर्योदयापासून प्रथमप्रहरीं अंगारिणी, दीप्ता, धूमिता, शेष ५ शांत. द्वितीयप्रहरीं पूर्वादि, तृ० आग्नेयादि, च० दक्षि०, पंच० नैर्ऋत्या०, ष० पश्चि,० स० वाय,० अ० उत्तरादि, होतात ) ॥१०६॥

शकुनसमयेथवान्येहस्त्यश्वश्वादयोनुवाशंते ।
तत्प्रभवमस्थितस्मिंस्तदंगसंभूतमेवेति ॥१०७॥

अर्थ–अथवा निमित्तकालीं हत्ती, घोडा, कुत्रा, इत्यादि यातून कोणीही सूर्याभिमुख शब्द करील, त्या प्राण्याचें हाड गृहपतिस्पृष्ट अंगतुल्य गृहपतिस्थितदेशीं आहे असें समजावें ॥१०७॥

सूत्रेप्रसार्यमाणेगर्दभरावोस्थिशल्यमाचष्टे ।
श्वसृगाललंघितेवासूत्रेशल्यंविनिर्देश्यं ॥१०८॥

अर्थ–सूत्र पसरलें असता, गर्दभाचा शब्द होईल तर हाड भूमीत आहे असें सांगावें. कुत्रा किंवा कोल्हा हे सूत्रावरून गेले तर त्यांचें शल्य ( हाड ) भूमींत आहे असें सांगावें ॥१०८॥

दिशिशांतायांशकुनोमधुरविरावीयदातदावाच्यः ।
अर्थस्तस्मिन्स्थानेगृहेश्वराधिष्ठितेंगेवा ॥१०९॥

अर्थ–ज्याकालीं शांत दिशेकडे पक्षी मधुरशब्द करील त्याकालीं गृहेश्वराधिष्ठित स्थानीं किंवा गृहेश्वरस्पृष्ट वास्तुपुरुषाच्या अंगीं द्रव्य आहे असें सांगावें. ( तें द्रव्य गृहपतीच्या उंची इतकें खोल आहे ) ॥१०९॥

21569

सूत्रच्छेदेमृत्युःकीलेचावाङ्मुखेमहारोगः ।
गृहनाथस्थपतीनांस्मृतिलोपेमृत्युरादेश्यः ॥११०
स्कंधात्च्युतेशिरोरुक्कुलोपसर्गोपवर्जितेकुंभे ।
भग्नेपिचकर्मिवधश्च्युतेकराद्गृहपतेर्मृत्युः ॥१११॥

अर्थ—सूत्र तुटलें तर गृहपतीस मृत्यु. खुंटी मारतानां ठोकण्याचे जोरापेक्षां फार खोल गेली तर महान् रोग होतो. गृहस्वामी व सुतार यांस स्मरण नाहींसें (भ्रम) झाला तर त्यांस मृत्यु होतो ॥११०॥ उदकपूर्ण कुंभ खांद्यावरून पडला तर मस्तकरोग होतो. अधोमुख पडेल तर कुलास उपद्रव होतो. फुटला तर कामाठ्यांस मृत्यु होतो. हस्तापासून गळला तर गृहपतीस मृत्यु होतो ॥१११॥

दक्षिणपूर्वेकोणेकृत्वापूजांशिलांन्यसेत्प्रथमां ।
शेषाःप्रदक्षिणेनस्तंभाश्चैवंसमुत्थाप्याः ॥११२॥
छत्रस्त्रगंवरयुतःकृतधूपविलेपनःसमुत्थाप्यः ।
स्तंभस्तथैवकार्योद्वारोच्छ्रायःप्रयत्नेन ॥११३॥

अर्थ—पहिली शिला, पूजा करून ईशानीस स्थापन करावी. नंतर शेष शिला (दगड) प्रदक्षिण लावाव्या. असेच स्तंभही उभे करावे ॥११२॥ छत्र, माला, वस्त्र यांणीं युक्त व धूपगंधादिपूजित स्तंभ उभारावा व द्वारही तसेंच प्रयत्नानें उभारावें ॥११३॥

विहगादिभिरवलीनैराकंपितपतितदुःस्थितैश्चफलं ।
शक्रध्वजफलसदृशंतस्मिंश्चशुभंविनिर्दिष्टं ॥११४॥

अर्थ—स्तंभ व द्वार पक्ष्यादिकांनीं आलिंगित (स्पृष्ट) किंवा कांपविला अथवा दुःस्थित (वांकडा केला) असतां त्याचें फल शक्रध्वज (अ० ४३ श्लो० ६२ पासून ६६ पर्यंत) फलासारखें शुभाशुभ सांगितलें ॥११४॥

प्रागुत्तरोन्नतेधनसुतक्षयःसुतवधश्चदुर्गंधे ।
वक्रेबंधुविनाशोनसंततिगर्भाश्चदिङ्मूढे ॥११५॥

अर्थ—गृहभूमि पूर्वेकडे किंवा उत्तरेस उंच असेल तर धन व पुत्र यांचा नाश, दुर्गंधियुक्त असेल तर पुत्रवध, वांकडी ल० सारखी नसेल तर बंधुनाश, पूर्वादिदिशा साधून नसेल तर गर्भनाश हीं फळें होतात (दिशा साधून चौथारा पाणसाळीनें करावा) ॥११५॥

इच्छेयदिगृहवृद्धिंततःसमंताद्विवर्धयेत्तुल्यं ।
एकोद्देशेदोषःप्रागथवाप्युत्तरेकुर्यात् ॥११६॥

अर्थ—गृहाची वृद्धि ( वाढविणें ) इच्छील तर सर्व दिशाकडे सारखी करावी. एकीकडे वाढविण्यात दोष आहे, परंतु अल्प दोषास्तव पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे गृहवृद्धि करावी ॥११६॥

प्राग्भवतिमित्रवैरंमृत्युभयंदक्षिणेनयदिवृद्धिः ।
अर्थविनाशःपश्चादुदग्विवृद्धौमनस्तापः ॥११७॥

अर्थ—पूर्वेस गृह वाढविलें तर मित्रवैर, दक्षिणेस मृत्युभय, पश्चिमेस द्रव्यनाश, उत्तरेस वाढविलें तर चित्तसंताप हीं फळें होतात ॥११७॥

ऐशान्यांदेवगृहंमहानसंचापिकार्यमाग्नेय्यां ।
नैर्ऋत्यांभांडोपस्करोर्थधान्यानिमारुत्यां ॥११८॥

अर्थ—चौसोपी गृहात ईशानीस देवगृह, आग्नेयीस महानस ( पाकस्थान ), निर्ऋतीस भांडोपस्कर ( उपयोगी भांडीं वगैरे ठेवण्याची जागा ), वायव्येस द्रव्य व धान्य यांचें गृह, अशीं करावीं. ( याचा अन्यत्र विस्तार आहे ) ॥११८॥

प्राच्यादिस्थेसलिलेसुतहानिःशिखिभयंरिपुभयंच ।
स्त्रीकलहःस्त्रीदौष्ट्यंनैःस्व्यंवित्तात्मजविवृद्धिः ॥११९॥

अर्थ—वास्तूच्या पूर्वेस उदकस्थान ( विहिर वगैरे ) असेल तर पुत्रनाश, आग्नेयीस अग्निभय, दक्षिणेस शत्रुभय, नैर्ऋतीस स्त्रीकलह, पश्चिमेस स्त्रियांच्याठाईं दुष्टस्वभाव, वायव्येस निर्धनत्व, उत्तरेस द्रव्यवृद्धि, ईशानीस पुत्रवृद्धि हीं फळें होतात ११९

खगनिलयभग्नसंशुष्कदग्धदेवालयश्मशानस्थान् ।
क्षीरतरुधवविभीतकनिंबारणिवर्जितांश्छिद्यात् १२०

अर्थ—पक्ष्यांचे रहाण्याचा, मोडलेला, सुकलेला, जळलेला, देवळाजवळचा, मसनस्थानीचा हे वृक्ष व पिंपळादिक दुधाचे वृक्ष, धावडा, भेला, निंब, अरणि ( वृक्षवि० ऐरण ) या वृक्षांवाचून गृहास वृक्ष तोडावे ॥१२०॥

रात्रौकृतवलिपूजंप्रदक्षिणंछेदयेद्दिवावृक्षं ।
धन्यमुदक्प्राक्पतनंनग्राह्योतोन्यथापतितः १२१

अर्थ–रात्रीस बलि व पूजा करून दिवसास वृक्ष पूर्वादि प्रदक्षिण तोडावा. त्या वृक्षाचे पतन उत्तरेस किंवा पूर्वेस होईल तर शुभ. याहून अन्य दिशाकडे पडलेला वृक्ष गृहास घेऊ नये ॥१२१॥

**छेदोयद्यविकारीततःशुभंदारुतद्गृहौपयिकं । पीतेतुमंडलेनिर्दिशेत्तरोर्मध्यगांगोधां ॥१२२॥ मंजिष्ठाभेभेकोनीलेसर्पस्तथारुणेसरठः । मुद्गाभेश्माकपिलेतुमूषकोंभश्चखड्गाभे ॥१२३॥**

अर्थ–वृक्षाचा छेद विकाररहित होईल तर, ते काष्ठ गृहास उपयुक्त (शुभ) होय. तोडलेले वृक्षाचे मडल (बुध) पीतवर्ण होईल तर वृक्षामध्ये घोरपड आहे असे सांगावे ॥१२२॥ तांबडे होई० मडूक, निळे हो० सर्प, किंचित् तांबडे हो० सरडा, मुद्गाभ (हिरवे) होई० पाषाण, पिंगटवर्ण हो० उंदीर, खड्गाभ (श्वेतवर्ण) होईल तर उदक, हीं तोडलेल्या वृक्षात आहेत असे सांगावे १२३

**धान्यगोगुरुहुताशसुराणांनस्वपेदुपरिनाध्यनुवंशं । नोत्तरापरशिरानचनग्नोनैवचार्द्रचरणःश्रियमिच्छन् ॥१२४॥**

अर्थ–धान्य, गाय, पित्रादिगुरु, अग्नि, देव याचेवर व वंश (श्लोक ६३,) या सूत्रावर निजूनये. उत्तर व पश्चिम दिशा याकडे मस्तक करून, नग्न, ओल्यापायानी, लक्ष्मीइच्छिणाऱ्या पुरुषाने निद्रा करूनये ॥१२४॥

**भूरिपुष्पनिकरंसतोरणंतोयपूर्णकलशोपशोभितं । धूपगंधबलिपूजितामरंब्राह्मणध्वनियुतंविशेत्गृहं ॥१२५॥**

अर्थ–बहुत पुष्पसमूहानीं युक्त, तोरणयुक्त, उदकपूर्णकलशानीं शोभित, धूप, गंध, बलि याहीकरून पूजिले आहेत देव ज्यामध्ये, असे व ब्राह्मणध्वनि (वेदशब्द) यानीं युक्त अशा गृहाप्रत सुमुहूर्ती प्रवेश करावा ॥१२५॥

**इतिश्रीवराहमिहिरकृतौबृहत्संहितायांवास्तुविद्यानामत्रिपंचाशोध्यायः ॥५३॥**

## ॥ अथदगार्गलं ॥

धर्म्यंयशस्यंचवदाम्यतोहंदगार्गलंयेनजलोपलब्धिः ।
पुंसांयथांगेषुशिरास्तथैवक्षितावपिप्रोन्नतनिम्नसंस्थाः ॥१॥
एकेनवर्णेनरसेनचांभश्च्युतंनभस्तोवसुधाविशेषात् ।
नानारसत्वंवहुवर्णतांचगतंपरीक्ष्यंक्षितितुल्यमेव ॥२॥

अर्थ—वास्तुविद्याप्रकरणानंतर धर्म्य व यशप्रद व ज्यांणें जलप्राप्ति होत्ये असें दगार्गल मी वराहमिहिराचार्य सांगतों. जशा पुरुषाच्या अंगीं वरखालीं जाणाऱ्या शिरा असतात तशाच भूमीतही जलवाहिनी शिरा आहेत ॥१॥ उदक आकाशापासून एकवर्णानें व एकरसानेंच भूमीवर पडतें; परंतु नानाप्रकारची भूमि आहे यास्तव तें उदक नानारस ( बहुतस्वाद ) व बहुवर्ण झालें यास्तव भूमितुल्य उदकाचे रस व वर्ण जाणावे. तथाच वक्ष्यति ( सशर्करातांम्रमहीकषायक्षारंधरित्रीकपिलाकरोति ॥ आपाडुरायांलवणप्रदिष्टमृष्टंजलनीलवसुधरायामिति)२

पुरुहूतानलयमनिर्ऋतिवरुणपवनेंदुशंकरादेवाः ।
विज्ञातव्याःक्रमशःप्राच्यादीनांदिशांपतयः ॥३॥
दिक्पतिसंज्ञाश्चशिरानवमीमध्येमहाशिरानाम्नी ।
एताभ्योन्याःशतशोविनिःसृतानामभिःप्रथिताः॥४

अर्थ—इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, सोम, शिव हे ८ देव पूर्वादि ८ दिशांचे स्वामी अनुक्रमानें जाणावे ॥३॥ ज्या दिशेकडून जी शिरा ( जलवाहिनी ) येईल त्या शिरेस त्या दिक्पतीचें नाव जाणावें व मध्यें नववीशिरा महाशिरानामक जाणावी. यांहून अन्यही शिरा शेंकडों निघाल्या आहेत त्यांचींही नावें प्रसिद्ध आहेत. तथाच वक्ष्यति ( कुमुदानामशिरासापुरुषत्रयवाहिनीभवति )४

पातालादूर्ध्वशिराःशुभाश्चतुर्दिक्षुसंस्थितायाश्च ।
कोणदिगुत्थानशुभाःशिरानिमित्तान्यतोवक्ष्ये ॥५॥

अर्थ—पातालापासून ल० खालून वर ज्या शिरा येतात व चार दिशेस ज्या शिरा असतात त्या शुभ होत. अग्न्यादि कोणदिशेस उत्पन्न झालेल्या शिरा शुभ नव्हत. यानंतर शिरांचीं चिन्हें सांगतों ॥५॥

यदिवेतसोंवुरहितेदेशेहस्तैस्ततस्त्रिभिःपश्चात् ।
सार्धपुरुषेतोयंवहतिशिरापश्चिमातत्र ॥६॥
चिन्हमपिचार्धपुरुषेमंडूकःपांडुरोथमृत्पीता ।
पुटभेदकश्चतस्मिन्पाषाणोभवतितोयमधः ॥७॥

अर्थ—जेथें स्वभावतः उदक नाहीं अशा जलरहित देशीं वेताचें झाड असेल तर त्याचे पश्चिमेकडे तीन हातांवर दीड पुरुषाखालीं उदक असतें तेथे पश्चिमेस शिरा ( झरा ) वाहत्ये ॥६॥ अर्धपुरुषावर पांढरा बेडूक, नंतर पीतवर्ण मृत्तिका, त्याचेखालीं पुटभेदक पाषाण हीं चिन्हें लागतील त्याचे खालीं उदक सापडेल ( येथें पुरुष ऊर्ध्वबाहु. त्याचें प्रमाण अंगुलें १२० होत. यांचा पंचमांश हस्त जाणावा ) ॥७॥

जंव्वाश्चोदग्घस्तैस्त्रिभिःशिराधोनरद्वयेपूर्वा ।
मृल्लोहगंधिकापांडुराथपुरुषेत्रमंडूकः ॥८॥

अर्थ—जंबू (जांबूळ ) वृक्षाचे उत्तरेस तीन हातांपुढें दोन पुरुषांखालीं पूर्वेकडे शिरा आहे. येथें पुरुषभर खटलें असतां लोखंडासारख्या गंधाची थोडी पांढरी माती व तींत बेडूक हें चिन्ह दिसेल ॥८॥

जंबूवृक्षस्यप्राग्वल्मीकोयदिभवेत्समीपस्थः ।
तस्माद्दक्षिणपार्श्वेसलिलंपुरुषद्वयेस्वादु ॥९॥
अर्धपुरुषेचमत्स्यःपारावतसंनिभश्चपाषाणः ।
मृद्भवतिचात्रनीलादीर्घकालंवहुचतोयं ॥१०॥

अर्थ—जांबळीचे पूर्वेस जवळ वारूळ असेल तर त्याचे दक्षिणेस दोन पुरुषांखालीं गोड उदक आहे ॥९॥ याचें चिन्ह. अर्धपुरुष खटल्यावर तेथे मत्स्य व त्याखालीं पारव्याचे वर्णाचा दगड व तेथें नीलवर्ण मृत्तिका हीं चिन्हें असलीं म्हणजे बहुतदिवस राहणारें असें बहुत उदक लागेल ॥१०॥

पश्चादुदुंवरस्यत्रिभिरेवकरैर्नरद्वयेसार्धे ।
पुरुषेसितोहिरश्मांजनोपमोधःशिरासुजला ॥११॥

अर्थ—जलवर्जित देशीं उंबराचें झाड असेल तर त्याचे पश्चिमेस तीन हातांपुढें अडीच पुरुषांखालीं उत्तम जलयुक्त शिरा आहे. याचें चिन्ह. एक पुरुष खटल्यावर तेथें श्वेतसर्प दिसेल व काजळासारखा दगड दिसेल त्याचे खालीं उदक लागेल ११

उदगर्जुनस्यदृश्योवल्मीकोयदिततोर्जुनाद्धस्तैः ।
त्रिभिरंबुभवतिपुरुषैस्त्रिभिरर्धसमन्वितैःपश्चात्॥१२॥
श्वेतागोधार्धनरेपुरुषेमृत्धूसराततःकृष्णा ।
पीतासितासिकताततोजलंनिर्दिशेदमितं ॥१३॥

अर्थ–अर्जुन ( ताजन ) वृक्षाचे उत्तरेस वारूळ असेल तर वृक्षापासून पश्चिमेकडे तीन हातावर खटलें असता, साडेतीन पुरुषाखालीं उदक आहे ॥१२॥ चिन्ह. अर्धपुरुष खटल्यावर पांढरी गोधा ( पाल ), एकपुरुषावर धूसरा ( काळीपांढरी ) माती, नंतर काळीमाती, नंतर पिवळी, नंतर रेतीनें युक्त पांढरी माती, त्याचे खालीं बहुत जल आहे असें सांगावें ॥१३॥

वल्मीकोपचितायांनिर्गुंड्यांदक्षिणेनकथितकरैः ।
पुरुषद्वयेसपादेस्वादुजलंभवतिचाशोष्यं ॥१४॥
रोहितमत्स्योर्धनरेमृत्कपिलापांडुराततःपरतः ।
सिकतासशर्कराथक्रमेणपरतोभवत्यंभः ॥१५॥

अर्थ–वारूळयुक्त निगडीचें झाड असेल तर त्याच्या दक्षिणेकडे तीन हातावर स वादोनपुरुष खटलें तर तेथें शुष्क न होणारें व गोड उदक आहे ॥१४॥ याचें चिन्ह. अर्ध्यापुरुषावर रोहितमासा, पिंगटमाती, नंतर पांढरीमा०, नंतर दगडा नीं युक्त रेती, त्याचे खालीं उदक आहे ॥१५॥

पूर्वेणयदिवदर्यावल्मीकोदृश्यतेजलंपश्चात् ।
पुरुषैस्त्रिभिरादेश्यंश्वेतागृहगोधिकार्धनरे ॥१६॥

अर्थ–बोरीचे झाडाच्या पूर्वेस वारूळ दिसेल तर झाडाच्या पश्चिमेस तीन हातां पुढें तीन पुरुष खटलें असता, उदक आहे असें सांगावें. तेथें चिन्ह. अर्धपुरु- षावर पांढरी पाल असेल, त्याचे खालीं खटलें असता उदक लागेल ॥१६॥

सपलाशावदरीचेद्दिश्यपरस्यांततोजलंभवति ।
पुरुषत्रयेसपादेपुरुषेत्रचदुंदुभिश्चिन्हं ॥१७॥

अर्थ–पळस व वारूळयुक्त बोरीचें झाड असेल तर, त्याचे पश्चिमेस तीन हाता नंतर सवातीन हात खटलें असता, खालीं उदक आहे. याचें चिन्ह. पुरुषावर दुंदुभि ( निर्विष दुतोंड्या सर्प ) असेल ॥१७॥

बिल्वोदुंबरयोगेविहायहस्तत्रयंतुयाम्येन ।
पुरुषैस्त्रिभिरंबुभवेत्कृष्णोर्धनरेचमंडूकः ॥१८॥

अर्थ–बेल व उंबर यांचा योग (एकत्र असणें) जेथें असेल त्याचे दक्षिणेस तीन हात भूमि टाकून तीन पुरुष खटलें तर उदक आहे. याचें चिन्ह. अर्धपुरुष खटल्यावर तेथें काळा बेडूक सांपडेल ॥१८॥

काकोदुंबरिकायांवल्मीकोदृश्यतेशिरातस्मिन् ।
पुरुषत्रयेसपादेपश्चिमदिक्स्थावहतिसाच ॥१९॥
आपांडुपीतिकामृद्गोरसवर्णश्चभवतिपाषाणः ।
पुरुषार्धेकुमुदनिभोदृष्टिपथंमूषकोयाति ॥२०॥

अर्थ–काकोदुंबरिका (बोखाड्याचें झाड) या खालीं वारूळ दिसेल तर तेथें सवातीन पुरुष खटलें असतां पश्चिमदिशेकडे जलशिरा वाहते ॥१९॥ येथें चिन्ह. थोडीपांढरी माती, पुढें पिवळी, नंतर पाढरादगड व अर्धापुरुष खटलें ह्मणजे पांढरा उंदीर दृष्टीस पडेल ॥२०॥

जलपरिहीनेदेशेवृक्षःकंपिल्लकोयदादृश्यः ।
प्राच्यांहस्तत्रितयेवहतिशिरादक्षिणाप्रथमं ॥२१॥
मृन्नीलोत्पलवर्णाकापोताचैवदृश्यतेतस्मिन् ।
हस्तेजगंधिमत्स्योभवतिपयोल्पंचसक्षारं ॥२२॥

अर्थ–जलरहित देशीं कंपिलक (दर्कमादार, घोरचुरळी) वृक्ष दृष्टीस पडेल तर त्याचे पूर्वेस तीन हातांपुढें सवातीन हातांखालीं दक्षिणेकडे जलशिरा वाहते ॥२१॥ याचें चिन्ह. प्रथम नीलकमलासारखी माती, नंतर कपोताच्या रंगाची माती दिसेल. हातभर खटलें ह्मणजे अजगंधि मत्स्य लागेल तेथें खारें अल्प उदक आहे ॥२२॥

शोणाकतरोरपरोत्तरेशिराद्वौकरावतिक्रम्य ।
कुमुदानामशिरासापुरुषत्रयवाहिनीभवति ॥२३॥

अर्थ–शोणाक (टेटू किंवा टिंटा) वृक्षाचें वायव्येस दोन हात सोडून तीन पुरुष खटलें असता कुमुदानामक शिरा वाहते ॥२३॥

आसन्नोवल्मीकोदक्षिणपार्श्वेविभीतकस्ययदि ।
अध्यर्धेतस्यशिरापुरुषेज्ञेयादिशिप्राच्यां ॥२४॥

अर्थ—बिभीतक ( बेहडा ) वृक्षाच्या दक्षिणदिशेकडे जवळ वारूळ असेल तर त्या बेहड्याच्या पूर्वेस दोन हातापुढे दीडपुरुष खटले असतां, जलशिरा आहे असें जाणावें ॥२४॥

तस्यैवपश्चिमायांदिशिवल्मीकोयदाभवेद्धस्ते ।
तत्रोदग्भवतिशिराचतुर्भिरर्धाधिकैःपुरुषैः ॥२५॥
श्वेतोविश्वंभरकःप्रथमेपुरुषेतुकुंकुमाभोश्मा ।
अपरस्यांदिशिचशिरानश्यतिवर्षत्रयेतीते ॥२६॥

अर्थ—बेहड्याचेच पश्चिमेस वारूळ असेल तर, त्या वृक्षाचे उत्तरेस एकहात सोडून पुढें साडेचार पुरुषांखालीं जलशिरा आहे ॥२५॥ चिन्ह. प्रथम एकपुरुष खटलें असतां, पांढरा विश्वंभरक (प्राणिविशेष ) दिसतो. नंतर कुंकुमवर्ण पाषाण, त्याखालीं पश्चिमेकडे जलशिरा आहे; परंतु ती तीनवर्षांनीं नाहींशी होईल॥२६॥

सकुशःसितऐशान्यांवल्मीकोयत्रकोविदारस्य ।
मध्येतयोर्नरैरर्धपंचमैस्तोयमक्षोभ्यं ॥२७॥
प्रथमेपुरुषेभुजगःकमलोदरसंनिभोमहीरक्ता ।
कुरुविंदःपाषाणश्चिन्हान्येतानिवाच्यानि ॥२८॥

अर्थ—कोविदार ( कोरळ, बाहवा, कांचन ) वृक्षाचे ईशानीस दर्भयुक्त पांढरें वारूळ जेथे असेल तेथें कोविदार व वल्मीक यांचे मध्यें साडेचार पुरुषांखालीं बहुत उदक आहे ॥२७॥ प्रथम एकपुरुष खटलें असता तेथें कमळाच्या मध्यासारखा पीतवर्ण सर्प दिसेल, नंतर तांबडीमाती, नंतर कुरुविंदपाषाण, हीं चिन्हें आहेत असे सांगावें ॥२८॥

यदिभवतिसप्तपर्णोवल्मीकवृतस्तदुत्तरेतोयं ।
वाच्यंपुरुषैःपंचभिरत्रापिभवंतिचिन्हानि ॥२९॥
पुरुषार्धेमंडूकोहरितोहरितालसंनिभाभूश्च ।
पाषाणोभ्रनिकाशःसौम्याचशिराशुभांबुवहा ॥३०॥

अर्थ—सप्तपर्ण ( सालीण ) वृक्ष वारूळानें वेष्टित असेल तर त्याचे उत्तरेस एक हातापुढें पाच पुरुषांखालीं उदक आहे. येथेंही चिन्हें आहेत ॥ २९ ॥ अर्धपुरुष खटलें असतां, हिरवा बेडूक सापडेल; नंतर हरताळासारखी पिवळी-भूमि, नंतर काळा पाषाण, त्याखालीं उत्तरेस चांगलें उदक वाहणारी शिरा ( झरा ) आहे ॥३०॥

सर्वेषांवृक्षाणामधःस्थितोदर्दुरोयदादृश्यः ।
तस्माद्धस्तेतोयंचतुर्भिरर्धाधिकैःपुरुषैः ॥३१॥
पुरुषेलुभवतिनकुलोनीलामृत्पीतिकाततःश्वेता ।
दर्दुरसमानरूपःपाषाणोदृश्यतेचात्र ॥३२॥

अर्थ—सर्व वृक्षांत ज्याखालीं ( मुळांत ) बेडूक दिसेल त्या वृक्षाचे उत्तरेस एक हातापुढें साडेचार पुरुषांखालीं उदक आहे ॥३१॥ येथें हीं चिन्हें. एक पुरुष खटलें असतां, मुगस दिसेल. नंतर निळी माती, नंतर पीतवर्ण, नंतर श्वेतवर्ण माती, त्याचे खालीं बेडकासारख्या वर्णाचा पाषाण दिसेल ॥३२॥

यद्यहिनिलयोदृश्योदक्षिणतःसंस्थितःकरंजस्य ।
हस्तद्वयेतुयाम्येपुरुषत्रितयेशिरासार्धे ॥३३॥
कच्छपकःपुरुषार्धेप्रथमंचोद्भियतेशिरापूर्वा ।
उदगन्यास्वादुजलाहरितोश्माधस्ततस्तोयं ॥३४॥

अर्थ—करंजवृक्षाचे दक्षिणेस सापाचें वारूळ दिसेल तर त्या वृक्षाचे दक्षिणेस दोन हातांपुढें साडेतीन पुरुषांखालीं जल आहे ॥३३॥ येथें चिन्ह. अर्धापुरुष खटल्यावर कासव दिसेल, तेथें प्रथम पूर्वेकडे झरा उत्पन्न होईल. नंतर उत्तरेकडे दुसरा झरा गोडपाण्याचा निघेल, नंतर हिरवा पाषाण त्याचे खालीं उदक चागलें आहे ॥३४॥

उत्तरतश्चमधूकादहिनिलयःपश्चिमेतरोस्तोयं ।
परिहृत्यपंचहस्तानर्धाष्टमपौरुषेप्रथमं ॥३५॥
अहिराजःपुरुषेस्मिन्धूम्राधात्रीकुलत्थवर्णोश्मा ।
माहेंद्रीभवतिशिरावहतिसफेनंसदातोयं ॥३६॥

अर्थ—मोहाच्या उत्तरेस सर्पगृह (वल्मीक) दिसेल तर त्या वृक्षाचे पश्चिमेस पांच हात भूमि सोडून पुढे साडेसात पुरुषांखाली उदक आहे. येथें चिन्ह. प्रथम ॥ ३५ ॥

एक पुरुष खटलें असतां मोठा सर्प दिसेल. नंतर धूम्रवर्ण भूमि, कुळथासारख्या वर्णाचा पाषाण, त्याखालीं माहेंद्री ( पूर्वेकडील ) शिरा फेनयुक्त जलातें निरंतर वाहत्ये ॥३६॥

वल्मीकःस्निग्धोदक्षिणेनतिलकस्यसकुशदूर्वश्चेत् ।
पुरुषैःपंचभिरंभोदिशिवारुण्यांशिरापूर्वा ॥३७॥

अर्थ–तिलक ( तिळवा ) वृक्षाचे दक्षिणेस कुश व दूर्वा याणीं युक्त व आर्द्र असें वारूळ असेल तर, त्या वृक्षाच्या पश्चिमेकडे पांच हात भूमि सोडून पुढें पांच पुरुषांखालीं पूर्वेकडे जलशिरा आहे ॥३७॥

सर्पावासःपश्चाद्यदाकदंबस्यदक्षिणेनजलं ।
परतोहस्तत्रितयात्पड्भिःपुरुषैस्तुरीयोनैः ॥३८॥
कौवेरीचात्रशिरावहतिजलंलोहगंधिचाक्षोभ्यं ।
कनकनिभोमंडूकोनरमात्रेमृत्तिकापीता ॥३९॥

अर्थ–कदंब ( कळंब ) वृक्षाच्या पश्चिमेस सर्पाचें वारूळ दिसेल तर त्या वृक्षाच्या दक्षिणेस तीन हातांपुढें साडेचार पुरुषांखालीं उदक आहे ॥३८॥ येथें उत्तरेकडे शिरा वाहत्ये. तें जल लोहगंधयुक्त अक्षोभ आहे. येथें चिन्ह सुवर्णासारख्या रंगाचा बेडूक एकपुरुषावर दिसेल, नंतर पीतवर्ण मृत्तिका. त्याखालीं अक्षोभ उदक आहे ॥३९॥

वल्मीकसंवृतोयदितालोवाभवतिनालिकेरोवा ।
पश्चात्पड्भिर्हस्तैर्नरैश्चतुर्भिःशिरायाम्या ॥४०॥

अर्थ–वारुळानें वेष्टित ताडवृक्ष किंवा नारळीचा वृक्ष असेल तर त्या वृक्षाचे पश्चिमेस सहा हातांपुढें चार पुरुषांखालीं दक्षिणेकडे जलशिरा आहे ॥४०॥

याम्येनकपित्थस्याहिसंश्रयश्चेदुदग्जलंवाच्यं ।
सप्तपरित्यज्यकरान्खात्वापुरुषान्जलंपंच ॥४१॥
कर्बुरकोहिःपुरुषेकृष्णामृत्पुटभिदपिचपाषाणः ।
श्वेतामृत्पश्चिमतःशिराततश्चोत्तराभवति ॥४२॥

अर्थ–कपित्थ ( कवठी ) वृक्षाच्या दक्षिणेस सापाचें वारूळ असेल तर, त्या वृक्षाचे उत्तरेस सात हात भूमि सोडून पांच पुरुष खटल्यें असतां उदक आहे असें

सांगावें ॥४१॥ चिन्ह. एक पुरुषावर कर्बुर ( चित्रवर्ण ) सर्प. नंतर काळी माती. नंतर पुटभित् असा पाषाण, नंतर पश्चिमेकडे पांढरी माती तेथें उत्तरेस शिरा ( उदकाचा झरा ) आहे ॥४२॥

अश्मंतकस्यवामेबदरीवादृश्यतोहिनिलयोवा ।
षड्भिरुदक्तस्यकरैःसार्धेपुरुषत्रयेतोयं ॥४३॥
कूर्मःप्रथमेपुरुषेपाषाणोधूसरःससिकतामृत् ।
आदौशिराचयाम्यापूर्वोत्तरतोद्वितीयाच ॥४४॥

अर्थ—अश्मंतक ( आपटा ) वृक्षाचे उत्तरेस बोर किंवा सापाचें वारूळ दिसेल तर त्या वृक्षाचे उत्तरेस सहा हात भूमि सोडून साडेतीन पुरुष खटलें असतां उदक आहे ॥४३॥ चिन्हें. प्रथम एक पुरुष खटलें असतां कांसव दिसेल, नंतर धूसरवर्ण पाषाण, नंतर रेतीची माती, तेथें प्रथम दक्षिणेस झरा लागेल, नंतर ईशानीस दुसरा झरा लागेल ॥४४॥

वामेनहरिद्रतरोर्वल्मीकश्चेत्ततोजलंपूर्वे ।
हस्तत्रितयेपुरुषैःसत्र्यंशैःपंचभिर्भवति ॥४५॥
नीलोभुजगःपुरुषेमृत्पीतामरकतोपमश्चाश्मा ।
कृष्णाभूःप्रथमंवारुणीशिरादक्षिणेनान्या ॥४६॥

अर्थ—हरिद्र(दारुहळद किंवा शाणपर्णी, वृक्षवि०)वृक्षाच्या उत्तरेस वारूळ असेल तर, त्या वृक्षाचे पूर्वेस तीन हात भूमि सोडून पावणेसहा पुरुष खटलें असतां उदक आहे ॥४५॥ चिन्ह. एक पुरुषावर नीलवर्ण सर्प दिसेल, नंतर पिवळी माती, नंतर हिरवा पाषाण, नंतर काळी माती, त्यांत प्रथम पश्चिमेस शिरा ( झरा ) लागेल, नंतर दुसरा दक्षिणेस झरा लागेल ॥४६॥

जलपरिहीनेदेशेदृश्यंतेनूपजानिचिन्हानि ।
वीरणदूर्वामृदवश्चयत्रतस्मिन्जलंपुरुषे ॥४७॥

अर्थ—जलहीन देशांत ज्या स्थळीं वीरण (काळा वाळा, तृणवि० ), दूर्वा हीं नलस्थानज चिन्हें मृदु दिसतात त्या स्थळीं एक पुरुष खटलें असतां, उदक आहे असें सांगावें ॥४७॥

भार्ङ्गीत्रिवृतादंतीसूकरपादीचलक्ष्मणाचैव ।
नवमालिकाचहस्तद्वयेंवुयाम्येत्रिभिःपुरुषैः ॥४८॥

अर्थ–भारंगी, त्रिवृता ( निशोतर ), दंती ( वृक्षनि० ), खरसांबळी, लक्ष्मणा ( जास्वद, मुचुकुंद ), नवमालिका ( मोगरी ) ह्या ओषधि जेथें असतील त्याचे दक्षिणेस दोन हातांपुढें तीन पुरुषाखालीं उदक आहे ॥४८॥

स्निग्धाःप्रलंबशाखावामनविटपद्रुमाःसमीपजलाः ।
सुषिराजर्जरपत्रारूक्षाश्चजलेनसंत्यक्ताः ॥४९॥

अर्थ–स्निग्ध, लांबशाखांचे, ऱ्हस्व, विस्तीर्ण अशा वृक्षांजवळ उदक असतें. सुषिर ( आंत पोकळ ), जर्जरपत्र, रूक्ष अशा वृक्षांजवळ उदक नाहीं ॥४९॥

तिलकाम्रातकवरुणकभल्लातकबिल्वतिंदुकांकोल्लाः ।
पिंडारशिरीषांजनपरूषकावंजुलातिबलाः ॥५०॥
एतेयदिसुस्निग्धावल्मीकैःपरिवृतास्ततस्तोयं ।
हस्तैस्त्रिभिरुत्तरतश्चतुर्भिरर्धेनचनरस्य ॥५१॥

अर्थ–तिलक ( तिळाचें ), आम्रातक ( आंबा ), वरुण ( वायवर्णा ), बिल्वा, बेल, तिंदुक ( टेंभुरणी), अंकोल्ल ( अंकोली ), पिंडार ( पेंढी ), शिरीष ( शिरस ), अंजन ( काळाशेगवा ), परूष ( भुयधामणी ), वंजुल ( अशोक ), अतिबला ( चाचांटी ), ॥५०॥ हे वृक्ष जर स्निग्ध व वल्मीकानें वेष्टित असतील तर त्या वृक्षांपासून उत्तरेस तीन हस्तांपुढें साडेचार पुरुषाखालीं उदक आहे ५१

अतृणेसतृणायस्मिन्सतृणेतृणवर्जितामहीयत्र ।
तस्मिन्शिराप्रदिष्टावक्तव्यंवाधनंतस्मिन् ॥५२॥

अर्थ–गवत उत्पन्न होण्याजोग्या जमिनीवर गवत न उगवेल किंवा न उगवण्याजोग्या जमिनीवर गवत उगवेल तर तेथें खालीं उदकाचा झरा आहे अथवा धन ( नाणें किंवा दागिने नव्हत. सोनें, रुपें १० धातु किंवा व्यवहारोपयोगी अन्य खनिजपदार्थ ) आहे असें सांगावें. येथें साडेचार पुरुषांखालीं पाणी आहे असें सांगावें असें कोणी ह्मणतात ॥५२॥

कंटक्यकंटकानांव्यत्यासेंभस्त्रिभिःकरैःपश्चात् ।
खात्वापुरुषत्रितयंत्रिभागयुक्तंधनंवास्यात् ॥५३॥

अर्थ–पळसादि अकंटक वृक्षांमध्यें खदिरादि कंटकयुक्त वृक्ष असेल अथवा कंटकयुक्त वृक्षामध्यें अकंटक वृक्ष असेल तर त्या वृक्षापासून पश्चिमेस तीन हातांपुढें पावणेचार पुरुष खटलें असता उदक लागेल अथवा द्रव्य सांपडेल ॥५३॥

नदतिमहीगंभीरंयस्मिंश्चरणाहताजलंतस्मिन् ।
सार्धैस्त्रिभिर्मनुष्यैःकौवेरीतत्रचशिरास्यात् ॥५४॥

अर्थ—पायानें ताडण केलें असतां भूमीचा शब्द गंभीर ( मधुर ) जेथें होतो त्या स्थलीं साडेतीन पुरुष खटलें म्हणजे उत्तरेकडे झरा आहे ॥५४॥

वृक्षस्यैकाशाखायदिविनताभवतिपांडुरावास्यात् ।
विज्ञातव्यंशाखातलेजलंत्रिपुरुषंखात्वा ॥५५॥

अर्थ—वृक्षाची एक खांदी विनत ( लवलेली ) असेल किंवा पाण्डुरवर्ण असेल तर त्या खांदीखालीं तीन पुरुष खटलें असतां जल आहे असें जाणावें ५५

फलकुसुमविकारोयस्यतस्यपूर्वेशिरात्रिभिर्हस्तैः ।
भवतिपुरुषैश्चतुर्भिःपाषाणोधःक्षितिःपीता ॥५६॥

अर्थ—ज्या वृक्षाच्या फलांस किंवा पुष्पांस विकार ( अन्यवृक्षफलपुष्पसदृशत्व ) असेल त्या वृक्षाच्या पूर्वेस तीन हातापुढें चार पुरुष खटलें असतां उदक लागेल. येथें चिन्ह. खालीं दगड व पीतवर्ण भूमि असेल ॥५६॥

यदिकंटकारिकाकंटकैर्विनादृश्यतेसितैःकुसुमैः ।
तस्यास्तलेंबुवाच्यंत्रिभिर्नरैरर्धपुरुषेच ॥५७॥

अर्थ—कंटकारिका ( रिंगिणी किंवा सांवरी ) वृक्ष कांट्यांनीं रहित व पांढऱ्या पुष्पांनीं युक्त दिसेल तर त्याचे खालीं साडेतीन पुरुषावर जल आहे ॥५७॥

खर्जूरीद्विशिरस्कायत्रभवेज्जलविवर्जितेदेशे ।
तस्याःपश्चिमभागेनिर्देश्यंत्रिपुरुषेवारि ॥५८॥

अर्थ—ज्या जलरहितदेशीं दोन शिरांची ( फांद्यांची ) खर्जूरी ( खजुरीचें झाड ) वृक्ष जेथें असेल तिच्या पश्चिमेकडे दोन हातापुढें तीन पुरुष खटलें असता उदक आहे असें सांगावें ॥५८॥

यदिभवतिकर्णिकारःसितकुसुमःस्यात्पलाश
वृक्षोवा । सव्येनतत्रहस्तद्वयेंबुपुरुषद्वयेभवति ५९

अर्थ—कर्णिकार (पांगारा) अथवा पळस हे दोषही वृक्ष पांढऱ्या पुष्पांचे असतील तर त्याचे दक्षिणेस दोन हात भूमी सोडून पुढें दोन पुरुष खटलें असतां उदक आहे ॥५९॥

ऊष्मायस्यांधात्र्यांधूमोवातत्रवारिनरयुग्मे।
निर्देष्टव्याचशिरामहतातोयप्रवाहेण ॥६०॥

अर्थ– वाफ किंवा धूर ज्या भूमीवर असेल तेथें दोन पुरुषांखालीं माठया उदक प्रवाहानें युक्त शिरा आहे असें सांगावें ॥६०॥

यस्मिन्क्षेत्रोद्देशेजातंसस्यंविनाशमुपयाति।
स्निग्धमतिपांडुरंवामहाशिरानरयुगेतत्र ॥६१॥

अर्थ–ज्या शेतांत झालेलें धान्य नाश पावतें. अथवा स्निग्ध धान्य बहुत होतें किंवा पांढरें होतें, त्या क्षेत्रांत दोन पुरुषांखालीं मोठा झरा आहे ॥ ६१ ॥

मरुदेशेभवतिशिरायथातथातःपरंप्रवक्ष्यामि।
ग्रीवाकरभाणामिवभूतलसंस्थाःशिरायांति ॥६२॥

अर्थ–मरुदेश ( जलरहितदेश मारवाड ) यांतील शिरा सांगतों. त्या देशांत उंटाच्यामानेप्रमाणें जमिनींत शिरा जातात ( फार खोल ) ॥६२॥

पूर्वोत्तरेणपीलोर्यदिवल्मीकोजलंभवतिपश्चात्।
उत्तरगमनाचशिराविज्ञेयापंचभिःपुरुषैः ॥६३॥
चिन्हंदर्दुरआदौमृत्कपिलातःपरंभवेद्धरिता।
भवतिचपुरुषेधोश्मातस्यतलेवारिनिर्देश्यं ॥६४॥

अर्थ–पीलु ( अक्रोड किंवा किंकणेलाचा वृक्ष ) वृक्षाचे ईशानीस वल्मीक असेल तर त्या वृक्षाचे पश्चिमेस साडेचार हातापुढे पांच पुरुषांखालीं उत्तरेकडे शिरा आहे असें जाणावें॥६३॥चिन्ह प्रथम एक पुरुष खटलें असतां बेडूक, नंतर कपिलवर्ण ( वानराचे केसासारिखी ) मृत्तिका, नंतर हिरवी मृत्तिका, नंतर दगड, त्याखालीं उदक आहे असें सांगावें ॥६४॥

पीलोरेवप्राच्यांवल्मीकोतोर्धपंचमैर्हस्तैः।
दिशियाम्यायांतोयंवक्तव्यंसप्तभिःपुरुषैः ॥६५॥
प्रथमेपुरुषेभुजगःसितासितोहस्तमात्रमूर्तिश्च।
दक्षिणतोवहतिशिरासक्षारंभूरिपानीयं ॥६६॥

अर्थ–पीलुवृक्षाच्याच पूर्वेस वल्मीक असेल तर त्या वृक्षाचे दक्षिणेस साडेपाचहात

सोडून सात पुरुषांखालीं उदक आहे असें सांगावें ॥६५॥ चिन्ह. प्रथमपुरुषाखालीं काळापांढरा हस्तमात्र लांब सर्प लागेल. खालीं दक्षिणेकडून शिरा लागेल त्यांतून खारें बहुत उदक वाहील ॥६६॥

उत्तरतश्चकरीरादहिनिलयेदक्षिणेजलंस्वादु ।
दशभिःपुरुषैर्ज्ञेयंपुरुषेपीतोत्रमंडूकः ॥६७॥

अर्थ—करीर ( कारवी किंवा वेळू ) वृक्षाचे उत्तरेस वल्मीक असेल तर त्या वृक्षाचे दक्षिणेस साडेचार हातांपुढें दहा पुरुषांखालीं गोड उदक आहे. चिन्ह. पुरुषाखालीं पीतवर्ण बेडूक दिसेल ॥६७॥

रोहीतकस्यपश्चादहिवासश्चेत्त्रिभिःकरैर्याम्ये ।
द्वादशपुरुषान्खात्वासक्षारापश्चिमेनशिरा ॥६८॥

अर्थ—रोहीतक ( रक्तरोहिडा ) वृक्षाच्या पश्चिमेस वल्मीक असेल, तर त्या वृक्षाचे दक्षिणेस तीन हातांपुढें बारा पुरुष खटलें असतां पश्चिमेकडे खाऱ्यापाण्याची शिरा दिसेल ॥६८॥

इंद्रतरोर्वल्मीकःप्राग्दृश्यःपश्चिमेशिराहस्ते ।
खात्वाचतुर्दशनरान्कपिलागोधानरेप्रथमे ॥६९॥

अर्थ—इंद्रतरु ( अर्जुन किंवा देवदारु अथवा पांढरा कुडा ) वृक्षाचे पूर्वेस वल्मीक दिसेल तर त्या वृक्षाचे पश्चिमेस एक हात भूमि सोडून १४ पुरुष खटलें असतां खालीं शिरा वाहते. चिन्ह. प्रथम पुरुषाखालीं गोधा ( घोरपड ) कपिलवर्ण दिसेल ॥६९॥

यदिवासुवर्णनाम्नस्तरोर्भवेद्वामतोभुजंगगृहं ।
हस्तद्वयेतुयाम्येपंचदशनरावसानेंबु ॥७०॥
क्षारंपयोत्रनकुलोर्धमानवेताम्रसंनिभश्चाश्मा ।
रक्ताचभवतिवसुधावहतिशिरादक्षिणातत्र ॥७१॥

अर्थ—सुवर्ण ( नागकेशर किंवा वाहवा अथवा पिंवळा वाळा ) नामक वृक्षाच्या उत्तरेस वल्मीक असेल तर त्या वृक्षापासून दोन हातांपुढें दक्षिणेस १५ पुरुष खटलें असतां खारें उदक आहे ॥ ७० ॥ चिन्ह. अर्धपुरुष खटलें असतां मुंगूस व खालीं तांब्यासारखा दगड, खालीं तांबडी मृत्तिका, तेथें दक्षिणेकडे शिरा वाहते ॥७१॥

बदरीरोहितवृक्षौसंपृक्तौचेद्विनापिवल्मीकं ।
हस्तत्रयेंबुपश्चात्पोडशभिर्मानवैर्भवति ॥७२॥
सुरसंजलमादौदक्षिणाशिरावहतिचोत्तरेणान्या ।
पिष्टनिभःपापाणोमृच्छ्वेतावृश्चिकोर्धनरे ॥७३॥

अर्थ—बोर व रोहित ( रक्तरोहिडा ) हे वृक्ष एकत्र वल्मीकावांचूनही दिसतील तर त्या वृक्षाचे पश्चिमेकडे तीन हातांपुढें १६पुरुषांखालीं उदक आहे॥७२॥चिन्ह.प्रथम गोड उदक पश्चिमेकडे लागेल नंतर उत्तरेकडे दुसरी शिरा लागेल, पिठासारखा पाषाण, नंतर श्वेत मृत्तिका व अर्धपुरुषावर विंचू दिसेल ॥७३॥

सकरीराचेद्बदरीत्रिभिःकरैःपश्चिमेनतत्रांभः ।
अष्टादशभिःपुरुषैरैशानीबहुजलाचशिरा ॥७४॥

अर्थ—बोरवृक्ष करीरवृक्षानें युक्त असेल तर त्याचे पश्चिमेस तीन हातांपुढें १८ पुरुषांखालीं ईशानीकडे बहुजलशिरा आहे ॥७४॥

पीलुसमेताबदरीहस्तत्रयसंमितेदिशिप्राच्यां ।
विंशत्यापुरुषाणामशोषमंभोत्रसक्षारं ॥७५॥

अर्थ—पीलुवृक्षयुक्त बदरी असेल तर त्याचे पूर्वेस तीन हातांपुढें वीस पुरुषांखालीं खारें बहुत उदक आहे.॥७५॥

ककुभकरीरावेकत्रसंयुतौयत्रककुभबिल्वौवा ।
हस्तद्वयेंबुपश्चान्नरैर्भवेत्पंचविंशत्या ॥७६॥

अर्थ—ककुभ ( अर्जुनसादडा ) व करीर हे वृक्ष एकत्र असतील अथवा ककुभ व बिल्व हे वृक्ष एकत्र असतील तर त्याचे पश्चिमेस दोन हातांपुढें २५ पुरुषांखालीं उदक आहे ॥७६॥

वल्मीकमूर्धनियदादूर्वाश्चकुशाश्चपांडुराःसंति ।
कूपोमध्येदेयोजलमत्रनरैकविंशत्या ॥७७॥

अर्थ—वारुळावर दूर्वा व पांढरे कुश असतील तर त्या वारुळांत कूप खणावा तेथें २१ पुरुषांखालीं उदक आहे ॥७७॥

भूमीकदंबकयुतावल्मीकेयत्रदृश्यतेदूर्वा ।

हस्तत्रयेणयाम्येनरैर्जलंपंचविंशत्या ॥७८॥

अर्थ–कदंबवृक्षानें युक्त भूमीवरील वारुळावर दूर्वा दिसतील तर त्या कदंबापासून दक्षिणेस तीन हातांपुढें २५ पुरुषांखालीं उदक आहे ॥७८॥

वल्मीकत्रयमध्येरोहीतकपादपोयदाभवति ।
नानावृक्षैःसहितस्त्रिभिर्जलंतत्रवक्तव्यं ॥७९॥
हस्तचतुष्केमध्यात्षोडशभिश्चांगुलैरुदग्वारि ।
चत्वारिंशत्पुरुषान्खात्वाश्मातःशिराभवति ॥८०॥

अर्थ–तीन वल्मीकांमध्यें रोहीतक वृक्ष विजातीय तीन वृक्षांनीं सहित असेल तर त्या रोहीतकवृक्षाच्या उत्तरेस चार हात १६ अंगुळें भूमी सोडून ४० पुरुष खटलें असतां दगड लागेल, त्याचे खालीं जलशिरा आहे ॥७९॥८०॥

ग्रंथिप्रचुरायस्मिञ्छमीभवेदुत्तरेणवल्मीकः ।
पश्चात्पंचकरांतिशतार्धसंख्यैर्नरैःसलिलं ॥८१॥

अर्थ–बहुतग्रंथियुक्त शमीवृक्ष जेथें असेल त्याचे उत्तरेस वल्मीक असेल तर त्या वृक्षाचे पश्चिमेकडे पांच हातांपुढें ५० पुरुषांखालीं उदक आहे असें सांगावें ८१

एकस्थाःपंचयदावल्मीकामध्यमोभवेच्छ्वेतः ।
तस्मिन्शिराप्रदिष्टानरषष्ट्यापंचवर्जितया ॥८२॥

अर्थ–एके ठिकाणीं पांच वल्मीकें असून त्यांचे मध्यभागीं एक श्वेतवल्मीक असे तर तेथें ५५ पुरुषांखालीं शिरा आहे ॥८२॥

सपलाशायत्रशमीपश्चिमभागेनुमानवैःषष्ट्या ।
अर्धनरेहिःप्रथमंसवालुकापीतमृत्परतः ॥८३॥

अर्थ–पलाशयुक्त जेथें शमीवृक्ष असेल त्याचे पश्चिमेकडे ६० पुरुषांखालीं उदक आहे. चिन्ह. प्रथम अर्धपुरुष खटलें असतां सर्प सांपडेल नंतर वालुकायुक्त पिंवळी मृत्तिका असेल ॥८३॥

वल्मीकेनपरिवृतःश्वेतोरोहीतकोभवेयस्मिन् ।
पूर्वेणहस्तमात्रेसप्तत्यामानवैरंबु ॥८४॥

अर्थ—पाढरा रोहीतकवृक्ष वल्मीकानें वेष्टित असेल तेथें त्या वृक्षाचे पूर्वेस एक हातापुढें ७० पुरुषाखालीं उदक आहे ॥८४॥

श्वेताकंटकबहुलायत्रशमीदक्षिणेनतत्रपयः ।
नरपंचकसंयुतयासप्तत्याहिर्नरार्धेच ॥८५॥

अर्थ—पाढरा कंटकयुक्त शमीवृक्ष जेथें असेल त्याच्या दक्षिणेकडे ७५ पुरुषाखालीं उदक आहे. चिन्ह. अर्धपुरुषाखालीं सर्प असेल ॥८५ ॥

मरुदेशेयच्चिन्हंनजांगलैतैर्जलंविनिर्देश्यं ।
जंबूवेतसपूर्वेयेपुरुषास्तेमरौद्विगुणाः ॥८६॥

अर्थ—मरुदेशामध्यें जें चिन्ह, त्याणें जांगल ( सल्पोदक, डोंगराळ ) देशीं उदक सांगूनये. जंबू व वेतसवृक्ष याचे पूर्वेस जे पुरुष सांगितले ते मरुदेशांत त्याच चिन्हानीं दुप्पट सांगावे ॥८६॥

जंबूस्त्रिवृतामूर्वाशिशुमारीसारिवाशिवाश्यामा ।
वीरुधयोवाराहीज्योतिष्मतीचगरुडवेगा ॥८७॥
सूकरिकमाषपर्णीव्याघ्रपदाश्चेतियद्यहेर्निलये ।
वल्मीकादुत्तरतस्त्रिभिःकरैस्त्रिपुरुषेतोयं ॥८८॥

अर्थ—जांबूळ, निशोत्तर, मूर्वा, शिशुमारी, पाढरी उपळसरी, शेरणी, पिंपळी, वाराही (श्वेत भुयकोहळी), मालकांगोणी, गरुडवेगा, खरसाबळी, रानउडीद, व्याघ्रपदा ( बेहकळी ) ह्या औषधि सापाच्या वारुळावर असतील तर त्याचे उत्तरेस तीन हातापुढें तीन पुरुष खटलें असता उदक आहे असें सांगावें ॥८७।८८॥

एतदनूपेवाच्यंजांगलभूमौतुपंचभिःपुरुषैः ।
एतैरेवनिमित्तैर्मरुदेशेसप्तभिःकथयेत् ॥८९॥

अर्थ—हीं पूर्वोक्त लक्षणें अनूप ( पाणथळ, बहूदक ) देशांत सांगावीं. सल्पोदकदेशीं तर याच लक्षणांनीं पांच पुरुष सांगावे. याच लक्षणांनीं मरुदेश ( निरुदकदेश ) यांत सात पुरुषानीं उदक सांगावें ॥८९॥

एकनिभायत्रमहीतृणतरुवल्मीकगुल्मपरिहीना ।
तस्यांयत्रविकारोभवतिधरित्र्यांजलंतत्र ॥९०॥

अर्थ–जेथें एकाच रंगाची जमीन तृण, वृक्ष, वल्मीक, गुल्म ( झुडुप ), यांणीरहित; अशी असून तिच्यामध्येंच दुसऱ्या रंगाचे मातीचा भाग असेल तर तेथें उदक आहे असें सांगावें ॥९०॥

यत्रस्निग्धानिम्नासवालुकासानुनादिनीवास्यात् ।
तत्रार्धपंचमैर्वारिमानवैःपंचभिर्यदिवा ॥९१॥

अर्थ–जेथें आर्द्र, निम्न ( उतरती ), वालुकायुक्त, सशब्द, अशी भूमि असेल तेथें साडेपांच पुरुषांखालीं अथवा पांच पुरुषांखालीं उदक आहे ॥९१॥

स्निग्धतरूणांयाम्येनरैश्चतुर्भिर्जलंप्रभूतंच ।
तरुगहनेपिहिविकृतोयस्तस्मात्तद्वदेववदेत् ॥९२॥

अर्थ–तेलकट वृक्षांच्या दक्षिणेस चार पुरुषांखाली बहुत उदक आहे असें सांगावें. जेथें बहुत वृक्ष असतील त्यांतून एक वृक्ष अन्य वृक्षासारखा असेल तर त्या वृक्षाचे दक्षिणेस चार पुरुषांखालीं उदक आहे ॥९२॥

नमतेयत्रधरित्रीसार्धेपुरुषेतुजांगलानूपे ।
कीटावायत्रविनालयेनबहवोंबुतत्रापि ॥९३॥

अर्थ–जेथें पाय मारिला असतां जमीन खालीं जात्ये अशा जंगली किंवा पाणथळ जाग्यांत दीड पुरुषाखालीं उदक आहे. गृहावांचून कीट (कृमि, मुंग्या इ०) बहुत असतील तेथेंही दीड पुरुषाखालीं उदक आहे ॥९३॥

उष्णाशीताचमहीशीतोष्णांभस्त्रिभिर्नरैःसार्धैः ।
इंद्रधनुर्मत्स्योवावल्मीकोवाचतुर्हस्तात् ॥९४॥

अर्थ–सर्व उष्ण भूमि असून त्यांत जेथें शीत भूमि असेल; अथवा सर्व शीत असून जेथें उष्ण भूमि असेल, तेथें साडेतीन पुरुषाखालीं उदक आहे. अथवा जेथें ( सूर्यकिरणांच्या योगानें ) इंद्रधनुष्य दिसेल; किंवा मत्स्याकार दिसेल, अथवा वारूळ दिसेल तेथें जंगली व पाणथळ जाग्यांत ४ हातांपुढें पाणी आहे॥९४॥

वल्मीकानांपंक्त्यांयद्येकोभ्युच्छ्रितःशिरातदधः ।
शुष्यतिनरोहतेवासस्यंयस्यांचतत्रांभः ॥९५॥

अर्थ–वारुळाची ओळ असून त्यांत एक उंच असेल तर त्याचे खालीं चार हातां-

वर उदक आहे. जेथें धान्य शुष्क होतें; अथवा रुजत नाहीं तेथें चार हातांवर उदक आहे ॥९५॥

न्यग्रोधपलाशोदुंबरैःसमेतैस्त्रिभिर्जलंतदधः ।
वटपिप्पलसमवायेतद्वद्वाच्यंशिराचोदक् ॥९६॥

अर्थ—वड, पळस व उंबर हे तीन एकत्र असतील तेथें खालीं उदक आहे. वड व पिंपळ हे एकत्र असतील तेथेंही उत्तरेकडे चार हातांखालीं उदक आहे ९६

आग्नेयदिकोणेग्रामस्यपुरस्यवाभवतिकूपः ।
नित्यंसकरोतिभयंदाहंचसमानुषंप्रायः ॥९७॥
नैर्ऋतकोणेबालक्षयंचवनिताभयंचवायव्ये ।
दिक्त्रयमेतत्त्यक्त्वाशेषासुशुभावहाःकूपाः ॥९८

अर्थ—ग्रामाच्या किंवा नगराच्या आग्नेयकोणीं कूप (जलाशय) असेल तर तो नित्य भय व मनुष्यास दाह, बहुतकरून करितो ॥९७॥ नैर्ऋतकोणीं असेल तर बालक्षय करितो. वायव्यकोणीं असेल तर स्त्रियांस भय करितो. हें दिक्त्रय (तीन दिशा) सोडून अन्यदिशास कूप शुभसूचक होत ॥९८॥

सारस्वतेनमुनिनादगार्गलंयत्कृतंतदवलोक्य ।
आर्याभिःकृतमेतद्वृत्तैरपिमानवंवक्ष्ये ॥९९॥

अर्थ—सारस्वत मुनींनें जें दगार्गल केलें, तें पाहून हें मी आर्याछंदानें केलें. आतां मानवदगार्गल, वृत्तानीं (श्लोकछंदानें) सांगतों ॥९९॥

स्निग्धायतःपादपगुल्मवल्योनिच्छिद्रपत्राश्च
ततःशिरास्ति । पद्मक्षुरोशीरकुलाःसगुंड्राः
काशाःकुशावानलिकानलोवा ॥१००॥ ख
र्जूरजंबवर्जुनवेतसाःस्युःक्षीरान्वितावाद्रुमगु
ल्मवल्ल्यः । छत्रेभनागाःशतपत्रनीपाःस्युर्न
क्तमालाश्चससिंदुवाराः१०१विभीतकोवामद
यंतिकावायत्रास्तितस्मिन्पुरुषत्रयेंभः।स्यात्प
र्वतस्योपरिपर्वतोन्यस्तत्रापिमूलेपुरुषत्रयेंभः १०२

Registered No 76 of 1874

## सूचना.

विद्वान्, उदार, परोपकारी आणि श्रीमान् इत्यादि सद्गृहस्थास आम्हीं विनयपूर्वक असें सुचवितो कीं, या ग्रंथाचा अकारापासून रकापर्यंत सर्वांस विशेष उपयोग होईल, असें समजून प्राकृत (मराठी) टीकेसह लोकहितो द्देशानें हे पुस्तक छापण्याचे काम सुरू केले आहे. यास वर्गणीद्वारा साह्य करून, तें पूर्ण करणें सुज्ञ देशबांधवांकडे आहे.

वर्गणीचे दर

| | किमत. | हाशील |
|---|---|---|
| आगाऊ किंवा अंक पोंचताच दिल्यास दर अंकास | ८ आणे | ६ पै |
| मागाहून दिल्यास दर अंकास | १० आणे | ६ पै |

किमतीबद्दल टिकिटा पाठविणें झाल्यास अर्धा आणा दराच्या पाठवाव्या.

मुंबईत ठाकुरद्वारानजीक हरिबाबाचे चाळींत रा० रा० नारोकृष्ण दुमाळे याजकडे पैसा जमा करून त्याची पावती घ्यावी.

## आश्रयदात्यांस विनंती.

**या अंकासुद्धां या पुस्तकाचे दहा अंक निघाले. ज्यांणीं जाहिरातीप्रमाणे आगाऊ किंमत जमा केली नाहीं, त्यांणी हा अंक पोंचतांच दहा अंकांबद्दल किमत रुपये ६-४ व हाशिलाबद्दल ५ आणे एकूण सहा रुपये नऊ आणे लौकर पाठवावे.**

श्री

# बृहत्संहिता

( वराह मिहिरकृत )

मूळश्लोक संस्कृत असून त्याचा अर्थ प्राकृत ( महाराष्ट्र ) भाषेत लिहिला आहे.

# THE BRIHATSANHITÁ

[ BY VARAHA MIHIRA ]

यात व्यवहारोपयोगी सर्वप्रकारचे विषय आहेत.


पुस्तक १ ले | तारीख २५ मार्च १८७४. | अंक ११

VOL I | 25th MARCH 1874 | No. 11



रत्नागिरी

येथे

जनार्दन हरि आठल्ये

यांणीं

आपल्या

जगन्मित्र छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केले.


प्रत्येक अंकात मोठ्या तक्तीचे साच्याची चतुष्पत्री ३२ पृष्ठें असून सुमारे ८०० ग्रंथ येत जाईल

अर्थ—ज्यास्थळीं वृक्ष, गुल्म, वल्ली ह्या स्निग्ध ( टवटवीत ) असतील तेथें व छिद्ररहित पत्राचे वृक्ष असतील तेथें तीन पुरुषाखालीं जलशिरा आहे असे सांगावें स्थळकमळिणी, गोखरू, वाळा, थोर डोर्ली, नागरमोथा, कसाडा किंवा लव्हा, दर्भजाति, सुगंधौषधि वि० किंवा गुळ्वेल, देवनळ, ॥१००॥ खर्जूर, जांबूळ, अर्जुन, वेत, दुधासारख्या चिकाचे वृक्ष, गुल्म ( एकमूल शाखासमूह ) व वल्ली, आळवे, कासाळू, नागकेशर, कळव, कमळ, करज, कात्रीनिगूड ॥१०१॥ बे हेडा, मोगरी, हे वृक्ष ज्यास्थळीं असतील त्यास्थळीं तीन पुरुषाखालीं उदक आहे असें सांगावें जेथें पर्वतावर दुसरा पर्वत असेल तेथें पर्वतमूळीं तीन पुरुषाखालीं उदक आहे ॥१०२॥

यामौंजकैःकाशकुशैश्चयुक्तानीलाचमृद्यत्रसशर्करा,च ।
तस्यांप्रभूतंसुरसंचतोयंकृष्णाथवायत्रचरक्तमृद्वा॥१०३

अर्थ—जी भूमि, मुंज, काश, कुश या ३ प्रकारच्या तृणापैकीं कोणत्यानेही युक्त, नीलवर्ण, बारीक दगडानीं युक्त, अथवा काळी, किंवा तांबडी अशा भूमीचा ठाईं बहुत व सुरस उदक असते ॥१०३॥

सशर्करात्ताम्रमहीकषायंक्षारंधरित्रीकपिलाकरोति । आपांडुरायांलवणंप्रदिष्टंमिष्टंपयोनीलवसुंधरायां १०४

अर्थ—शर्करा ( रेतीसारखी जाड्याकणाची व खड्याची माती ) युक्त व ताम्रभूमि कषाय ( कडु ) उदक करिते कपिल ( पिंगट ) वर्ण भूमि क्षार उदक करिते थोडयाशा पांढऱ्या भूमीचाठाईं लवण ( क्षार ) उदक होतें नीलवर्ण भूमीचाठाईं मिष्ट उदक होतें ॥१०४॥

शाकाश्वकर्णार्जुनबिल्वसर्जाःश्रीपर्ण्यरिष्टाध वाशिंशपाश्च । छिद्रैश्चपर्णैर्द्रुमगुल्मवल्योरूक्षा श्चदूरेंबुनिवेदयंति ॥१०५॥

अर्थ—साग, राळेचा वृक्ष, अर्जुन, बिल्व, सायळा, शिवण, निंब, खैर, शिसवा, व सच्छिद्र पानें रूक्ष असे वृक्ष, गुल्म, वल्ली ह्या जेथें असतील तेथून दूर उदक आहे असे सांगतात ॥१०५॥

सूर्याग्निभस्मोष्ट्रखरानुवर्णायानिर्जलासावसु

धाप्रदिष्टा । रक्तांकुराःक्षीरयुताःकरीरारक्ताधराचेज्जलमश्मनोधः ॥१०६॥

अर्थ—सूर्य, अग्नि, भस्म, उंट, गर्दभ, यांच्या सारखा वर्ण ज्या भूमीचा आहे ती निर्जल सांगीतली. जेथें करीर (कारवी किंवा नांबू) वृक्ष, रक्तपल्लव व क्षीर यांनीं युक्त असतील व रक्तभूमि जर असेल तर तेथें पाषाणाखालीं उदक आहे असें सांगावें ॥१०६॥

वैडूर्यमुद्गांबुदमेचकाभापाकोन्मुखोदुंबरसंनिभावा । भृंगांजनाभाकपिलाथवायाज्ञेयाशिलाभूरिसमीपतोया ॥१०७॥

अर्थ—वैडूर्यमणि (लसण्या पांढरा भूरकटरंगाचा) मूग, मेघ, यांसारखी व कृष्णवर्ण किंवा पिकलेल्या उंबरफळासारखी अथवा भ्रमर, कज्जल यांसारखी अथवा कपिलवर्ण (भुरकट) जी शिला (पाषाण) तिचे जवळ उदक आहे असें समजावें ॥१०७॥

पारावतक्षौद्रघृतोपमावाक्षौमस्यवस्त्रस्यचतुल्यवर्णा । यासोमवल्ल्याश्चसमानरूपासाप्याशुतोयंकुरुतेक्षयंच ॥१०८॥

अर्थ—पारवापक्षी, मध, घृत यांसारखी अथवा रेशमी वस्त्रासारखी किंवा सोमवल्लीसारखी जी शिला तीही अक्षय शीघ्र उदक करिते ॥१०८॥

ताम्रैःसमेतापृषतैर्विचित्रैरापांडुभस्मोष्ट्रखरानुरूपा । भृंगोपमांगुष्ठिकपुष्पिकावासूर्याग्निवर्णाचशिलावितोया ॥१०९॥

अर्थ—तांबडे नानाप्रकारचे बिंदूंनीं युक्त, ईषत्पांडुरवर्ण, भस्म, उंट, गर्दभ, यांच्या सारखी, भ्रमरासारखी, अंगुष्ठपुष्पिका (आंगठ्याएवढे पांढरे टिपके जीवर आहेत अशी) सूर्य व अग्नि यांसारख्या वर्णाची अशी जी शिला ती उदकरहित जाणावी ॥१०९॥

चंद्रातपस्फटिकमौक्तिकहेमरूपायाश्चेंद्रनीलमणिहिंगुलुकांजनाभाः । सूर्योदयांशुहरिता

**लनिभाश्रयाःस्युस्ताःशोभनामुनिवचोत्रचवृ त्तमेतत् ॥११०॥**

अर्थ–चांदणें, स्फटिकमणि, मौक्तिक, सुवर्ण यांसारख्या; इंद्रनीलमणि, हिंगूळ, कज्जल यांसारख्या; सूर्योदयींचे किरण, हरिताळ, यांसारख्या ज्या शिला त्या सर्व शोभन ( जलयुक्त ) असें जाणावें असें मुनीनीं सांगितलें ॥११०॥

**एताह्यभेद्याश्चशिलाःशिवाश्चयक्षैश्चनागैश्चस दाभिजुष्टाः । येषांचराष्ट्रेषुभवंतिराज्ञांतेषाम वृष्टिर्नभवेत्कदाचित् ॥१११॥**

अर्थ–ह्या पूर्वोक्त शिला अभेद्य ( फोडूं नयेत ) कारण, कल्याणकारक व यक्ष, नाग यांणीं सर्वकाळ सेवित ( आश्रयित ) होत. अशा शिला ज्या राजांच्या राज्यांत असतील तेथें कधींही अवर्षण होणार नाहीं ॥१११॥ गरज असल्यास शिला फोडण्याचा उपाय.

**भेदंयदानैतिशिलातदानींपालाशकाष्ठैः सहतिंदुकानां । प्रज्वालयित्वानलमग्नि वर्णांसुधांबुसिक्ताप्रविदारमेति ॥११२॥**

अर्थ–शिला फुटत नाहीं तर, तत्काल टेंभुरणीचीं व पळसाचीं काष्ठें यांहींकरून अग्नि पेटवून ती शिला लाल करावी. आणि चुन्याच्या पाण्यानें भिजवावी म्हणजे फुटते ॥११२॥

**तोयंशृतंमोक्षकभस्मनावायत्सप्तकृत्वःपरिषे चनंतत् । कार्यंशरक्षारयुतंशिलायाःप्रस्फो टनंवन्हिवितापितायाः ॥११३॥**

अर्थ–मोक्षक ( मष्कक, मोरवा ) वृक्षाच्या भस्मांत तापविलेलें उदक शर ( सरनामक तृणवि० ) तृणाच्या भस्मानें युक्त करून तापविलेल्या शिलेचें सातवेळ सिंचन पुनःपुनः तापवून करावें म्हणजे ती शिला फुटते ॥११३॥

**तक्रकांजिकसुराःसकुलत्थायोजितानिवदरा णिचतस्मिन् । सप्तरात्रमुषितान्यभितप्तांदा रयंतिहिशिलांपरिषेकैः ॥११४॥**

अर्थ–ताक, पेज, मद्य, कुळीद हे एकत्र करून त्यामध्यें चार टावावीं आणि सा तरात्रीं ठेवावी त्याणें तापिलेली शिळा भिजवावी ह्मणजे फुटते ॥११४

नैंवंपत्रंत्वक्चनालंतिलानांसांपामार्गंतिंदुकं स्याद्गुडूची । गोमूत्रेणस्रावितःक्षारएषांषट्कृत्वोतस्तापितोभिद्यतेश्मा ॥११५॥

अर्थ–निंबाचीं पानें व साल, तिळाचें नाल (तिळकट), आघाडा, टेंभुरणी, गुळवेल, याचें भस्म गोमूत्रानें युक्तकरून त्याणें तापिवलेला पाषाण (दगड) सहावेळ पुन पुन तापवून सिंचन केला ह्मणजे फुटतो ॥११५॥

आर्कंपयोहुडुविषाणमषींसमेतंपारावताखुशकृताचयुतंप्रलेपः । टंकस्यतैलमथितस्यततोस्यपानंपश्चाच्छितस्यनशिलासुभवेद्विघातः ११६

क्षारेकदल्यामथितेनयुक्तेदिनोषितेपायितमायसंयत् । सम्यक्छितंचाश्मनिनैतिभंगंनचान्यलोहेष्वपितस्यकौंठ्यं ॥११७॥

अर्थ–या दोन श्लोकाचा अर्थ (अ० ५० श्लो० २५।२६) यात सांगीतला आहे. प्रथम श्लोकातील टंकस्य या पदाचा अर्थ शस्त्र (टांकीइ०) असा आहे ॥११६।११७॥

पालीप्रागपरायतांबुसुचिरंधत्तेनयाम्योत्तराकल्लोलैरवदारमेतिमरुतासाप्रायशःप्रेरितैः । तांचेदिच्छतिसारदारुभिरपांसंपातमावारयेत्पाषाणादिभिरेववाप्रतिचयंक्षुण्णांद्विपाश्वादिभिः ॥११८॥

अर्थ–पूर्वपश्चिम पाली (वापी, विहीर) बहुतादिवस उदक धारण करिते दक्षिण विहीर फार दिवस रहात नाहीं. कारण वायूनें प्रेरित जे तरंग त्याहींकरून तिचें विदारण बहुधा होतें. अशा विहिरीतें जर चांगली करण्यास इच्छील तर जिकडे जलतरंग जात असतील तिकडे दृढकाष्ठानीं किंवा दगडानीं अथवा भाजलेल्या इटानीं जलपतनस्थल बाधावें प्रतिचय (एकेकथरीं) गज, अश्व,

उष्ट्र, महिष, बैल यांहीकरून भूमीचें मर्दन करावें ह्मणजे तेणेकरून बळकट घट्ट होतें ॥११८॥

ककुभवटाम्रप्लक्षकदंबैःसनिचुलजंबूवेतसनीपैः । कुरबकतालाशोकमधूकैर्बकुलविमिश्रैश्चावृततीरां ॥११९॥

अर्थ—ककुभ ( अर्जुनसादडा ), वट, आम्र, पाईर, कळंब, कडुनिंब, जांभूळ, वेत, कोन्हांटा, ताड, अशोक, मोहा, बकुल, या वृक्षांनीं विहिरीचें तीर आच्छादित करावें ( हे वृक्ष लावावे ) ॥११९॥

द्वारंचनैर्वाहिकमेकदेशेकार्यंशिलासंचितवारिमार्गे । कोशस्थितंनिर्विवरंकपाटंकृत्वाततःपांशुभिरावपेत्तं ॥१२०॥

अर्थ—शिलांनीं केला आहे उदकाचा मार्ग ज्यास असें एकीकडे निर्वाहार्थ द्वार करावें. ह्यावर मध्ये छिद्ररहित कपाट करून नंतर तें मातीनें युक्त करावें ॥१२०

अंजनमुस्तोशीरैःसराजकोशातकामलकचूर्णैः । कतकफलसमायुक्तैर्योगःकूपेप्रदातव्यः१२१
कलुषंकटुकंलवणंविरसंसलिलंयदिवाशुभगंधिभवेत् । तदनेनभवत्यमलंसुरसंसुसुगंधिगुणैरपरैश्चयुतं ॥१२२॥

अर्थ—अंजन ( फटुकी किंवा काळीकापशी ), नागरमोथा, वाळा, शिरदोडी किंवा सोंठीघोसाळी, यांचें चूर्ण व कतकफल ( निवळीचेंबी ) यांचा योगकरून विहिरीमध्यें टाकावा ॥१२१॥ तेणेंकरून गढूळ, कडु, क्षार, विरस, अशुभगंध असेंही उदक स्वच्छ, सुरस, सुगंधि, या गुणांनीं व अन्यही चांगल्या गुणांनीं युक्त होतें ॥१२२॥

हस्तोमघानुराधापुष्यधनिष्ठोत्तराणिरोहिण्यः । शतभिषगित्यारंभेकूपानांशस्यतेभगणः ॥१२३॥

अर्थ—हस्त, मघा, अनुराधा, पुष्य, धनिष्ठा, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा,

रोहिणी, शततारका, हा नक्षत्रसमुदाय कूपाच्या ( विहिरीच्या ) आरंभास प्रश स्त होय ॥१२३॥

कृत्वावरुणस्यबलिंवटवेतसकीलकंशिरास्थाने ।
कुसुमैर्गंधैर्धूपैःसंपूज्यनिधापयेत्प्रथमं ॥१२४॥

अर्थ—वरुण ( अपांपति ) यास बलि देऊन वट व वेत याची मेख करून तिची पुष्पें, गंध, धूप इत्यादिकांनीं पूजाकरून शिरा ( झरा ) स्थानीं प्रथम स्थापन करावी ॥१२४॥

मेघोद्भवंप्रथममेवमयाप्रदिष्टंज्येष्ठामतीत्यबल
देवमतादिदृष्ट्वा । भौमंदगार्गलमिदंकथितंद्वि
तीयंसम्यग्वराहमिहिरेणमुनिप्रसादात् ॥१२५॥

अर्थ—ज्येष्ठी पौर्णिमेस ज्येष्ठानक्षत्र जाऊन मेघोद्भव उदक प्रथमच अध्याय २३ यात बलदेवादिकांचें मत पाहून मी सांगीतलें. या अध्यायांत भूमिसंबंधी हें दुसरें दगार्गल ( पाणी पाहणें ) मी ( वराह मिहिरानें ) मुनिप्रसादानें उत्तम सांगीतलें ॥१२५॥

इतिश्रीवराहमिहिरकृतौबृहत्संहितायांद
गार्गलंनामचतुःपंचाशोध्यायः ॥५४॥

---

## ॥ अथवृक्षायुर्वेदः ॥

---

प्रांतच्छायाविनिर्मुक्तानमनोज्ञाजलाशयाः ।
यस्मादतोजलप्रांतेष्वारामान्विनिवेशयेत् ॥१॥

अर्थ—आसमंताद्भागीं छायेनें रहित असे जलाशय ( विहिरी, तळीं इ० ) सुंदर दिसत नाहींत यास्तव जलाशयाचे सभोंवार आराम ( बाग ) करावे ॥१॥

मृद्वीभूःसर्ववृक्षाणांहितातस्यांतिलान्वपेत् ।
पुष्पितांस्तांश्चमृद्नीयात्कर्मैतत्प्रथमंभुवि ॥२॥

अर्थ—मधुर व कोमल ( मृदु ) भूमि सर्व वृक्षांस हितकारक होय. यास्तव त्या भूमीवर तीळ पेरून ते फुलले ह्मणजे त्यांचें तेथेंच मर्दन करावें. झाडें लावावयाचे भूमीवर हे कृत्य प्रथम करावें ॥२॥

अरिष्टाशोकपुन्नागशिरीषाःसप्रियंगवः ।
मंगल्याःपूर्वमारामेरोपणीयागृहेषुवा ॥३॥

अर्थ—कडुनिंब, अशोक, सुरंगी, शिरस, गहुला.हे वृक्ष मंगलकारक यास्तव प्रथम बागेंत किंवा गृहाजवळ हे लावावे ॥३॥

पनसाशोककदलीजंबूलकुचदाडिमाः ।
द्राक्षापालीवताश्चैववीजपूरातिमुक्तकाः ॥४॥
एतेद्रुमाःकांडरोप्यागोमयेनप्रलेपिताः ।
मूलच्छेदेथवास्कंधेरोपणीयाःप्रयत्नतः ॥५॥

अर्थ—फणस, अशोक, केळी, जांवळी, ओंटी, डाळिंब, द्राक्षी, पालीवत, महाळुंग, कस्तुरीमोगरा किंवा टेंभुरणी ॥४॥ हे वृक्ष कांडरोप्य आहेत ह्मणजे बीजांपासूनच झाडें करण्याची गरज नाहीं. या वृक्षांच्या खांद्या तोडून लावल्या असतां वांचतात, यास्तव तोडलेल्या खांदीस गाईचें शेण लावून मग ती जमिनींत लावावी. अथवा एक झाड तोडून त्याजवर किंवा खांदीवर दुसऱ्या ( सजातीय किंवा विजातीय ) झाडाचे खांदीचें कलम करावें. त्यावर मातीचा लपेटा द्यावा. ज्यांस फुलें व फळें येतात अशा झाडांच्या रांद्या जगतात ॥५॥

अजातशाखान्शिशिरेजातशाखान्हिमागमे ।
वर्षागमेचसुस्कंधान्यथादिक्प्रतिरोपयेत् ॥६॥

अर्थ—अंकुर न फुटलेले वृक्ष शिशिरांत ( माघफाल्गुनांत ), अंकुर फुटलेले हेमंतांत ( मार्गशीर्षपौषांत ), खांद्या फुटलेले वर्षाकाळीं ( श्रावणभाद्रपदांत ) लावावे. वृक्ष उपटण्यापूर्वी त्याचें जें अंग ज्या दिशेस होतें तेंच अंग त्याच दिशेस होईल असा वृक्ष लावावा ( उपटण्यापूर्वी दिशा समजण्यासाठीं झाडास चुन्याची वगैरे खुण करून ठेवावी ) ॥६॥

घृतोशीरतिलक्षौद्रविडंगक्षीरगोमयैः ।
आमूलस्कंधलिप्तानांसंक्रामणविरोपणं ॥७॥

अर्थ–तूप, वाळा, तीळ, मध, वावडिंग, दुग्ध, गाईचें शेण, यांचा मूळापासून खांद्यापर्यंत लेप करून, वृक्ष अन्य देशास नेऊन लाविला तरी जगतो ॥७॥

शुचिर्भूत्वातरोःपूजांकृत्वास्नानानुलेपनैः ।
रोपयेद्रोपितश्चैवपत्रैस्तैरेवजायते ॥८॥

अर्थ–शुद्ध होऊन, वृक्षास स्नान घालून अनुलेपनादिकांनीं त्याची पूजाकरून लावावा. असा लावलेला वृक्ष त्याच पानानीं होतो. पूर्वीचीं पानें शुष्क होत नाहींत ८

सायंप्रातश्चघर्मर्तौशीतकालेदिनांतरे ।
वर्षासुचभुवःशोषेसेक्तव्यारोपिताद्रुमाः ॥९॥

अर्थ–ग्रीष्मऋतूमध्यें लावलेले वृक्ष सायंकाळीं व प्रातःकाळीं शिंपावे. हेमंत व शिशिर ऋतूमध्यें एक दिवस सोडून शिंपावे. वर्षाऋतूंत भूमि शुष्क झाली म्हणजे शिंपावे ॥९॥

जंबूवेतसवानीरकदंबोदुंबरार्जुनाः ।
वीजपूरकमृद्वीकालकुचाश्चसदाडिमाः ॥१०॥
वंजुलोनक्तमालश्चतिलकःपनसस्तथा ।
तिमिरोम्रातकश्चैवषोडशानूपजाःस्मृताः ॥११॥

अर्थ–जांबूल, वेत, पोरसांपिंपळ, कळंब, उंबर, अर्जुन, लिंबू, द्राक्ष, ओंटीचें झाड, डाळिंबी व एलची, अशोक व तिवर, करंज, तिळ, फणस, तिमिर, ( वृक्षवि० ), अम्रातक ( अंबाडा ), हे सोळा वृक्ष पाणथळ देशांत होणारे होत ॥१०॥११॥

उत्तमंविंशतिर्हस्तामध्यमंषोडशांतरं ।
स्थानात्स्थानांतरंकार्यंवृक्षाणांद्वादशावरं ॥१२॥

अर्थ–एका वृक्षापासून दुसरावृक्ष लावणें, वीस हातांवर उत्तम, सोळा हातावर मध्यम, बारा हातावर कनिष्ठ होय ॥१२॥

अभ्याशजातास्तरवःसंस्पृशंतःपरस्परं ।
मिश्रैर्मूलैश्चनफलंसम्यग्यच्छंतिपीडिताः ॥१३॥

अर्थ–समीप झालेले वृक्ष परस्पर स्पर्श करतात व पाळें मिश्र होतात, यास्तव पीडित होऊन उत्तमप्रकारें फळें देत नाहींत ॥१३॥

शीतवातातपैरोगोजायतेपांडुपत्रता ।
अवृद्धिश्चप्रवालानांशाखाशोपोरसस्रुतिः ॥१४॥

अर्थ-थंडी, वारा व ऊन यांहींकरून वृक्षांस रोग होतो. या रोगानें पांढरीपानें, अंकुर न वाढणें, शाखा शुष्क होणें, रस गळणें, हीं होतात या चिन्हांवरून रोग झाला असें समजावें ॥१४॥

चिकित्सितमथैतेषांशस्त्रेणादौविशोधनं ।
विडंगघृतपंकाक्तान्सेचयेत्क्षीरवारिणा ॥१५॥

अर्थ-अशा रोगग्रस्त वृक्षांचें प्रथम शस्त्रानें व्रणादिकाचें शोधन करावें. वावडिंग, घृत, कर्दम, हीं एकत्र करून त्याचा लेप व्रणादिकावर करावा आणि पाण्यांत दूध घालून तें शिंपडावें असें केलें ह्मणजे रोग जातो ॥१५॥

फलनाशेकुलत्थैश्चमाषैर्मुद्गैस्तिलैर्यवैः ।
शृतशीतपयःसेकःफलपुष्पाभिवृद्धये ॥१६॥

अर्थ-वृक्षांचीं फळें गळतील किंवा नासतील तर कुळीद, उडीद, मूग, तीळ, यव, हे पदार्थ दुधांत घालून शिजवावे. नंतर थंड करून त्याणें वृक्षांचें सिंचन करावें ह्मणजे फळें व फुलें यांची वृद्धि होते ॥१६॥

अविकाजशकृच्चूर्णस्वाढकेद्वेतिलाढकं ।
सक्तुप्रस्थोजलद्रोणोगोमांसतुलयासह ॥१७॥
सप्तरात्रोषितैरेतैःसेकःकार्योवनस्पतेः ।
वल्लीगुल्मलतानांचफलपुष्पायसर्वदा ॥१८॥

अर्थ-मेंढा व बकरा यांच्या विष्ठेचें ( लेंडीचें ) चूर्ण २ आढक, तिळांचें चूर्ण १ आढक, सातूंचें चूर्ण एक प्रस्थ, उदक एक द्रोण व इतक्यांबरोबर गोमांस ॥१७॥ हीं एकत्र करून सात रात्रीं ठेवावीं त्याणें पाहिजे त्या ऋतूंत वृक्षांचें सिंचन करावें ह्मणजे वल्ली, गुल्म, लता, यांस सर्वकाळ फळें फुलें येतात. ( आढकादि प्रमाण. ५ गुंजा ह्मणजे १ मासा, १६ मासे १ तोळा, ४ तोळे १ पल, ४ पलें १ कुडव, ४ कुडव १ प्रस्थ, ४ प्रस्थ १ आढक, ४ आढक १ द्रोण, ४ द्रोण १ मण, ४ मण १ खंडी, १०० पलें १ तुला, २० तुला ह्मणजे १ भार ) ॥१८॥

वासराणिदशदुग्धभावितंबीजमाज्ययुतह
स्तयोजितं । गोमयेनबहुशोविरूक्षितंक्रौड
मार्गपिशितैश्चधूपितं ॥१९॥
मत्स्यसूकरवसासमन्वितंरोपितंचपरिकर्मि
तावनौ ॥ क्षीरसंयुतजलावसेचितंजायतेकु
सुमयुक्तमेवतत् ॥२०॥

अर्थ—हातास तूप लावून त्या हाताने दहा दिवस दुधानें कोणत्याहीझाडाचे बीजांस सिंचन करावें नंतर गोमयानें बहुतवेळ मर्दन करावें. नंतर तें बीज भाज्यांत ठेवून त्यास डुकर व हरिण यांच्या मांसाची धुरी द्यावी. आणि मत्स्य व डुकर यांच्या वसेने युक्त करून पूर्वोक्त कामवलेल्या ( तीळ रुजून ते फुलल्यावर मोडलेल्या ) जमिनींत लावावें. नंतर दूध आणि पाणी एकत्र करून त्यानें शिंपावें ह्मणजे तें बीज त्वरित पुष्पयुक्त होतें ॥१९॥२०॥

तिंत्तिडीत्यपिकरोतिवल्लरींव्रीहिमाषतिलचू
र्णसक्तुभिः । पूतिमांससहितैश्चसेचिताधूपि
ताचसततंहरिद्रया ॥२१॥

अर्थ—भात, उडीद, तिळ, यांचें चूर्ण व सातू आणि दुर्गंधियुक्त मांस यांणीं सिंचन करून, हळदीनें धूपित केलेलें चिंचेचें झाड, अतिकठिण असताही नूतनांकुर असें होतें. मग इतर झाड होईल यांत काय संशय! ॥२१॥

कपित्थवल्लीकरणायमूलान्यास्फोतधात्रीधव
वासिकानां । पलाशिनीवेतससूर्यवल्लीश्या
मातिमुक्तैःसहिताष्टमूली ॥२२॥
क्षीरेशृतेचाप्यनयासुशीतेतालाशतंस्थाप्यक
पित्थबीजं । दिनेदिनेशोषितमर्कपादैर्मासं
विधिस्त्वेषततोधिरोप्यं ॥२३॥
हस्तायतंतद्विगुणंगभीरंखात्वावटंप्रोक्तजला
वपूर्णं । शुष्कंप्रदग्धंमधुसर्पिषातत्प्रलेपयेद्भ
स्मसमन्वितेन ॥२४॥

**चूर्णीकृतैर्माषतिलैर्यवैश्चप्रपूरयेन्मृत्तिकयांतरस्थैः । मत्स्यामिषांभःसहितंचहन्याद्यावद्घनत्वंसमुपागतंतत् ॥२५॥**
**उप्तंचवीजंचतुरंगुलाधोमत्स्यांभसामांसजलैश्चसिक्तं । वल्लीभवत्याशुशुभप्रवालाविस्मापनीमंडपमावृणोति ॥२६॥**

अर्थ—कपित्थ ( कंवठी ) यास नवीन पल्लव आणणें असल्यास उपाय. कांचन, आंवळी, धावडा, अडुळसा, यांचीं मूळें; वेत व रुविमांदार यांच्या पर्णयुक्तवल्ली; धोतरा व तिवर यांचीं मूळें, अशीं ८ घालून ॥२२॥ तापविलेलें दूध निवून त्यांत कंवठीचें बीज टाकून शंभर टाळ्या वाजवण्याच्या काळापर्यंत ठेवून, तें बीज दिवसास सूर्यकिरणांनीं सुकवावें असा विधि दररोज ( ३० दिवस ) करावा नंतर तें बीज पेरावें ॥२३॥ हातभर लांबरुंद व दोनहात खोल असा खळगा काढून तो पाणी व दूध मिश्रकरून त्याणें पूर्ण करावा आणि शुष्क झाल्यानंतर अग्नीनें दग्ध करावा. नंतर मध व घृत यांत भस्म घालून त्या खळग्यास लेप करावा ॥२४॥ उडीद, तिळ, यव यांचें चूर्ण करून तें आंतील मृत्तिकेशीं मिळवावें व मत्स्य, मांस यांणीं युक्तजलानें युक्त करून कठिण होईपर्यंत ताडण करावें ( ठोकावें ) ॥२५॥ त्यांत चार अंगुलांखालीं बीज पेरावें आणि मत्स्य, मांससहित उदकानें सिंचन करावें; ह्मणजे वृक्षास चांगले व आश्चर्यकारक असे अंकुर येतात व ते मंडपाप्रत शीघ्र आवरण ( वेष्टन ) करितात ॥२६॥

**शतशोंकोल्लसंभूतफलकल्केनभावितं ।**
**एतत्तैलेनवाबीजंश्लेष्मातकफलेनवा ॥२७॥**
**वापितंकरकोन्मिश्रमृदितत्क्षणजन्मकं ।**
**फलभारान्विताशाखाभवतीतिकिमद्भुतं ॥२८॥**

अर्थ—अंकोलवृक्षाच्या फलकल्कानें ( रसानें ) शंभरवेळ सिंचित अथवा त्याच्या तेलानें शंभरवेळ सिक्त, अथवा भोंकरीच्या कल्कानें किंवा तेलानें शंभरवेळ सिक्त कोणतेंही बीज करून ॥२७॥ गारांच्या पाण्यानें मिश्रभूमींत पेरावें ह्मणजे त्याचक्षणीं त्या बीजास अंकुर येतात. नंतर फळभारानें युक्त त्यांच्या शाखा होतील यांत काय आश्चर्य आहे ॥२८॥

**श्लेष्मातकस्यबीजानिनिष्कुलीकृत्यभावयेत्प्राज्ञः ।**

अंकोल्लबिज्जलाद्भिश्छायायांसप्तकृत्वेवं ॥२९॥
माहिषगोमयघृष्टान्यस्यकरीषेचतानिनिक्षिप्य ।
करकाजलमृद्योगेन्युप्तान्यन्हाफलकराणि ॥३०॥

अर्थ–भोकरीचें बीज बुद्धिमतानें कृत्रिमतुष काढून अकोलयुक्तजलानें भिजवून उपेत वाळवावें, असें सात दिवस करून म्हशीच्या शेणात घषणकरून त्याच ... णांत गारानीं युक्त मृत्तिकेत पेरावे त्यास एक दिवसात फळ येतें ॥२९॥३०॥

ध्रुवमृदुमूलविशाखागुरुभंश्रवणस्तथाश्विनीहस्तं ।
उक्तानिदिव्यदृग्भिःपादपसंरोपणेभानि ॥३१॥

अर्थ–उत्तरात्रय, रोहिणी, मृग, रेवती, चित्रा, अनुराधा, मूळ, विशाखा, पुष्य, श्रवण, अश्विनी, हस्त हीं नक्षत्रें दिव्यदृष्टपर्यांनीं वृक्ष लावण्यास शुभ सांगित लीं आहेत ॥३१॥

॥ इतिबृहत्संहितायांवृक्षायुर्वेदोनामपंचपंचाशत्तमो ध्यायः ॥५५॥

## ॥ अथप्रासादलक्षणं ॥

कृत्वाप्रभूतंसलिलमारामान्विनिवेश्यच ।
देवतायतनंकुर्याद्यशोधर्माभिवृद्धये ॥१॥

अर्थ–बहुत उदक करून, बगमादिका स्थापून, यश व धर्म यांच्या वृद्ध्यर्थ तेथें देवालय करावें ॥१॥

इष्टापूर्तेनलभ्यंतेयेलोकास्तान्बुभूषता ।
देवानामालयःकार्योद्वयमप्यत्रदृश्यते ॥२॥

अर्थ–यज्ञ व वापीकूपतडागादि यांहींकरून जे लोक प्राप्त होतात त्यांतें इच्छि णाऱ्या पुरुषांनीं देवालय करावें देवालय करण्यांत यज्ञ व वाप्यादिक हीं दोन, हीं प्राप्त होतात ॥२॥

सलिलोद्यानयुक्तेषुकृतेष्वकृतकेषुच ।
स्थानेष्वेतेषुसांनिध्यमुपगच्छंतिदेवताः ॥३॥

अर्थ—उदक व उपवनें यांहीं युक्त व नवीं केलेलीं किंवा स्वतः सिद्ध अशा स्थानीं देवतासांनिध्य करितात ( तेथें येतात ) ॥३॥

सरःसुनलिनीछत्रनिरस्तरविरश्मिषु ।
हंसांसाक्षिप्तकल्हारवीचीविमलवारिषु ॥४॥
हंसकारंडवक्रौंचचक्रवाकविराविषु ।
पर्यंतनिचुलच्छायाविश्रांतजलचारिषु ॥५॥

अर्थ—कमळें हींच छत्रें त्यांणीं दूर केले आहेत सूर्यकिरण जेथें अशा सरोवरांत, हंसभुजांनीं ताडित कमलयुक्ततरंगानीं स्वच्छ आहेत उदकें जेथें अशा, हंस, कारंडव, क्रौंच, चक्रवाक, हे शब्द करतात जेथें अशा, आसमताद्भागीं जलवेतसांच्या छायेंत विश्रांत आहेत जलचर जेथें अशा सरोवरांत देवता रहातात ॥४।५॥

क्रौंचकांचीकलापाश्चकलहंसकलस्वनाः ।
नद्यस्तोयांशुकायत्रशफरीकृतमेखलाः ॥६॥
फुल्लतीरद्रुमोत्तंसाःसंगमश्रोणिमंडलाः ।
पुलिनाभ्युन्नतोरस्याहंसहासाश्चनिम्नगाः ॥७॥
वनोपांतनदीशैलनिर्झरोपांतभूमिषु ।
रमंतेदेवतानित्यंपुरेषूद्यानवत्सुच ॥८॥

अर्थ—क्रौंचपक्षी हेच आहेत कांची ( कमरपट्टा ) समुदाय ज्याचे अशा, पीतवर्ण हंसांचे आहेत मधुर शब्द ज्यांचेठाईं अशा, उदकें हींच आहेत वस्त्रें ज्यांचीं अशा, बारीक मत्स्यच आहेत मेखला ज्यांच्या अशा नद्यांचाठाईं देवता रमतात ॥ ६ ॥ फुललेले जे तीरस्थ वृक्ष हेच आहेत कर्णभूषणें ज्यांची अशा, दोन नद्यांचा जो संगम तोच आहे श्रोणिमंडल ज्याचा अशा, तीरांमध्यें जे उन्नत भाग तेच आहेत स्तन ज्याचे अशा, हंस हेच आहेत हास्यें ज्यांचीं अशा नद्या जेथें असतील तेथें देवता रमतात ॥७॥ वनसमीप नद्या व पर्वताच्या पाझरांसमीप भूमींचाठाईं व बागांनीं युक्त अशा नगरांमध्येंही नित्य देवता रमतात ॥ ८ ॥

भूमयोब्राह्मणादीनांयाःप्रोक्तावास्तुकर्मणि ।
ताएवतेषांशस्यंतेदेवतायतनेष्वपि ॥९॥

अर्थ—ब्राह्मणादि वर्णांस ज्या भूमि वास्तुकर्मीं ( अ० ५३ श्लो० ९६।९७ ) सांगितल्या त्याच ब्राह्मणादि वर्णांस देवालय बांधण्याविषयीं प्रशस्त होतात ॥९॥

चतुःषष्टिपदंकार्यंदेवतायतनंसदा ।
द्वारंचमध्यमंतत्रसमदिक्स्थंप्रशस्यते ॥१०॥

अर्थ—देवालय, सर्वकाल चतु षष्टिपद (अ. ५३ श्लो. ५५ ) यात सांगीतल्यासारखें ६४पदाचें करावें. त्या देवालयास समदिशेस मध्यम भागात द्वार प्रशस्त होय१०

योविस्तारोभवेद्यस्यद्विगुणातत्समुन्नतिः ।
उच्छ्रायाद्यस्तृतीयोंशस्तेनतुल्याकटिर्भवेत् ॥११॥
विस्तारार्धंभवेद्गर्भोभित्तयोन्याःसमंततः ।
गर्भपादेनविस्तीर्णंद्वारंद्विगुणमुच्छ्रितं ॥१२॥
उच्छ्रायात्पादविस्तीर्णाशाखातद्वदुदुंबरः ।
विस्तारपादप्रतिमंबाहुल्यंशाखयोःस्मृतं ॥१३॥
त्रिपंचसप्तनवभिःशाखाभिस्तत्प्रशस्यते ।
अधःशाखाचतुर्भागेप्रतीहारौनिवेशयेत् ॥१४॥
शेषंमंगल्यविहगैःश्रीवृक्षस्वस्तिकैर्घटैः ।
मिथुनैःपत्रवल्लीभिःप्रमथैश्चोपशोभयेत् ॥१५॥
द्वारमानाष्टभागोनाप्रतिमास्यात्सपिंडिका ।
द्वौभागौप्रतिमातत्रतृतीयांशश्चपिंडिका ॥१६॥

अर्थ— देवळाचे चौथाऱ्याचे रुदीचे जितके हात असतील, त्याचे दुप्पट हात देवळाची उंची असावी. उंचीचे तृतीयांशाइतकी कटि म० गाभारा किंवा घुमटी इची उंची असावी ॥११॥ रुदीचे अर्धाइतकी गाभाऱ्याची रुंदी (व लांबी) असावी. गाभाऱ्याचे चोंफेर भिंती घालाव्या गाभाऱ्याचे रुदीचे चतुर्थांशाइतकी दाराची रुदी करावी व तिचे दुप्पट दाराची उंची करावी ॥१२॥ दाराचे उंचीचे चतुर्थांशाइतकी बाजवाची रुदी असावी. तसेच उंबरठे करावे. बाजवेचे रुदीचे चतुर्थांशाइतकी बाजवेची जाडी असावी ॥१३॥ ही जाडी३।५।७।९ इत्यादि शाखानी (फळ्यानी) पुरी करावी. बाजूचे खाल्चे चतुर्थांशात प्रतीहार (नद्यादिक) ठेवावे ॥१४॥ शाखेचे बाकीवरील भाग मंगलपक्षी, श्रीवृक्ष, स्वस्तिकघट, मिथुनें, पत्रवल्ली, गण यांणी सुशोभित करावे ॥१५॥ दाराचे उंचीचे अष्टमभागाहून कमी, पिंडीसहित प्रतिमा करावी. त्यात दोन भाग मूर्ति व तिसरा भाग पिंडी करावी ॥१६॥

उदाहरण. १६ हात लांब व १६ हात रुंद देवळाचा चौथारा असेल तेव्हां, त्या देवळाचें शिखर ( कळस ) ३२ हात उंच करावें. ह्म० देवळाची ३२ उंची असावी. तिचा तृतीयांश १० हात १६ आंगळें इतकी कटी ह्म० गाभारा, याची उंची करावी. कांहीं पायऱ्या करून त्यांवर सिंहासन बसवावें. सिंहासनापासून वर गाभाऱ्याची उंची मोजावी. रुंदी हात १६ इचें अर्ध हात ८ इतकी गाभाऱ्याची लांबीरुंदी करावी. त्याचे सभोंवार भिंती घालाव्या. गर्भाचा चतुर्थांश हात २ इतका रुंद दरवाजा करावा. रुंदीचे दुप्पट ह्म० ४ हात उंच करावा. उंचीचा चतुर्थांश ह्म० १ हात इतकी बाजवांची व उंबरठ्यांची रुंदी असावी. १ हात रुंद भिंत घालावी. बाजवेचे रुंदीचा चतुर्थांश ह्म० ८ आंगळें इतकी बाजवेची जाडी करावी. ही जाडी जरूर असेल तशी ३।५।७।९ फळ्यांनीं ( एकाशीं एक जाडी करितां बसवून ) जाडी पुरी करावी. शाखेचे उंचीचा खालचा चतुर्थांश एक हात आहे. त्यांत द्वारपाळ करावे किंवा स्थापावे. वरील ३ हात जाग्यांत, मंगलकारक पक्षी, श्रीवृक्ष ( नारळ इत्यादि ) स्वस्तिकें वगैरे काढिलेले असे घट, स्त्रीपुरुषांचीं चित्रें, पानांच्या पट्टी, त्या त्या देवतेचे पार्षदगण, यांचीं चित्रें काढून ती जागा सुशोभित करावी. द्वाराची उंची ४ हात, त्याचा अष्टमांश १२ आंगळें. तितकी कमी ह्म० साडेतीन हात बैठक व मूर्ति यांची उंची करावी. त्यांत २८ आंगळें बैठक व ५६ आंगळें उंच मूर्ति करावी. पाषाणांनीं बांधावयाचे देवळांचा हा प्रकार होय. उत्तरहिंदुस्थानांत अशाप्रकारचीं देवालयें बहुत आहेत. मुंबईतील ठाकुरद्वारचें राममंदिर हें अशाच प्रकारचें आहे. नाशिकचें राममंदिरही याच प्रकारचें आहे. देवळाचा चौथारा बराच उंच असून त्यावर कांहीं पायऱ्या करून त्यावर सिंहासन व त्यावर, वर सांगितलेल्या प्रमाणाप्रमाणें उंचीची मूर्ति असली ह्म० दरवाज्यासमोर उभी रहाणारी मंडळी फार लांबवर असली तरी सर्वांस मूर्तीचें पूर्णदर्शन होतें.

मेरुमंदरकैलासविमानच्छंदनंदनाः ।
समुद्रपद्मगरुडनंदिवर्धनकुंजराः ॥१७॥
गुहराजोवृषोहंसःसर्वतोभद्रकोघटः ।
सिंहोवृत्तश्चतुष्कोणःषोडशाष्टास्त्रयस्तथा ॥१८॥
इत्येतेविंशतिःप्रोक्ताःप्रासादाःसंज्ञयामया ।
यथोक्तानुक्रमेणैवलक्षणानिवदाम्यतः ॥१९॥

अर्थ--१मेरु २ मंदर ३ कैलास ४ विमानच्छंद ५ नंदन ६ समुद्र ७ पद्म८ गरुड ९ नंदिवर्धन १० कुंजर ॥१७॥ ११ गुहराज १२ वृष १३ हंस १४ सर्व-

तोभद्र १५ घट १६ सिंह १७ वृत्त १८ चतुष्कोण १९ षोडशास्त्रि २० अ ष्टास्त्रि ॥१८॥ हीं २० नावें प्रासादाचीं मी सांगीतलीं. पुढील श्लोकापासून याच नामानुक्रमानें या प्रासादाचीं लक्षणें सांगतों ॥१९॥

तत्रषडस्त्रिमेरुर्द्वादशभौमोविचित्रकुहरश्च ।
द्वारैर्युतश्चतुर्भिर्द्वात्रिंशद्धस्तविस्तीर्णः ॥२०॥

अर्थ—त्या प्रासादामध्यें षट्कोण, बारा मजले, नानाप्रकारच्या खिडक्यानीं युक्त, चार दिशांत चार द्वारांनीं युक्त, ३२ हात रुंद, ६४ हात उंच असा मेरुप्रासाद होय ॥२०॥

त्रिंशद्धस्तायामोदशभौमोमंदरःशिखरयुक्तः ।
कैलासोपिशिखरवानष्टाविंशोष्टभौमश्च ॥२१॥

अर्थ—षट्कोण, ३० हात रुंद, ६० हात उंच, दहा मजल्याचा शिखरयुक्त मंदरसंज्ञक प्रासाद होय. कैलास प्र० ही षट्कोण, शिखरयुक्त २८ हात रुंद ५६ हात उंच, आठ मजल्याचा होय ॥२१॥

जालगवाक्षकयुक्तोविमानसंज्ञस्त्रिसप्तकायामः ।
नंदनइतिषड्भौमोद्वात्रिंशत्षोडशाण्डयुतः ॥२२॥

अर्थ—विमानसंज्ञक प्रासाद जाळीच्या खिडक्यानीं युक्त २१ हात रुंद, ४२ हात उंच, आठ मजल्याचा होय. नंदनसं० सहा मजल्याचा, ३२ हात रुंदी ६४ हात उंच १६ शिखरानीं युक्त असा होय ॥२२॥

वृत्तःसमुद्रनामापद्मःपद्माकृतिःशयानष्टौ ।
शृंगेणैकेनभवेदेकैवचभूमिकातस्य ॥२३॥

अर्थ—समुद्रसं० वर्तुल व पद्मसं० कमलाकृति अष्टकोण, दोनही प्रासाद ८ हात रुंद १६ हात उंच, एकच शिखर व एकच मजला असे दोनही पूर्वोक्त प्रासाद होत २३

गरुडाकृतिश्चगरुडोनंदीतिचषट्चतुष्कविस्तीर्णः ।
कार्यश्चसप्तभौमोविभूषितोंडैश्चविंशत्या ॥२४॥

अर्थ—गरुड व न॥ [illegible] हे दोनही गरुडाकृति होत. त्यांत प्रथमपक्ष पुच्छसहित पु [illegible] ४ हातरुंद ४८ [illegible] सातमजली, २० शिख [illegible] ॥२४॥

कुंजरइतिगजपृष्ठःषोडशहस्तःसमंततोमूलात् ।
गुहराजःषोडशकस्त्रिचंद्रशालाभवेद्वलभी ॥२५॥

अर्थ–कुंजरसं० हस्तिपृष्ठासारखा याचा १६ हात रुंदी ३२ हात उंची होय. गुहराजसं० गुहाकार १६ हात रुंद ३२ हात उंच व दोन्ही प्रासादांची एक भूमि व वलभी तीन शिरोगृहांनीं युक्त असावी ॥२५॥

वृषएकभूमिशृंगोद्वादशहस्तःसमंततोवृत्तः ।
हंसोहंसाकारोघटोष्टहस्तःकलशरूपः ॥२६॥

अर्थ–वृषसं० प्रासाद ( देवालय ) एक मजला व एक शिखर, १२ हात रुंद २४ हात उंच आणि वर्तुळाकार होय. हंससं० हंसाकार एक मजला व एक शिखर ८ हात रुंद १६ हात उंच होय. घटसं० कलशासारखा ८ हात रुंद व १६ हात उंच, एक मजला व एक शिखर होय ॥२६॥

द्वारैर्युतश्चतुर्भिर्बहुशिखरोभवतिसर्वतोभद्रः ।
बहुरुचिरचंद्रशालःषड्विंशःपंचभौमश्च ॥२७॥

अर्थ–सर्वतोभद्रसं० चार दिशांस चार द्वारांनीं युक्त, बहुत शिखरांनीं युक्त, बहुत सुंदर शिरोगृहांनीं युक्त, २६ हात रुंद ५२ हात उंच पांच मजली, चतुरस्र होय ॥२७॥

सिंहःसिंहाक्रांतोद्वादशकोणोष्टहस्तविस्तीर्णः ।
चत्वारोंजनरूपाःपंचांडयुतस्तुचतुरस्रः ॥२८॥

अर्थ–सिंहसं० सिंहासारखा द्वादशकोण, ८ हातरुंद, १६ हातउंच, एकमजली करावा. वृत्त, चतुष्कोण, षोडशकोण, अष्टकोण, हे चारही नामासारखेच (वर्तुळ, चतुष्कोणइ० ), अधारयुक्त, एकशिखर होत. त्यांत चतुष्कोण मात्र पांच शिखरांनीं युक्त असावा बाकी तीन एक शिखर होत ( या चार प्रासादांसभोंवत्या भिंती घालून आच्छादन करून एक द्वार ठेवावें ) ॥२८॥

भूमिकांगुलमानेनमयस्याष्टोत्तरंशतं ।
सार्धहस्तत्रयंचैवकथितंविश्वकर्मणा ॥२९॥
प्राहुःस्थपतयश्चात्रमतमेकंविपश्चितः ।
कपोतपालिसंयुक्तान्यूनागच्छंतितुल्यतां ॥३०॥

अर्थ–मयनामकाच्यामतें १०८ अंगुलें भूमिका ( सव उची ) होय विश्वक र्म्यांनें साडेतीन हात भूमिका सांगीतली॥२९॥विद्वान् शिल्पशास्त्रज्ञ जे ते या दो न मताचें ऐक्य करितात तें असें कीं, कमीमान कपोतपालिकेनें युक्त केलें असता बरोबर होतें ॥३०॥

प्रासादलक्षणमिदंकथितंसमासाद्गर्गेणयद्विरचितंत
दिहास्तिसर्वं । मन्वादिभिर्विरचितानिपृथूनियानि
तत्संस्पृशन्प्रतिमयात्रकृतोधिकारः ॥३१॥

अर्थ–हें प्रासादलक्षण जें मी यात सांगीतलें तें गर्गानें केलेलें प्रासादलक्षण सर्व आहे मन्वादिकानीं केलेलीं विस्तृत जीं प्रासादलक्षणें ता पाहून मी येथें हा अधि कार केला ॥३१॥

इतिबृहत्संहितायांप्रासादलक्षणंनामषट्पंचाशोध्यायः५६

## ॥ अथवज्रलेपः ॥

आमंतिंदुकमामंकपित्थकंपुष्पमपिचशाल्मल्याः ।
बीजानिशल्लकीनांधन्वनवल्कोवचाचेति ॥१॥
एतैःसलिलद्रोणःक्वाथयितव्योष्टभागशेषश्च ।
अवतार्योस्यचकल्कोद्रव्यैरेतैःसमनुयोज्यः ॥२॥
श्रीवासकरसगुग्गुलुभल्लातककुंदुरूकसर्जरसैः ।
अतसीबिल्वैश्चयुतःकल्कोयंवज्रलेपाख्यः ॥३॥

अर्थ–अपक्व टेंभुरणीचें फळ, अपक्व कवठीचें फळ, सावरीचें पुष्प, साळईवृक्षाचें बीं, धामणीची साल, वेखंड, हीं द्रोण (२५६ पळें म्ह० ८५३$\frac{1}{3}$तोळे) परिमित उदकामध्यें घालून काढाकरून अष्टांश शेष ठेऊन उतरावा नंतर श्रीवासक ( कुरडू ) वृक्षाचा चीक, बोळ, गुग्गुल, बिब्बा, कवड्याऊद किंवा देवदारूचा चीक, सालवृक्षाचा चीक ( राळ ) जवस, बेलफळ, याहीं युक्त तो काढा करावा म्हणजे हा वज्रलेपनामक, लेप होतो ॥१॥२॥३॥

प्रासादहर्म्यवलभीलिंगप्रतिमासुकुड्यकूपेषु ।
सतप्तोदातव्योवर्षसहस्रायुतस्थायी ॥४॥

अर्थ—देवालय, गृह, गवाक्ष, शिवलिंग, देवप्रतिमा, भिंति, कूप ( विहीर तलाव इत्यादि जलाधार ) यांचाठाईं हा पूर्वोक्त वज्रलेप तापवून द्यावा ( लावावा ); म्हणजे तो दहाहजार वर्षेपर्यंतही तसाच रहातो ( सुटत नाहीं ) ॥४॥

**लाक्षाकुंदुरुगुग्गुलुगृहधूमकपित्थबिल्वमध्यानि ।**
**नागवलाफलतिंदुकमदनफलमधूकमंजिष्ठाः ॥५॥**
**सर्जरससरसामलकानिचेतिकल्कःकृतोद्वितीयोयं ।**
**वज्राख्यःप्रथमगुणैरयमपितेष्वेवकार्येषु ॥६॥**

अर्थ—लाख, देवदारूचा चीक, गुग्गुल, गृहधूम ( घरांतील धूर ), कंवठीचें फळ, बेलफळांतील गल्क, लहान चिकण्याचें फळ, टेंभुरणीचें फळ, धोत्र्याचेंफळ, मोहाचेंफळ, मंजिष्ठा, सालवृक्षाचा चीक ( राळ ) बोळ, आंवळकाठी, याचा काढा पूर्ववत् करून अष्टभाग शेष घ्यावा. आणि तापवून लावावा. हा दुसरा वज्रलेप, पूर्वोक्त गुणांनीं युक्त, पूर्वोक्त प्रासादादिकीं द्यावा ॥५॥६॥

**गोमहिषाजविषाणैःखररोम्णामहिषचर्मगव्यैश्च ।**
**निंबकपित्थरसैःसहवज्रतरोनामकल्कोन्यः ॥७॥**

अर्थ—गाय, हैस, मेंढा यांचीं शिंगें; गाढवाचे केंस, महिष व गाय यांचें चर्म, निंब, कंवठ यांचीं फळें, बोळ, यांचा काढा पूर्ववत् करावा. म्हणजे हा वज्रतर लेपसंज्ञक दुसरा काढा, पूर्वीप्रमाणें लावावा ॥७॥

**अष्टौसीसकभागाःकांसस्यद्वौतुरीतिकाभागः ।**
**मयकथितोयोगोयंविज्ञेयोवज्रसंघातः ॥८॥**

अर्थ—आठभाग शिसें, दोनभाग कांसें, पितळ किंवा जस्ताचें फूल किंवा लोखंडाचें कीट, एक भाग, याचे मिश्रण करावे हा, वज्रसंघात, मयनामक शिल्पज्ञानें सांगितलेला आहे. हा पूर्वीसारखा देवालयादिकांस लावावा म्हणजे पूर्वीप्रमाणें रहातो ॥८॥

**इतिबृहत्संहितायांवज्रलेपोनामसप्तपंचाशोऽध्यायः ॥**

## ॥ अथप्रतिमालक्षणं ॥

जालांतरगेभानौयदणुतरंदर्शनंरजोयाति ।
तद्विंद्यात्परमाणुंप्रथमंतद्धिप्रमाणानां ॥१॥

अर्थ–सूर्यकिरण खिडकींत पडले असतां, त्यांत जें सूक्ष्मरज दृष्टिगोचर होतें, तो परमाणु होय हा सर्व प्रमाणांत प्रथम होय ॥१॥

परमाणुरजोवालाग्रलिक्षयूकायवोंगुलंचेति ।
अष्टगुणानियथोत्तरमंगुलमेकंभवतिमात्रा ॥२॥

अर्थ–परमाणु, रज, वालाग्र, लिक्षा, यूका, यव, अंगुल हीं पहिल्यापासून अष्टगुणित केलीं ह्मणजे पुढील अंगुलसंख्या होते (८ परमाणु ह्म० १ रज ८ रज–१ वालाग्र ८ वालाग्र = १ लिक्षा ८ लिक्षा = १ यूका ८ यूका = १ यव ८ यव – १ अंगुल) ॥२॥

देवागारद्वारस्याष्टांशोनस्ययस्तृतीयोंशः ।
तत्पिंडिकाप्रमाणंप्रतिमातद्विगुणपरिमाणा ॥३॥

अर्थ–देवालयाच्या द्वाराची जो उंची तींत तिचा अष्टमांश कमी करून शेषांकाचा जो तृतीयांश तें पिंडिकेचें (बैठकीचें) प्रमाण होय त्याच्या दुप्पट प्रतिमेचें प्रमाण जाणावें ॥३॥

स्वैरंगुलप्रमाणैर्द्वादशविस्तीर्णमायतंचमुखं ।
नग्नजितातुचतुर्दशदैर्घ्येणद्राविडंकथितं ॥४॥

अर्थ–(पीठाची उंची सोडून फक्त मूर्तीचीच उंची घेऊन तिचा १२ अंश घ्यावा नंतर त्या द्वादशांशाचा नवमांश काढावा जो नवमांश येईल तें या कार्यासंबंधी अंगुल समजावें या अंगुलाचे मानानें मूर्तीचें १०८ आंगळें प्रमाण पुढें सांगितलें आहे उदाहरण. ९६ आंगळें मूर्ति करावयाची आहे त्याचा १२ अंश $8\frac{2}{3}$, त्याचा ९ अंश ह्म० अर्धें आंगुळ व किंचित् अधिक येतें तितकें या कामासंबंधी आंगुळ समजावें) या आंगळांनीं १२ आं० लांब न १२ आं० रुंद प्रतिमेचें मुख करावें नग्नजितानें १४ आं० प्रमाण सांगितलें तें द्रविडदेशाचें मान होय ॥४॥

नासाललाटचिबुकग्रीवाश्चतुरंगुलास्तथाकर्णौ ।
द्वेअंगुलेचहनुकेचिबुकंतुद्वयंगुलंविस्तृतं ॥५॥

अर्थ—नासिका, ललाट, चिबुक ( अधरोष्ठाचे खालचा भाग ), मान, कर्ण, हे अवयव चार चार अंगुलें असावे. २ हनु व चिबुक हे भाग २ अंगुलें विस्तृत असावे. हनु ह्म० मुख व गल्ल यांची संधि व चिबुक ह्म० मुखाचा अधोभाग ॥५॥

अष्टांगुलंललाटंविस्तारात्द्वयंगुलात्परेशंखौ ।
चतुरंगुलौतुशंखौकर्णौतुद्वयंगुलंपृथुलौ ॥६॥

अर्थ—ललाटाचा विस्तार आठ अंगुलें करावा. ह्या ललाटाच्या दोन बाजूंस दोन अंगुलापुढे शंख करावे; ते खालीं चार अंगुलें दीर्घ करावे. कर्ण दोन अंगुलें पृथुल ( विस्तीर्ण ) करावे ॥६॥

कर्णोपांतःकार्योर्धपंचमेभ्रूसमेनसूत्रेण ।
कर्णश्रोतःसुकुमारकंचनयनप्रबंधसमं ॥७॥

अर्थ—नेत्रांचे टोकापासून साडेचार आंगळावर कान करावा व त्याचा वरील भाग भवई इतका उंच करावा. कर्णच्छिद्र व सुकुमारक ( छिद्रसमीपचा उंच भाग ) हे भाग नेत्रप्रबंध ( नेत्र अलस्थान ) याचे तुल्य ( १ अंगुल ) करावे ॥७॥

चतुरंगुलंवसिष्ठःकथयतिनेत्रांतकर्णयोर्विवरं ।
अधरोंगुलप्रमाणस्तस्यार्धेनोत्तरोष्ठश्च ॥८॥

अर्थ—नेत्रांत व कर्ण यांचा मध्यभाग चार अंगुलें असावा असें वसिष्ठऋषि ह्मणतात. अधरोष्ठ १ अंगुल व वरचा ओष्ठ त्याचे निमें ( अर्धे अंगुल ) करावा ॥८॥

अर्धांगुलातुगोच्छावक्त्रंचतुरंगुलायतंकार्यं ।
विपुलंतुसार्धमंगुलंमध्यात्त्र्यंगुलंव्यात्तं ॥९॥

अर्थ—गोच्छा ( मिशी ) अर्धे अंगुल विस्तीर्ण करावी. मुख चार अंगुलें विस्तीर्ण व दीड अंगुळ रुंद करावें. मुख हसित करणें असल्यास, मध्यापासून ३ आंगळें व्यात्त ह्म० विस्तृत करावें ॥९॥

द्वयंगुलतुल्यौनासापुटौचनासापुटाग्रतोज्ञेया ।
स्यात्द्वयंगुलमुच्छ्रायश्चतुरंगुलमंतरंचाक्ष्णोः ॥१०॥

अर्थ–नासिकेचीं पुटे दोन अगुलें व नासापुटाग्रेंही दोनच अगुलें आणि नासिकेची उचीही दोन अगुलें करावी. दोन डोळ्यांचें अतर चार अगुलें करावें १०

द्व्यंगुलमितोऽक्षिकोशोद्वेनेत्रेतत्रिभागिकातारा ।
दृक्तारापंचांशोनेत्रविकाशोंगुलंभवति ॥११॥

अर्थ–नेत्राची पापणी ( नेत्राच्छादन ) दोन अगुलें, नेत्र दोन अगुलें, त्याच्या तृतीयाशानें तारा ( बुबुळ ), दोन अगुलाचा पचमाश नेत्रविकाश, ( नेत्र विस्तृति ) १ अगुल करावी ॥११॥

पर्यंतात्पर्यंतंदशभ्रुवोर्धांगुलंभ्रुवोर्लेखा ।
भ्रूमध्यंद्व्यंगुलकंभ्रूर्दैर्घ्येणांगुलचतुष्कं ॥१२॥

अर्थ–भिंवईच्या शेवटापासून दुसऱ्या भिंवईचा शेवट १० अगुलें, भ्रुकुटीची रेषा अर्धांगुल विस्तृत, भ्रूमध्यभाग २ अगुलें, एक एक भ्रुकुटी चार चार अगुलें लांब करावी ॥१२॥

कार्यातुकेशरेखाभ्रूवंधसमांगुलार्धविस्तीर्णा ।
नेत्रांतेकरवीरकमुपन्यसेदंगुलप्रतिमं ॥१३॥

अर्थ–ललाटावर केशरेषा भ्रूबधतुल्य ( १० अगुलें ) दीर्घ व अर्धांगुल विस्तीर्ण करावी नेत्राच्या शेवटास १ अगुल प्रमाण करवीरपत्रक ( मूषिका इतिप्रसिध ) करावें ॥१३॥

द्वात्रिंशत्परिणाहाच्चतुर्दशायामतोंगुलानिशिरः ।
द्वादशतुचित्रकर्मणिदृश्यंतेविंशतिरदृश्याः ॥१४॥

अर्थ–मस्तकाचा वर्तुळ घेर ३२ अगुलें व विस्तार १४ अगुलें करावा त्यातून चित्रकर्मामध्यें १२ अगुलें दिसतात व २० दिसत नाहीत ॥१४॥

आस्यंसकेशनिचयंषोडशदैर्घ्येणनग्नजित्प्रोक्तं ।
ग्रीवादशविस्तीर्णापरिणाहाद्विंशतिःसैका ॥१५॥

अर्थ–केशसमूहसहित मुखाची लाबी १६ अगुलें ( १४ अगुलें मुख व केशसमूह २ अगुलें ) नग्नजित् शिल्पज्ञानें सांगितलें ग्रीवा ( मान ) १० अगुलें विस्तीर्ण व घेर २१ अगुलें करावा ॥१५॥

कंठाद्द्वादशहृदयंहृदयान्नाभिश्चतत्प्रमाणेन ।

नाभीमध्यान्मेढ्रांतरंचतत्तुल्यमेवोक्तं ॥१६॥

अर्थ—कंठापासून १२ अंगुळें हृदय व हृदयापासून नाभि १२ अंगुळें व नाभिमध्यापासून मेढ्र (शिश्न) मध्यभाग १२ अगुळेंच सांगितला आहे ॥१६॥

ऊरूचांगुलमानैश्चतुर्युताविंशतिस्तथाजंघे ।
जानुकपिच्छेचतुरंगुलेचपादौचतत्तुल्यौ ॥१७॥

अर्थ—मांड्या २४ अंगुळें व पोटऱ्याही २४ अंगुळे दीर्घ कराव्या. गुडघे ४ अंगुळें व पादही ४ अंगुळें दीर्घ करावे ॥१७॥

द्वादशदीर्घौषट्पृथुतयाचपादौत्रिकायतांगुष्ठौ ।
पंचांगुलपरिणाहौप्रदेशिनीत्र्यंगुलंदीर्घा ॥१८॥

अर्थ—पाय खोटापासून अगुष्ठपर्यंत १२ अगुळें लांब व ६ अगुळें रुंद करावे. आगठे ३ अंगुळें दीर्घ व ५ अगुळें घेर करावा. प्रदेशिनी (आगठ्याजवळची) तीन अंगुळें दीर्घ करावी ॥१८॥

अष्टांशाष्टांशोनाःशेषांगुलयःक्रमेणकर्तव्याः ।
सचतुर्थभागमंगुलमुत्सेधोंगुष्ठकस्योक्तः ॥१९॥

अर्थ—शेष तीन अंगुलि प्रदेशिनीपेक्षा अष्टांश कमी अनुक्रमानें कराव्या. ह्म० प्रदेशिनीपेक्षां मध्यमा, मध्यमेहून अनामिका, अनामिकेहून कनिष्ठिका ह्या अष्टांश कमी कराव्या. सव्वाअगुल अंगुष्ठाची उंची सांगितली ॥१९॥

अंगुष्ठनखःकथितश्चतुर्थभागोनमंगुलंतज्ज्ञैः ।
शेषनखानामर्धांगुलंक्रमात्किंचिदूनंवा ॥२०॥

अर्थ—अंगुष्ठाचें नख, पाऊण अगुल प्रतिमालक्षणज्ञांनीं सांगीतलें. शेष सर्व अंगुलींचीं नखें अर्धांगुल अथवा अनुक्रमानें कांहीं कमी अशीं ह्म० ज्याप्रकारें सुदर दिसतील तशीं करावीं ॥२०॥

जंघाग्रेपरिणाहश्चतुर्दशोक्तस्तुविस्तरःपंच ।
मध्येतुसप्तविपुलापरिणाहात्रिगुणिताःसप्त ॥२१॥

अर्थ—पोटऱ्यांच्या अंतीं १४ अंगुळें घेर, पांच अगुळें विस्तार करावा. पो० मध्य भागीं ७ अं० विस्तार व २१ अं० घेर करावा ॥२१॥

अष्टौतुजानुमध्येवैपुल्यंत्र्यष्टकंतुपरिणाहः ।
विपुलौचतुर्दशोरूमध्येद्विगुणश्चतत्परिधिः ॥२२॥

अर्थ—गुडघ्याच्या मध्यभागीं ८ अ० स्थूल ( विस्तीर्ण ) व २४ अ० परिणाह ( घेर ) करावा. मांड्या मध्यभागीं १४ अ० विस्तीर्ण व २८ अ० परिधि ( घेर ) करावा ॥२२॥

कटिरष्टादशविपुलाचत्वारिंशच्चतुर्युतापरिधौ ।
अंगुलमेकंनाभिर्वेधेनतथाप्रमाणेन ॥२३॥

अर्थ—कमर १८ अ० विस्तीर्ण व ४४ अ० घेर करावी. नाभि खोल १ अ० व विस्तीर्ण एक अंगुल करावी ॥२३॥

चत्वारिंशत्द्वियुतानाभीमध्येनमध्यपरिणाहः ।
स्तनयोःषोडशचांतरमूर्ध्वंकक्षेषडंगुलिके ॥२४॥

अर्थ—नाभीचा मध्य घेर ४२ अंगुलें करावा स्तनाचें अंतर ( मध्यभाग) १६ अ० करावें स्तनाच्या वर ६ अ० तिर्कस काखा कराव्या ॥२४॥

कार्यावष्टावंसौद्वादशबाहूतथाप्रबाहूच ।
बाहूषड्विस्तीर्णौप्रतिबाहूत्वंगुलचतुष्कं ॥२५॥

अर्थ—स्कंध ८ अंगुलें दीर्घ मानेच्या बाजूपासून करावें १२ अ० बाहु व प्रबाहूही १२ अ० दीर्घ करावे. बाहु ६ अ० व प्रबाहू ४ अ० विस्तीर्ण करावे ॥२५॥

षोडशबाहूमूलेपरिणाहाद्द्वादशाग्रहस्तेच ।
विस्तारेणकरतलंषडंगुलंसप्तदैर्घ्येण ॥२६॥

अर्थ—बाहूच्या मूलप्रदेशा १६ अ० घेर व हस्ताग्रीं १२ अ० घेर करावा हस्ततळाची रुंदी ६ अ० व ७ अंगुलें लांबी करावी ॥२६॥

पंचांगुलानिमध्याप्रदेशिनीमध्यपर्वदलहीना ।
अनयातुल्याचानामिकाकनिष्ठातुपर्वोना ॥२७॥

अर्थ—मध्यांगुली ५ अ० दीर्घ करावी प्रदेशिनी मध्यांगुलिपर्वार्धानें कमी करावी प्रदेशिनी इतकीच अनामिका व कनिष्ठिका अनामिकेच्या पर्वाच्या ( पेराच्या ) अर्धानें कमी करावी ॥२७॥

**पर्वद्वयमंगुष्ठःशेषांगुल्यस्त्रिभिस्त्रिभिःकार्याः ।**
**नखपरिमाणंकार्यंसर्वासांपर्वणोर्धेन ॥२८॥**

अर्थ–दोन पेराचा अंगुष्ठ करावा शेष सर्व अंगुलीं तीन ३ पेरें करावीं सर्व अं गुलींचीं नखें त्या त्या अंगुलीच्या पर्वार्धानें करावीं ॥२८॥

**देशानुरूपभूषणवेषालंकारमूर्तिभिःकार्या ।**
**प्रतिमालक्षणयुक्तासंनिहितावृद्धिदाभवति ॥२९॥**

अर्थ–देशाचाराप्रमाणे भूषण, वेष, अलंकार, याहींकरून लक्षणयुक्त प्रतिमा करावी ती संनिहित असता, वृद्धि करणारी होत्ये ॥२९॥

**दशरथतनयोवलिश्चवैरोचनिःशतंविंशं ।**
**द्वादशहान्याःशेषाःप्रवरसमन्यूनपरिमाणाः ॥३०॥**

अर्थ–दशरथाचा पुत्र राम व विरोचनाचा पुत्र बलि हे १२० अंगुलें करावे शेष सर्व देवाच्या मूर्ति, १२० त १२ अंगुलें कमी, ह्म० १०८ अंगुलें कराव्या त्या श्रेष्ठ होत. ९६ अं० मध्यम, ८४ अं० कनिष्ठ होत ॥३०॥

**कार्योष्टभुजोभगवांश्चतुर्भुजोद्विभुजएववाविष्णुः ।**
**श्रीवत्सांकितवक्षाःकौस्तुभमणिभूषितोरस्कः ॥३१॥**
**अतसीकुसुमश्यामःपीतांबरनिवसनःप्रसन्नमुखः ।**
**कुंडलकिरीटधारीपीनगलोरःस्थलांसभुजः ॥३२॥**
**शंखगदाशरपाणिर्दक्षिणतःशांतिदश्चतुर्थकरः ।**
**वामकरेषुचकार्मुकखेटकचक्राणिशंखश्च ॥३३॥**
**अथचचतुर्भुजमिच्छतिशांतिदएकोगदाधरश्चान्यः ।**
**दक्षिणपार्श्वेह्येवंवामेशंखश्चचक्रंच ॥३४॥**
**द्विभुजस्यतुशांतिकरोदक्षिणहस्तोपरश्चशंखधरः ।**
**एवंविष्णोःप्रतिमाकर्तव्याभूतिमिच्छद्भिः ॥३५॥**

अर्थ–भगवान् विष्णु, अष्टभुज किंवा चतुर्भुज अथवा द्विभुज करावा श्रीवत्सानें (केशाच्या भोंवऱ्यानें) चिन्हित वक्षस्थल, कौस्तुभमण्यानें भूषित उर, अतसी (जवस) पुष्पासारखा श्यामवर्ण, पीतांबरनेसयुक्त, प्रसन्नमुख, कानांत कुंडलें व मस्तकावर

मुकुट याते धारण करणारा, गळा, उर स्थल, खांद, बाहु हे ४ पुष्ट, उजव्या ह-स्तात शख, गदा, बाण, ही आयुधे व चवथा खालचा हस्त शांतिद (प्रश्नकर्त्या-च्या सन्मुख ऊर्ध्वांगुलि) असे व डाव्या हस्तांत धनुष्य, ढाल, चक्र, शख, ही आयुधे अष्टभुजास करावीं ॥३१।३२।३३॥ चतुर्भुज करण्यास इच्छील तर उज वा एक शांतिद व दुसरा गदाधर, डावा शख व चक्र यांतें धारण करणारा, असे चार हात असावे ॥३४॥ द्विभुजविष्णूचे हस्त उजवा शांतिद, डावा शखधर असे करावे. याप्रकारें विष्णूच्या प्रतिमा ऐश्वर्य इच्छिणाऱ्यांनीं कराव्या ॥३५॥

वलदेवोहलपाणिर्मदविभ्रमलोचनश्चकर्तव्यः ।
विभ्रत्कुंडलमेकंशंखेंदुमृणालगौरवपुः ॥३६॥

अर्थ—नांगर हातात, मदानें चचल लोचन, एक कुंडल कानांत धारण करणारा व शख, चद्र, कमलतंतु यासारख्या गौरशरीराचा असा बळराम करावा ॥३६॥

एकानंशाकार्यादेवीवलदेवकृष्णयोर्मध्ये ।
कटिसंस्थितवामकरासरोजमितरेणचोद्वहती ॥३७॥
कार्याचतुर्भुजायावामकराभ्यांसपुस्तकंकमलं ।
द्वाभ्यांदक्षिणपार्श्वेवरमर्थिष्वक्षसूत्रंच ॥३८॥
वामेष्वष्टभुजायाःकमंडलुश्चापमंबुजंशास्त्रं ॥
वरशरदर्पणयुक्ताःसव्यभुजाःसाक्षसूत्राश्च ॥३९॥

अर्थ—एकानशा (नावाची) देवी बलदेव व कृष्ण यांचे मध्यें कटीवर डावा हात व उजव्या हस्तात कमल धारण करणारी, अशी द्विभुजा करावी ॥३७॥ चतुर्भुजा केली तर डाव्या २ हातात पुस्तक व कमल, उजव्या २ हातात याचकास वर देणें व रुद्राक्षमाला हीं असावीं ॥३८॥ अष्टभुजा केली तर डाव्या ४ हाता-त कमंडलु, धनुष्य, कमल, पुस्तक हीं आयुधें व उजव्या ४ हातांत वर, बाण, आरसा, रुद्राक्षमाला हीं असावीं ॥३९॥

सांवश्चगदाहस्तःप्रद्युम्नश्चापभृत्सुरूपश्च ।
अनयोःस्त्रियौचकार्येखेटकनिस्त्रिंशधारिण्यौ ॥४०॥

अर्थ—कृष्णपुत्र, सांब याच्या हातात गदा व प्रद्युम्न सुंदरस्प व हातात धनुष्य, असे करावे. या दोघांच्या स्त्रिया ढाल व तरवार धारण करणाऱ्या अशा दोन कराव्या ॥४०॥

ब्रह्माकमंडलुकरश्चतुर्मुखःपंकजासनस्थश्च ।
स्कंदःकुमाररूपःशक्तिधरोबर्हिकेतुश्च ॥४१॥

अर्थ–हातांत कमंडलु, चार मुखें, कमलावर बसलेला असा ब्रह्मा करावा. कुमार ( पांचवर्षांच्या आंत मुलगा ) याचेरूपाचा, शक्ति ( सैती, भली ) धरणारा, मयूरध्वज असा स्कंद ( कार्तिकस्वामी ) करावा ॥४१॥

शुक्लश्चतुर्विषाणोद्विपोमहेंद्रस्यवज्रपाणित्वं ।
तिर्यग्ललाटसंस्थंतृतीयमपिलोचनंचिन्हं ॥४२॥

अर्थ–शुभ्र व चारदंतांचा इंद्राचा हत्ती, त्यावर हातांत वज्र ( आयुधवि० ) व तिरकस ललाटावर तिसरें नयन हेंही चिन्ह, असा इंद्र करावा ॥४२॥

शंभोःशिरसींदुकलावृषध्वजोक्षिचतृतीयमप्यूर्ध्वं ।
शूलंधनुःपिनाकंवामार्धेवागिरिसुतार्धं ॥४३॥

अर्थ–शिवाच्या मस्तकीं चंद्राची कला, वृषभध्वज, वर तिसरा नेत्र, एका हातांत शूल व दुसऱ्यांत पिनाक सं० धनुष्य असा शिव करावा. अथवा डाव्या अर्ध्याभागीं पार्वतीचें अर्धांग करावें ह्म० अर्धगौरीश्वर होतो ॥४३॥

पद्मांकितकरचरणःप्रसन्नमूर्तिःसुनीचकेशश्च ।
पद्मासनोपविष्टःपितेवजगतोभवेद्बुद्धः ॥४४॥

अर्थ–कमलचिन्हित हात व चरण, शांतस्वरूप, फार आखूड केश, कमलासनावर बसलेला, सर्व जगतास पित्यासारखा असा बुध ( बौद्ध ) करावा ॥४४॥

आजानुलंबबाहुःश्रीवत्सांकःप्रशांतमूर्तिश्च ।
दिग्वासास्तरुणोरूपवांश्चकार्योर्हतांदेवः ॥४५॥

अर्थ–गुडघ्यांपर्यंत लांब हात, श्रीवत्सचिन्हित, शांतमूर्ति ( जितेंद्रिय, हास्यवदन), नग्न, तरुण वयस्क, सुंदररूप, असा अर्हताचा ह्म० जैनांचा देव ( जैन ) करावा ॥४५॥

नासाललाटजंघोरुगंडवक्षांसिचोन्नतानिरवेः ।
कुर्यादुदीच्यवेषंगूढंपादादुरोयावत् ॥४६॥
बिभ्राणःस्वकररुहेपाणिभ्यांपंकजेमुकुटधारी ।

कुंडलभूषितवदनःप्रलंबहारोवियद्गवृतः ॥४७॥
कमलोदरद्युतिमुखःकंचुकगुप्तःस्मितप्रसन्नमुखः ।
रत्नोज्ज्वलप्रभामंडलश्चकर्तुःशुभकरोर्कः॥४८॥

अर्थ–नासिका, ललाट, पोठऱ्या, माड्या, गाल, ऊर, हे सूर्याचे उच्च करावे. उदीच्य ( उत्तरदिशेकडील पुरुषाच्या वेषासारखा वेष ), पायापासून उरापर्यंत गुप्त ( चोलकधारी ), आपल्यानखात बाहू हीं २ कमले धारण करणारा, मस्त कीं मुकुट धारक, कुंडलानीं शोभित मुख, गळ्यांत लांब हार, वियद्ग ( सारसप क्षी ) यानीं वेष्टित ॥४६॥४७॥ कमलाच्या गाभ्यासारख्या कांतीने युक्त मुख, कंचुक ( आंगरखा ) याणें गुप्तशरीर, हास्ययुक्त व प्रसन्नमुख, रत्नासारखी लखलखीत कांतिसमूहानें युक्त, असा सूर्य, कर्त्यास शुभकारक होतो ॥४८॥

सौम्यातुहस्तमात्रावसुदाहस्तद्वयोच्छ्रिताप्रतिमा ।
क्षेमसुभिक्षायभवेत्रिचतुर्हस्तप्रमाणाया ॥४९॥
नृपभयमत्यंगायांहीनांगायामकल्पताकर्तुः ।
शातोदर्याक्षुद्भयमर्थविनाशःकृशायांच ॥५०॥
मरणंतुसक्षतायांशस्त्रनिपातेननिर्दिशेत्कर्तुः ।
वामावनतापत्नींदक्षिणविनताहिनस्त्यायुः ॥५१॥
अंधत्वमूर्ध्वदृष्ट्याकरोतिचिंतामधोमुखीदृष्टिः ।
सर्वप्रतिमास्वेवंशुभाशुभंभास्करोक्तसमं ॥५२॥

अर्थ–१ हस्तप्रमाण दीर्घ प्रतिमा शुभ, २ हात उच्च प्र० द्रव्य देणारी, ३ ह स्तप्रमाण उच्च प्रतिमा कल्याण करणारी होते व ४ हात उच्च प्रतिमा सुभिक्ष कारक होसे ॥४९॥ प्रतिमा अतिस्थूल असेल तर राजभय, कमी अवयवाची असे० कर्त्यास अशुभकारक, कृशउदर असे० दुर्भिक्षभय, कृश असे० द्रव्य नाश ॥५०॥ व्रण ( खळगे ) युक्त असे० शस्त्रपातानें कर्त्यास मरण सांगावें. डा व्या आंगास नम्र असे० कर्त्याच्या स्त्रीचा नाश, उजव्या आंगास नम्र असे० कर्त्याचा आयुष्यनाश ॥५१॥ ऊर्ध्वदृष्टि असे० कर्त्यास अंधत्व, अधोमुखदृष्टि ( खालीं पहाणें ) असे० क० चिंता होते, याप्रकारें सर्व प्रतिमांचे शुभाशुभ फल सूर्यप्रतिमेस सांगितल्यासारखें जाणावें ॥५२॥

लिंगस्यवृत्तपरिधिंदैर्घ्येणासूत्र्यतत्रिधाविभजेत् ।

**मूलेतच्चतुरस्त्रंमध्येत्वष्टास्त्रिवृत्तमथः ॥५३॥**
**चतुरस्त्रमवनिखातमध्यंकार्यंतुपिंडिकाश्वभ्रे ।**
**दृश्योच्छ्रायेणसमासमंततःपिंडिकाश्वभ्रात् ॥५४॥**

अर्थ–लिंगाच्या वृत्ताचा घेर मोजून तितकी लांबी करावी. या लांबीचे तीन भाग करावे. त्यांतील पहिला चतुरस्त्र, मध्ये अष्टकोण, तिसरा वर्तुळ करून, पहिला चतुरस्त्र भूमींत, मध्य अष्टास्त्रि पिंडिकेंत ( बैठकींत) बसवावा. तिसरा वर्तुळभाग चहूंकडून उंचीनें सारखा दृश्य असा करावा; जितका लिंगाचा दृश्यभाग त्याचे उंचीइतकी श्वभ्रा ( खळगा) पासून समंततः (सभोवती) पिंडिका असावी ५३।५४

**कृशदीर्घंदेशघ्नंपार्श्वविहीनंपुरस्यनाशाय ।**
**यस्यक्षतंभवेन्मस्तकेविनाशायतल्लिंगं ॥५५॥**

अर्थ–लिंग, कृश किंवा दीर्घ ( महान् ) होईल तर देशनाश, जें पार्श्वभागीं हीन तें नगराचा नाश करितें. ज्या लिंगाच्या मस्तकीं क्षत ( खळगा ) तें कर्त्याचा नाश करितें ॥५५॥

**मातृगणःकर्तव्यःस्वनामदेवानुरूपकृतचिन्हः ।**
**रेवंतोश्वारूढोमृगयाक्रीडादिपरिवारः ॥५६॥**

अर्थ–मातृसमूह, आपल्या नावाच्या देवासारख्या चिन्हांचा करावा. रेवंत (पांचवा मनु ), अश्वारूढ मृगयाक्रीडादि परिवार युक्त करावा ॥५६॥

**दंडीयमोमहिषगोहंसारूढश्चपाशभृद्वरुणः ।**
**नरवाहनःकुबेरोवामकिरीटीबृहत्कुक्षिः ॥५७॥**

अर्थ–यम, दंड, हस्त व महिषारूढ (रेड्यावर बसलेला) असा करावा. वरुण, हंसावर बसलेला व पाश हातांत असा करावा. कुबेर, मनुष्यावर बसलेला व वाम (डाव्या) भागीं मुकुट व विस्तीर्ण कुक्षि असा करावा.(कोठें खरवाहनः कुबेरो असा पाठ आहे)५७

**( प्रमथाधिपोगजमुखःप्रलंबजठरःकुठारधारीस्यात् ।**
**एकविषाणोविभ्रन्मूलककंदंसुनीलदलकंदं ॥५८॥ )**

अर्थ–गणपति, हत्तीच्या मुखाचा, लांब पोट, कुऱ्हाड धारण करणारा, एकदंत, मूलककंद व सुनीलदलकंद यातें धारण करणारा असा करावा ॥५८॥

**इतिबृहत्संहितायांप्रतिमालक्षणंनामाष्टपंचाशोध्यायः ५८**

## ॥ अथवनसंप्रवेशः ॥

कर्तुरनुकूलदिवसेदैवज्ञविशोधितेशुभनिमित्ते ।
मंगलशकुनैःप्रास्थानिकैश्चवनसंप्रवेशःस्यात् ॥१॥

अर्थ—प्रतिमा कर्त्यास अनुकूल दिवशीं, दैवज्ञानें विशोधित शुभनिमित्तीं, प्रयाणस बधी शुभशकुनानीं वनांत ( बहुत वृक्षदेशीं ) प्रवेश करावा ॥१॥

पितृवनमार्गसुरालयवल्मीकोद्यानतापसाश्रमजाः ।
चैत्यसरित्संगमसंभवाश्चघटतोयसिक्ताश्च ॥२॥
कुब्जानुजातवल्लीनिपीडितावज्रमारुतोपहताः ।
स्वयपतितहस्तिनिपीडितशुष्काग्निप्लुष्टमधुनिलयाः ॥३॥
तरवोवर्जयितव्याःशुभदाःस्युःस्निग्धपत्रकुसुमफलाः ।
अभिमतवृक्षंगत्वाकुर्यात्पूजांसबलिपुष्पां ॥४॥

अर्थ—स्मशान, मार्ग, देवालय, वारूळ, बाग, तपस्व्याचा आश्रम, यांतील वृक्ष, चैत्य गावांतील मोठा वृक्ष, नद्यांच्या संगमीं झालेले वृक्ष व घागरीच्या उदकानें शिंपलेले वृक्ष, ॥२॥ कुब्ज ( लहान ), अनुजात ( मागून झालेले), वेली यांणीं पी डित ( युक्त ), वीज व वायु यांणीं पीडित, स्वतां पडलेले, हत्तींनीं पीडित, नीरस, अग्नीनें जळलेले, मधमोहें धरण्याचे ॥३॥ असे वृक्ष वर्ज्य करावे व पानें, पुष्पें व फळें ज्याचीं स्निग्ध ( रूक्ष नाहींत ) असे वृक्ष शुभ होत. अभीष्ट वृक्षाप्रत जा ऊन बलि व पुष्पें यांहीं पूजा करावी ॥४॥

सुरदारुचंदनशमीमधूकतरवःशुभाद्विजातीनां ।
क्षत्रस्यारिष्टाश्वत्थखदिरबिल्वाविवृद्धिकराः ॥५॥
वैश्यानांजीवकखदिरसिंधुकस्यंदनाश्चशुभफलदाः ।
तिंदुककेसरसर्जार्जुनाम्रशालाश्चशूद्राणां ॥६॥

अर्थ—देवदारु, चंदन, शमी, मोहा, हे वृक्ष ब्राह्मणांस शुभ, कडुनिंब, अश्वत्थ, खदिर, बिल्व, हे क्षत्रियांस वृद्धिदायक, ॥५॥ असण्याचें झाड, खदिर, निगुड, टेंभुरणी, हे वैश्यांस शुभ फल देणारे, टेंभुरणी, बकूळ, सालवृक्ष, अर्जुन, आम्र, नाग, हे शूद्रास शुभ होत ॥६॥

लिंगंवाप्रतिमावाद्रुमवत्स्थाप्यायथादिशंयस्मात् ।
तस्माच्चिन्हयितव्यादिशोद्रुमस्योर्ध्वमथवाधः ॥७॥

अर्थ–लिंग अथवा प्रतिमा वृक्षाची जशी दिशा तशी स्थापन करावी ह० वृक्षाची जी पूर्व ती प्रतिमेची पूर्व दिशा, वृ० अधोभाग तोच प्र० अधोभाग, वृ० ऊर्ध्वभाग तो प्र० ऊर्ध्वभाग, याप्रमाणें करावयाचें यास्तव वृक्षाच्या दिशा व ऊर्ध्वाधो भागास चिन्हें करावी ॥७॥

परमान्नमोदकौदनदधिपललोल्लोपिकादिभिर्भक्ष्यैः ।
मद्यैःकुसुमैर्धूपैर्गंधैश्चतरुंसमभ्यर्च्य ॥८॥
सुरपितृपिशाचराक्षसभुजगासुरगणविनायकाद्यानां ।
कृत्वारात्रौपूजांवृक्षंसंस्पृश्यचब्रूयात् ॥९॥

अर्थ–क्षीर, मोदक, भात, दहीं, तिळकूट, उल्लोपिका ( पक्वान्नवि० ), इत्यादि भक्ष्य पदार्थ, मद्य, पुष्पें, धूप, गंध, यांहींकरून वृक्षाची पूजा करून ॥८॥ देव, पितर, पिशाच, राक्षस, नाग, दैत्य, प्रमथादिगण, विनायक ( विघ्न हर्ता ), भूत, प्रेत, सिद्ध, गंधर्व इत्यादिकाची रात्रीं पूजा करून वृक्षास स्पर्श करून बोलावें॥९॥

अर्चार्थममुकस्यत्वंदेवस्यपरिकल्पितः
नमस्तेवृक्षपूजेयंविधिवत्संप्रगृह्यतां ॥१०॥

अर्थ–अमुक देवाची प्रतिमा करण्याकरिता तुला कल्पिला आहे हे वृक्षा तुला नमस्कार असो. ही यथाशास्त्र केलेली पूजा ग्रहण करावीस ॥१०॥

यानीहभूतानिवसंतितानिबलिंगृहीत्वाविधिवत्प्रयुक्तं ।
अन्यत्रवासंपरिकल्पयंतुक्षमंतुतान्यद्यनमोस्तुतेभ्यः ११

अर्थ–जीं या वृक्षीं भूतें रहातात तीं यथाशास्त्र दिलेला हा बलि ग्रहण करून दुसऱ्या जागीं रहाण्याची जागा कल्पूत आणि मजवर क्षमा करोत. आज त्या कारणें नमस्कार असो ॥११॥

वृक्षंप्रभातेसलिलेनसिक्त्वापूर्वोत्तरस्यांदिशि
सन्निकृत्य । मध्वाज्यलिप्तेनकुठारकेणप्रदक्षि
णंशेपमतोभिहन्यात् ॥१२॥

अर्थ–प्रात काळीं वृक्षाचें उदकानें सिंचन करून ईशानी दिशेस मध व आज्य

यांणीं लिप्त अशा कुऱ्हाडीनें तोडण्यास प्रारंभ करून त्यापासून प्रदक्षिण, शेष राहिलेला वृक्ष तोडावा ॥१२॥

पूर्वेणपूर्वोत्तरतोथवोदक्पतेद्यदावृद्धिकरस्तदास्यात् ।
आग्नेयकोणात्क्रमशोग्निदाहःरुग्रोगरोगास्तुरगक्षयश्च १३

अर्थ—पूर्व, ईशानी, उत्तर या दिशांकडे तो वृक्ष पडेल तर वृद्धिकर होतो. आग्नेयीस अग्निदाह, दक्षिणेस रोग, निर्ऋतीस रोग, पश्चिमेस रोग, वायव्येस अश्वक्षयही फलें होतात ॥१३॥

यन्नोक्तमस्मिन्वनसंप्रवेशेनिपातविच्छेदनवृक्षगर्भाः ।
इंद्रध्वजेवास्तुनिचप्रदिष्टाःपूर्वंमयातेत्रतथैवयोज्याः १४

अर्थ—जे वृक्षनिपात, छेदन, वृक्षगर्भ या वनसंप्रवेशांत सांगितले नाहींत, ते इंद्रध्वज ( अ० ४३ श्लो० १९।२० ) यांत व वास्तुप्रकरणांत पूर्वीं मी सांगितले आहेत ते येथें तसेच योजावे ॥१४॥

॥ इतिबृहत्संहितायांवनसंप्रवेशोनामैकोनषष्टितमोध्यायः ॥५९॥

## ॥ अथप्रतिमाप्रतिष्ठापनं ॥

दिशिसौम्यायांकुर्यादधिवासनमंडपंबुधःप्राग्वा ।
तोरणचतुष्टययुतंशस्तद्रुमपल्लवच्छन्नं ॥१॥
पूर्वेभागेचित्राःस्रजःपताकाश्चमंडपस्योक्ताः ।
आग्नेय्यांदिशिरक्ताःकृष्णाःस्युर्याम्यनैर्ऋतयोः २
श्वेतादिश्यपरस्यांवायव्यायांतुपांडुराएव ।
चित्राश्चोत्तरपार्श्वेपीताःपूर्वोत्तरेकोणे ॥३॥

अर्थ—उत्तर किंवा पूर्व या दिशांस ज्ञात्यांनीं अधिवासन ( मूर्तीची स्थापनाच्या पूर्व दिवशीं पूजा इ० करणें ) याचा मंडप, चार तोरणांनीं युक्त व प्रशस्त ( पवित्र ) वृक्षांच्या पल्लवांनी आच्छादित असा करावा ॥१॥ मंडपाच्या पूर्वदिशेकडे चित्रवर्णी माळा व पताका सांगितल्या. आग्नेयीस तांबड्या, दक्षिणेस व निर्ऋतीस काळ्या ॥२॥ पश्चिमेस पांढऱ्या, वायव्येस थोड्या पांढऱ्या, उत्तरेस चित्रवर्णी, ईशानीस पीतवर्ण अशा माळा व पताका कराव्या ॥३॥

जगन्मित्र छापखान्यात पुस्तकें विकत मिळतात तीं:—

८= सत्यनारायणपूजा.
८= शिवरात्रिकथेचे अ०
८- राममंत्रश्लोक
८— गोदावर्यष्टक.
८— महिम्नस्तोत्र.
८— व्याकरणसाह्य
८।।। शके १७९६ साल चें पंचांग
८।।। हरिपाठ.
८।।। धावे
८।।। रामरक्षा.
८।।। गोपिगीत.
८।।। रुक्मिणी स्वयंवर व सुभद्राहरण आर्या.
८।।। अंगदशिष्टाई.
८।।। वास्तुप्रकरणीकोष्टक
८।।। धूम्रपान.

८।।। तुकारामकृत मानस पूजेचे अभंग.
८।।। सोळा सोमवारकथा
८।।। चित्रें.
८।। शिवलिखित.
८।। मंगलाष्टकें नवग्रहांचीं
८।। गुरुचरित्रओंव्या५२
८।। ज्ञानेश्वरसाधुकृतखेळ
८।। भीष्मप्रतिज्ञा.
८।। सीतास्वयंवर.
८।। द० म० कोष्टकें.
८।। चर्पटपंजरिका.
८।। नौकाक्रीडन.
८।। कऱ्हाडे ब्राह्मणाचे प्रवर.
८।। शिवस्तुति.
८।। गणपतीचे श्लोक.

८। दुर्गास्तोत्र.
.।।।.गोदालहरी सटीक
.।. नीतीशतपत्र
.।।।.लघु कौमुदी.
।।।.दानचंद्रिका.
.।—रघुसर्ग ६ वा.
.।—रघुसर्ग ७ वा
.।।=नैषधकाव्य सर्ग१रा
९ पंचदशी प्राकृत.
२ वेदांतसूर्य.
१ जातकालंकार.
१।। कृष्णालीलामृत काव्य सटीक.
१ पंचांग साधन.
१ मुहूर्त तत्वदीपिका.

Registered No 76 of 18

# सूचना.

विद्वान्, उदार, परोपकारी आणि श्रीमान् इत्यादि सद्गृहस्थास आम्ही विनयपूर्वक असें सुचवितो कीं, या ग्रंथाचा राजापासून रंकापर्यंत सर्वांस विशेष उपयोग होईल, असें समजून प्राकृत ( मराठी ) टीकेसह लोकहितो देशानें हें पुस्तक छापण्याचें काम सुरू केलें आहे यास वर्गणीद्वारा साह्य करून, तें पूर्ण करणें सुज्ञ देशाभिमान्याकडे आहे

## वर्गणीचे दर.

| | किमत. | हाशील. |
|---|---|---|
| आगाऊ किंवा अंक पोंचल्याव दिल्यास दर अंकास | ८ आणे | १ पै |
| मागाहून दिल्यास दर अंकास | १० आणे | ६ पै |

किमतीबद्दल टिकिटा पाठविणें झाल्यास अर्धा आणा दराच्या पाठवाव्या

मुंबईंत ठाकुरद्वारानजीक हरिबाबाचे चाळींत रा० रा० नारोकृष्ण दुमाळे याजकडे पैसा जमा करून त्यांची पावती घ्यावी.

---

## आश्रयदात्यांस विनंती.

**जाहिरातीप्रमाणें आजपर्यंतचे अंकांचा आकार दर अंकास साडेदहा आणे प्रमाणें मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावा.**

श्री

# बृहत्संहिता

( वराह मिहिरकृत )

मूळश्लोक संस्कृत असून त्याचा अर्थ प्राकृत ( महाराष्ट ) भाषेत लिहिला आहे.

# THE BRIHATSANHITÁ

[ BY VARÁHA MIHIRA ]

यांत व्यवहारोपयोगी सर्वप्रकारचे विषय आहेत.


| | | |
|---|---|---|
| पुस्तक १ लें | तारीख २५ एप्रील १८७४. | अंक १२ |
| VOL I | 25th April 1874 | No. 12 |



रत्नागिरी

येथे

जनार्दन हरि आठल्ये

यांणी

आपल्या

जगन्मित्र छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.


प्रत्येक अंकांत मोठ्या तक्तीचे साच्याचीं चतुष्पत्री ३२ पृष्ठें असून सुमारें ८०० ग्रंथ येत आहेत.

## जगन्मित्र छापखान्यांत पुस्तकें विकत मिळतात तीं:—

१० श्रीमद्भागवत.
८ यथार्थदीपिका.
६ धर्मसिंधु (ग्रंथकार यांचे घरचे पुस्तकावरून छापिलेला त्यांतील कठिण शब्दांचे कोशासह.)
४ भारतचंपु सटीक.
४ एकादशीव्रतसार.
३ बृहज्जातक.
२॥ गीतार्थबोधिनी.
२ विक्रमचरित्र.
२ फौजदारी ठराव.
१॥ नारायणभट्टी.
१॥ व्रतोद्यापनकौमुदी.
१।-॥। दिवाणी व फौजदारी निवडक निवाडे सन १८६४।६५ सालचे.
१। रसमाधव.
१। सर्वार्थचिंतामणि.
१। गोपीचंदराजाचें नाटक मराठी.
१ रुक्मिणीस्वयंवर.
१ बालवैद्य.
१ शिवलीलामृत.
॥।=मुहूर्तगणपति.
॥।' मुहूर्तमार्तंड प्राकृत टीका. [ण.
॥।' [illegible]
॥।' निर्मळमाहात्म्य.
॥।' गीतार्थमंजरी.
॥= विष्णुसहस्रनामावळी

प्राकृत अर्थ.
॥=पुनर्विवाहाच्या अशास्त्रतेचा बोधक वाद.
॥=समश्लोकी गीता.
॥-प्रतिष्ठामयूख.
॥' वेताळपंचविशी.
॥' रत्नां० शि० वर्णन.
॥. स्वप्नचिंतामणि.
।≡लघुजातक.
।≡माघसर्ग २ रा.
।≡वनौषधिसंग्रह.
।= पांडुरंगमाहात्म्य.
।- भगवद्गीता.[आक्ट.
।= नवीन पोलिसचा
।= मर्योल्डचरित्र.
।= माघसर्ग १ ला.
।= माघसर्ग ३ रा.
।= अपूर्णांक (शिवराम भास्कर गोखलेकृत).
।= गुरुदत्तात्रय स्वामीच्या आरत्या (अक्कलकोटचे स्वामींचे तसबिरीसह).
।. तर्कदीपिका.
।- कुंडार्क सटीक.
।॥ इक्ष्वाकुआख्यान.
।॥ विदुरनीति.
।' स्फुटज्योतिष.
।' रघुवंशसर्ग ३ रा.
।' सिंहासनबत्तिशी.
।' आनंदसागर.
= तीर्थांची अष्टकें.
= ग्रामिमाहात्म्य.

८=। पल्लीपतनकारिका.
८=। गणपतिसहस्रनाम.
८= शिवसहस्रनामावलि.
८= प्रातःस्मरण.
८= बभ्रुवाहनआख्यान.
८= रामदासी श्लोक.
८= गोत्रावली (कऱ्हाडे ब्राह्मणांची).
८= विष्णुसहस्रनाम.
८= रामजोशीकृत लावण्या व पदें.
८= केकावलि.
८= संस्कृत आरत्या.
८= गायनप्रकार.
८= विधवाविवाह सहारसार.
८= केरोपंती पंचांग शके १७९६ चें.
८= गंगालहरी.
८-॥ विष्णुसहस्रनामावलि.
८-॥ विधवाविवाहखंडण.
८-॥ अकलिपि.
८-॥ प्राकृत आरत्या.
८-॥ रामहृदय व रामगीता.
८-। मेस्तक (तोंडचे हिशेब)
८- नलाख्यान आर्या.
८- व्यंकटेशस्तोत्र.
८- रामदासाचे अभंग.
८- स्फुट आर्या व श्लोक.
८- गंगाचार्यकृत प्रश्नावलि.
८- एकादशीमाहात्म्य.

आयुःश्रीबलंजयदादारुमयीमृन्मयीतथाप्रतिमा ।
लोकहितायमणिमयीसौवर्णीपुष्टिदाभवति ॥४॥
रजतमयीकीर्तिकरीप्रजाविवृद्धिंकरोतिताम्रमयी ।
भूलाभंतुमहांतंशैलीप्रतिमाथवालिंगं ॥५॥

अर्थ—काष्ठाची अथवा मृत्तिकेची प्रतिमा आयुष्य, लक्ष्मी, बल, जय देते. हीरकादि मणिमय प्रतिमा लोककल्याण करिते. सुवर्णाची प्र० पुष्टि करिते ॥४॥ रुप्याची प्र० कीर्ति करिते. ताम्याची प्र० प्रजावृद्धि करिते. पाषाणाची प्रतिमा अथवा लिंग मोठ्या (बहुत) भूमीचा लाभ करिते ॥५॥

शंकूपहताप्रतिमाप्रधानपुरुषंकुलंचघातयति ।
श्वभ्रोपहतारोगानुपद्रवांश्चाक्षयान्कुरुते ॥६॥

अर्थ—शंकूनें ( शस्त्राचे टोंकानें ) उपहत ( दुखावलेली ) प्रतिमा मुख्यपुरुष व कुल याचा नाश करिते. श्वभ्र ( खळगा ) नें उपहत जी प्रतिमा ती सार्वकाळ रोग व उपद्रव करिते ॥६॥

मंडपमध्येस्थंडिलमुपलिप्यास्तीर्यसिकतयाथकुशैः ।
भद्रासनकृतशीर्षोपधानपादांन्यसेत्प्रतिमां ॥७॥

अर्थ—मंडपामध्यें भूमि सारवून वाळू व दर्भ आस्तरण ( हें घालून ) भद्रासन ( राजासन ) यावर मस्तक करून उशीवर पाय अशी प्रतिमा ठेवावी ॥७॥

प्लक्षाश्वत्थोदुंबरशिरीषवटसंभवैःकषायजलैः ।
मंगल्यसंज्ञिताभिःसर्वौषधिभिःकुशाद्याभिः ॥८॥
द्विपवृषभोद्धृतपर्वतवल्मीकसरित्समागमतटेषु ।
पद्मसरःसुचमृद्भिःसपंचगव्यैश्चतीर्थजलैः ॥९॥
पूर्वशिरस्कांस्नातांसुवर्णरत्नांबुभिश्चससुगंधैः ।
नानातूर्यनिनादैःपुण्याहैर्वेदनिर्घोषैः ॥१०॥

अर्थ—प्लक्ष ( पाईर ), पिंपळ, उंबर, शिरस, वड, या वृक्षाच्या पल्लवानीं युक्त तापलेलें जल व मांगल्यसंज्ञक दर्भादि सर्वौषधि ( जया, जयंती, जीवपुत्रा, पुनर्नवा, विष्णुक्रांता, अभया, विश्वेश्वरी, सहा, सहदेवा, पूर्णकोशा, शतावरी अ० ४८ श्लो० ३९।४० पहा ) यांहीकरून, गज व वृषभ यांणीं उकरलेली; पर्वत, वा-

स्थळ, नदीसंगमाचे तीर, कमळयुक्त तळें यांच्या मृत्तिका, पंचगव्य, तीर्थजळें, यांहीं करून, सुवर्ण व रत्नानींयुक्त सुगंधिजलाहीं ॥८।९॥ पूर्वेकडे मस्तक करून स्नान घालावें. त्यावेळीं नानाप्रकारच्या वाद्यांचे व पुण्याहवाचनाचे व वेदाचे शब्दघोष होत असावे ॥१०॥

ऐंद्र्यांदिशींद्रलिंगामंत्राःप्राग्दक्षिणेग्निलिंगाश्च ।
जप्तव्याद्विजमुख्यैःपूज्यास्तेदक्षिणाभिश्च ॥११॥

अर्थ–पूर्वदिशेस इंद्रदैवत्य मंत्राचा व आग्नेयीस अग्निदैवत्य मंत्राचा जप श्रेष्ठब्राह्मणांनीं करावा, व त्या ब्राह्मणांची दक्षिणादिकांहीं पूजा करावी ॥११॥

योदेवःसंस्थाप्यस्तन्मंत्रैश्चानलंद्विजोजुहुयात् ।
अग्निनिमित्तानिमयाप्रोक्तानींद्रध्वजोच्छ्राये ॥१२॥
धूमाकुलोपसव्योमुहुर्मुहुर्विस्फुलिंगकृन्नशुभः ।
होतुःस्मृतिलोपोवाप्रसर्पणंवाऽशुभंप्रोक्तं ॥१३॥

अर्थ–ज्या देवाची स्थापना करावयाची तल्लिंगक मंत्रानीं अग्नींत ब्राह्मणानीं हवन करावें त्यावेळीं अग्नीचीं निमित्तें मी पूर्वी ( अ० ४३ श्लो० ३२ ) इंद्रध्वज उभारतेवेळीं जीं सांगितलीं तीं येथेंही पहावीं ॥१२॥ धूमानें व्याप्त, ज्वालानीं डावा फिरणार, वारंवार स्फुलिंग ( ठिणग्या ) करणार असा अग्नि शुभ नव्हे तसाच हवनकर्त्या पुरोहिताच्या स्मरणाचा नाश किंवा मागें सरणें अशुभ सांगितलें॥१३॥

स्नातामभुक्तवस्त्रांस्वलंकृतांपूजितांकुसुमगंधैः ।
प्रतिमांस्वास्तीर्णायांशय्यायांस्थापकःकुर्यात्॥१४॥

अर्थ–स्नान घातलेली, नव्यावस्त्रानें युक्त, उत्तम अलंकृत, पुष्पें, गंध, धूप इत्यादिकानीं पूजित, अशी प्रतिमा चांगला बिछाना घातलेला अशा शय्येच्याठाईं प्रतिष्ठापकानें स्थापन करावी ॥१४॥

सुप्तांसुनृत्यगीतैर्जागरकैःसम्यगेवमधिवास्य ।
दैवज्ञसंप्रदिष्टेकालेसंस्थापनंकुर्यात् ॥१५॥

अर्थ–त्या निजलेल्या प्रतिमेतें उत्तम नृत्य व गायनपूर्वक जागरकांहीं करून, उत्तमप्रकारें अधिवासन पूर्वी करून नंतर ज्योतिष्यानें उक्तमुहूर्ती त्या प्रतिमेचें स्थापन करावें ॥१५॥

अभ्यर्च्यकुसुमवस्त्रानुलेपनैःशंखतूर्यनिर्घोषैः ।
प्रादक्षिण्येननयेदायतनस्यप्रयत्नेन ॥१६॥
कृत्वाबलिंप्रभूतंसंपूज्यब्राह्मणांश्चसभ्यांश्च ।
दत्वाहिरण्यशकलंविनिक्षिपेत्पिंडिकाश्वभ्रे ॥१७॥
स्थापकदैवज्ञद्विजसभ्यस्थपतीन्विशेषतोभ्यर्च्य ।
कल्याणानांभागीभवतीहपरत्रचस्वर्गी ॥१८॥

अर्थ—त्या प्रतिमेची पुष्पें, वस्त्रें, गंधादि यांनीं पूजा करून शंख व वाद्ये यांचा शब्द होत असतां, अधिवासनमंडपांतून निघून देवालयाच्या उजवीकडून ती प्रतिमा प्रतिष्ठापकानें गाभाऱ्यांत न्यावी ॥१६॥ नंतर पुष्कळ बलि करून सभ्य-ब्राह्मण यांची पूजा करून बैठकीच्या खळग्यांत सुवर्णखंड घालून त्या खळग्यांत प्रतिमा स्थापन करावी ॥ १७ ॥ त्यावेळीं स्थापनकर्ताब्राह्मण, दैवज्ञ, ब्राह्मण, कसबी ( सुतार इ० ) यांची विशेष पूजा करावी. असें प्रतिमास्थापन केलें ह्मणजे तो यजमान कल्याणांचा भोक्ता यालोकीं व परलोकीं स्वर्गवास करणारा असा होतो ॥१८॥

विष्णोर्भागवतान्मगांश्चसवितुःशंभोःसभस्मद्विजा
न्मातॄणामपिमातृमंडलविदोविप्रान्विदुर्ब्रह्मणः ।
शाक्यान्सर्वहितस्यशांतमनसोनग्नान्जिनानांविदु
र्येयंदेवमुपाश्रिताःस्वविधिनातैस्तस्यकार्याक्रिया ॥१९

अर्थ—विष्णूचे संस्थापक भागवत, सूर्याचे मगसंज्ञक ब्राह्मण, शिवाचे भस्मधारण-कर्ते ( पाशुपत ), ब्राह्मयादि मातृगणाचे मातृमंडलवेत्ते, ब्रह्मयाचे ब्राह्मण, सर्व हिताचे ( बुद्धाचे ) शांतमन जे शाक्य ( रक्तवस्त्रधारी ) ते, जिनांचे नग्न ( क्षपणिक ) संस्थापक जाणावे. ज्या देवाचा ज्यांणीं आश्रय स्वकीयशास्त्रानें केला त्यांणीं त्या देवाची क्रिया ( स्थापनादिकर्म ) करावी ॥१९॥

उदगयनेसितपक्षेशिशिरगभस्तौचजीववर्गस्थे ।
लग्नेस्थिरेस्थिरांशेसौम्यैर्धीधर्मकेंद्रगतैः ॥२०॥
पापैरुपचयसंस्थैर्ध्रुवमृदुहरितिष्यवायुदेवेषु ।
विकुजेदिनेनुकूलेदेवानांस्थापनंशस्तं ॥२१॥

अर्थ–उत्तरायणा, शुक्लपक्षीं, शिशिरऋतूत बृहस्पतीच्या गृह, होरा, द्रेष्काण, नवमांश, द्वादशांश, त्रिंशांश, या षड्वर्गी चंद्र असता, स्थिरलग्नीं, स्थिरांशीं लग्नापासून ५।९।१।४।७।१० या स्थानीं शुभग्रह व ३।६।१०।११ या स्थानीं, पापग्रह असता, ध्रुव ( तीन उत्तरा व रोहिणी ), मृदु ( मृग, रेवती, चित्रा, अनुराधा), श्रवण, पुष्य, स्वाती, या नक्षत्रा; भौमावाचून ६ वारीं, कर्त्यास शुभकर अशा दिवशीं देवाची प्रतिष्ठा ( स्थापन ) शुभ होय ॥२०॥२१॥

सामान्यमिदंसमासतोलोकानांहितदंमयाकृतं ।
अधिवासनसंनिवेशनेसावित्रेपृथगेवविस्तरात् ॥२२॥

अर्थ–हे प्रतिष्ठापन, संक्षेपानें सर्व देवांचें एकच, लोकास कल्याणकारक असें मी केलें हीं अधिवासन व प्रतिष्ठानें, सावित्रशास्त्रीं सर्व देवांचीं भिन्नभिन्न व विस्तृत सांगीतलीं आहेत ॥२२॥

॥इतिबृहत्संहितायांप्रतिष्ठापनंनामषष्टितमोध्यायः ६०

## ॥ अथगोलक्षणं ॥

पराशरःप्राहबृहद्रथायगोलक्षणंयत्क्रियतेततोयं । मया समासःशुभलक्षणास्ताःसर्वास्तथाप्यागमतोभिधास्ये॥१

अर्थ–पराशरऋषि बृहद्रथानामक स्वशिष्याकारणें जें गोलक्षण सांगता झाला, त्यावरून मी हा त्याचा संक्षेप, गाई सर्व जरी शुभलक्षण आहेत तथापि शास्त्राप्रमाणें सांगतो ॥१॥

साश्राविलरूक्षाक्ष्योमूषकनयनाश्चनशुभदागावः ।
प्रचलच्चिपिटविषाणाःकरटाःखरसदृशवर्णाश्च ॥२॥
दशसप्तचतुर्दंत्यःप्रलंबमुंडाननाविनतपृष्ठाः ।
ह्रस्वस्थूलग्रीवायवमध्यादारितखुराश्च ॥ ३ ॥
श्यावातिदीर्घजिव्हागुल्फैरतितनुभिरतिबृहद्भिर्वा ।
अतिककुदाःकृशदेहानेष्टाहीनाधिकांग्यश्च ॥ ४ ॥

अर्थ–स्रवणारे व उस्कट आणि रूक्ष असे आहेत नेत्र ज्यांचे अशा, उंदरासार-

ऱ्या डोळ्यांच्या अशा गाई शुभद नव्हत. हालणारीं व चेपलेलीं ( आखूड वगैरे ) आहेत शिंगें ज्यांचीं अशा, काळ्या तांबड्या व गाढवाच्या वर्णाच्या ॥२॥ १०।७। ४ दांतांच्या, लांब तोंडाच्या व शिंगांवांचून, पाठीस खळगा अशा, आखूड व स्थूल मानेच्या, यवमध्य ( पोट मात्र मोठें असून मागें व पुढें बारीक ) पसरलेल्या खुरांच्या ॥३॥ काळी व अति लांब अशा जिव्हेच्या, फार बारीक व फार मोठे गुल्फ ( खुरवया ) यांच्या, मोठ्या कोल्याच्या, बारीक देहाच्या, कमी किंवा अधिक अवयवांच्या अशा गाई शुभ नव्हत ॥४॥

वृषभोप्येवंस्थूलातिलंबवृषणःशिराततक्रोडः ।
स्थूलशिरान्वितगंडस्त्रिस्थानंमेहतेयश्च ॥५॥
मार्जाराक्षःकपिलःकरटोवानशुभदोद्विजस्येष्टः ।
कृष्णोष्ठतालुजिव्हःश्वसनोयूथस्यघातकरः ॥६॥

अर्थ—वृषभ ( आंडील बैल ) ही असा ( वरील लक्षणयुक्त ) शुभ नव्हे. मोठा व लांब वृषण ( आंड ), शिरांनीं व्याप्त उर, मोठ्या शिरांनीं व्याप्त गाल ज्याचे, त्रिस्थानें मेहते ( मूत्रपुरीष एककालीं करणारा व डोळ्यांचे शिश्नानें म्हणजे मूत्रानें सिंचन करणारा ) ॥५॥ मांजरासारख्या डोळ्यांचा, काळा, करडा वर्णाचा, असा वृषभ शुभ नव्हे; परंतु ब्राह्मणास इष्ट होय. ओष्ठ, तालु, जिव्हा हीं काळीं ज्याचीं असा व त्रास करणारा असा वृषभ कळपाचा घातकारक होतो ॥६॥

स्थूलशकृन्मणिशृंगःसितोदरःकृष्णसारवर्णश्च ।
गृहजातोपित्याज्योयूथविनाशावहोवृषभः ॥७॥

अर्थ—शकृत् ( शेणपो ), मणि ( शिश्न ), शिंग, हीं ज्याचीं मोठीं असा, पांढऱ्या पोटाचा, कांहीं काळा व कांहीं पांढरा अशा रंगाचा, असा वृषभ आपल्या घरांत झालेला असला तथापि त्याचा त्याग करावा; कारण तो वृषभ कळपाचा नाशकारक होय ॥७॥

श्यामकपुष्पचितांगोभस्मारुणसंनिभोबिडालाक्षः ।
विप्राणामपिनशुभंकरोतिवृषभःपरिगृहीतः ॥८॥

अर्थ—श्याम ( काळा ) वर्ण पुष्पांनीं युक्त अवयवांचा, भस्मवर्ण व तांबडा, मांजराच्या डोळ्यांसारख्या डोळ्यांचा वृषभ घेतला असतां, ब्राह्मणांचेंही कल्याण होत नाहीं ॥८॥

येचोद्धरंतिपादान्पंकादिवयोजिताःकृशग्रीवाः ।

कातरनयनाहीनाश्चपृष्ठतस्तेनभारसहाः ॥९॥

अर्थ—ज्या वृषभांवर ओझें घातलें असतां, चिखलांतून पाय काढावे, असे पाय उचलतात ते, बारीक मानेचे, भित्र्या डोळ्यांचे, पाठ लपलेले, असे वृषभ ओझ्याचे उपयोगी नाहींत ॥९॥

मृदुसंहतताम्रोष्ठास्तनुस्फिजस्ताम्रतालुजिव्हाश्च ।
तनुह्रस्वोच्चश्रवणाःसुकुक्षयःस्पष्टजंघाश्च ॥१०॥
आताम्रसंहतखुराव्यूढोरस्काबृहत्ककुदयुक्ताः ।
स्निग्धश्लक्ष्णतनुत्वग्रोमाणस्ताम्रतनुशृंगाः ॥११॥
तनुभूस्पृग्वालधयोरक्तांतविलोचनामहोच्छ्रासाः ।
सिंहस्कंधास्तन्वल्पकंबलाःपूजिताःसुगताः ॥१२॥

अर्थ—मृदु, मिळालेले व तांबडे असे आहेत ओष्ठ ज्यांचे असे, बारीक कुल्याचे, तालु व जिव्हा ज्यांच्या तांबड्या असे, बारीक, आखूड व उच कानांचे, सुंदर कुशींचे, सरळ जंघांचे ॥१०॥ ईषत् ताम्र व मिळालेल्या खुरांचे, अत्यंत दृढ वक्षस्थळाचे, मोठ्या कोळ्यानें युक्त, स्निग्ध, मृदु व पातळ अशीं आहेत त्वचा ( कातडी ) व केश ज्यांचे असे, तांबडीं व बारीक अशीं आहेत शिंगें ज्यांचीं असे ११ बारीक व भूमीला स्पर्श करणारें आहे पुच्छ ज्यांचें असे, तांबडे आहेत डोळ्यांचे प्रांतभाग ज्याचे असे, फार उंच, सिंहासारखा आहे स्कंध ज्यांचा असे, बारीक व थोडकी आहे कबल ( मानेखालील सोंसळी ) ज्यांची असे, चांगली आहे गति ज्यांची असे वृषभ शुभ होत ॥१२॥

वामावर्तैर्वामेदक्षिणपार्श्वेचदक्षिणावर्तैः ।
शुभदाभवंत्यनडुहोजंघाभिश्चैणकनिभाभिः ॥१३॥

अर्थ—डाव्या बाजूस डावे फिरलेले व उजव्ये बाजूस उजवे फिरलेले असे केश ज्यांचे असे व नकन्यासारख्या जंघांचे ( पोटऱ्यांचे ) बैल शुभ होत ॥१३॥

वैडूर्यमल्लिकाबुद्बुदेक्षणाःस्थूलनेत्रवर्माणः ।
पार्ष्णिभिरस्फुटिताभिःशस्ताःसर्वेपिभारवहाः १४

अर्थ—श्यामवर्ण, हंसाचे डोळ्याप्र०, पाण्याचे बोंबड्याप्रमाणें ज्यांचे डोळ्यांचे भवईस जाडे केस आहेत असे, खुरांचे ( गेळांचे ) मागचे भाग न फुटले आहेत ज्यांचे, ते बैल ओझें नेण्यास योग्य होत ॥१४॥

घ्राणोद्देशेसवलिर्मार्जारमुखःसितश्चदक्षिणतः ।
कमलोत्पललाक्षाभःसुवालधिर्वाजितुल्यजवः ॥१५॥
लंबैर्वृषणैर्मेषोदरश्चसंक्षिप्तवंक्षणाक्रोडः ।
ज्ञेयोभाराध्वसहोजवेश्वतुल्यश्चशस्तफलः ॥१६॥

अर्थ—नाकावर वळ्या पडलेला, मार्जारासारख्या मुखाचा, उजव्या आंगास पांढरा, श्वेतकमल व नीलकमल व लाख यांच्या रंगाचा, सुंदरपुच्छकेशांचा, घोड्यासारख्या वेगाचा ( शीघ्रगति ), लांब अंडयुक्त, मेंढ्यासारख्या पोटाचा, वंक्षण ( अंडामागील जंघा ) व क्रोड (अग्रजंघांतर) हीं संक्षिप्त (लहान) आहेत ज्याचीं असा, बैल भार घेण्यास, मार्ग चालण्यास, घोड्यासारख्या वेगाचा व शुभफलद जाणावा ॥१५।१६॥

सितवर्णःपिंगाक्षस्ताम्रविषाणेक्षणोमहावक्त्रः ।
हंसोनामशुभफलोयूथस्यविवर्धनःप्रोक्तः ॥१७॥

अर्थ—पांढरा, पिंगटनेत्र, तांबडीं शिंगें व डोळे, मोठें मुख, या लक्षणांचा बैल हंसनामक, कळप वाढविणारा, शुभफलदायक सांगितला ॥१७॥

भूस्पृग्वालधिरालाम्रविषाणोरक्तदृक्ककुद्मीच ।
कल्मापश्चस्वामिनमचिरात्कुरुतेपतिंलक्ष्म्याः॥१८॥

अर्थ—भूमीला स्पर्श करणारे आहेत पुच्छांचे केश ज्याचे असा, अल्प ताम्रवर्ण आहेत शिंगे ज्याचीं असा, तांबड्या डोळ्यांचा, कोळ्यानें युक्त, कल्माष ( बहुरंगयुक्त ) असा वृषभ धन्यातें लवकरच लक्ष्मीचा पति ( धनवान् ) करितो ॥१८॥

योवासितैकचरणोयथेष्टवर्णश्चसोपिशस्तफलः ।
मिश्रफलोपिग्राह्योयदिनैकांतप्रशस्तोस्ति ॥१९॥

अर्थ—अथवा पांढरा एक पाय ज्याचा असा व कोणत्याही वर्णाचा, बैल शुभ होय. ( योवा सितैश्चचरणैः असा पाठ कोणी ह्मणतात त्यांचेमतीं श्वेत चार पाय ). जर सर्वलक्षणयुक्त मिळत नाहीं. तर शुभाशुभ मिश्रफलही घ्यावा. ( शुभ व अशुभ या फलांचें अंतर करून एकही अशुभफल शेष रहाणार नाही, तर तो घ्यावा असें कोणी ह्मणतात ) ॥१९॥

॥इतिबृहत्संहितायांगोलक्षणंनामैकषष्टितमोध्यायः॥६१॥

## ॥ अथश्वलक्षणं ॥

पादाःपंचनखास्त्रयोग्रचरणःषड्भिर्नखैर्दक्षिणस्ता
म्रोष्ठाग्रनसोमृगेश्वरगतिर्जिघ्रन्भुवंयातिच। लांगू
लंससटंदृगृक्षसदृशीकर्णौचलंबौमृदूयस्यस्यात्सक
रोतिपोष्टुरचिरात्पुष्टांश्रियंश्वागृहे ॥१॥

अर्थ–तीन पाय पांचपांच नखांनीयुक्त व चवथा पुढला उजवा पाय सहा नखांनीं युक्त, ओठ व नाकाचें अग्र हीं तांबडीं असा, सिंहासारखा पळणारा, जात असतां भूमि हुंगणारा, केशयुक्त पुच्छ, वानरासारखी दृष्टि, लांब व मृदु कर्ण, हीं एक्षणें ज्या कुतऱ्याची असतील तो, आपल्या धन्याच्या गृहामध्यें लक्ष्मीतें लवकरच पुष्ट करितो (आपल्या धन्यास द्रव्यवान् करतो) ॥१॥

पादेपादेपंचपंचाग्रपादेवामेयस्याःषण्नखा
मल्लिकाक्ष्याः। वक्रंपुच्छंपिंगलालंबकर्णाया
सारापृष्टंकुक्कुरीपातिपोष्टुः ॥२॥

अर्थ–जिच्या पायास पांचपांच नखें व डाव्या पुढच्या पायास सहा नखें अशी, मल्लिकाक्षी (डोळ्यांसभोंवती पांढरी रेषा), वांकुडें पुच्छ, पिंगटवर्ण, लांब काना ची अशी जी कुत्री ती आपल्या पोषणकर्त्याचें राष्ट्र पालन करते ॥२॥

॥इतिबृहत्संहितायांश्वलक्षणंनामद्वाषष्टितमोध्यायः ६२

## ॥ अथकुक्कुटलक्षणं ॥

कुक्कुटस्त्वृजुतनूरुहांगुलिस्ताम्रवक्त्रनखचूलिकः
सितः। रौतिसुस्वरमुपात्ययेचयोवृद्धिदःसनृपरा
ष्ट्रवाजिनां ॥१॥

अर्थ–पिसें व अंगुलि सरळ ज्याच्या असा, मुख, नखें, चूलिक (मस्तकावरील शिखा) हीं तांबडीं, पांढरा, उष काली सुस्वर शब्द करितो असा जो कोंबडा, तो राजा, राष्ट्र व घोडे यांची वृद्धि करितो ॥१॥

यवग्रीवोयोवावदरसदृशोवापिविहगो
बृहन्मूर्धावर्णैर्भवतिवहुभिर्यश्चरुचिरः ।
सशस्तःसंग्रामेमधुमधुपवर्णश्चजयकृन्न
शस्तोयोतोन्यःकृशतनुरवःखंजचरणः ॥२॥

अर्थ– यवग्रीव ( ज्याची मान मध्ये जाडी असा ), बदरसदृश ( लोहितवर्ण ), विस्तीर्ण मस्तक, वहुत वर्णांनीं युक्त, निर्मल असा कोंबडा युद्धामध्ये शुभ होय. अथवा मधाच्या वर्णाचा किंवा भ्रमरासारखा ( काळा ) तोही जय करणारा होय. याहून अन्य, कृश, अल्पशब्द, आंखूडपायांचा कोंबडा शुभ नव्हे ॥२॥

कुक्कुटीचमृदुचारुभाषिणीस्निग्धमूर्तिरुचिराननेक्षणा ।
सावदातिसुचिरंमहीक्षितांश्रीयशोविजयवीर्यसंपदः ३

अर्थ–मृदु व सुंदर शब्द करणारी, निर्मलशरीर, मुख व डोळे सुंदर आहेत, जिचे अशी कोंबडी राजांस लक्ष्मी, कीर्ति, विजय, बल व संपत्ति यांते देत्ये. यास्तव राजांनीं अशी कोंबडी बाळगावी ॥३॥

इतिबृहत्संहितायांकुक्कुटलक्षणंनामत्रिषष्टितमोऽध्यायः ६३

## ॥ अथकूर्मलक्षणं ॥

स्फटिकरजतवर्णोनीलराजीविचित्रःकलशसदृश
मूर्तिश्चारुवंशश्चकूर्मः । अरुणसमवपुर्वासर्षपा
कारचित्रःसकलनृपमहत्त्वंमंदिरस्थःकरोति ॥१॥

अर्थ–स्फटिकमणि व रुपे याच्या वर्णाचा, नीलवर्णरेषांनीं चित्रित, कलशासारख्या शरीराचा, चारुवंश ( फार उंच नव्हे अशा पाठीचा ) असा; अथवा तांबड्या शरीराचा, मोहरीसारख्या पांढऱ्या बिंदूंनी युक्त असा कांसव गृहामध्ये असेल तर सर्व राजांचे महत्व करतो ( राजाधिराजा करतो ) ॥१॥

अंजनभृंगश्यामतनुर्वाविंदुविचित्रोऽव्यंगशरीरः ।
सर्पशिरावास्थूलगलोयःसोपिनृपाणांराष्ट्रविवृद्ध्यै ॥२

अर्थ–काजळ व भ्रमर यासारखा काळ्या शरीराचा, बिंदूनीं चित्रित, पूर्णावयव, सर्पासारख्या तोंडाचा, मोठ्या गळ्याचा असा जो कासव तोही राजाची राष्ट्रवृद्धि करणारा होतो ॥२॥

वैडूर्यत्विट्स्थूलकंठस्त्रिकोणोगूढच्छिद्रश्चारुवंशश्चशस्तः । क्रीडावाप्यांतोयपूर्णेमणौवाकार्यःकूर्मोमंगलार्थंनरेंद्रैः ॥३॥

अर्थ–वैडूर्यमण्याच्या कांतीचा ( काळा ), स्थूलकंठ, त्रिकोणाकृति, गुप्तच्छिद्र, सुंदर पृष्ठभाग असाही कासव शुभ होय. असा कासव राजांनीं शुभार्थ क्रीडावापी ( पुष्करिणी ) अथवा उदकपूर्ण मृन्मय भांड्यामध्यें ठेवावा ॥३॥

इतिबृहत्संहितायांकूर्मलक्षणंनामचतुःषष्टितमोध्यायः ६४

---

## ॥ अथछागलक्षणं ॥

छागशुभाशुभलक्षणमभिधास्येनवदशाष्टदंतास्ते । धन्याःस्थाप्यावेश्मनिसंत्याज्याःसप्तदंताये ॥१॥

अर्थ–बकऱ्याचें शुभाशुभलक्षण सांगतों. ८।९।१० दाताचे बकरे शुभ होत ते घरात बाळगावे. सात दाताचे बाळगू नयेत ॥१॥

दक्षिणपार्श्वेमंडलमसितंशुक्लस्यशुभफलंभवति । ऋश्यनिभकृष्णलोहितवर्णानांश्वेतमपिशुभदं ॥२॥

अर्थ–पांढऱ्या बकऱ्याच्या उजव्या बाजूस मध्यभागीं काळें मंडल ( वर्तुळाकृति ) शुभ होय. ऋश्य म्ह० मृगवि० त्यासारख्या नीलरंगाचे, काळ व लोहितवर्ण अशा बकऱ्याच्याही उजव्या बाजूस पांढरें मंडल शुभसूचक होय ॥२॥

स्तनवदवलंबतेयःकंठेजानांमणिःसविज्ञेयः । एकमणिःशुभफलकृद्धन्यतमाद्वित्रिमणयोये ॥३॥

अर्थ–बकऱ्यांच्या कंठाचाठाईं स्तनासारखा जो लोंबतो तो मणि जाणावा. तो एक मणि शुभसूचक व दोन तीन मणि कंठाच्याठाईं ज्याच्या असतील ते अतिशुभफल देणारे होत ॥३॥

मुंडाःसर्वेशुभदाःसर्वसिताःसर्वकृष्णदेहाश्च ।
अर्धासिताःसितार्धाधन्याःकपिलार्धकृष्णाश्च ॥४॥

अर्थ–मुंड ( शिंगांनीं रहित ) बकरे, कोणत्याही रंगाचे असोत ते सर्व शुभ होत. सर्व पांढरे, सर्वांग काळे, अर्धे काळे, अर्धे पांढरे, अर्धे कपिल ( पिंगट ) व अर्धे काळे असे बकरेही शुभ होत ॥४॥

विचरतियूथस्याग्रेप्रथमंचांभोवगाहतेयोजः ।
सशुभःसितमूर्धावामूर्धनिवाटिक्किकायस्य ॥५॥

अर्थ–जो बकरा कळपाच्या पुढें जातो तो व प्रथम ( सर्वांचे आदी ) उदक पितो तो व ज्याचें मस्तक पांढरें तो, व ज्याच्या मस्तकावर टिक्किका ( टिकले) असतात तो, हे सर्व शुभ होत. असा बकरा कुट्टक सं० होय ॥५॥

सपृषतकंठशिरावातिलपिष्टनिभश्चताम्रदृक्शस्तः ।
कृष्णचरणःसितोवाकृष्णोवाश्वेतचरणोयः ॥६॥

अर्थ–बिंदुयुक्त कंठ किंवा मस्तक ज्याचें असा, तिलपिष्टतुल्य ( श्वेतकृष्णमिश्रित ) वर्ण, तांबड्या डोळ्यांचा जो बकरा तो शुभ. पांढरा असून काळ्या पायाचा शुभ. अथवा काळाअसून पांढऱ्या पायांचा जो बकरा तो शुभ होय. हा कुटिलसंज्ञक होय ॥६॥

यःकृष्णांडःश्वेतोमध्येकृष्णेनभवतिपट्टेन ।
योवाचरतिसशब्दंमंदंचसशोभनश्छागः ॥७॥

अर्थ–जो बकरा काळ्या आंडाचा, श्वेतवर्ण, मध्यभागीं काळा पट्टा व जो हळू हळू शब्द करून चरतो तोही शुभ होय. तो जटिल सं० ॥७॥

ऋष्यशिरोरुहपादोयोवाप्राक्पांडुरोपरेनीलः ।
सभवतिशुभकृच्छागःश्लोकश्चाप्यत्रगर्गोक्तः ॥८॥

अर्थ–नीलवर्ण मस्तकावरील केश व पाय ज्याचे असा बोकड शुभ. अथवा पूर्वभागीं ( मस्तकाकडे अर्धा ) पांढरा व मागें नीलवर्ण तोही शुभ होय. तो वामनसं० छाग होय. याविषयीं गर्गऋषीनें श्लोकही सांगीतला आहे तो पुढें सांगतो ॥८॥

कुट्टकःकुटिलश्चैवजटिलोवामनस्तथा ।
तेचत्वारःश्रियःपुत्रानालक्ष्मीकेवसंतिते ॥९॥

अर्थ—कुट्टक, कुटिल, जटिल, वामन, या चार नावांचे बकरे लक्ष्मीचे पुत्र होत, ते दरिद्री मनुष्याकडे रहात नाहींत ॥९॥

अथाप्रशस्ताःखरतुल्यनादाःप्रदीप्तपुच्छाःकुन
खाविवर्णाः । निकृत्तकर्णाद्विपमस्तकाश्चभ
वंतियेचासिततालुजिव्हाः ॥१०॥

अर्थ—गाढवासारख्या शब्दाचे, वाकडें व अत्युग्र आहे पुच्छ ज्याचें असे, वाईट नखांचे, विवर्ण ( अशुभवर्ण ), छिन्नकर्ण ( तोडल्यासारखे कर्ण,) हत्तीसारख्या मस्तकाचे, तालु व जिव्हा हीं काळी ज्यांचीं, असे बकरे अशुभ होत ॥१०॥

वर्णैःप्रशस्तैर्मणिभिश्चयुक्तामुंडाश्चयेताम्रवि
लोचनाश्च । तेपूजितावेश्मसुमानवानांसौ
ख्यानिकुर्वंतियशःश्रियंच ॥११॥

अर्थ—पूर्वोक्त प्रशस्त, ( शुभ ) वर्ण, १, २, ३, मणि (गलस्तन ) यांनीं युक्त, मुंड ( शृंगरहित ) व तांबड्या डोळ्यांचे असे जे बकरे ते मनुष्याच्या घरात सौख्यें, यश, लक्ष्मी यांते करतात ॥११॥

इतिश्रीवराहमिहिरकृतौबृहत्संहितायांछाग
लक्षणंनामपंचषष्टितमोध्यायः ॥६५॥

---

## ॥ अथअश्वलक्षणं ॥

---

दीर्घग्रीवाक्षिकूटस्त्रिकहृदयपृथुस्ताम्रताल्वो
ष्ठजिव्हःसूक्ष्मत्वक्केशवालःसुशफगतिमुखो
ह्रस्वकर्णोष्ठपुच्छः । जंघाजानूरुवृत्तःसम
सितदशनश्चारुसंस्थानरूपोवाजीसर्वांगशु
द्धोभवतिनरपतेःशत्रुनाशायनित्यं ॥१॥

अर्थ—मान व अक्षिकूट ( दृष्टीचा आश्रय नेत्रगोल ) हीं लांब, कटिभाग व हृदय हीं मोठीं विस्तीर्ण, तालु, ओष्ठ व जिव्हा हीं तांबडीं, कातडी, केश व पुच्छकेश

हीं सूक्ष्म ( पातळ, मृदु, बारीक ), पाय, गमन, मुख हीं सुंदर, कान, ओष्ठ, पुच्छ हीं आखूड; पोटऱ्या, गुडघे, मांड्या हीं वर्तुळ, समसाख्य व पांढरे दांत, आकार व शरीरशोभा रमणीय, असा सर्वांगीं शुद्ध घोडा, राजास शत्रुनाशार्थ नित्य होतो ॥१॥

**अश्रुपातहनुगंडहृद्गलप्रोथशंखकटिवस्तिजानुनि ।**
**मुष्कनाभिककुदेतथागुदेसव्यकुक्षिचरणेपुचाशुभाः ॥२**

अर्थ—अश्रु ( नेत्रोदक ) पतनस्थान, हनवटी, गाल, हृदय, गळा, प्रोथ ( मुख प्रांत ), कानाजवळचे शंख, कमर, नाभी-खालच्या व शिश्नाच्यावरचा भाग, गुडघे, वृषण, नाभि, ककुदावर ( बैलास कोळें असतें त्यास्थानीं ), गुद, डावी कूस, पाय, या अवयवांच्याठाईं भोंवरे घोड्यास असले तर तो घोडा अशुभकारक होतो ॥२॥

**येप्रपाणगलकर्णसंस्थिताःपृष्ठमध्यनयनोपरि**
**स्थिताः । ओष्ठसक्थिभुजकुक्षिपार्श्वगास्तेल**
**लाटसहिताःसुशोभनाः ॥३॥**

अर्थ—प्रपाण ( उत्तरोष्ठतल ), गळा, कान, पाठीचा मध्यभाग, नेत्रांचा वरचा भाग ( भिंवया ), ओंठ, मांड्या, भुज, वामकुक्षि, पार्श्वभाग, ललाट, यांचाठाईं जे भोंवरे ते फार चांगले ( शुभ फल देणारे ) होत ॥३॥

**तेषांप्रपाणएकोललाटकेशेषुचध्रुवावर्तः ।**
**रंध्रोपरंध्रमूर्धनिवक्षसिचेतिस्मृतौद्वौद्वौ ॥४॥**

अर्थ—त्या भोंवऱ्यामध्यें १० ध्रुवावर्त त्याचीं स्थानें—१ प्रपाणीं, १ ललाटकेशीं, २ रंध्रीं ( कुक्षि व नाभि यांच्या मध्यभागीं ), २ उपरंध्रीं ( कुक्षि व नाभि यांच्या वरच्या भागीं ), २ मस्तकीं २ उरस्थलीं, या प्रमाणें १० ध्रुवावर्त सांगित ले आहेत ॥४॥

**षड्भिर्दंतैःसिताभैर्भवतिहयशिशुस्तैःकषायै**
**र्द्विवर्षैःसंदंशैर्मध्यमांत्यैःपतितसमुदितैस्त्र्य**
**ब्दपंचाब्दिकोश्वः।संदंशानुक्रमेणत्रिकपरि**
**गणिताःकालिकापीतशुक्लाःकाचामाक्षिकशं**
**खावटचलनमतोदंतपातंचविद्धि ॥५॥**

अर्थ–घोड्याच्या खालच्या दातात दोन दाढांच्या मध्ये साहा दात स्पष्ट आहेत; ते साहा दात पांढरे असतील तर तो घोडा एक वर्षाचा, काळेतांबडे अस० २ वर्षांचा, ( दोन दंतपंक्तींमध्ये सममध्यभागीं जे दोन दात ते सदश, सदशाच्या दोन बाजूंचे २ मध्यम, मध्यमाच्या बाजूंचे २ अंत्य ) सदश पडून दुसरे आले असले तर ३ वर्षांचा, मध्यम प० ४ वर्षांचा, अंत्य प० ५ वर्षांचा, सदशा काळे असतील तर ६ वर्षांचा, मध्यमका० ७ व०, अंत्य का० ८ व०, स० पिंवळे अ० ९ व०, मध्य० पिं० १० व०, अंत्य पिं० ११ व०, स० पांढरे अ० १२ व०, मध्य० पां० १३, अंत्य पां० १४, स० कांचवर्ण अ० १५, मध्यम कां० १६ , अं० कां० १७, सदश मधासारखे अ० १८, म० १९, अं० २०, स० शंखासारख्या आकाराचे अ० २१, म० २२, अं० २३ स० सच्छिद्र० अ० २४, मध्य० २५, अंत्य० २६, स० हालत अ० २७, म० २८, अंत्य २९, स० पडले अ० ३०, म० ३१, अं० ३२, याप्रकारें एकापासून ३२ पर्यंत घोड्याच्या वयाचीं वर्षें दातावरून जाणावीं ॥५॥

## ॥ इतिबृहत्संहितायांअश्वलक्षणंनामषट्षष्टितमोध्यायः ॥६६॥

---

## ॥ अथगजलक्षणं ॥

---

मध्वाभदंताःसुविभक्तदेहानचोपदिग्धाश्चकृशाःक्षमाश्च । गात्रैःसमैश्चापसमानवंशा वराहतुल्यैर्जघनैश्चभद्राः ॥१॥

अर्थ–मधासारखी दंतकांती ज्याची असे, सुंदर विभक्त आहेत देह ज्याचे असे, अतिस्थूल व अतिकृश नव्हत, सर्वकर्म सहन करणारे, सर्व शरीरावयव सारखे, धनुष्यासारखा आहे वंश ( पाठीचें हाड ) ज्याचा असे, डुकरासारखे आहेत कटिभाग ज्यांचे, असे जे हत्ती, ते भद्रजातीचे भद्रसंज्ञक होत ॥१॥

वक्षोथकक्षावलयःश्लथाश्चलंबोदरस्त्वग्बृहतीगलश्च । स्थूलाचकुक्षिःसहपेचकेनसैंहीचदृङ्मंदमतंगजस्य ॥२॥

अर्थ–उर, कक्षा, वलय, हीं शिथिल, उदर लांब, कातडी व मान हीं मोठी, कुक्षि व पुच्छमूल हीं स्थूल, सिंहासारखी दृष्टि, हीं मंदसंज्ञक हत्तीचीं लक्षणें होत २

मृगास्तुह्रस्वाधरवालमेढ्रास्तन्वंघ्रिकंठद्विज
हस्तकर्णाः । स्थूलेक्षणाश्चेतियथोक्तचिन्हैः
संकीर्णनागाव्यतिमिश्रचिन्हाः ॥३॥

अर्थ–ओंठ, पुच्छ, शिश्न हीं आंखुड; पाय, कंठ, दांत, शुंडा, कान हे बारीक; नेत्र विस्तीर्ण, या चिन्हांनीं युक्त जे गज ते भद्रसंज्ञक होत. पूर्वोक्त तीनही चिन्हांनीं जे मिश्रित ते मिश्रसं० गज होत ॥३॥

पंचोन्नतिःसप्तमृगस्यदैर्घ्यमष्टौचहस्ताःपरि
णाहमानं । एकद्विवृद्धावथमंदभद्रौसंकीर्ण
नागोनियतप्रमाणः ॥४॥

अर्थ–मृगसंज्ञकाची उंची ५ हात, पुच्छमूलापासून गंडस्थळांपर्यंत लांबी ७ हात, परिणाह ( घेर ) ८ हात. मंदसंज्ञकाची ६ हात उंची, ८ हात लांबी ९ हात घेर; भद्राची ७ हात उंची ९ हात लांबी, १० हात घेर; व संकीर्ण ( मिश्र ) संज्ञक हत्तीचे प्रमाणास नियम नाहीं ॥४॥

भद्रस्यवर्णोहरितोमदस्यमंदस्यहारिद्रकसंनि
काशः । कृष्णोमदश्चाभिहितोमृगस्यसंकीर्ण
नागस्यमदोविमिश्रः ॥५॥

अर्थ–भद्रसं० हत्तीच्या मदाचा वर्ण हिरवा ( पोपटी ), मंदसं० वर्ण पिवळा, मृगसं० वर्ण काळा, संकीर्णसं० हत्तीच्या मदाचा वर्ण मिश्र ( हिरवा पिवळा काळा ) अशा मदाच्या ( दानोदकाच्या ) रंगांवरून हत्तींच्या जाती जाणाव्या ॥५॥

ताम्रौष्ठतालुवदनाःकलविंकनेत्राःस्निग्धोन्नता
ग्रदशनाःपृथुलायतास्याः । चापोन्नतायतनिगू
ढनिमग्नवंशास्तन्वेकरोमचितकूर्मसमानकुंभाः ॥६॥
विस्तीर्णकर्णहनुनाभिललाटगुह्याःकूर्मोन्नतद्वि
नवविंशतिभिर्नखैश्च । रेखात्रयोपचितवृत्तकराः
सुवालाधन्याःसुगंधिमदपुष्करमारुताश्च ॥७॥

अर्थ–ओष्ठ, तालु, मुख हीं तांबडीं; कलविंक ( चिमणापक्षी ) पक्ष्यासारखे नेत्र, स्निग्ध व अग्रें उंच असे दात, विस्तीर्ण व लांब असें मुख ज्यांचें असें; पा .

रखा उच व विस्तीर्ण, निगूढ ( शिथिलसंधि ), अति उच नव्हे असा आहे वंश ( पाठीचा कणा ) ज्याचा असे; कुश एककेशानें युक्त व कासवाच्या पाठीसारखीं आहेत गंडस्थळें ज्याचीं असे ॥६॥ कर्ण, हनवटी, नाभि, ललाट, गुह्य हीं विस्तीर्ण ज्याचीं असे, कासवासारखीं उन्नत १८ किंवा २० आहेत नखें ज्यास, लाव तीन रेषानीं युक्त, वर्तुळ आहे शुंडा ज्याची असे, सुंदर आहेत केश ज्याचे असे, सुगंधयुक्त आहे मद ( गंडस्थळातील उदक ) व शुंडेतील वायु ज्याचा असे हत्ती धन्य ( शुभ ) होत ॥७॥

दीर्घांगुलिरक्तपुष्कराःसजलांभोदनिनादबृंहि णः। बृहदायतवृत्तकंधराधन्याभूमिपतेर्मतंगजाः८

अर्थ—लांब अंगुलि ( शुंडेच्या शेवटास मासाचा तुकडा असतो तो ) व तांबडें आहे शुंडाग्र ज्याचें असे, सजल मेघाच्या शब्दासारखा शब्द ज्याचा असे, मोठी विस्तीर्ण, वाटोळी आहे मान ज्याची असे हत्ती राजास शुभकारक होत ॥८॥

निर्मदाभ्यधिकहीननखांगान्कुब्जवामनकमे षविषाणान् । दृश्यकोशफलपुष्करहीनान् श्यावनीलशबलासिततालून् ॥९॥ स्वल्पव क्त्ररुहमत्कुणषंढान्हस्तिनीचगजलक्षणयु क्तां । गर्भिणींचनृपतिःपरदेशंप्रापयेदतिवि रूपफलास्ते ॥१०॥

अर्थ—जे हत्ती मदरहित, फार अधिक किंवा फार कमी आहेत नखें व अवयव ज्याचे असे, कुब्ज, वामन ( ठेंगणे ), बकऱ्याच्या शिंगासारख्या दाताचे, अंड व शुंडाचे अग्रीं कमलासारखें चिन्ह हीं अदृश्य ज्याचीं असे, मलिन, नील व मिश्रितरंगाची तालु ज्याची असे, स्वल्प आहेत दांत, किंवा मुखलोमे ज्याची असे व बाह्यदंतरहित, षंढ, असे हत्ती व याच हत्ताच्या लक्षणानीं युक्त व मोठ्या दातांची व मदयुक्त हत्तीण, गर्भिणी हत्तीण हीं सर्व अशुभफल देणारीं यास्तव राजानें दुसऱ्या देशास पाठवावीं आपल्या देशात ठेवू नये ( जो हत्ती गमन करीत असतां, पाप मिळतात तो षंढ ) ॥९॥१०॥

॥ इतिश्रीवराहमिहिरकृतौबृहत्संहितायांगज लक्षणंनामसप्तषष्टितमोऽध्यायः ॥६७॥

## ॥ अथपुरुषलक्षणं ॥

उन्मानमानगतिसंहतिसारवर्णस्नेहस्वरप्रकृति
सत्त्वमनूकमादौ । क्षेत्रंमृजांचविधिवत्कुशलो
वलोक्यसामुद्रविद्वदतियातमनागतंच ॥१॥

अर्थ—उन्मान ( उंची ), मान ( वजन ), गति, संहति, सार, वर्ण, स्नेह, स्वर, प्रकृति, सत्त्व, अनूक ( उपजतस्वभाव, प्रारब्ध ), क्षेत्र ( पादादि शिरांत दशविध ), मृजा ( छाया ) हीं सर्व लक्षणें कुशल पुरुष पाहून सामुद्रिक जाणणाराहोत्साता भूत व भविष्य फलें सांगतो ॥१॥

अस्वेदनौमृदुतलौकमलोदराभौश्लिष्टांगुलीरु
चिरताम्रनखौसुपार्ष्णी । उष्णौशिराविरहि
तौसुनिगूढगुल्फौकूर्मोन्नतौचचरणौमनुजेश्वरस्य २

अर्थ—घर्मरहित, तळवे मृदु, कमलाच्या गाभ्यासारखे पीतवर्ण, मिळालेल्या अंगुली, तेजस्वी व तांबडीं नखें, मागले भाग सुंदर, उन, शिरांनीं रहित, अत्यंत गुप्त आहेत गुल्फ ( पायांच्या खोटा ) ज्यांचे असे, कासवाच्या पाठीसारखे उन्नत असे, राजाचे चरण ( पाय ) होत ॥२॥

शूर्पाकारविरूक्षपांडुरनखौवक्रौशिरासंततौ
संशुष्कौविरलांगुलीचचरणौदारिद्र्यदुःखप्रदौ ।
मार्गायोत्कटकौकषायसदृशौवंशस्यविच्छित्ति
दौब्रह्मघ्नौपरिपक्वमृद्द्युतितलौपीतावगम्येरतौ ३

अर्थ—सुपासारखे, रूक्ष, पांढरीं नखें, वक्र ( वांकडे, दीर्घ ), शिरायुक्त, मांसरहित, विरल अंगुली, असे पाय दारिद्र्य व दुःख देणारे होत. उत्कटक ( मध्यें उंच, पादुकांच्या आकाराचे ) पाय मार्गामध्यें रत ( नित्य चालणारे ) होत. कषाय ( काळेतांबडे ) सदृश पाय वंशनाशकारक होत. भाजलेल्या मातीच्या वर्णाचे पाय ब्रह्महत्या करणारे होत. पीतवर्ण पाय अगम्यस्त्रीचाठाईं आसक्त होत ॥३॥

प्रविरलतनुरोमवृत्तजंघाद्विरदकरप्रतिमैर्वरो

रुभिश्च । उपचितसमजानवश्चभूपाधनरहि ताःश्वसृगालतुल्यजंघाः ॥४॥

अर्थ–विरळ व बारीक आहेत रोमें ज्यावर अशा व वर्तुळ जघा, ( नळे, पोटऱ्या ), हत्तीच्या शुंडेसारख्या माड्या, पुष्ट व सारखे जानु, या लक्षणांनीं युक्त राजे होत. कुतरा व कोल्हा यासारख्या जघांचे पुरुष दरिद्री होत ॥४॥

रोमैकैकंकूपकेपार्थिवानांद्वेद्वेज्ञेयेपंडितश्रोत्रियाणां । त्र्याद्यैर्निःस्वामानवादुःखभाजःकेशाश्चैवंनिंदिताःपूजिताश्च ॥५॥

अर्थ–प्रत्येक कूपकां ( रोमरध्रं ) मध्यें एक एक केश राजाचा व दोन दोन केश पंडित व वेदवेत्ता याचे, असतात. तीन चार केश असले तर ते मनुष्य निर्धन व दुःखी होतात. याप्रकारेंच मस्तकावरील्ही केश अशुभ व शुभ जाणावे ॥५॥

निर्मांसजानुर्म्रियतेप्रवासेसौभाग्यमल्पैर्विकटैर्दरिद्राः । स्त्रीनिर्जिताश्चापिभवंतिनिम्नैराज्यंसमांसैश्चमहद्भिरायुः ॥६॥

अर्थ–ज्याचे मांसरहित जानु ( गुडघे, टोंपर ) तो प्रवासामध्यें मरतो. कृशजानूंनीं सौभाग्य, विकट ( विस्तीर्ण ) जानूंनीं दरिद्री, निम्न ( खोल ) जानूंनीं स्त्रीजित, मांसयुक्त ( पुष्ट ) जानूंनीं राज्य, मोठ्या जानूंनीं आयुष्यवृद्धि, हीं फलें होतात ॥६॥

लिंगेल्पेधनवानपत्यरहितःस्थूलेविहीनोधनैर्मेढ्रेवामनतेसुतार्थरहितोवक्रेन्यथापुत्रवान् । दारिद्र्यंविनतेत्वधोल्पतनयोलिंगेशिरासंततेस्थूलग्रंथियुतेसुखीमृदुकरोत्यंतंप्रमेहादिभिः ॥७॥

अर्थ–शिश्न, आंखुड लहान असलें तर धनवान् व पुत्ररहित होतो; मोठें अ० दरिद्री, वामभागीं नत अ० पुत्र व धन यांहीं रहित, वाकडें असून दक्षिणनत असलें तर पुत्रवान्, खालीं नतअ० दरिद्र, शिश्नावर शिरा बहुत अ० थोडे पुत्र होतील, मोठ्या ग्रंथीनें युक्त असेल तर सुखी, शिश्न मृदु असतां प्रमेहादि रोगांनीं मृत्यु होतो ॥७॥

कोशनिगूढैर्भूपादीर्घैर्भग्नैश्च वित्तपरिहीनाः ।
ऋजुवृत्तशेफसोलघुशिरालशिश्नाश्च धनवंतः ॥८॥

अर्थ—ज्याचें शिश्न, कोशनिगूढ ( भात्यासारख्या त्वचेनें गुप्त ) ते राजे होतात. दीर्घ व स्फुटित ( अग्र बाहेर पडलेलें ) असता द्रव्यहीन, सरळ, वाटोळें, ऱ्हान, शिरायुक्त ज्याचें शिश्न ते धनवान् होतात ॥८॥

जलमृत्युरेकवृषणोविषमैःस्त्रीचंचलःसमैःक्षितिपः ।
ऱ्हस्वायुश्चोद्बद्धैःप्रलंबवृषणस्यशतमायुः ॥९॥

अर्थ—वृषण ( अंड ) एकचीचा असेल तर जलामध्यें मृत्यु होतो. विषम, ( १ लान की व १ मोठा ) अ० स्त्रियाची इच्छा करणारा, सारखा अ० राजा ऊर्ध्वबद्ध अ० अल्पायु, लांब वृषण अ० शतायु होतो ॥९॥

रक्तैराढ्यामणिभिर्निर्द्रव्याःपांडुरैश्चमलिनैश्च ।
सुखिनःसशब्दमूत्रानिःस्वानिःशब्दधाराश्च ॥१०॥
द्वित्रिचतुर्धाराभिःप्रदक्षिणावर्तवलितमूत्राभिः ।
पृथ्वीपतयोज्ञेयाविकीर्णमूत्राश्चधनहीनाः ॥११॥
एकैवमूत्रधारावलितारूपप्रदानसुतदात्री ।
स्निग्धोन्नतसममणयोधनवनितारत्नभोक्तारः ॥१२॥
मणिभिश्चमध्यनिम्नैःकन्यापितरोभवंतिनिःस्वाश्च ।
बहुपशुभाजोमध्योन्नतैश्चनात्युल्बणैर्धनिनः ॥१३॥

अर्थ—तांबडामणि ( शिश्नाचा शेवट, मोटाभाग ) असता राजे होतात. पांढरा व मलिन अ० दरिद्री होतात. ज्याचें मूत्र शब्दयुक्त ते सुखी, ज्याची निःशब्द मूत्रधारा ते दरिद्री ॥१०॥ ज्याच्या मूत्राच्या धारा २।३।४ व प्रदक्षिण फिरण्यानें वेष्टित मूत्रधारा, ते राजे होतात. ज्याचें विकीर्ण ( थावून होणारें ) मूत्र ते दरिद्री होतात ॥११॥ जी मूत्रधारा एकच असून वेष्टित, ती सुंदर रूप करणारी होय, पुत्र देणारी नाहीं. ( कोणी, रूपप्रधान सुतदात्री असें ह्मणतात त्यांचे मतीं, रूप व उत्तमपुत्र देणारी ) स्निग्ध, उंच, सम असा मणि ज्याचा ते द्रव्य, स्त्री, रत्नें, पानें भोगणारे होतात ॥१२॥ मणि, मध्यें निम्न असता कन्येचे बाप व दरिद्री होतात. मध्यें उंच अ० बहुत पशूंचे बाळगणारे होतात. फार मोठा मणि नसेल तर धनवान् होतात ॥१३॥

परिशुष्कबस्तिशीर्षैर्धनरहितादुर्भगाश्चविज्ञेयाः ।
कुसुमसमगंधशुक्राविज्ञातव्यामहीपालाः ॥१४॥
मधुगंधेबहुवित्तामत्स्यसगंधेबहून्यपत्यानि ।
तनुशुक्रःस्त्रीजनकोमांससगंधोमहाभोगी ॥१५॥
मदिरागंधेयज्वाक्षारसगंधेचरेतसिदरिद्रः ।
शीघ्रंमैथुनगामीदीर्घायुरतोन्यथाल्पायुः ॥१६॥

अर्थ—बस्ति (नाभीखालील व शिश्नावरचा भाग) शीर्ष शुष्क अ० दरिद्री व लोकांस अप्रिय होतात. पुष्पतुल्य सुगंधि रेत (धातु) ज्यांचें ते राजे होतात ॥१४ मधासारखा रेताचा गंध अ० धनवान्, मत्स्यतुल्य रेतगंध अ० बहुत मुलें होतात, स्वल्परेत अ० कन्या होतात, मांसतुल्य रेतगंध अ० सुखादि भोगणारा होतो १५ मद्यतुल्य रेतगंध अ० याज्ञिक होतो. क्षारतुल्य रेतगंध अ० दरिद्री होतो. शीघ्र जो मैथुनगामी तो दीर्घायु व चिरकाल मैथुन करणारा अल्पायु होतो ॥१६॥

निःस्वोतिस्थूलस्फिक्समांसलस्फिक्सुखान्वि
तोभवति । व्याघ्रांतोध्यर्धस्फिग्मंडूकस्फिग्न
राधिपतिः ॥१७॥

अर्थ—कुले फार मोठे ज्याचे तो दरिद्री, कुले मांसल अ० सुखयुक्त होतो. अध्यर्ध (दीड) कुला ज्याचा त्याला व्याघ्रापासून मृत्यु. बेडकासारखे ज्याचे कुले तो राजा होतो ॥१७॥

सिंहकटिर्मनुजेंद्रःकपिकरभकटिर्धनैःपरित्यक्तः ।
समजठराभोगयुताघटपिठरनिभोदरानिःस्वाः ॥१८॥

अर्थ—सिंहासारखी ज्याची कमर तो राजा होतो. वानर व उंट यांसारखी कमर तो दरिद्री, सम (उंच सखल नाहीं) ज्यांचें उदर ते सुखी, घागर व पिठर (सपेली) यांसारखें ज्यांचे उदर ते दरिद्री होतात ॥१८॥

अविकलपार्श्वाधनिनोनिम्नैर्वक्रैश्चभोगसंत्यक्ताः ।
समकुक्षाभोगाढ्यानिम्नाभिर्भोगपरिहीनाः ॥१९॥
उन्नतकुक्षाःक्षितिपाःकुटिलाःस्युर्मानवाविषमकुक्षाः ।
सर्पोदरादरिद्राभवंतिबव्हाशिनश्चैव ॥२०॥

अर्थ–परिपूर्ण मांसल पार्श्व ( कमरेवर चार अंगुळें ) भाग अ० धनवान्, खोल व वक्र पार्श्व अ० दुःखी, कुक्षा ( उदरमध्यभाग ) सम अ० भोगयुक्त, निम्न कुक्षा अ० भोगरहित होतात ॥१९॥ उंच कुक्षा अ० राजे, विषम ( उंचसखल ) ज्या मनुष्यांची कुक्षा ते कपटी, सर्पाकारसें ज्यांचें उदर ते दरिद्री व बहुत खाणारे होतात ॥२०॥

परिमंडलोन्नताभिर्विस्तीर्णाभिश्चनाभिभिःसुखिनः ।
स्वल्पात्वदृश्यनिम्नानाभिःक्लेशावहाभवति ॥२१॥
वलिमध्यगताविषमाशूलाबाधंकरोतिनैःस्व्यंच ।
शाठ्यंवामावर्ताकरोतिमेधांप्रदक्षिणतः ॥२२॥
पार्श्वायताचिरायुषमुपरिष्टाच्चेश्वरंगवाढ्यमधः ।
शतपत्रकर्णिकाभानाभिर्मनुजेश्वरंकुरुते ॥२३॥

अर्थ–वर्तुल, उंच व विस्तीर्ण नाभि असतां सुख होतें. लहान, अदृश्य व खोल नाभि अ० दुःख होतें ॥२१॥ वलीमध्यें व उंचसखल नाभि अ० शूलानें मृत्यु व दरिद्र होतें. वामावर्त ( डावी फिरलेली अ० ) कपटस्वभाव होतो. उजवी फिरलेली असतां बुद्धिमान् होतो ॥२२॥ बाजूस विस्तीर्ण नाभि अ० चिरायु, वर विस्ती० समृद्ध, खालीं विस्ती० गाई इ० कांनीं युक्त होतो. कमळाच्या मध्यभागासारखी मध्योन्नत नाभि असतां राजा होतो ॥२३॥

शस्त्रांतंस्त्रीभोगिनमाचार्यंबहुसुतंयथासंख्यं ।
एकद्वित्रिचतुर्भिर्वलिभिर्विद्यान्नृपंत्ववलिं ॥२४॥
विषमवलयोमनुष्याभवंत्यगम्याभिगामिनः पापाः । ऋजुवलयःसुखभाजःपरदारद्वेषिणश्चैव ॥२५॥

अर्थ–१।२।३।४ अशा पोटावर वळ्या अ० अनुक्रमानें शस्त्रमृत्यु, स्त्रीभोगी, उपदेशक, बहुतपुत्र हीं फळें होतात. वळि नसतां राजा होतो ॥२४॥ उंचसखल वळि अ० अगम्यस्त्रीगमनकर्ते व पापी होतात. सरळ वळि अ० सुखी व परस्त्रीचे द्वेषकर्ते होतात ॥२५॥

मांसलमृदुभिःपार्श्वैःप्रदक्षिणावर्तरोमभिर्भूपाः ।
विपरीतैर्निर्द्रव्याःसुखपरिहीनाःपरप्रेष्याः ॥२६॥

अर्थ–पुष्ट व मृदु व दक्षिणावर्त केश असे पार्श्व भाग(कुक्षीवरील चार अंगुलें) असता राजे होतात; याहून अन्यथा ( अपुष्ट, रूक्ष, वामावर्तकेश ) अ० दरिद्री, दुःखी व दुसऱ्याचे सेवक होतात ॥२६॥

सुभगाभवंत्यनुद्धद्धचूचुकानिर्धनाविषमदीर्घैः ।
पीनोपचितनिमग्नैःक्षितिपतयश्चूचुकैःसुखिनः ॥२७॥

अर्थ–अनुद्वद्ध ( फार उच नव्हत ) अशीं चूचुकें ( स्तनाग्रें ) अ० द्रव्यवान् होतात. दोनही सारखीं नव्हत व लांब चूचुकें अ० दरिद्री होतात. कठिन, पुष्ट, निमग्न ( खोल ) चूचुकें अ० राजे व सुखी होतात॥२७॥

हृदयंसमुन्नतंपृथुनवेपनंमांसलंचनृपतीनां ।
अधमानांविपरीतंखररोमचितंशिरालंच ॥२८॥

अर्थ–उच्च, विस्तीर्ण, अकंपन, पुष्ट असें हृदय राजाचें होय. पूर्वोक्ताहून विपरीत व रूक्षकेशांनीं युक्त, शिरायुक्त असें हृदय दरिद्र्याचें होय ॥२८॥

समवक्षसोर्थवंतःपीनैःशूरास्त्वकिंचनास्तनुभिः ।
विषमंवक्षोयेषांतेनिःस्वाःशस्त्रनिधनाश्च ॥२९॥

अर्थ–उरस्थल सम ( सारखें ) अ० द्रव्यवान्, पुष्ट (कठिन) अ० शूर, कृश, अ० दरिद्री, विषम ( उच सखल ) अ० दरिद्री व शस्त्रानें मरणारे असे होतात ॥२९॥

विषमैर्विषमोजत्रुभिरर्थविहीनोस्थिसंधिपरिणद्धैः ।
उन्नतजत्रुर्भोगीनिम्नैर्निःस्वोर्थवान्पीनैः ॥३०॥

अर्थ–जत्रु ( उर आणि कंठ यांचा संधि, सरी ) विषम अ० क्रूर होतो. हाडांच्या संधींनीं बद्ध अ० दरिद्री, उच्च अ० भोगयुक्त, खोल अ० दरिद्री, पुष्ट अ० द्रव्यवान् असा होतो ॥३०॥

चिपिटग्रीवोनिःस्वःशुष्कासशिराचयस्यवाग्रीवा ।
महिषग्रीवःशूरःशस्त्रांतोवृषसमग्रीवः ॥३१॥
कंबुग्रीवोराजाप्रलंबकंठःप्रभक्षणोभवति ।
पृष्ठमभग्नमरोमशमर्थवतामशुभदमतोन्यत् ॥३२॥

अर्थ–मान चपटी, शुष्क व शिरायुक्त अ० निर्धन होतो. महिषासारखी मान अ०

शूर, वैलासारखी अ० शस्त्रमरण ॥३१॥ कंबु ( वळित्रययुक्त ) ग्रीवा अ० राजा, लांब कंठ अ० भक्षणशील होतो. पाठ अस्फुटित व केशरहित अ० धनवान होतो. याहून अन्य अशुभ होय ॥३२॥

अस्वेदनपीतोन्नतसुगंधिसमरोमसंकुलाःकक्षाः ।
विज्ञातव्याधनिनामतोन्यथार्थैर्विहीनानां ॥३३॥

अर्थ–घर्मरहित, पुष्ट, उंच, सुगंधि, सम, केशयुक्त अशी कक्षा ( बाहुमूल ) द्रव्यवानाची जाणावी. याहून अन्य दरिद्र्याची होय ॥३३॥

निर्मांसौरोमचितौभग्नावल्पौचनिर्धनस्यांसौ ।
विपुलावव्युच्छिन्नौसुश्लिष्टौसौख्यवीर्यवतां ॥३४॥

अर्थ–मांसरहित, केशयुक्त, स्फुटित, अविस्तीर्ण असे स्कंध दरिद्र्याचे होत. विस्तीर्ण, अस्फुटित व सलग्न असे स्कंध सुखी व बलिष्ठ याचे होतात ॥३४॥

करिकरसदृशौवृत्तावाजान्ववलंबिनौसमौपीनौ ।
बाहूपृथिवीशानामधनानांरोमशौह्रस्वौ ॥३५॥

अर्थ–हत्तीच्या शुंडेसारखे, वाटोळे, जानूपर्यंत लांब, सारखे व पुष्ट असे बाहु राजाचे होत. केशयुक्त व आंखूड बाहु दरिद्र्याचे होत ॥३५॥

हस्तांगुलयोदीर्घाश्चिरायुषामवलिताश्चसुभगानां ।
मेधाविनांचसूक्ष्माश्चिपिटाःपरकर्मनिरतानां ॥३६॥
स्थूलाभिर्धनरहितावहिर्नताभिश्चशस्त्रनिर्याणाः ।
कपिसदृशकराधनिनोव्याघ्रोपमपाणयःपापाः ॥३७॥

अर्थ– हस्तांच्या अंगुलि, लांब असतां दीर्घायु होतात. अवलित ( सुस्पष्ट ) अ० सौभाग्ययुक्त होतात. सूक्ष्म ( बारीक ) अ० ज्ञानी, चेपटलेल्या अ० दुसऱ्याचे चाकर होतात ॥३६॥ हस्तांगुलि मोठ्या अ० दरिद्री, बाहेर लवल्या अ० शस्त्र मृत्यु, वानराच्या हातांसारखे हात अ० धनवान्, व्याघ्राच्या हातासारखे हात असतां, पापी होतात ॥३७॥

मणिबंधनैर्निगूढैर्दृढैश्चसुश्लिष्टसंधिभिर्भूपाः ।
हीनैर्हस्तच्छेदःश्लथैःसशब्दैश्चनिर्द्रव्याः ॥३८॥

अर्थ—मणिबंध ( मणगट ) अस्पष्ट, दृढ, सुसंलग्नसंधि असे अ० राजे होतात. मणिबंध हीन अ० हस्तच्छेद होतो. शिथिल व शब्दयुक्त मणिबंध असतां, दरिद्री होतात ॥३८॥

पितृवित्तेनविहीनाभवंतिनिम्नेनकरतलेननराः ।
संवृतनिम्नैर्धनिनःप्रोत्तानकराश्चदातारः ॥३९॥
विषमैर्विषमानिःस्वाश्चकरतलैरीश्वरास्तुलाक्षाभैः ।
पीतैरगम्यवनिताभिगामिनोनिर्धनारूक्षैः ॥४०॥

अर्थ—हस्ततल, उंच नसतां, पितृद्रव्यरहित मनुष्य होतात. समवर्तुल, निम्न ( खोल ) असतां धनवान्, अत्यंत उंच हस्त अ० दान करणारे होतात ॥३९॥ असम करतल अ० क्रूर व दरिद्री होतात. लाखेसारखे तांबडे करतल अ० राजे होतात. पिवळे अ० अगम्यस्त्रीगामी होतात. रखरखीत अ० दरिद्री होतात ४०

तुषसदृशनखाःक्लीबाश्चिपिटैःस्फुटितैश्चवित्तसंत्यक्ताः ।
कुनखविवर्णैःपरतर्ककाश्चताम्रैश्चमूपतयः ॥४१॥

अर्थ—कोंड्यासारखी नखें अ० नपुंसक होतात. चेपटलेलीं किंवा फुटलेलीं अ० दरिद्री होतात. कुत्सित व विवर्ण नखें अ० परतर्कुक ( दुसऱ्याचें सुख पाहणारे ) होतात. तांबडीं नखें अ० सेनापति होतात ॥४१॥

अंगुष्ठयवैराढ्याःसुतवंतोंगुष्ठमूलगैश्चयवैः ।
दीर्घांगुलिपर्वाणःसुभगादीर्घायुषश्चैव ॥४२॥

अर्थ—अंगुष्ठमध्यभागीं यव ( जवाकार ) अ० द्रव्यवान्, अंगुष्ठमूलीं यव अ० पुत्रवान्, लांब अंगुलिपर्वें अ० सौभाग्ययुक्त व दीर्घायु होतात ॥४२॥

स्निग्धानिम्नारेखाधनिनांतद्व्यत्ययेननिःस्वानां ।
विरलांगुलयोनिःस्वाधनसंचयिनोघनांगुलयः ॥४३॥

अर्थ—धनवंतांच्या हस्तगत रेषा स्निग्ध व खोल असतात. यांहून अन्य दरिद्र्यांच्या होतात. विरल अंगुलि ज्यांच्या ते दरिद्री व घट्ट ज्यांच्या अंगुलि ते द्रव्यसंचय करणारे होतात ॥४३॥

तिस्रोरेखामणिबंधनोत्थिताःकरतलोपगानृपतेः ।
मीनयुगांकितपाणिर्नित्यंसत्रप्रदोभवति ॥४४॥
वज्राकाराधनिनांविद्याभाजांतुमीनपुच्छनिभाः ।
शंखातपत्रशिबिकागजाश्वपद्मोपमानृपतेः ॥४५॥
कलशमृणालपताकांकुशोपमाभिर्भवंतिनिधिपालाः ।
दामनिभाभिश्चाढ्याःस्वस्तिकरूपाभिरैश्वर्यं ॥४६॥
चक्रासिपरशुतोमरशक्तिधनुःकुंतसंनिभारेखाः ।
कुर्वंतिचमूनाथंयज्वानमुलूखलाकाराः ॥४७॥
मकरध्वजकोष्ठागारसंनिभाभिर्महाधनोपेताः ।
वेदीनिभेनचैवाग्निहोत्रिणोब्रह्मतीर्थेन ॥४८॥
वापीदेवकुलाद्यैर्धर्मंकुर्वंतिचत्रिकोणाभिः ।
अंगुष्ठमूलरेखाःपुत्राःस्युर्दारिकाःसूक्ष्माः ॥४९॥
रेखाःप्रदेशिनीगाःशतायुषंकल्पनीयमूनाभिः ।
छिन्नाभिर्द्रुमपतनंबहुरेखारेखिणोनिःस्वाः ॥५०॥

अर्थ–मणिबंधापासून उत्पन्न होऊन हस्ततलाप्रत गेलेल्या तीन रेषा राजाच्या होत. दोनमत्स्यांनी युक्त हस्त ज्याचा तो यज्ञामध्ये बहुत अन्न देणारा होतो ( बहुत यज्ञ करतो ) ॥४४॥ धनवंतांच्या हस्तावर वज्रासारख्या रेषा होतात. विद्यावंतांच्या हस्तांवर मत्स्यपुच्छासारख्या रेषा होतात. शंख, छत्र, पालखी, हत्ती, घोडा, कमल यांसारख्या रेषा राजांच्या हस्तांवर होतात ॥४५॥ कलश, कमळाची देंटी, पताका ( निशाण ), अंकुश, यांसारख्या रेषांनीं द्रव्यवान् होतात. दाम् ( दावें ) सारख्या रेषांनी धनवान् होतात. स्वस्तिकासारख्या रेषांनी ऐश्वर्यवान् होतात ॥४६॥ चक्र, तलवार, फरशी, तोमर ( गुरगुज, हा मुसळण्याच्या रवीसारखा असतो ), शक्ति ( शास्त्रवि० सेवी ), धनुष्य, भाला यांसारख्या रेषा हस्तगत अ० सेनापति होतो. उखळासारख्या रेषा अ० यज्ञकर्ता होतो ॥४७॥ मकर ( मगर, सुसर ), चिन्ह, कोठार यांसारख्या रेषांनी बहुधनानें युक्त होतात. वेदी ( यज्ञभूमि ) सारख्या ब्रह्मतीर्थानें ( अंगुष्ठमूलानें ) अग्निहोत्री होतात ॥४८॥ वापी ( जलाशय ), देवालय, सिंहासन इत्यादिकांसारख्या रेषा हातावर अ० धार्मिक होतात. त्रिकोण रेषा अ० धार्मिकच होतात. अंगुष्ठमूलीं जितक्या स्थूल रेषा तितके पुत्र होतात. त्यांत बारीक असतील तितक्या कन्या होतात ॥४९॥ प्रदे-

शिनी (अगुष्ठाजवळची) मत गेलेल्या रेषाही शतायु होतात. त्यांहून जशा कमी असतील तसें आयुष्य कमी कल्पावें. त्या छिन्न(तुटलेल्या) असतील तर वृक्षावरून पतन होतें. बहुत रेषा असतील अथवा रेषा नसतील तर ते दरिद्री होतात ५०

अतिकृशदीर्घैश्चिबुकैर्निर्द्रव्यामांसलैर्धनोपेताः ।
बिंबोपमैरवक्रैरधरैर्भूपास्तनुभिरस्वाः ॥५१॥
ओष्ठैःस्फुटितविखंडितविवर्णरूक्षैश्चधनपरित्यक्ताः ।
स्निग्धाघनाश्चदशनाःसुतीक्ष्णदंष्ट्राःसमाश्चशुभाः ॥५२॥

अर्थ–चिबुक (अधरोष्ठाच्या खालचा भाग) फार कृश व दीर्घ अ० दरिद्री होतात. पुष्ट अ० द्रव्यवान् होतात. ओष्ठ पिकलेल्या तोंडल्यासारखे तांबडे व सरळ अ० राजे होतात. कृश अ० निर्धन होतात ॥५१॥ उत्तरोष्ठ फुटलेले, तुटलेले, विगतवर्ण, रूक्ष असे अ० दरिद्री होतात. दांत निर्मळ, दाट, अग्रत तीक्ष्ण दाढा, सम असे शुभ होत ॥५२॥

जिव्हारक्तादीर्घाश्लक्ष्णासुसमाचभोगिनांज्ञेया ।
श्वेताकृष्णापरुषानिर्द्रव्याणांतथाताल ॥५३॥

अर्थ–जिव्हा तांबडी, दीर्घ, पातळ व सम अशी सुखयुक्तांची जाणावी. पांढरी, काळी, परुष (कठोर) अशी जिव्हा दरिद्र्याची जाणावी. जिव्हेसारखीच तालुही जाणावी ॥५३॥

वक्त्रंसौम्यंसंवृतममलंश्लक्ष्णंसमंचभूपानां ।
विपरीतंक्लेशभुजांमहामुखंदुर्भगाणांच ॥५४॥

अर्थ–सौम्य, संवृत (वर्तुल), स्वच्छ, नातिपुष्ट, सम असें मुख राजांचें होतें. यांहून विपरीत दुःखी पुरुषांचें होतें. अतिविस्तीर्ण मुख दुर्भाग्यपुरुषांचें होतें ५४।

स्त्रीमुखमनपत्यानांशाठ्यवतांमंडलंपरिज्ञेयं ।
दीर्घनिर्द्रव्याणांभीरुमुखाःपापकर्माणः ॥५५॥
चतुरस्रंधूर्तानांनिम्नंवक्त्रंचतनयरहितानां ।
कृपणानामतिह्रस्वंसंपूर्णंभोगिनांकांतं ॥५६॥

अर्थ–अपत्यरहितांचें मुख स्त्रीमुखासारखें होय. परकार्यविमुखाचें वर्तुळमुख जाणावें. दरिद्र्यांचें लांब मुख होतें. भ्याल्यासारखें मुख ज्यांचें ते पापी जाणावे ॥५५॥ दुस-

न्यास ठकविणारांचे मुख चतुष्कोण जाणावें. खोलकट मुख पुत्ररहितांचे जाणावें. फार आंखूड मुख कृपणाचें जाणावें. पुष्ट व तेजस्वी मुख सुखयुक्तांचें होतें ॥५६॥

अस्फुटिताग्रंस्निग्धंश्मश्रुशुभंमृदुचसंनतंचैव ।
रक्तैःपरुषैश्चौराःश्मश्रुभिरल्पैश्चविज्ञेयाः ॥५७॥

अर्थ—पुरुषाचे मुखावरचे दाढी मिशी इ० केश शेवटास फुटलेले नव्हत, स्निग्ध, मृदु, नम्र असे शुभ होत. तांबडे व रसरखीत, अल्प असे श्मश्रु (दाढीमिशी) अ० चोर होतात ॥५७॥

निर्मांसैःकर्णैःपापमृत्यवश्चर्पटैःसुबहुभोगाः ।
कृपणाश्चन्हस्वकर्णाःशंकुश्रवणाश्चभूपतयः ॥५८॥
रोमशकर्णादीर्घायुषस्तुधनभोगिनोविपुलकर्णाः ।
क्रूराःशिरावनद्धैर्व्यालंबैर्मांसलैःसुखिनः ॥५९॥

अर्थ—मांसरहित कर्ण असतां पापकर्मानें मृत्यु होतो. चर्पट (विस्तीर्ण) असतां सुखी होतात. कर्ण आंखूड असतां कृपण, तीक्ष्णाग्र कर्ण राजे होतात ॥ ५८ ॥ केशयुक्तकर्णांचे पुरुष दीर्घायु होतात. विस्तीर्णकर्ण धनवान् होतात. शिरायुक्तकर्ण असतां क्रूर होतात. लांब व पुष्ट कर्ण असतां सुखी होतात ॥५९॥

भोगीत्वनिम्नगंडोमंत्रीसंपूर्णमांसगंडोयः ।
सुखभाक्शुकसमनासश्चिरजीवीशुष्कनासश्च ६०
छिन्नानुरूपयागम्यगामिनोदीर्घयातुसौभाग्यं ।
आकुंचितयाचौरःस्त्रीमृत्युःस्याच्चिपिटनासः ॥६१॥
धनिनोग्रवक्रनासादक्षिणवक्राःप्रभक्षणाःक्रूराः ।
ऋज्वीस्वल्पच्छिद्रासुपुटानासासभाग्यानां ॥६२॥

अर्थ—गाल उंच असतां भोगयुक्त, मांसल (पुष्ट) असतां प्रधान होतो. नाक पोपटाच्या चोंचीसारखें असतां सुखी, शुष्क असतां चिरायुष्य ॥६०॥ तुटल्यासारखें अ० अगम्यस्त्रीगमनकर्ता, लांब असतां सौभाग्यवान्, आकुंचित (आंखूड) असतां चोर, चेपटलेलें असतां स्त्रीपासून मृत्यु ॥६१॥ नाकाचें अग्र वाकडें अ० धनवान्, उजव्याआंगीं वक्र असतां बहुत खाणार व क्रूर, सरळ, बारीक भोंकें, सुंदर पुटें (नाकपुड्या), असें नाक भाग्ययुक्त पुरुषांचें होतें ॥६२॥

धनिनांक्षुतंसकृत्द्वित्रिपिंडितंल्हादिसानुनादंच ।
दीर्घायुषांप्रमुक्तंविज्ञेयंसंहतंचैव ॥६३॥

अर्थ–धनवंताची शिंक एक, दीर्घायु पुरुषाच्या शिंका २ किंवा ३; आनंदकारक, सानुनाद ( घुमणार ), अतिदीर्घ, संहत ( जोडलेला ) असा शिंकेचा शब्द दीर्घायु-पुरुषाचा होय ॥६३॥

पद्मदलाभैर्धनिनोरक्तांतविलोचनाःश्रियोभाजः ।
मधुपिंगलैर्महार्थामार्जारविलोचनाःपापाः ॥६४॥
हरिणाक्षामंडललोचनाश्चजिह्मैश्चलोचनैश्चौराः ।
क्रूराःकेकरनेत्रागजसदृशदृशश्चभूपतयः ॥६५॥
ऐश्वर्यंगंभीरैर्नीलोत्पलकांतिभिश्चविद्वांसः ।
अतिकृष्णतारकाणामक्ष्णामुत्पाटनंभवति ॥६६॥
मंत्रित्वंस्थूलदृशांश्यावाक्षाणांचभवतिसौभाग्यं ।
दीनादृग्निःस्वानांस्निग्धाविपुलार्थभोगवतां ॥६७॥

अर्थ–नेत्र कमलपत्रासारखे अ० धनवान्, शेवटास तांबडे अ० लक्ष्मीवान्, मधासारखे पिंगटवर्ण अ० महाधन, मांजरासारखे अ० पापी, ॥६४॥ हरिणासारखे, वाटोळे, जिह्म ( कुटिल ), अशा डोळ्याचे चोर; तिरके अ० क्रूर, हत्तीसारखे अ० राजे, असे होतात ॥६५॥ खोलनेत्र अ० ऐश्वर्य, नीलकमलासारखे अ० विद्वान्, फार काळे बुबुळ अ० नेत्रांचे उत्पाटन होते ॥६६॥ नेत्रांतील बुबुळ मोठे अ० प्रधान, श्याव ( उदीरग ) नेत्र अ० सौभाग्य, दीनदृष्टि अ० निर्धन; निर्मल व विस्तीर्ण दृष्टि अ० द्रव्यवान् व सुखी होतात ॥६७॥

अभ्युन्नताभिरल्पायुषोविशालोन्नताभिरतिसुखिनः ।
विषमभ्रुवोदरिद्रावालेंदुनतभ्रुवःसधनाः ॥६८॥
दीर्घासंसक्ताभिर्धनिनःखंडाभिरर्थपरिहीनाः ।
मध्यविनतभ्रुवोयेतेसक्ताःस्त्रीष्वगम्यासु ॥६९॥

अर्थ–भिंवया अनुक्रमाने उच्च अ० अल्पायु, विस्तीर्ण व उच्च अ० सुखी, विषम अ० दरिद्री, बालचंद्रासारख्या नत अ० धनवान् ॥६८॥ दीर्घ व असंबद्ध अ० धनवान, तुटलेल्या अ० दरिद्री, मध्ये नमलेल्या अ० अगम्यस्त्रीचाठाई आसक्त, असे होतात ॥६९॥

उन्नतविपुलैःशंखैर्धनिनोनिम्नैःसुतार्थसंत्यक्ताः ।
विषमललाटाविधनाधनवंतोर्धेंदुसदृशेन ॥७०॥
शुक्तिविशालैराचार्यताशिरासंततैरधर्मरताः ।
उन्नतशिराभिराढ्याःस्वस्तिकवत्संस्थिताभिश्च ॥७१॥
निम्नललाटावधबंधभागिनःक्रूरकर्मनिरताश्च ।
अभ्युन्नतैश्चभूपाःकृपणाःस्युःसंकटललाटाः ॥७२॥

अर्थ—कंठावरील भाग उंच व विस्तीर्ण अ० धनवान्, निम्न (नीच) अ० पुत्र व द्रव्य यांहीं हीन होतात. ललाट (कपाळ) असम अ० निर्धन, अर्धचंद्राकारखें अ० धनवान् होतात ॥७०॥ शिंप्यासारखें विस्तीर्ण अ० आचार्यत्व, शिरांनीं व्याप्त अ० अधर्मरत, उंच व स्वस्तिकासारख्या शिरा अ० धनवान् होतात ॥७१॥ खोलकट अ० वध व बंध भोगितात व पापकर्मरतही होतात. उंच अ० राजे होतात. संकट (आकुंचित, अल्प) ललाट अ० कृपण (दानशील नव्हत) असे होतात ॥७२॥

रुदितमदीनमनश्रुस्निग्धंचशुभावहंमनुष्याणां ।
रूक्षंदीनंप्रचुराश्रुचैवनशुभप्रदंपुंसां ॥७३॥

अर्थ—दैन्यरहित, अश्रु (नेत्रोदक) रहित व स्निग्ध असें रोदन (रडणें) मनुष्यांस शुभ होय, रूक्ष, दीन व बहुतनेत्रोदकयुक्त असें रोदन पुरुषांस अशुभकारक होय ॥७३॥

हसितंशुभदमकंपंविनिमीलितलोचनंचपापस्य ।
दृष्टस्यहसितमसकृत्सोन्मादस्यासकृत्प्रांते ॥७४॥

अर्थ—कंपरहित हास्य शुभ होय. दुष्टाचें हास्य डोळे मिटून होतें. आनंदाचें हास्य वारंवार (बहुत) होतें. हसनांतीं वारंवार हास्य, मद्यपानादिकानें मत्ताचें होतें ॥७४॥

तिस्त्रोरेखाःशतजीविनांललाटायताःस्थितायदिताः ।
चतसृभिरवनीशत्वंनवतिश्चायुःसपंचाब्दा ॥७५॥
विच्छिन्नाभिश्चागम्यगामिनोनवतिरप्यरेखेण ।
केशांतोपगताभीरेखाभिरशीतिवर्षायुः ॥७६॥

पंचभिरायुःसप्ततिरेकाग्रावस्थिताभिरपिषष्टिः ।
बहुरेखेणशतार्धंचत्वारिंशच्चवक्राभिः ॥७७॥
त्रिंशद्भ्रूलग्नाभिर्विंशतिकश्चैववामवक्राभिः ।
क्षुद्राभिःस्वल्पायुर्न्यूनाभिश्चांतरेकल्प्यं ॥७८॥

अर्थ—ललाटावर लांब तीन रेषा अ० १०० वर्षे आयुष्य, चार रेषा अ० राजा होतो व ९५ वर्षे आयुष्य, ॥७५॥ ललाटरेषा विच्छिन्न किंवा रेषारहित ललाट अ० ९० वर्षे आयुष्य व अगम्यस्त्रीगमनकर्ता होतो. केशांपर्यंत लांब रेषा गेल्या अ० ८० वर्षे आयुष्य, ॥७६॥ पाच रेषा अ० ७० वर्षे आयुष्य, सर्व रेषा शेवटास एकत्र मिळाल्या अ० ६० वर्षे, बहुतरेषा अ० ५० वर्षे, वांकड्या रेषा अ० ४० वर्षे, ॥७७॥ भिवयांस रेषा मिळाल्या अ० ३० वर्षे, डाव्या आंगास वाकड्या अ० २० वर्षे, सूक्ष्म (फार बारीक) रेषा अ० अल्पायुषी होतात. सांगितल्याहून न्यून १।२ रेषा अ०ही स्वल्पायु होतात. तीन रेषांनीं १०० व चार रेषांनीं ९५ यांमधील आयुष्याची कल्पना कमीजास्तीवरून करावी ॥७८

परिमंडलैर्गवाढ्याश्छत्राकारैःशिरोभिरवनीशाः ।
चिपिटैःपितृमातृघ्नाःकरोटिशिरसांचिरान्मृत्युः ॥७९॥
घटमूर्धाध्वानरुचिर्द्विमस्तकःपापकृद्धनैस्त्यक्तः ।
निम्नंतुशिरोमहतांबहुनिम्नमनर्थदंभवति ॥८०॥

अर्थ—परिमंडल (वाटोळें) मस्तक अ० गाईनीं युक्त होतात. छत्राकार (नरमोठें) मस्तक असतां राजे होतात. चपटें मस्तक अ० आईबापांचा नाश करतात. करोटी (टोपी, पागोटें) सारखें मस्तक अ० चिरायुष होतात ॥७९॥ घट (कुंभ) सदृश मस्तक अ० अध्वानरुचि (मार्गगमनप्रीति) होतो. द्विमस्तक पापकर्ता व निर्धन होतो. खोलवट मस्तक अ० श्रेष्ठ होतात. फार खोलवट मस्तक अ० दुःखी होतात ॥८०॥

एकैकभवैःस्निग्धैःकृष्णैराकुंचितैरभिन्नाग्रैः ।
मृदुभिर्नचातिबहुभिःकेशैःसुखभाग्नरेंद्रोवा ॥८१॥
बहुमूलविषमकपिलाःस्थूलस्फुटिताग्रपरुषह्रस्वाश्च ।
अतिकुटिलाश्चातिघनाश्चमूर्धजावित्तहीनानां ॥८२॥

अर्थ—एकेक रोमरंध्रांत एकेक, स्निग्ध, काळे, आकुंचित, अग्रास दोन तीन फांटे

फुटलेले नाहीत, मृदु, फार नाहीत असे केश असतां सुखी अथवा राजा होतो ८१॥ एक रोमरंध्रामध्ये बहुत, कांहीं आंखूड व कांहीं लांब, कपिलवर्ण, जाड, फुटलेलीं अग्रें, रूक्ष, आंखूड, फारवांकडे, फारदाट, असे केश असता दरिद्री होतात ८२

यद्यद्गात्रंरूक्षंमांसविहीनंशिरावनद्धंच।
तत्तदनिष्टंप्रोक्तंविपरीतमतःशुभंप्रोक्तं ॥८३॥

अर्थ–जो जो शरीराचा अवयव रूक्ष, मांसहीन, शिरायुक्त, तो तो अशुभ होय. याहून विपरीत स्न० स्निग्ध, मांसयुक्त, शिरारहित अवयव तो शुभ सांगीतला ॥८३

त्रिषुविपुलोगंभीरस्त्रिष्वेवषडुन्नतश्चतुर्ह्रस्वः
सप्तसुरक्तोराजापंचसुदीर्घश्चसूक्ष्मश्च ॥८४॥

अर्थ–तीनजागीं विस्तीर्ण, तीनजागीं गंभीर ( खोल ), सहाजागीं उंच, चारजागीं ऱ्हस्व, सातजागीं तांबडा, पांचजागीं लांब, पांचजागी बारीक असा जो पुरुष तो राजा होतो. याचा विस्तार पुढे आहे ॥८४॥

नाभिःस्वरःसत्वमितिप्रदिष्टंगंभीरमेतत्त्रितयंनराणां ।
उरोललाटंवदनंचपुंसांविस्तीर्णमेतत्त्रितयंप्रशस्तं ॥८५
वक्षोथकक्षानखनासिकास्यंकृकाटिकाचेतिषडुन्नतानि ।
ऱ्हस्वानिचत्वारिचलिंगपृष्ठंग्रीवाचजंघेचहितप्रदानि ८६
नेत्रांतपादकरताल्वधरोष्ठजिव्हारक्तानखाश्चखलुसप्तसु
खावहानि । सूक्ष्माणिपंचदशनांगुलिपर्वकेशाःसाकं
त्वचाकररुहाश्चनदुःखितानां ॥८७॥ हनुलोचनबाहु
नासिकाःस्तनयोरंतरमत्रपंचमं । इतिदीर्घमिदंतुपंच
कंनभवत्येवनृणामभूभुजां ॥८८॥

अर्थ–नाभि, स्वर, धैर्य हीं ३ मनुष्यांचीं खोल असावीं. उर, ललाट, मुख हीं ३ विस्तीर्ण असतां पुरुषास शुभ होत ॥८५॥ वक्षस्थळ, कांख, नखें, नाक, मुख, मानेचा पृष्ठभाग, हीं ६ उच्च शुभ होत. शिश्न, पाठ, मान, जंघा ( पोटरी ), हीं ४ ऱ्हस्व हितकारक होत ॥८६॥ नेत्रप्रांत, पाद, कर, तालु, अधरोष्ठ, जिव्हा, नखें हीं ७ आरक्त सुखकारक होत. दांत, अंगुलिपर्वें, केश, त्वचा, नखें हीं ५ बारीक असतां दुःखी होत नाहींत ॥८७॥ हनवटी, नेत्र, बाहु, नाक, दोन स्तनांच्या मध्यें अंतर हीं ५ राजावांचून लांब होत नाहींत ॥८८॥

॥ इतिक्षेत्रं ॥

छायाशुभाशुभफलानिनिवेदयंतीलक्ष्यामनुष्यपशुपक्षिपुलक्षणज्ञैः । तेजोगुणान्बहिरपिप्रविकाशयंतीदीपप्रभास्फटिकरत्नघटस्थितेव ॥८९॥

अर्थ–शुभाशुभ फलें सांगणारी अशी छाया, लक्षणज्ञ पुरुषांनीं मनुष्य, पशु, पक्षी यांचाठाईं पहावी. स्फटिकरत्नांच्या घटामध्यें रहालेली दीपकांति जशी बाहेर प्रकाश करते तशी शरीरस्थ छाया बाहेरही तेजाच्या गुणांतें प्रकट करते॥८९

स्निग्धद्विजत्वङ्नखरोमकेशछायासुगंधाचमहीसमुत्था । तुष्ट्यर्थलाभाभ्युदयान्करोति धर्मस्यचाहन्यहनिप्रवृत्तिं ॥९०॥

अर्थ–भूमिसमुत्पछाया (शरीरकांति) अ० मनुष्याचे दंत, त्वचा, नखें, आंगावरील केश, मस्तकावरील केश, हे सर्व स्निग्ध होतात व शरीरकांति सुगंध होते. ती छाया तुष्टि, अर्थलाभ, अभ्युदय व दिवसादिवसाचेठाईं धर्माची प्रवृत्ति यांतें करते ॥९०॥

स्निग्धासिताच्छहरितानयनाभिरामासौभाग्यमार्दवसुखाभ्युदयान्करोति । सर्वार्थसिद्धिजननीजननीवचाप्याछायाफलंतनुभृतां शुभमादधाति ॥९१॥

अर्थ–स्निग्ध, श्वेत, स्वच्छ, हरिद्वर्ण, नेत्रसौख्यकरणारी अशी छाया सौभाग्य, मृदुत्व, सुख, अभ्युदय यांतें करते व सर्वकार्यांची सिद्धि करणारी आईसारखी ती छाया प्राण्यांस शुभफल देते ॥९१॥

चंडाधृष्यापद्महेमाग्निवर्णायुक्तातेजोविक्रमैःसप्रतापैः । आग्नेयीतिप्राणिनांस्याज्जयायक्षिप्रंसिद्धिंवांछितार्थस्यधत्ते ॥९२॥

अर्थ–चंड (क्रोध), अधृष्य, (अनभिभवनीय) कमळ, सुवर्ण व अग्नि यांसारख्या रंगाची, तेज, पराक्रम, शौर्य, यांहीं युक्त अशी (अग्निसंबंधी) छाया प्राण्यांस जय, इच्छितार्थाची शीघ्र सिद्धि करते ॥९२॥

जगन्मित्र छापखान्यात पुस्तकें विकत मिळतात तीं:—

| | | |
|---|---|---|
| ८= सत्यनारायणपूजा. | ८॥। तुकारामकृत मानस-पूजेचे अभंग. | ८। दुर्गास्तोत्र. |
| ८= शिवरात्रिकथेचे अ० | ८॥। सोळा सोमवारकथा | .॥।.गोदालहरी सटीक. |
| ८– राममंत्रश्लोक. | ८॥। चित्रे. | .।. नीतिशतपत्र. |
| ८– गोदावर्यष्टक. | ८॥ शिवालिखित. | .॥।.लघुकौमुदी. |
| ८– महिम्नस्तोत्र. | ८॥ मंगलाष्टकें नवग्रहांची | .॥।.दानचंद्रिका. |
| ८– व्याकरणसाह्य. | ८॥ गुरुचरित्रओंव्या५२ | .।–रघुसर्ग ६ वा. |
| ८॥। शके १७९६ सालचें पंचांग. | ८॥ ज्ञानेश्वरसाधुकृतखेळ | .।–रघुसर्ग ७ वा. |
| ८॥। हरिपाठ. | ८॥ भीष्मप्रतिज्ञा. | .॥=नैषधकाव्य सर्ग३रा |
| ८॥। धावे. | ८॥ सीतास्वयंवर. | ५ पंचदशी प्राकृत. |
| ८॥। रामरक्षा. | ८॥ द० म० कोष्टकें. | २ वेदांतसूर्य. |
| ८॥। गोपिगीत. | ८॥ चर्पटपंजरिका. | १ जातकालंकार. |
| ८॥। रुक्मिणी स्वयंवर व सुभद्राहरण आर्या. | ८॥ नौकाक्रीडन. | १॥ कृष्णालीलामृत काव्य सटीक. |
| ८॥। अंगदशिष्टाई. | ८॥ कऱ्हाडे ब्राह्मणाचे प्रवर. | १ पंचांग साधन. |
| ८॥। वास्तुप्रकरणींकोष्टक | ८॥ शिवस्तुति. | १ मुहूर्ततत्वदीपिका. |
| ८॥। ध्रुवाख्यान. | ८॥ गणपतीचे श्लोक. | १ अवधूतगीता |

मलिनपरुषकृष्णापापगंधानिलोत्थाजनयतिवधबंध
व्याध्यनर्थार्थनाशान् । स्फटिकसदृशरूपाभाग्ययु
क्तात्युदारानिधिरिवगगनोत्थाश्रेयसांस्वच्छवर्णा॥९३॥

अर्थ–मलिन, परुष, ( रूक्ष ) कृष्णवर्ण, दुर्गंध अशी वायूत्पन्न छाया वध, बंध, व्याधि, अनर्थ, द्रव्यनाश यांतें करते. स्फटिकासारखी स्वच्छ, भाग्ययुक्त, फार उदार, निधिसारखी सर्व अर्थ देणारी, स्वच्छवर्ण अशी, आकाशोत्पन्न छाया होय९३

छायाःक्रमेणकुजलाग्न्यनिलांबरोत्थाःकेचिद्वदंतिदं
शताश्चयथानुपूर्व्या । सूर्याब्जनाभपुरुहूतयमोडु
पानांतुल्यास्तुलक्षणफलैरितितत्समासः ॥९४॥

अर्थ–ह्या पूर्वोक्त छाया अनुक्रमानें पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, या पंचमहाभूतांपासून उत्पन्न झालेल्या सांगीतल्या. कोणी गर्गादि ऋषि ह्या पांच व सूर्य, विष्णु, इंद्र, यम, चंद्र यांच्या ५ एकूण दहा छाया असे ह्मणतात; परंतु सूर्य व अग्नि; विष्णु व आकाश; इंद्र व पृथ्वी; यम व वायु; चंद्र व जल; या दोहोंदोहोंचें लक्षण व फलें यांहींकरून समानत्व आहे यास्तव मी येथें त्यांचा पांचांतच संक्षेप केला आहे ॥९४॥

## ॥ इतिछाया ॥ मृजा ॥

करिवृषरथौघभेरीमृदंगसिंहाब्दनिःस्वनाभूपाः ।
गर्दभजर्जररूक्षस्वराश्चधनसौख्यसंत्यक्ताः ॥९५॥

अर्थ–हत्ती, वृषभ, रथसमूह, दुंदुभि, मृदंग, सिंह, मेघ, यांसारखा ज्यांचा शब्द ते राजे होतात. गाढव, विकारयुक्त, कठोर किंवा कर्कश ज्यांचा स्वर ते द्रव्य व सौख्य यांणीं त्यक्त ह्म० दरिद्री व दुःखी होत ॥९५॥

## ॥ इतिस्वरः ॥

सप्तभवंतिचसारामेदोमज्जात्वगस्थिशुक्राणि ।
रुधिरंमांसंचेतिप्राणभृतांतत्समासफलं ॥९६॥

अर्थ–मेद ( हाडांतील स्नेहभाग ) कपालांतरस्थमेंदू, त्वचा, हाडें, रेत, रक्त, मांस हीं ७ प्राण्यांचीं सार ( बळकट ) होतात त्यांचें संक्षेपानें फल सांगतों ॥९६॥

तालवोष्ठदंतपालीजिव्हानेत्रांतपायुकरचरणैः ।
रक्तैस्तुरक्तसाराबहुसुखवनितार्थपुत्रयुताः ॥९७॥

अथ–तालु, ओष्ठ, दंतांची मांसपंक्ति, जिव्हा, नेत्रप्रांत, गुद, हस्त, पाय, हे तांबडे असतां तो रक्तसारपुरुष बहुत सुख, स्त्री, द्रव्य, पुत्र यांहीं युक्त होतो ॥९७॥

स्निग्धत्वक्काधनिनोमृदुभिःसुभगाविचक्षणास्तनुभिः ।
मज्जामेदःसाराःसुशरीराःपुत्रवित्तयुताः ॥९८॥

अर्थ–त्वचा ( कातडी ) स्निग्ध अ० धनवान्, मृदु अ० भाग्यवान्, तनु (पातळ) त्वचा अ० पंडित होतात मज्जा व मेद बलिष्ठ अ० उत्तमशरीर, पुत्र, द्रव्य यांहीं युक्त होतात ॥९८॥

स्थूलास्थिरस्थिसारोबलवान्विद्यांतगःसुरूपश्च ।
बहुगुरुशुक्राःसुभगाविद्वांसोरूपवंतश्च ॥९९॥

अर्थ–मोठें हाड ज्याचें तो अस्थिसार बलवान्, विद्वान्, सुरूप होतो बहुत व घन रेत ज्याचें ते सुभग, विद्वान्, रूपवान् असे होतात ॥९९॥

उपचितदेहोविद्वान्धनीसुरूपश्चमांससारोयः ।
संघातइतिचसुश्लिष्टसंधितासुखभुजोज्ञेयाः ॥१००॥

अर्थ–जो मांससार तो स्थूलशरीर, विद्वान्, धनवान्, सुरूप होतो

॥ इतिसारः ॥

सर्वांगाच्या सांधींच्याठाई सुश्लिष्टत्व म्ह० सांधे चांगले बळकट मिळालेले असतां संहति होते तो ज्या पुरुषास असेल ते सुखी जाणावे ॥१००॥

॥ इतिसंहतिः ॥

स्नेहःपंचसुलक्ष्योवाग्जिव्हादंतनेत्रनखसंस्थः ।
सुतधनसौभाग्ययुताःस्निग्धैस्तैर्निर्धनारूक्षैः ॥१०१॥

अर्थ–वाणी, जिव्हा, दंत, नेत्र, नखें, या पांच स्थानीं स्नेह पहावा हीं ५ स्निग्ध असतां पुत्र, धन, सौभाग्य यांहीं युक्त होतात, वहीं ५ रूक्ष अ० दरिद्री होतात १०१

॥ इतिस्नेहः ॥

द्युतिमान्वर्णःस्निग्धः क्षितिपानांमध्यमःसुतार्थवतां ।

रूक्षोधनहीनानांशुद्धःशुभदोनसंकीर्णः ॥१०२॥

अर्थ–राजांचा वर्ण तेजस्वी व स्निग्ध होय. पुत्र व द्रव्य यांहीं युक्ताचा वर्ण मध्यम ( किंचित् स्निग्ध व किंचित् रूक्ष ) होय. दरिद्र्याचा वर्ण रूक्ष होय. शुद्धवर्ण शुभ व मिश्रितवर्ण अशुभ होय ॥१०२॥

॥ इतिवर्णः ॥

साध्यमनूकंवक्त्राद्गोवृषशार्दूलसिंहगरुडमुखाः ।
अप्रतिहतप्रतापाजितरिपवोमानवेंद्राश्च ॥१०३॥
वानरमहिषवराहाजतुल्यवदनाःसुतार्थसुखभाजः ।
गर्दभकरभप्रतिमैर्मुखैःशरीरैश्चनिःस्वसुखाः ॥१०४॥

अर्थ–मुखावरून पूर्वजन्मशुभाशुभ याची कल्पना करावी. गाय, वृषभ, वाघ, सिंह, गरुड यांसारखें ज्यांचें मुख ते अकुंठितसामर्थ्य, जितशत्रु, राजे होतात १०३ वानर, रेडा, डुकर, बकरा यांसारखें ज्यांचें मुख ते पुत्रवान्, धनवान्, सुखी होतात. गाढव, उंट यांसारखें ज्यांचें मुख व शरीर ते दरिद्री व दुःखी होतात १०४

॥ इतिअनूकं ( पूर्वजन्म ) ॥

अष्टशतंषण्णवतिःपरिमाणंचतुरशीतिरितिपुंसां॥
उत्तमसमहीनानामंगुलसंख्यास्वमानेन ॥१०५

अर्थ–१०८, ९६, ८४ अंगुलें ( त्याचे हाताचीं ) अनुक्रमेंकरून, उत्तम, मध्यम, कनिष्ठ पुरुषांच्या उंचीचें मान जाणावें ॥१०५॥

॥ इत्युन्मानं ॥

भारार्धतनुःसुखभाक्तुलितोतोदुःखभाग्भवत्यूनः ।
भारोतीवाढ्यानामध्यर्धःसर्वधरणीशः ॥१०६॥

अर्थ–मनुष्य तोलला असतां १००० पळें वजन येतो तो सुखी होय. याहून कमी दुःखी होय. भार ह्म० २००० पळें वजन अतिधनवान् होतो. ३००० पळें वजन सार्वभौम राजा होतो. ( ४ तोळे ह्म० १ पळ, २ हजार पळें ह्म० १ भार असें जाणावें. येथें ८० गुंजाचा तोळा घ्यावा ) ॥१०६॥

विंशतिवर्षानारीपुरुषःखलुपंचविंशतिभिरब्दैः ।
अर्हतिमानोन्मानंजीवितभागेचतुर्थेवा ॥१०७॥

अर्थ—स्त्री विसाव्या वर्षी व पुरुष पंचविसाव्या वर्षी मान ह्म० वजन व उन्मान ह्म० उंची यास योग्य होतात. अथवा शंभर वर्षांच्या आत आयुष्याचा निश्चय झाला असता त्याचे चतुर्थभागी मानोन्मानास योग्य होतात ॥१०७॥

## ॥ इतिमानं ॥

भूजलशिख्यनिलांबरसुरनररक्षःपिशाचकतिरश्चां ।
सत्वेनभवतिपुरुषोलक्षणमेतद्भवत्येषां ॥१०८॥

अर्थ—भूमि, जल, अग्नि, वायु, आकाश, देव, मनुष्य, राक्षस, पिशाच, पशुपक्षी यांच्या सत्वाने ह्म० प्रकृतीने पुरुष होतो. त्यांचे हें वक्ष्यमाण लक्षण जाणावें १०८

महीस्वभावःशुभपुष्पगंधःसंभोगवान्सुरवसनः
स्थिरश्च ।तोयस्वभावोवहुतोयपायीप्रियाभिला
पीरसभोजनश्च ॥१०९॥

अर्थ—चंपकप्रभृति शुभपुष्पासारखा आहे गंध ज्याचा असा, भोगशील, सुंदर आहे वायु ज्याचा असा पुरुष भूमिप्रकृति होय. बहुत उदकपान करणारा, अनुकूल भाषण करणारा, मधुरादिरसयुक्त भोजन करणारा असा पुरुष जलप्रकृति होय ॥१०९॥

अग्निप्रकृत्याचपलोतितीक्ष्णश्चंडःक्षुधालुर्वहुभो
जनश्च । वायोःस्वभावेनचलःकृशश्चक्षिप्रंचको
पस्यवशंप्रयाति ॥११०॥

अर्थ—अग्निप्रकृतीकरून, चपल, अतितीक्ष्ण, क्रूर, भुकाळु, बहुत खाणारा, असा पुरुष होतो ,वायुप्रकृतीनें चंचल, कृश, शीघ्रकोपी असा पुरुष होतो ११०

स्वप्रकृतिर्निपुणोविवृतास्यःशव्दगतेःकुशलः
सुपिरांगः । त्यागयुतःपुरुषोमृदुकोपःस्नेहरत
श्चभवेत्सुरसत्वः ॥१११॥

अर्थ—सर्व कलामध्यें निपुण, प्रसृतमुख, शास्त्रगायनादिकीं कुशल, सुषिर ( पोकळ ) शरीर असा पुरुष आकाशप्रकृति होय. दानशील, अल्पकोपी, स्नेहयुक्त असा पुरुष देवप्रकृति होय ॥१११॥

मर्त्यसत्त्वसंयुतोगीतभूषणप्रियः ।
संविभागशीलवान्नित्यमेवमानवः ॥११२॥

अर्थ—मनुष्यप्रकृतियुक्त पुरुष गायन व भूषण ( अलंकार ) ह्यांविषयीं प्रीतियुक्त, सम्यक् विभाग व चरित्र यांणीं युक्त, असा नित्य होतो ॥११२॥

तीक्ष्णप्रकोपःखलचेष्टितश्चपापश्चसत्वेन
निशाचराणां । पिशाचसत्त्वश्चपलोमला
क्तोबहुप्रलापीचतमुल्वणांगः ॥११३॥

अर्थ—अत्यंतक्रोधी, दुर्जनासारखा व्यापार करणारा, पापरत, असा राक्षसप्रकृति पुरुष होतो. चंचल, मलयुक्त, बहुत बडबडकरणारा, स्थूलशरीर असा पिशाचप्रकृति पुरुष होतो ॥११३॥

भीरुःक्षुधालुर्बहुभुक्चयःस्याज्ज्ञेयःससत्वेन
नरस्तिरश्चां । एवंनराणांप्रकृतिःप्रदिष्टायल्ल
क्षणज्ञाःप्रवदंतिसत्त्वं ॥११४॥

अर्थ—भयार्त, भुकाळु, बहुतखाणारा, असा पशुपक्ष्यांच्या प्रकृतियुक्त पुरुष होय. याप्रकारें पुरुषांच्या प्रकृति सांगीतल्या. असें प्रकृतिलक्षण जाणणारे प्रकृति सांगतात ॥११४॥

॥ इतिप्रकृतिः ॥

शार्दूलहंससमदद्विपगोपतीनांतुल्याभवंतिगतिभिः
शिखिनांचभूपाः । येषांचशब्दरहितंस्तिमितंचया
तंतेपीश्वराद्रुतपरिप्लुतगादरिद्राः ॥११५॥

अर्थ—व्याघ्र, हंस, उन्मत्तहत्ती, वृषभ, मयूर यांसारख्या गमनाचे पुरुष राजे होतात. ज्यांचें गमन शब्दरहित व मंद तेही धनवान् होतात. त्वरित व अडखळत जे गमन करितात ते दरिद्री होतात ॥११५॥

॥ इतिगतिः ॥

श्रांतस्ययानमशनंचबुभुक्षितस्यपानंतृषापरि
गतस्यभयेषुरक्षा । एतानियस्यपुरुषस्यभवंति

कालेधन्यंवदंतिखलुतंनरलक्षणज्ञाः ॥११६॥

अर्थ-प्रात स० दमल्या अ० वाहन, भूक लागली असतां खाण्यास, तान लागली अ० उदकादि पिण्यास, भय प्राप्त झालें अ० रक्षणकर्ता, हीं ज्या पुरुषास याकाळीं मिळतात; त्या पुरुषास, पुरुषलक्षण जाणणारे, धन्य ( शुभलक्षण ) असें ह्मणतात ॥११६॥

पुरुषलक्षणमुक्तमिदंमयामुनिमतान्यवलो
क्यसमासतः । इदमधीत्यनरोनृपसंमतो,
भवतिसर्वजनस्यचवल्लभः ॥११७॥

अर्थ-ऋषींचीं मतें पाहून संक्षेपानें मी हें पुरुषलक्षण सांगीतलें. हें पढून मनुष्य, राजास मान्य व सर्व लोकांस प्रिय असा होतो ॥११७॥

॥ इतिश्रीवराहमिहिरकृतौबृहत्संहितायां
॥ पुरुषलक्षणंनामाष्टाषष्टितमोध्यायः॥६८॥

---

## ॥ अथपंचमहापुरुषलक्षणं ॥

---

ताराग्रहैर्बलयुतैःस्वक्षेत्रस्वोच्चगैश्चतुष्टयगैः ।
पंचपुरुषाःप्रशस्ताजायंतेतानहंवक्ष्ये ॥१॥

अर्थ-भौमादि पांच ग्रह बलिष्ठ, स्वगृहीं, स्वोच्चीं, केंद्रीं असतां, पांच पुरुष उत्तम होतात ते सांगतों ॥१॥

जीवेनभवतिहंसःसौरेणशशःकुजेनरुचकश्च ।
भद्रोबुधेनबलिनामालव्योदैत्यपूज्येन ॥२॥

अर्थ-पूर्वोक्तस्थानीं बृहस्पति बलिष्ठ अ० हंसस० पुरुष होतो. शनि अ० शशसंज्ञक, भौम अ० रुचक सं०, बुध अ० भद्रसं०, शुक्र अ० मालव्यसंज्ञक पुरुष होतो ॥२॥

सत्वमहीनंसूर्याच्छारीरंमानसंचचंद्रबलात् ।
यद्राशिभेदयुक्तावेतौतल्लक्षणःसपुमान् ॥३॥
तद्धातुमहाभूतप्रकृतिद्युतिवर्णसत्त्वरूपाद्यैः ।
अबलरवींदुयुतैस्तैःसंकीर्णालक्षणैःपुरुषाः ॥४॥

अर्थ—सूर्य बलिष्ठ अ० सत्वादिगुण परिपूर्ण होतात. देहगुण व मानसगुण चंद्रबलानें होतात. ज्या राशीचे होरा द्रेष्काणादि भेदयुक्त सूर्यचंद्र असतील त्या राशिभेदस्वामीच्या लक्षणांचा तो पुरुष होतो ॥३॥ त्या स्वामीच्या आप्यादिधातु, महाभूताच्या प्रकृति ( महीस्वभाव इत्यादि अ० ६८ श्लोक० १०९।११० ), कांति, ( अ० ६८ श्लोक ८९ ), वर्ण, सत्व, रूपादिकांहीं समान होतात ( जन्मकालीं सबल सूर्यचंद्र ज्या ग्रहाच्या गृहहोरादि षड्वर्गी असतील त्या ग्रहाच्या धात्वादि प्रकृतियुक्त पुरुष होतो ). जन्मकालीं निर्बल सूर्यचंद्रयुक्त गृहहोरादि षड्वर्ग असतां लक्षणांहीं संकीर्ण ( मिश्र ) होतात ॥४॥

भौमात्सत्वंगुरुताबुधात्सुरेज्यास्वरःसितात्स्नेहः ।
वर्णःसौरादेषांगुणदोषैःसाध्वसाधुत्वं ॥५॥

अर्थ—सत्व ( धैर्य ) भौमापासून होतें. शरीराचें गुरुत्व बुधापासून, शब्द गुरूपासून, स्नेह ( निर्मलत्व ) शुक्रापासून, वर्ण शनैश्चरापासून हीं होतात. या ग्रहाच्या सबलत्वानें चांगले व निर्बलत्वानें वाईट असे होतात ॥५॥

संकीर्णाःस्युर्नृपादशासुतेषांभवंतिसुखभाजः ।
रिपुगृहनीचोच्चच्युतसत्पापनिरीक्षणैर्भेदः ॥६॥

अर्थ—संकीर्ण ( मिश्र ) जे ते राजे होत नाहींत. त्या ग्रहाच्या दशेमध्यें सुखी होतात. शत्रुगृह, नीच, उच्च यापासून च्युत जे शुभ व पापग्रह यांच्या दृष्टीनें त्या पुरुषांचा भेद अ० सुखदुःखादिमिश्रत्व होतें ॥६॥

षण्णवतिरंगुलानांव्यायामोदीर्घताचहंसस्य ।
शशरुचकभद्रमालव्यसंज्ञितास्त्र्यंगुलविवृद्ध्या ॥७

अर्थ—हंससंज्ञक पुरुषाची, ( बांवाची ) रुंदी ९६ अंगुलें व उंचीही ९६ अंगुलें च होय. शश, रुचक, भद्र, मालव्य, संज्ञक पुरुषाची रुंदी व उंची तीन तीन अंगुलें अनुक्रमानें अधिक आणावी. अ० ९९ शश, १०२ रुचक, १०५ भद्र, १०८ मालव्य अशी जाणावी ॥७॥

यःसात्विकस्तस्यदयास्थिरत्वंसत्वार्जवंब्राह्मणदेव भक्तिः । रजोधिकःकाव्यकलाक्रतुस्त्रीसंसक्तचित्तःपु रुषोतिशूरः ॥८॥ तमोधिकोवंचयितापरेषांमूर्खोल सःक्रोधपरोतिनिद्रः । मिश्रैर्गुणैःसत्वरजस्तमोभि र्मिश्रास्तुतेसप्तसहप्रभेदैः ॥९॥

अर्थ–सत्वगुणाधिक पुरुषास दया, स्थिरचित्त, सत्यभाषण, सरळस्वभाव, ब्राह्मण व देव यांची भक्ति, हे गुण होतात. रजोगुण अधिक अ० काव्य, नृत्यगीतादिकला, यज्ञ, स्त्री, यांचाठाईं आसक्तचित्त व अतिशूर असा होतो ॥८॥ तमोगुण अधिक अ० लोकांस ठकविणें, मूर्ख, आळशी, क्रोधिष्ठ, अतिनिद्र, (निद्राळु) असा होतो. सत्वरजतम हे तीनही गुण मिश्रित अ० पूर्वोक्तस्वभाव मिश्र होतात. त्यांचे भेद सात होतात. ( १ सत्व, २ रज, ३ तम, ४ सत्वरजसी, ५ रजस्तमसी, ६ सत्वतमसी, ७ सत्वरजस्तमांसि असे सात प्रकार राशिभेदास्तव व संकीर्णत्वास्तव होतात ) ॥९॥

मालव्योनागनासासमभुजयुगलोजानुसंप्राप्तहस्तो मांसैःपूर्णांगसंधिःसमरुचिरतनुर्मध्यभागेकृशश्च । पंचाष्टौचोर्ध्वमास्यंश्रुतिविवरमपित्र्यंगुलोनंचतिर्य क्दीप्ताक्षंसत्कपोलंसमसितदशनंनातिमांसाधरोष्ठं १०

अर्थ–हत्तीच्या शुंडेसारखे बाहुद्वय, गुडघ्यांपर्यंत लांब हस्त, मांसांनीं परिपूर्ण अंगाच्या संधि, सम व तेजस्वी शरीर, मध्यभागीं कृश, हनुवटीपासून ललाटांपर्यंत १३ अंगुलें मुख, कर्णविवरही तिरकस त्र्यंगुलोन ( तीन अंगुलांत कांहीं कमी ) अ० हनुवटीपासून कर्णविवर १० अंगुलें, स्वच्छनेत्र, सुंदर गाल, सारखे व पांढरे दांत, फार मोठानाहीं अधरोष्ठ, असा मालव्यसंज्ञक पुरुष होय ॥१०॥

मालवान्सभरुकच्छसुराष्ट्रान्लाटसिंधुविषयप्रभृतींश्च । विक्रमार्जितधनोवतिराजापारियात्रनिलयःकृतबुद्धिः ११

अर्थ–सुंदरबुद्धि, पारियात्र पर्वतावर राहणारा, स्वपराक्रमानें संपादितद्रव्य असा मालव्यसंज्ञक पुरुष, राजा होऊन माळवा, भरु, कच्छ, सुराष्ट्र, लाट, सिंधुदेश इत्यादिकांतें रक्षण करतो ॥११॥

सप्ततिवर्षोमालव्योयंत्यक्ष्यतिसम्यक्प्राणांस्तीर्थे ।
लक्षणमेतत्सम्यक्प्रोक्तंशेपनराणांचातोवक्ष्ये ॥१२॥

अर्थ–७० वर्षांचा, हा मालव्य, तप करून पुण्यभूमीचाठाई प्राण सोडील. हें उत्तमप्रकारें मालव्यपुरुषाचें लक्षण सांगीतलें. भद्रादिपुरुषांचीं लक्षणें पुढें सांगतों ॥१२॥

उपचितसमवृत्तलंबबाहुर्भुजयुगलप्रमितःसमुच्छ्रयो
स्य । मृदुतनुघनरोमनद्धगंडोभवतिनरःखलुलक्ष
णेनभद्रः ॥१३॥

अर्थ–पुष्ट, सारखे, वाटोळे, लांब असे आहेत बाहु ज्याचे, वांवाइतकी आहे उंची ज्याची, मृदु, बारीक, दाट, अशा रोमांनीं ( अंगावरील केशांनीं ) युक्त आहेत गाल ज्याचे, असा पुरुष भद्रसंज्ञक होतो ॥१३॥

त्वक्शुक्रसारःपृथुपीनवक्षाःसत्त्वाधिकोव्या
घ्रमुखःस्थिरश्च । क्षमान्वितोधर्मपरःकृतज्ञो
गजेंद्रगामीबहुशास्त्रवेत्ता ॥१४॥ प्राज्ञोवपु
ष्मान्सुललाटशंखःकलास्वभिज्ञोधृतिमान्सु
कुक्षिः । सरोजगर्भद्युतिपाणिपादोयोगीसु
नासःसमसंहतभ्रूः ॥१५॥

अर्थ–त्वचा बळकट, रेत बहुत, विस्तीर्ण व पुष्ट वक्षस्थळ, सत्वगुणाधिक, व्याघ्रासारखें मुख, स्थिरबुद्धि, दयायुक्त, धर्मरत, उपकार जाणणारा, मंदगति, बहुत शास्त्रें जाणणारा, ॥१४॥ ज्ञानी, दृढदेह, उत्तम आहेत ललाट व शंख ज्याचे, नृत्यादि कला जाणणारा, धैर्यवान् , उत्तम कुक्षि ज्याची, कमलगर्भासारखे तेजस्वी हात व पाय ज्याचे, योगाभ्यासी, सुंदरनाक, सारख्या व मिळालेल्या भिवया ज्याच्या असा भद्रपुरुष होय ॥१५॥

नवांबुसिक्तावनिपत्रकुंकुमद्विपेंद्रदानागुरुतु
ल्यगंधता । शिरोरुहाश्चैकजकृष्णकुंचिता
स्तुरंगनागोपमगूढगुह्यता ॥१६॥

अर्थ–नवी उदकानें सिंचित भूमि, तमालपत्र, कुंकुम, हत्तीचें मदोदक, धूप, यां-

सारखा गंध; एका रोमरंध्रामध्यें एक असे, काळे, आकुंचित आहेत केश ज्याचे, घोडा व हत्ती यांसारखें गुप्त आहे शिश्न ज्याचें असा भद्रपुरुष होय ॥१६॥

हलमुसलगदासिशंखचक्रद्विपमकराब्जरथांकि
तांघ्रिहस्तः । विभवमपिजनोस्यवोभुजीति
क्षमतिहिनस्वजनंस्वतंत्रबुद्धिः ॥१७॥

अर्थ—नांगर, मुसल, गदा, तरवार, शंख, चक्र, हत्ती, मगर, कमल, गाडा यांसारख्या रेषांनीं युक्त आहेत पाय व हात ज्याचे, ऐश्वर्य ( संपत्ति ) लोक उपभोग करितात, स्वजनाची क्षमा करीत नाहीं, स्वाधीन आहे बुद्धि ज्याची, असा भद्रपुरुष होय ॥१७॥

अंगुलानिनवतिश्चषडूनान्युच्छ्रयेणतुलयापि
चभारः । मध्यदेशनृपतिर्यदिपुष्टाख्यादयो
स्यसकलावनिनाथः ॥१८॥

अर्थ—सहा अंगुलें कमी नव्वद म्ह० ८४ अंगुलें उंच, दोनहजार पलें वजन, असा भद्रसंज्ञक पुरुष मध्यदेशाचा राजा होईल. जर तोच पुरुष १०६ अंगुलें उंच असेल तर सर्वपृथ्वीचा राजा होईल. ( सातव्या श्लोकांत ष्यादिपुष्ट सांगितले त्याप्रमाणें ) ॥१८॥

भुक्त्वासम्यक्वसुधांशौर्येणोपार्जितामशीत्यब्दः ।
तीर्थेप्राणांस्त्यक्त्वाभद्रोदेवालयंयाति ॥१९॥

अर्थ—पराक्रमानें मिळवलेल्या पृथ्वीचा उपभोग करून ८० वर्षांनंतर पुण्यक्षेत्रीं प्राणत्याग करून भद्रसंज्ञक महापुरुष स्वर्गाप्रत जातो ॥१९॥

ईषद्दंतुरकस्तनुद्विजनखःकोशेक्षणःशीघ्रगोवि
द्याधातुवणिक्क्रियासुनिरतःसंपूर्णगंडःशठः ।
सेनानीःप्रियमैथुनःपरजनस्त्रीसक्तचित्तश्चलः
शूरोमातृहितोवनाचलनदीदुर्गेषुसक्तःशशः ॥२०॥

अर्थ—थोडे वरदांतांचा, बारीक दांत व नखांचा, नेत्रपातीं अधिक ज्याचीं, शीघ्रगामी, शब्दविद्या, गेरिकादिधातु, क्रयविक्रयादि व्यापार यांचाठाईं तत्पर, पुष्टगालांचा, परकार्यविमुख, सेनापति, मैथुनप्रिय, लोकांच्या स्त्रियांचाठाईं आसक्त, चंचल-

बुद्धि, युद्धशूर, मातृभक्त, वनें, पर्वत, नद्या, किल्ले यांचाठाईं आसक्तचित्त; असा शशसं० महापुरुष होय ॥२०॥

दीर्घांगुलानांशतमष्टहीनंसाशंकचेष्टःपररंध्र
विच्च । सारोस्यमज्जानिभृतप्रचारःशशो
ह्ययंनातिगुरुःप्रदिष्टः ॥२१॥

अर्थ—हा शशसंज्ञक ९२ अंगुळें उंच, शंकायुक्त व्यापारकर्ता, शत्रूचें छिद्र जाणणारा, मज्जासार, स्थिरप्रचार ( चंचलनव्हे ) फार स्थूल नाहीं, असा होय ॥२१

मध्येकृशःखेटकखड्गवीणापर्यंकमालामुरजा
नुरूपाः । शूलोपमाश्चोर्ध्वगताश्चरेखाःशश
स्यपादोपगताःकरेवा ॥२२॥

अर्थ—मध्यभागीं कृश, ढाल, तरवार, वीणा, मचक, माळ, मृदंग यांसारख्या व शूलासारख्या ऊर्ध्वगत रेषा पायांवर किंवा हातांवर असा पु० शशसंज्ञक होय २२

प्रात्यंतिकोमांडलिकोथवायंस्फिक्स्रावशूला
भिभवार्तमूर्तिः । एवंशशःसप्ततिहायनोयंवै
वस्वतस्यालयमभ्युपैति ॥२३॥

अर्थ—शश, गुहावासी लोकांचा राजा किंवा मांडलिक राजा होतो. कुल्यांचा स्राव व शूलरोगाच्या पीडेनें पीडितशरीर असा ७० वर्षांनीं मरतो ॥२३॥

रक्तंपीनकपोलमुन्नतनसंवक्रंसुवर्णोपमंवृत्तं
चास्यशिरोक्षिणीमधुनिभेसर्वेचरक्तानखाः ।
स्रग्दामांकुशशंखमत्स्ययुगलक्रत्वंगकुंभांबुजै
श्चिन्हैर्हंसकलस्वनःसुचरणोहंसःप्रसन्नेंद्रियः ॥२४॥

अर्थ—आरक्त, पुष्टगाल, उंचनाक, सुवर्णासारखें असें मुख; वाटोळें मस्तक, मधासारख्या वर्णाचे डोळे, सर्व नखें तांबडी, माळा, अंकुश, शंख, मत्स्यद्वय, यज्ञांग ( वेदीसुवादि ), कुंभ, कमळ या चिन्हांनीं चिन्हित, हंसासारखा मधुरशब्द, सुंदर पाय, स्वच्छ इंद्रियें असा हंससंज्ञक महापुरुष होय ॥२४॥

रतिरंभसिशुक्रसारताद्विगुणाचाष्टशतैःपलैर्मितिः ।

परिमाणमथास्यषडयुतानवतिःसंपरिकीर्तितावुधैः २५

अर्थ—हंसाची, क्रीडा उदकामध्यें, रेत अधिक, वजन १६०० पलें, उंची ९६ अंगुळें पंडितानीं सांगितली ॥२५॥

भुनक्तिहंसःखसशूरसेनान्गांधारगंगायमुनांतरालं ।
शतंदशोनंशरदांनृपत्वंकृत्वावनांतेसमुपैतिमृत्युं ॥२६॥

अर्थ—खस, शूरसेन, गांधार, गंगा व यमुना यांचा मध्यदेश यांचा उपभोग हंसमहापुरुष करितो. नव्वद वर्षे राज्य करून वनामध्यें मृत्यु पावतो ॥२६॥

सुभ्रूकेशोरक्तश्यामःकंबुग्रीवोव्यादीर्घास्यः ।
शूरःक्रूरःश्रेष्ठोमंत्रीचोरस्वामीव्यायामीच ॥२७॥

अर्थ—सुंदर भिंवया व केश, तांबडा व काळा वर्ण, त्रिवलियुक्त मान, थोडेंसें लांब तोंड, शूर, क्रोधी, श्रेष्ठ, मसलती, चोरांचा राजा, श्रम करणारा, रुचकस० ' महापुरुष होय ॥२७॥

यन्मात्रमास्यंरुचकस्यदीर्घंमध्यप्रदेशेचतुरस्त्र
तासा । तनुच्छविःशोणितमांससारोहंताद्वि
षांसाहससिद्धकार्यः ॥२८॥

अर्थ—रुचकाचें जितकें लांब मुख तितकीच उदरमध्याची विपुलता ( रुंदी ), सूक्ष्मत्वचा, रक्त व मांस हीं बळकट, शत्रु मारणारा, साहसकर्मानें कार्य सिद्ध करणारा, रुचकस० महापुरुष होय ॥२८॥

खट्वांगवीणावृषचापवज्रशक्तींदुशूलांकितपाणिपादः।
भक्तोगुरुब्राह्मणदेवतानांशतांगुलःस्यात्तुलयासहस्रं २९

अर्थ—खट्वांग ( आयुधविशेष ), वीणा, वृषभ, धनुष्य, वज्र, शक्ति ( सैती ) चंद्र, त्रिशूल यांसारख्या रेषांनीं युक्त हात व पाय, गुरु, ब्राह्मण, देव यांचा भक्त, १०० अंगुळें उंच, सहस्र पलें वजन रुचकस० होय ॥२९॥

मंत्राभिचारकुशलःकृशजानुजंघोविंध्यंससह्य
गिरिमुज्जयनींचभुक्त्वा । संप्राप्यसप्ततिसमा
रुचकोनरेंद्रःशस्त्रेणमृत्युमुपयात्यथवानलेन॥३०॥

अर्थ—मंत्रप्रयोग व जारणमारणादि यांविषाई कुशल, गुडघे व पोटऱ्या बारीक, विंध्य व सह्यपर्वत आणि उज्जयनी यांचें राज्य करून ७० वर्षे झाल्यावर रुचक-महापुरुष राजा शस्त्रानें अथवा अग्नीनें मृत्यु पावतो ॥३०॥

पंचापरेवामनकोजघन्यःकुब्जोपरोमंडलकोथसामी।
पूर्वोक्तभूपानुचराभवंतिसंकीर्णसंज्ञाःशृणुलक्षणैस्तान्३१

अर्थ—पूर्वोक्त पांच महापुरुषांहून दुसरे वामनक, जघन्य, कुब्ज, मंडलक, सामी, हे पांच पुरुष पूर्वोक्त राजांचे अनुचर (सुहृत्) संकीर्ण (मिश्र) संज्ञक होत. त्यांचीं लक्षणें सांगतों ॥३१॥

संपूर्णांगोवामनोभग्नपृष्ठःकिंचिच्चोरुर्मध्यक
क्षांतरेषु। ख्यातोराज्ञोह्येषभद्रानुजीवीस्फी
तोदातावासुदेवस्यभक्तः ॥३२॥

अर्थ—पूर्णावयव, पाठ, मांड्या, मध्यभाग, कांख यांमध्यें थोडासा वांकडा, कीर्तिमान्, भद्रसं० राजाचा सेवक, वृद्धिगत, दानशील, वासुदेवाचा भक्त, वामन-पुरुष होय ॥३२॥

मालव्यसेवीतुजघन्यनामाखंडेंदुतुल्यश्रवणःसुगंधिः।
शुक्रेणसारःपिशुनःकविश्चरूक्षच्छविःस्थूलकरांगुलीकः३३
क्रूरोधनीस्थूलमतिःप्रतीतस्ताम्रच्छविःस्यात्प
रिहासशीलः। उरोंघ्रिहस्तेष्वसिशक्तिपाश
परश्वधांकश्चजघन्यनामा ॥३४॥

अर्थ—मालव्यसं० महापुरुषाची सेवा करणारा, अर्धचंद्रासारखे कान, सुंदर अंग-संधि, रेत अधिक, पिशुन, कवि, कठिनत्वचा, करांगुली मोठ्या ॥३३॥ क्रोधी, धनवान्, अल्पबुद्धि, प्रसिद्ध, लोहितवर्ण त्वचा, हसणारा, उर, चरण, हस्त, यांवर तरवार, शक्ति, पाश, फरश, यांसारख्या रेषा, असा जघन्यनामक पुरुष होय ३४

कुब्जोनाम्नायःसशुद्धोह्यधस्तात्क्षीणःकिंचित्
पूर्वकायेनतश्च। हंसासेवीनास्तिकोर्थैरुपेतो
विद्वान्शूरःसूचकःस्यात्कृतज्ञः ॥३५॥ कला
स्वभिज्ञःकलहप्रियश्चप्रभूतभृत्यःप्रमदाजित

श्च । संपूज्यलोकंप्रजहात्यकस्मात्कुब्जोयमुक्तःसततोद्यतश्च ॥३६॥

अर्थ–कुब्जनामक, अधोभागी संपूर्णांग, पूर्वभागी ( वरच्या अंगीं ) किंचित् क्षीण व नत ( अस्पष्ट ); हंसस०ची सेवा करणारा, नास्तिक, द्रव्ययुक्त, विद्वान्, शूर, पिशुन, उपकार जाणणारा ॥३५॥ नृत्यादि कला जाणणारा, कलहप्रिय, बहुत वाकर, स्त्रीजित, लोकांची पूजा करून अकस्मात् सोडणारा, निरंतर उद्योगी, कुब्ज होय ॥३६॥

मंडलकनामधेयोरुचकानुचरोभिचारवित्कुशलः ।
कृत्यावैतालादिषुकर्मसुविद्यासुचानुरतः ॥३७॥
वृद्धाकारःखररूक्षमूर्धजःशत्रुनाशनेकुशलः ।
द्विजदेवयज्ञयोगप्रसक्तधीःस्त्रीजितोमतिमान् ॥३८॥

अर्थ–मंडलक पुरुष रुचकाचा सेवक, आभिचारिक कर्मे करणारा, कुशल, कृत्या ( आभिचारिक मत्रांनीं उत्पन्न झालेली स्त्री ), वेताल इ० कर्माचाठाईं व विद्यांमध्ये तत्पर ॥३७॥ वृद्धसदृशशरीर, कठिण व रूक्ष असे केश, शत्रूंच्या नाशाविषयीं कुशल, ब्राह्मण, देव, यज्ञ, योगाभ्यास यांचाठाईं आसक्तबुद्धि, स्त्रीजित, बुद्धिमान्, मंडलक होय ॥३८॥

सामीतियःसोतिविरूपदेहःशशानुगामीखलुदुर्भगश्च । दातामहारंभसमाप्तकार्योगुणैःशशस्यैवभवेत्समानः ॥३९॥

अर्थ–सामिसं०, फार विरूपदेह, शश याचा सेवक, दुर्भाग्य, दानशील, मोठ्या कार्यांचा आरंभ करून समाप्ति करणारा, सत्वादि गुणांनीं शशासारखा (श्लो०२०) ३९

पुरुषलक्षणमुक्तमिदंमयामुनिमतानिसमीक्ष्यसमासतः । इदमधीत्यनरोनृपसंमतोभवतिसर्वजनस्यचवल्लभः ॥४०॥

अर्थ–या श्लोकाचा अर्थ पूर्वाध्यायांतीं सांगीतला ॥४०॥

॥ इतिवराहमिहिरकृतौबृहत्संहितायांपंचमहापुरुषलक्षणंनामैकोनसप्ततितमोध्यायः ॥६९॥

## ॥ अथस्त्रीलक्षणं ॥

स्निग्धोन्नताग्रतनुताम्रनखौकुमार्याःपादौसमोपचि
तचारुनिगूढगुल्फौ । श्लिष्टांगुलीकमलकांतितलौच
यस्यास्तामुद्वहेद्यदिभुवोधिपतित्वमिच्छेत् ॥१॥

अर्थ–स्नेहयुक्त, कूर्मपृष्ठोन्नत, पुढें बारीक, तांबडीं नखें, समान, पुष्ट, सुंदर, गुप्त-गोफे, मिळालेल्या अंगुली, कमळाच्या कांतीसारखे तल, असे जिचे पाय असती-ल तीचें भूपतित्व इच्छिणारानें वरावी ॥१॥

मत्स्यांकुशाब्जयववज्रहलासिचिन्हावस्वेदनौमृदु
तलौचरणौप्रशस्तौ । जंघेचरोमरहितेविशिरेसुवृत्ते
जानुद्वयंसममनुल्वणसंधिदेशं ॥२॥ ऊरूघनौकरिक
रप्रतिमावरोमावश्वत्थपत्रसदृशंविपुलंचगुह्यं । श्रो
णीललाटमुरुकूर्मसमुन्नतंचगूढोमणिश्चविपुलांश्रिय
मादधाति ॥३॥

अर्थ–मत्स्य, अंकुश, कमल, यव, वज्र, नांगर, तलवार, यांसारख्या रेषांनीं चिन्हित, घर्मयुक्त नव्हत, मृदु आहेत तल ज्यांचे असे पाय शुभ होत. केशरहित, शिराविरहित व वाटोळ्या पोटऱ्या, सारखे, बारीक सांधे असे जानु ॥२॥ घट्ट, हत्तीच्या सुंडेसारख्या, रोमरहित अशा मांड्या; पिंपळाच्या पानासारखी विस्तीर्ण योनि, श्रोणीललाट ( कमरेच्या वरचा भाग ) विस्तीर्ण व कूर्मपृष्ठोन्नत, योनीतला मणि गुप्त अशी स्त्री असतां, वहुत लक्ष्मी प्राप्त होते ॥३॥

विस्तीर्णमांसोपचितोनितंबोगुरुश्चधत्तेरसनाकलापं ।
नाभिर्गभीराविपुलांगनानांप्रदक्षिणावर्तगताप्रशस्ता ४

अर्थ–स्त्रियांचा नितंब ( कटिप्रदेश ) विस्तीर्ण, मांसल, गुरु, असा अ० कमरपट्टा धारण करतो. स्त्रियांची नाभि खोल, मोठी, प्रदक्षिण भोंवऱ्यानें युक्त अशी प्रशस्त होय ॥४॥

मध्यंस्त्रियास्त्रिवलिनाथमरोमशंचवृत्तौघनावविष
मौकठिनावुरस्यौ । रोमापवर्जितमुरोमृदुचांगना

नाग्रीवाचकंवुनिचितार्थसुखानिधत्ते ॥५॥

अर्थ–स्त्रीचा मध्यभाग ( पोट ) त्रिवलियुक्त व केशरहित असावा. स्तन वर्तुल एकाशींएक, सारखे, कठिण, असावे. उर केशरहित, मृदु असावा. मान त्रिवलियुक्त असावी. ह्य० द्रव्य व सुख हीं प्राप्त होतात ॥५॥

बंधुजीवकुसुमोपमोधरोमांसलोरुचिरबिंबरूपभृत् । कुंदकुड्मलनिभाःसमाद्विजायोपितांपतिसुखामितार्थदाः ॥६॥

अर्थ–बंधुजीव ( दुपारी तांबडी ) पुष्पासारखा, मांसल, सुंदर, पक्वतोंडल्यासारखें रूप धारण करणारा, असा स्त्रियांचा ओंठ शुभ होय. कुंदाच्या कळीसारखे, सम ( सारखे ), असे दांत अ० पतिसुख व बहुत द्रव्य प्राप्त होतें ॥६॥

दाक्षिण्ययुक्तमशठंपरपुष्टहंसवल्गुप्रभाषितमदीनमनल्पसौख्यं । नासासमासमपुटारुचिराप्रशस्तादृग्नीलनीरजदलद्युतिहारिणीच ॥७॥

अर्थ–चातुर्ययुक्त, प्रामाणिक, कोकिल व हंस यासारखें रमणीय, दीन नव्हे असें भाषण बहुत सुख देतें. समान, समपुटें, सुंदर अशी नासिका शुभ होय. नीलकमलपत्राचें तेज हरणकरणारी ( कमलपत्रासारखी ) दृष्टि ( नेत्र ) प्रशस्त होय ॥७॥

नोसंगतेनातिपृथूनलंबेशस्तेभ्रुवौवालशशांकवक्रे । अर्धेंदुसंस्थानमरोमशंचशस्तंललाटंननतंनतुंगं ॥८॥

अर्थ–मिळालेल्या नाहींत, फार मोठ्या नव्हत, आखूड, द्वितीयेच्या बालचंद्रासारख्या वक्र अशा भिंवया शुभ होत. अर्धचंद्रासारखें, केशरहित, नीच नव्हे व उच्चही नव्हे ( सम ) असें ललाट शुभ होय ॥८॥

कर्णयुग्ममपियुक्तमांसलंशस्यतेमृदुसमंसमाहितं । स्निग्धनीलमृदुकुंचितैकजामूर्धजाःसुखकराःसमंशिरः ९

अर्थ–कर्णद्वय, योग्यपुष्ट, मृदु, तुल्य, सलग्न असें शुभ होय स्निग्ध, नीलवर्ण, मृदु, कुरळ, एकरंध्रामध्यें एक असे केश सुखकारक होत. मस्तक सम शुभ होय ॥९॥

भृंगारासनवाजिकुंजररथश्रीवृक्षयूपेषुभिर्मालाकुंड
लचामरांकुशयवैःशैलैर्ध्वजैस्तोरणैः । मत्स्यस्वस्ति
कवेदिकाव्यजनकैःशंखातपत्रांबुजैःपादेपाणितलेपि
वायुवतयोगच्छंतिराज्ञीपदं ॥१०॥

अर्थ—जलपात्र ( झारी ), आसन, अश्व, हत्ती, रथ, बिल्ववृक्ष, यज्ञस्तंभ, बाण, माला, कुंडल, चंवरी, अंकुश, यव, पर्वत, ध्वज, तोरण, मत्स्य, स्वस्तिक, वेदी, व्यजन, शंख, छत्र, कमल, हीं चिन्हें ( रेषारूप ) पायांवर किंवा हस्ततलावर अथवा हृदयावर असतां, त्या राजस्त्रिया होतात ॥१०॥

निगूढमणिबंधनौतरुणपद्मगर्भोपमौकरौनृपतियो
षितांतनुविकृष्टपर्वांगुली । ननिम्नमतिनोन्नतंकरतलं
सुरेखान्वितंकरोत्यविधवांचिरंसुतसुखार्थसंभोगिनीं ११

अर्थ—अस्पष्ट आहे मणिबंध ( हस्तमूल ) जिचा अशी, नूतनकमलगर्भासारखे व बारीक, लांब आहेत अंगुलिपर्वे ज्यांची असे हात राजस्त्रियांचे होत. खोलकट नव्हे व अतिउंचही नव्हे व उत्तमरेषांनीं युक्त हस्ततल अशी स्त्री चिरकाल पतियुक्त व पुत्र, सुख, द्रव्य यांचा उपभोग करिते ॥११॥

मध्यांगुलियामणिबंधनोत्थारेखागतापाणितलेंगना
याः । ऊर्ध्वस्थितापादतलेथवायापुंसोथवाराज्यसु
खायसास्यात् ॥१२॥

अर्थ—स्त्रीच्या हस्ततलामध्ये मणिबंधा ( हस्तमूला ) पासून उत्पन्न होऊन मध्यमांगुलीप्रत गेलेली रेषा अथवा पुरुषाच्या पादतलाचाठाई ऊर्ध्वस्थित रेषा असेल अथवा अशा रेषा हस्ततलीं किंवा पादतलीं होतील तर त्या राज्यसुख देतील १२

कनिष्ठिकामूलभवागतायाप्रदेशिनीमध्यमिकांतरालं ।
करोतिरेखापरमायुपःसाप्रमाणमूनातुतदूनमायुः ॥१३

अर्थ—कनिष्ठिकामूलापासून उत्पन्न होऊन प्रदेशिनी ( आंगठ्याजवळची ) व मध्यमा यांच्यामध्ये जी रेषा गेली ती परमायु करते. ती प्रमाणाहून कमी असल्यास त्या परमायूपेक्षां कमी आयुष्य जाणावें ( याचीं वर्षें कल्पनेनें १०० वर्षांत कमी जाणावीं ) ॥१३॥

अंगुष्ठमूलेप्रसवस्यरेखाःपुत्राबृहत्यःप्रमदास्तु
तन्व्यः । अच्छिन्नदीर्घाबृहदायुषांताःस्वल्पा
युषांछिन्नलघुप्रमाणाः ॥१४॥

अर्थ—अगुष्ठमूलाचाठाईं पुत्रादि अपत्यांच्या रेषा होत. त्या मोठ्या अ० पुत्र व बारीक अ० कन्या होतात. त्यातही तुटलेल्या नव्हत व लांब अशा दीर्घायुष्या व तुटलेल्या आणि बारीक अल्पायुष्या होत ॥१४॥

इतीदमुक्तंशुभमंगनानामतोविपर्यस्तमनिष्ट
मुक्तं । विशेषतोनिष्टफलानियानिसमासत
स्तान्यनुकीर्तयामि ॥१५॥

अर्थ—पूर्वोक्तप्रकारें स्त्रियांचें शुभलक्षण सांगीतलें, याहून जें विपरीत तें अशुभ होय. फारच अशुभ फलें तीं सक्षेपानें पुढें सांगतों. ॥१५॥

कनिष्ठिकावातदनंतरावामहींनयस्याःस्पृश
तीस्त्रियाःस्यात् । गताथवांगुष्ठमतीत्ययस्याः
प्रदेशिनीसाकुलटातिपापा ॥१६॥

अर्थ—ज्या स्त्रीच्या पायांची कनिष्ठिका किंवा अनामिका भूमीस स्पर्श करीत नाहीं; अथवा प्रदेशिनी अगुठ्याच्या पुढें गेलेली असेल तर ती स्त्री व्यभिचारिणी किंवा पापिष्ठ होईल ॥१६॥

उद्बद्धाभ्यांपिंडिकाभ्यांशिरालेशुष्केजंघेरोम
शेचातिमांसे । वामावर्तंनिम्नमल्पंचगुह्यंकुं
भाकारंचोदरंदुःखितानां ॥१७॥

अर्थ—वर बद्ध अशा गोळ्यांनीं युक्त, शिरायुक्त, केशयुक्त, फारमोठ्या अशा पोटऱ्या अशुभ. डावे फिरलेले केशांनीं युक्त, निम्न ( अधःस्थ ), अल्प अशी योनि अशुभ. घागरीसारखें पोट अशुभ. हीं तीन दुःखकारक होत ॥१७॥

ह्रस्वयातिनिःस्वतादीर्घयाकुलक्षयः ।
ग्रीवयापृथुत्थयायोषितःप्रचंडता ॥१८॥

फार आंखूड अ० निर्धनत्व, फार लांब अ० कुलक्षय, पृथुत्व ( चेपट ) ० स्त्री क्रूर होते. ॥१८॥

नेत्रेयस्याःकेकरेपिंगलेवासादुःशीलाश्याम.
लोलेक्षणाच । कूपौयस्यागंडयोश्चस्मितेषु
निःसंदिग्धंबंधकींतांवदंति ॥१९॥

अर्थ—नेत्र तिरवे व पिंगटवर्ण ती दुःशीला व काळे असून चंचल नेत्र तीही दुःशीला होय. जी स्त्री हंसली अ० गालांस खळग्या पडतात ती निःसंशय व्यभिचारिणी होय ॥१९॥

प्रविलंबिनिदेवरंललाटेश्वशुरंहंत्युदरेस्फि
जोःपतिंच । अतिरोमचयान्वितोत्तरोष्ठीन
शुभाभर्तुरतीवयाचदीर्घा ॥२०॥

अर्थ—लांब ललाट अ० दिराचा नाश, पोट लांब अ० सासऱ्याचा नाश, कुले लांब अ० पतीचा नाश, फार केशांनीं युक्त वरचा ओठ अ० ( मिशी आलेली ) व फारच उंच अशी स्त्री पतीस शुभकारक नव्हे ॥२०॥

स्तनौसरोमौमलिनोल्बणौचक्लेशंदधातेविष
मौचकर्णौ । स्थूलाःकरालाविषमाश्चदंताः
क्लेशायचौर्यायचकृष्णमांसाः ॥२१॥

अर्थ—स्तन व कर्ण केशयुक्त, मलिन, अतिस्थूल, दोनही सारखे नव्हत असे असतील, ती दुःखी होये. मोठे, बाहेर आलेले व लांब, सारखे नाहींत असे दांत दुःखकारक होतात. दांतांजवळचें मास काळें असेल तर ती स्त्री चोर होये२१

क्रव्यादरूपैर्वृककाककंकसरीसृपोलूकसमान
चिन्हैः । शुष्कैःशिरालैर्विषमैश्चहस्तैर्भवंति
नार्यःसुखवित्तहीनाः ॥२२॥

अर्थ—राक्षस, लांडगा, कावळा, कंक ( पक्षिवि० ), सर्प, घुबड यांसारख्या रेषांनीं चिन्हित, मांसरहित, शिरायुक्त, अतुल्य असे ज्या स्त्रियांचे हस्त त्या दुःखी व दरिद्री होतात ॥२२॥

यातूत्तरोष्ठेनसमुन्नतेनरूक्षाग्रकेशीकलहप्रि
यासा । प्रायोविरूपासुभवंतिदोषायत्राकृ
तिस्तत्रगुणावसंति ॥२३॥

अर्थ—ज्या स्त्रीचा वरचा ओंठ उंच व केशाचीं अग्रें रखरखीत ती कज्जेदलाल होये. बहुतकरून विरूपस्त्रियांचाठाईं दोष रहातात. जिची आकृति (शरीर) सुंदर तिचाठाईं गुण रहातात ॥२३॥

पादौसगुल्फौप्रथमंप्रदिष्टौजंघेद्वितीयंचसजानुचक्रे ।
मेढ्रोरुमुष्कंचततस्तृतीयंनाभिःकटिश्चेतिचतुर्थमाहुः२४
उदरंकथयंतिपंचमंहृदयंषष्ठमतस्तनान्वितं ।
अथसप्तममंसजत्रुणीकथयंत्यष्टममोष्ठकंधरे ॥२५॥
नवमंनयनेचसभ्रुणीसललाटंदशमंशिरस्तथा ।
अशुभेष्वशुभंदशाफलंचरणाद्येषुशुभेषुशोभनं ॥२६॥

अर्थ—गोंटयासहित पाय-प्रथम दशाफल देतात असें सांगितलें. गुडघ्यांसहित पोटऱ्या द्वितीय द० फल दे०.शिश्न, मांड्या, वृषण हीं तिसरें द० फल दे०.नाभि व कमर हीं चतुर्थ द० फल दे० ॥२४॥ उदर पंचम द० फ० देतें. स्तनयुक्त हृदय सहावें द० फल देतें. खांदा व जत्रु ( बाहु व कंठ यांचा सांधा, सरी ) हीं सातवें द० फल दे०.ओंठ व मान हीं आठवें दशाफल देतात ॥२५॥ नेत्र व भिंवया हीं नवम द० फल दे०.ललाट व शिर हीं दशम द० फल शुभाशुभ देतात. ( आयुष्याचे १० भाग करून जीं वर्षे येतील त्यामध्यें प्रथम पायांचें शुभ किंवा अशुभ फल येतें. दुसऱ्या भागांत पोटऱ्यांचें येतें. असें पुढें १० पर्यंत जाणावें ). हीं चरणादि इंद्रियें, अशुभ अ० अशुभफल व शुभ अ० शुभफल जाणावें ॥२६॥

इतिबृहत्संहितायांस्त्रीलक्षणंनामसप्ततितमोध्यायः ॥७०॥

---

## ॥ अथवस्त्रच्छेदलक्षणं ॥

वस्त्रस्यकोणेषुवसंतिदेवानराश्चपाशांतदशांतमध्ये । शेषास्त्रयश्चात्रनिशाचरांशास्तथैव शय्यासनेपादुकासु ॥१॥

१ चार कोनावर देव रहातात. पाशांत व दशांत मध्य यांचाठाईं

मनुष्य रहातात. मधल्या तीन भागीं राक्षस रहातात. असेच शय्या, आसन, पादुका यांचाठाईंही देवादि रहातात ॥१॥

लिप्तेमषीगोमयकर्दमाद्यैश्छिन्नेप्रदग्धेस्फुटिते चविंद्यात् । पुष्टंनवेल्पाल्पतरंचभुक्तेपापंशुभंचाधिकमुत्तरीये ॥२॥

अर्थ–काजळ वगैरे, गोमय, चिखल इत्यादिकांनीं लिप्त, कापलें, दग्ध झालें, फाटलें असतां; या वस्त्राचें शुभाशुभफल जाणावें. नवें वस्त्र अ० पूर्णफल, मध्यम अ० अल्पफल, जीर्ण अ० फार थोडें फल होतें. उत्तरीय (आंगवस्त्र) वस्त्र लिप्तादि अ० शुभाशुभफल अधिक होतें ॥२॥

रुग्राक्षसांशेष्वथवापिमृत्युःपुंजन्मतेजश्चमनुष्यभागे । भागेऽमराणामथभोगवृद्धिःप्रांतेषुसर्वत्रवदंत्यनिष्टं ॥३॥

अर्थ–राक्षसभागीं छेदादि झालीं अ० वस्त्रस्वामीस रोग किंवा मृत्यु होतो. मनुष्यभागीं पुरुषाची तेजवृद्धि होते. देवभागीं सुखादि भोगवृद्धि होते. सर्वभागीं शेवटांत छेदादि झालीं अ० अशुभफल होतें ॥३॥

कंकप्लवोलूककपोतकाकक्रव्यादगोमायुखरोष्ट्रसर्पैः । छेदाकृतिर्दैवतभागगापिपुंसांभयंमृत्युसमंकरोति ॥४॥

अर्थ–कंक (पक्षिवि०) प्लव (पाण्यावर तरणारा हंसादि पक्षि), घुबड, कबडा, कावळा, मांसभक्षक पक्षि, कोल्हा, गाढव, उंट, सर्प, यांसारखी वस्त्रछेदाची आकृति देवभागांत असली तथापि पुरुषांस मृत्युसारखें भय करते ॥४॥

छत्रध्वजस्वस्तिकवर्धमानश्रीवृक्षकुंभांबुजतोरणाद्यैः । छेदाकृतिर्नैर्ऋतभागगापिपुंसांविधत्तेनचिरेणलक्ष्मीं ॥५॥

अर्थ–छत्र, ध्वज, स्वस्तिक, वर्धमान (परीळ इ० मृन्मयपात्र), बिल्ववृक्ष, कुंभ, कमल, तोरण इ०कांसारखी वस्त्रच्छेदाची आकृति राक्षसभागांत असताही पुरुषांस शीघ्र लक्ष्मी प्राप्त होते ॥५॥

प्रभूतवस्त्रदाश्विनीभरण्यथापहारिणी ।
प्रदह्यतेग्निदैवतेप्रजेश्वरेर्थसिद्धयः ॥६॥

मृगेतुमूषकाद्भयंव्यसुत्वमेवशांकरे ।
पुनर्वसौशुभागमस्तदग्रभेधनैर्युतिः ॥७॥
भुजंगभेविलुप्यतेमघासुमृत्युमादिशेत् ।
भगाह्वयेनृपाद्भयंधनागमायचोत्तरा ॥८॥
करेणकर्मसिद्धयःशुभागमस्तुचित्रया ।
शुभंचभोज्यमानिलेद्विदैवतेजनप्रियः ॥९॥
सुहृद्युतिश्चमित्रभेपुरंदरेंबरक्षयः ।
जलप्लुतिश्चनैर्ऋतेरुजोजलाधिदैवते ॥१०॥
मिष्टमन्नमथवैश्वदैवतेवैष्णवेभवतिनेत्ररो
गता । धान्यलब्धिमपिवासवेविदुर्वारुणे
विषकृतंमहद्भयं ॥११॥ भद्रपदासुभयंसलि
लोत्थंतत्परतश्चभवेत्सुतलब्धिः । रत्नयुतिं
कथयंतिचपौष्णेयोभिनवांबरमिच्छतिभोक्तुं ॥१२॥

अर्थ—अश्विनी नक्षत्रावर नवीन वस्त्र धारण केलें तर बहुत वस्त्रें मिळतात. असेंच भरणीवर न० व० धा० केलें तर वस्त्रहरण, कृत्तिका० वस्त्रदहन, रोहिणी० द्रव्यप्राप्ति ॥६॥ मृग० उंदरापासून भय, आर्द्रा० मरण, पुनर्वसु० शुभप्राप्ति, पुष्य० धनप्राप्ति ॥ ७॥ आश्लेषा० वस्त्रच्छेदन, मघा० मरण, पूर्वा० राजभय, उत्तरा० धनप्राप्ति ॥८॥ हस्त० कर्मसिद्धि, चित्रा० शुभप्राप्ति, स्वाती० शुभभोजन, विशाखा० लोकप्रिय ॥९॥ अनुराधा० मित्रयोग, ज्येष्ठा० वस्त्रनाश, मूळ० जलामध्यें नाश, पूर्वाषाढा० रोग ॥१०॥ उत्तराषाढा० मिष्टान्नप्राप्ति, श्रवण० नेत्ररोग, धनिष्ठा० धान्यप्राप्ति, शततारका० विषभय ॥११॥ पूर्वाभाद्रपदा० उदकभय, उत्तराभाद्रपदा० पुत्रप्राप्ति, रेवती० रत्नप्राप्ति, अश्विन्यादि नक्षत्रांवर नवें वस्त्र धारण करणारास पूर्वोक्त फलें होतात ॥१२॥

विप्रमतादथभूपतिदत्तंयच्चविवाहविधावभि
लब्धं । तेषुगुणैरहितेष्वपिभोक्तुंनूतनमंबर
मिष्टफलंस्यात् ॥१३॥

अर्थ—ब्राह्मणांनीं, राजानें दिलेलें, विवाहविधीमध्यें मिळालेलें असें नवीन वस्त्र गुणरहितनक्षत्रादिकींही धारण केलें असतां, इष्टफल प्राप्त होतें ॥१३॥

(भोक्तुंनवांबरंशस्तमृक्षेपिगुणवर्जिते ।
विवाहेराजसन्मानेब्राह्मणानांचसंमते ॥१४॥)

अर्थ—विवाहकालीं, राजानें केलेल्या सन्मानीं व ब्राह्मणांची आज्ञा असतां, गुणरहितनक्षत्रींही नवें वस्त्र धारण करणें प्रशस्त होय ॥१४॥

॥ इतिबृहत्संहितायांवस्त्रच्छेदलक्षणंनामैकसप्ततितमोध्यायः ॥७१॥

## ॥ अथचामरलक्षणं ॥

देवैश्चमर्यःकिलवालहेतोःसृष्टाहिमक्ष्माधरकंदरेषु । आपीतवर्णाश्चभवंतितासांकृष्णाश्चलांगूलभवाःसिताश्च ॥१॥

अर्थ—देवांनीं, चमरी ( मृगवि० ) प्राणी केशांकारणें हिमाचलाच्या गुहांमध्यें उत्पन्न केले. त्यांच्या पुच्छापासून झालेले केश थोडे पिवळे, काळे, पांढरे असे होतात १

स्नेहोमृदुत्वंबहुवालताचवैशद्यमल्पास्थिनिबंधनत्वं । शौक्ल्यंचतेषांगुणसंपदुक्ताविद्धाल्पलुप्तानिनशोभनानि ॥२॥

अर्थ—स्निग्धत्व, मृदुत्व, बहुकेशत्व, स्वच्छता, हाडें बारीक, शुक्लत्व, ही या चमरीची गुणसंपत्ति सांगितली. ती खंडित, थोडे तुटलेली असतां शुभ नव्हे ॥२॥

अध्यर्धहस्तप्रमितोस्यदंडोहस्तोथवारत्निसमोथवान्यः । काष्ठाच्छुभात्कांचनरूप्यगुप्ताद्रत्नैर्विचित्रैश्चहितायराज्ञां ३

अर्थ—चवरीचा दांडा दीड हात, १ हात, अथवा २१॥ आंगळें लांब करावा. तो शुभकाष्ठाचा करून, सोनें रुपें यांणीं मढविलेला व चित्रवर्णरत्नांनीं युक्त असा राजास कल्याणकारक होय ॥३॥

यष्ट्यातपत्रांकुशवेत्रचापवितानकुंतध्वजचामराणां । व्यापीततंत्रीमधुकृष्णवर्णावर्णक्रमेणैवहितायदंडाः ॥४

अर्थ—काठी, छत्र, अंकुश, वेत्रदंड ( भालदाराचा ), धनुष्य, अब्दागीर ( पीस )

भाला, ध्वज, चामर, यांचे दांडे ब्राह्मणादिवर्णक्रमानें व्यापीत ( बहुपीत ), तंत्री ( पीतलोहित ), मधु ( श्यामपीत ), कृष्ण या वर्णांचे शुभ होत ॥४॥

मातृभूधनकुलक्षयावहारोगमृत्युजननाश्रपर्वभिः । द्व्यादिभिर्द्विकविवर्धितैःक्रमात्द्वादशांतविरतैःसमैःफलं ॥

अर्थ–दोहोंपासून द्विकवर्धित द्वादशांत, क्रमानें मातृनाश इ० फळें दंडादिकांच्या पेरांचीं जाणावीं. ह्म० २ पेरें अ० मातृनाश, ४ भूमिनाश, ६ धनक्षय, ८ कुलक्षय, १० रोगजनन, १२ मृत्युप्राप्ति, अशीं काठी इ० पेरांचीं फळें होतात ॥५॥

यात्राप्रसिद्धिर्द्विषतांविनाशोलाभःप्रभूतोवसुधागमश्च । वृद्धिःपशूनामभिवांछिताप्तिस्त्र्याद्येष्वयुग्मेषुतदीश्वराणां ॥६॥

अर्थ–तीन इ० विषम, दंडादिकांचीं, पेरें अ० यांच्या धन्यांस, ३ यात्राजय, ५शत्रुनाश,७बहुलाभ,९भूमिलाभ,११पशुवृद्धि,१३इच्छितप्राप्ति, हीं फळें होतात६

॥ इतिबृहत्संहितायांचामरलक्षणंनामद्वासप्ततितमोध्यायः ॥७२॥

---

## ॥ अथछत्रलक्षणं ॥

निचितंतुहंसपक्षैःकृकवाकुमयूरसारसानांच । दौकूलेननवेनतुसमंततश्छादितंशुक्लं ॥१॥

मुक्ताफलैरुपचितंप्रलंबमालाविलंस्फटिकमूलं । षड्ढस्तशुद्धहेमंनवपर्वनगैकदंडंच ॥२॥

दंडार्धविस्तृतंतत्समावृतंरत्नभूषितमुदग्रं । नृपतेस्तदातपत्रंकल्याणपरंविजयदंच ॥३॥

अर्थ–हंसपक्षांनीं अथवा कोंबडा, मोर, सारस या पक्ष्यांच्या पिसांनीं केलेलें व सभोंवार नव्या वस्त्रानें आच्छादित असें, शुभ्रवर्ण ॥१॥ मोत्यांनीं युक्त, लांब मुक्ताफलमालांनीं युक्त, स्फटिकमण्यांचें आहे दंडमूळ ज्यास असें, ६ हात लांब दांडा, शुद्ध सुवर्णानें आच्छादितदंड, नऊ पेरांच्या अथवा ७ पेरांच्या एकवृक्षाच्या दंडानें युक्त ॥२॥ दंडार्ध ह्म० तीन हात विस्तृत, आसमंतात् आवृत, रत्नांनीं शोभित, उंच, असें छत्र राजास कल्याण व विजय देतें ॥३॥

युवराजनृपतिपत्नीसेनापतिदंडनायकानांच ।
दंडोर्धपंचहस्तःसमपंचकृतार्धविस्तारः ॥४॥

अर्थ—युवराज, राजस्त्री, सेनापति, दंडनायक ( न्यायाधीश ), यांच्या छत्राचा दांडा साडेचार हात लांब व छत्राची रुंदी अडीच हात असावी ॥४॥

अन्येपामुष्णघ्नंप्रसादपट्टैर्विभूपितशिरस्कं ।
व्यालंबिरत्नमालंछत्रंकार्यंचमायूरं ॥५॥

अर्थ—युवराजादिकांवाचून इतरांचें छत्र उष्णनाशक, शुभवस्त्रांनीं सुशोभितशिर, रत्नमालायुक्त, असें मयूरपक्षाचें करावें ॥५॥

अन्येपांचनराणांशीतातपवारणंतुचतुरस्रं ।
समवृत्तदंडयुक्तंछत्रंकार्यंतुविप्राणां ॥६॥

अर्थ—अन्यमनुष्यांचें, शीत व उष्ण यांचें निवारण करणारें असें चतुरस्त्र छत्र करावें. ब्राह्मणांचें छत्र आसमतात् वर्तुळ व दंडयुक्त असें करावें ॥६॥

इतिबृहत्संहितायांछत्रलक्षणंनामत्रिसप्ततितमोध्यायः७३

---

## ॥ अथस्त्रीप्रशंसा ॥

जयेधरित्र्याःपुरमेवसारंपुरेगृहंसद्मनिचैकदे
शः । तत्रापिशय्याशयनेवरास्त्रीरत्नोज्ज्व
लाराज्यसुखस्यसारः ॥१॥

अर्थ—सर्व पृथ्वी जिंकिली तरी त्यांत एक नगरच श्रेष्ठ होय. नगरामध्यें गृह, गृहामध्येंही त्याचा एकदेश ( निजण्याचा प्रदेश, खोली ), त्यामध्येंही शय्या ( बिछाना ), त्या शयनींही मणि सुवर्ण इत्यादिकांनीं भूषित उत्तम स्त्री, हें राज्य सुखाचें सार होय ॥१॥

रत्नानिविभूपयंतियोपाभूष्यंतेवनितानरत्नकांत्या ।
चेतोवनिताहरंत्यरत्नानोरत्नानिविनांगनांगसंगात्॥२

अर्थ–स्त्रिया रत्नांतें शोभिवतात रत्नकांतीनें स्त्रिया सुशोभित होत नाहींत रत्नयुक्त जरी स्त्रिया नसल्या तथापि पुरुषाचें चित्त हरण करितात. स्त्रियांच्या अगसगावाचून रत्नें चित्त हरण करीत नाहींत ॥२॥

आकारंविनिगूहतांरिपुवलंजेतुंसमुत्तिष्ठतांतंत्रंचिंतय तांकृताकृतशतव्यापारशाखाकुलं । मंत्रिप्रोक्तनिषे विनांक्षितिभुजामाशंकिनांसर्वतोदुःखांभोनिधिवर्ति नांसुखलवःकांतासमालिंगनं ॥३॥

अर्थ–सुखदु खादि आकार आच्छादित करणारे, शत्रुसैन्य जिकण्याविषयीं उद्यु क्त, कृत व अकृत जे हजारों व्यापारविस्तार त्यांणीं व्याप्त अशा राजतंत्राचें चिंतन करणारे, प्रधानानीं सांगितल्याप्रमाणें वागणारे, पुत्रादि सर्वांपासून शंका घेणारे, दु खसमुद्रामध्यें राहणारे, अशा राजांस प्रियस्त्रीचें दृढालिंगन हें सौख्य लेश होय ( क्षणमात्र सुखकारक होय ) ॥३॥

श्रुतंदृष्टंस्पृष्टंस्मृतमपिनृणांल्हादजननंनरत्नंस्त्रीभ्यो न्यत्क्वचिदपिकृतंलोकपतिना । तदर्थंधर्मार्थौसुतवि षयसौख्यानिचततोगृहेलक्ष्म्योमान्याःसततमवला मानविभवैः ॥४॥

अर्थ–स्त्रीनाम श्रवण केलें, पाहिलें, स्पर्शकेल्या, स्मरणहीकेलें असता, पुरुषास आनंदकारक असें रत्न स्त्रियांहून इतर कोणतेंही ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें नाहीं, स्त्रियांच्या अर्थी ( स्त्रीसहायानें ) धर्म व अर्थ हे प्राप्त होतात. पुत्र व विषय सुखें त्यांपासून होतात. गृहामध्यें लक्ष्मीरूपच स्त्रिया होत. यास्तव स्त्रिया सत्कार व ऐश्वर्य यास निरंतर योग्य होत ( स्त्रियांचा सत्कार करावा ) ॥४॥

येप्यंगनानांप्रवदंतिदोषान्वैराग्यमार्गेणगुणान्विहाय । तेदुर्जनामेमनसोवितर्कःसद्भाववाक्यानिनतानितेषां५

अर्थ–स्त्रियांचे गुण सोडून, वैराग्यमार्गानें, जे स्त्रियांस दोषयुक्त म्हणतात; ते दुर्जन होत, असा माझ्या मनाचा निश्चय आहे व तीं त्यांचीं भाषणें परमार्थपर ( सत्य ) नव्हेत ( कपटी होत ) ॥५॥

प्रब्रूतसत्यंकतरोंगनानांदोषोस्तियोनाचरितोमनुष्यैः । धाष्टर्येनपुंभिःप्रमदानिरस्तागुणाधिकास्तामनुनात्रचोक्तं६

अर्थ–मनुष्यांनीं आचरण केला नाहीं, असा मोठा दोष स्त्रियांचा काय आहे ? हे तुम्हीं खरें सांगा. परदारगमनादिदोष प्रथम, पुरुषांनीं आचरण केला. पश्चात् यांनीं त्यांपासून ग्रहण केला. तस्मात् पुरुषांनीं निर्लज्जपणानें स्त्रिया दोषित केल्या; परंतु त्या उत्तम गुणवान् आहेत. याविषयीं धर्ममार्ग सांगणाऱ्या मनूनें त्याच स्त्रियांचें प्राधान्य सांगीतलें, तें पुढें सांगतों ॥६॥

सोमस्तासामदाच्छौचंगंधर्वाःशिक्षितांगिरं ।
अग्निश्चसर्वभक्षित्वंतस्मान्निष्कसमाःस्त्रियः ॥७॥

अर्थ–त्या स्त्रियांस चंद्र शुद्धि देता झाला. गंधर्व आनंदकारक वाणी देते झाले. अग्नि सर्वभक्षित्व देता झाला. यास्तव सर्वुवर्णांच्या स्त्रिया सुवर्णासारख्या शुभ होत ॥७॥

ब्राह्मणाःपादतोमेध्यागावोमेध्यास्तुपृष्ठतः ।
अजाश्वामुखतोमेध्याःस्त्रियोमेध्यास्तुसर्वतः ॥८॥

अर्थ–ब्राह्मण पायांनीं पवित्र, गाई पाठीमागें पवित्र, बकरा व अश्व हे मुखानें पवित्र, स्त्रिया तर सर्वतः पवित्र होत ॥८॥

स्त्रियःपवित्रमतुलंनैतादुष्यंतिकर्हिचित् ।
मासिमासिरजोह्यासांदुष्कृतान्यपकर्षति ॥९॥

अर्थ–स्त्रिया बहुत शुद्ध होत कधींही त्या दूषित होत नाहींत प्रतिमासाचाठाईं रज, यांच्या पातकांचा नाश करितें ॥९॥

जामयोयानिगेहानिशपंत्यप्रतिपूजिताः ।
तानिकृत्याहतानीवविनश्यंतिसमंततः ॥१०॥

अर्थ–सत्कार होत नाहीं, अशा कुलस्त्रिया, ज्या गृहांस शापितात. तीं गृहें महामारीनें मारल्याप्रमाणें सर्वत्र नाश पावतात. ( सर्व मनुष्यें मरतात ) ॥१०॥

जायावास्याज्जनित्रीवासंभवःस्त्रीकृतोनृणां ।
हेकृतघ्नास्तयोर्निंदांकुर्वतांवःकुतःसुखं ॥११॥

अर्थ–पत्नी असो अथवा माता असो, पुरुषांची उत्पत्ति स्त्रियापासून आहे. यास्तव त्यांची निंदा करणारे कृतघ्नहो, तुम्हास सुख कोठून होईल ॥११॥

**दंपत्योर्व्युत्क्रमेदोषःसमःशास्त्रेप्रतिष्ठितः ।**
**नरानतमवेक्षंतेतेनात्रवरमंगनाः ॥१२॥**

अर्थ—स्त्री व पुरुष या दोघांसही व्युत्क्रमानें ( पुरुषास परस्त्रीगमन व स्त्रियांस परपुरुषगमन ) यांचा दोष शास्त्रांत सारखाच सांगितला आहे. पुरुष त्या दो. षांतें पहात नाहींत: स्त्रिया पाहतात. * यास्तव विचार केला अ० स्त्रियाच श्रेष्ठ होत ॥१२॥

**बहिर्लोम्नातुषण्मासान्वेष्टितःखरचर्मणा ।**
**दारातिक्रमणेभिक्षांदेहीत्युक्त्वाविशुध्यति ॥१३॥**

अर्थ—बाहेर केश असें गाढवाचें कातडें पांघरून " मी परदार गमन केलें आहे. मला भिक्षा घाला " असें बोलून सहा महिने भिक्षा मागेल तेव्हां, परस्त्रीगमन करणारा पुरुष शुद्ध होतो ॥१३॥

**नशतेनापिवर्षाणामपैतिमदनाशयः ।**
**तत्राशक्त्यानिवर्ततेनराधैर्येणयोषितः ॥१४॥**

अर्थ—पुरुषांची कामवासना शंभर वर्षांनींही जात नाहीं. ती कामवासना पुरुषांची अशक्तीनें निवृत्त होते. व स्त्रियांची धैर्यानें निवृत्त होते. तस्मात् स्त्रियांचें सामर्थ्य पुरुषापेक्षां अधिक होय ॥१४॥

**अहोधार्ष्ट्यमसाधूनांनिंदतामनघाःस्त्रियः ।**
**मुष्णतामिवचौराणांतिष्ठचौरेतिजल्पतां ॥१५॥**

अर्थ—निष्पाप स्त्रियांची निंदा करणाऱ्या दुर्जन पुरुषांचें धारिष्ट, ज्याकडे चोरी केली, त्यासच चोरा उभा रहा, असें बोलणाऱ्या चोराप्रमाणें होय ॥१५॥

**पुरुषश्चटुलानिकामिनीनांकुरुतेयानिरहोन**
**तानिपश्चात् । सुकृतज्ञतयांगनागतासूनवगू**
**ह्यप्रविशंतिसप्तजिव्हं ॥१६॥**

अर्थ—पुरुष स्त्रियांपाशीं एकांतीं ( रतिसमयीं ) जीं प्रियभाषणें करितात. तीं रतीनंतर करीत नाहींत- आणि दुष्टत्वही करतात. स्त्रियातर सुंदर कृतज्ञता जी तीणेंकरून मृतपतीतें आलिंगन करून अग्नीप्रत प्रवेश करितात. ( नवऱ्याचा उपकार स्मरून अग्नींत सत्या जातात) ॥१६॥

स्त्रीरत्नभोगोस्तिनरस्ययस्यनिःस्वोपिस्वंप्र
त्यवनीश्वरोसौ । राज्यस्यसारोशनमंगना
श्चतृष्णानलोद्दीपनदारुशेषं ॥१७॥

अर्थ–स्त्रीरत्नाचा उपभोग ज्या पुरुषास आहे तो, निर्धन असला तरी, आपणास राजा मानितो. राज्याचें सार स्त्रियांचा उपभोग करणें हेंच आहे व तृष्णाग्नीचें प्रज्वलित करणारें, असें शेष राहिलेलें काष्ठच स्त्री होय ॥१७॥

कामिनींप्रथमयौवनान्वितांमंदवल्गुमृदुपी
डितस्वनां । उत्स्तनींसमवलंब्ययारतिः
सानधातृभवनेस्तिमेमतिः ॥१८॥

अर्थ–प्रथमतारुण्यानें युक्त, थोडें, रमणीय, मधुर, स्तब्ध, असें आहे भाषण जि चें अशी; उन्नतस्तनी अशा स्त्रीचें आलिंगन करून जें रतिसुख प्राप्त होतें तें ब्रह्मदेवाच्या घरींही नाहीं असें मला वाटतें ॥१८॥

तत्रदेवमुनिसिद्धचारणैर्मान्यमानपितृसेव्य
सेवनात् । ब्रूतधातृभवनेस्तिकिंसुखंयद्रहः
समवलंब्यनस्त्रियं ॥१९॥

अर्थ–ब्रह्मलोकामध्यें देव, मुनि, सिद्ध, चारण यांहीं मान्य ( पूजनीय ) पूजक, से वनीय यांच्या सेवेहून दुसरें सुख काय आहे तें सांगा? एकांतीं स्त्रीचें आलिंगन करून जें सुख प्राप्त होतें तें जर सुख नव्हे तर ब्रह्मलोकामध्यें तरी याहून सुख कोणतें आहे? ॥१९॥

आब्रह्मकीटांतमिदंनिबद्धंपुंस्त्रीप्रयोगेणजगत्समस्तं ।व्री
डात्रकायत्रचतुर्मुखत्वमीशोपिलोभाद्गमितोयुवत्याः२०

अर्थ–ब्रह्मदेवापासून कृमिपर्यंत सर्व जगत् स्त्रीपुरुषयोगानें बद्ध आहे. यास्तव या जगामध्यें पुरुषास स्त्रीविषयीं काय लाज आहे. शिवही स्त्रीच्या लोभानें चतुर्मुख झाला. ( याविषयीं कथा–तिलोत्तमा अप्सरा शिवास प्रदक्षिणा करीत असतां, अ तिसुंदर पार्वती मांडीवर होती ती रागें भरेल ह्मणून, चार दिशांस चार मुखें क रून अप्सरेकडे शिव पाहता झाला व एका मुखानें पार्वतीकडे पहात होता )२०

॥ इतिबृहत्संहितायांअंतःपुरचिंतायांस्त्रीप्रशं
सानामचतुःसप्ततितमोध्यायः ॥७४॥

# ॥ अथसौभाग्यकरणं ॥

जात्यंमनोभवसुखंसुभगस्यसर्वमाभासमात्र
मितरस्यमनोवियोगात् । चित्तेनभावयतिदू
रगतापियंस्त्रीगर्भंविभर्तिसदृशंपुरुषस्यतस्य ॥१॥

अर्थ—संपूर्ण कामजन्यसुख सुरूपपुरुषासच होतें. इतरास क्षणभर भासतें मात्र (स्त्री मनाच्या वियोगास्तव). कारण स्त्रियांचें मन सुंदर पुरुषावर लुब्ध होतें. दूर असूनही स्त्री ज्या पुरुषातें चित्तात आणील त्या पुरुषाच्या स्वरूपासारखें गर्भांतील मुलाचें स्वरूप होईल ॥१॥

भइक्ष्वाकांडपादपस्योप्तमुर्व्यांवीजंवास्यांना
न्यतामेतियद्वत् । एवंह्यात्माजायतेस्त्रीपुभूयः
कश्चित्तस्मिन्क्षेत्रयोगाद्विशेषः ॥२॥

अर्थ—वृक्षाची फांदी भूमीवर लावली किंवा बी पेरलें तर तें पूर्ववृक्षापेक्षां निराळे प्रकारचें होत नाहीं. असाच आत्मा स्त्रियांच्याठाईं पुनः उत्पन्न होतो. कदाचित् कांहीं क्षेत्रयोगानें सामर्थ्य विशेष होतो ॥२॥

आत्मासहैतिमनसामनइंद्रियेणस्वार्थेनचेंद्रि
यमितिक्रमएपशीघ्रः । योगोयमेवमनसःकि
मगम्यमस्तियस्मिन्मनोव्रजतितत्रगतोयमात्मा ३

अर्थ—मनासहवर्तमान आत्मा जातो. इंद्रियांसह मन जातें, शब्दादि अर्थांसह इंद्रियें जातात, असा शीघ्रक्रम होतो. हाच संबंध मनाचा होय. वास्तव मनास अगम्य काय आहे. जेथें मन जातें. तेथें हा आत्मा जातोच ॥३॥

आत्मायमात्मनिगतोत्हृदयेतिसूक्ष्मोग्राह्योच
लेनमनसासतताभियोगात् । योयंविचिंतयति
यातिसतन्मयत्वंयस्मादतःसुभगमेवगतायुवत्यः ४

अर्थ—हा जीवात्मा त्हृदयामध्यें परमात्म्याचाठाईं गेला असतां, अतिसूक्ष्म असताही निरंतर योगास्तव निश्चलमनानें ग्राह्य होतो. नंतर जो पुरुष ज्या वस्तूचें चिंतन करितो त्या वस्तुरूप तो आत्मा होतो. यास्तव स्त्रिया सुंदरपुरुषाप्रतच जातात ४

दाक्षिण्यमेकंसुभगत्वहेतुर्विद्वेषणंतद्विपरीतचेष्टा ।
मंत्रौषधाद्यैःकुहकप्रयोगैर्भवंतिदोषावहवोनशर्म ॥५॥

अर्थ–दाक्षिण्य ( चित्त संतुष्ट करून अनुकूल करणें ) हें एकच सुभगत्वाचें कारण होय. त्याहून विपरीत ज्या चेष्टा तें विद्वेषण होय. वशीकरणादि मंत्र व औषधविशेष व भोजनादि कपटप्रयोग यांहींकरून बहुत दोष होतात, कल्याण होत नाहीं ॥५॥

वाल्लभ्यमायातिविहायमानंदौर्भाग्यमापाद
यतेभिमानः । कृच्छ्रेणसंसाधयतेभिमानी
कार्याण्ययत्नेनवदन्प्रियाणि ॥६॥

अर्थ–गर्व सोडणारा पुरुष सर्वजनांस प्रिय होतो. गर्वित पुरुष दुर्भगत्वातें प्राप्त होतो. अभिमानी पुरुष कष्टानें कार्यें साधितो. गोड बोलणारा यत्नावांचून कार्यें साधितो ॥६॥

तेजोनतद्यत्प्रियसाहसत्वंवाक्यंनचानिष्टम
सत्प्रणीतं । कार्यस्यगत्वांतमनुद्धतायेतेज
स्विनस्तेनविकत्थनाये ॥७॥

अर्थ– जें प्रियवस्तूचाठाईं साहस करणें तें तेज नव्हे. जें वाक्य अनिष्ट ( मर्मवेधक ) व दुष्टभाषित तें वाक्य नव्हे. कार्याचा शेवट करून जे गर्वरहित, तेच तेजस्वी ( सुभग ) होत. जे निरर्थक दुष्टभाषण करितात ते सुभग नव्हत ॥७॥

यःसार्वजन्यंसुभगत्वमिच्छेद्गुणान्ससर्वस्यव
देत्परोक्षे । प्राप्नोतिदोषानसतोप्यनेकान्पर
स्ययोदोषकथांकरोति ॥८॥

अर्थ–जो सर्वजनप्रियत्वातें इच्छितो त्याणें सर्वांचे परोक्ष किंवा अपरोक्ष गुणवर्णनच करावें ( तेणेंकरून लोकप्रिय होतो ). दुसऱ्याच्या दोषांतें जो वर्णन करितो तो दुर्जनांपासून बहुत दोषांतें प्राप्त होतो. ( दुसऱ्याच्या स्तुतीनें सज्जन व निंदेनें दुर्जन होतो ) ॥८॥

सर्वोपकारानुगतस्यलोकःसर्वोपकारानुगतो
नरस्य । कृत्वोपकारंद्विपतांविपत्सुयाकीर्ति
रल्पेननसाशुभेन ॥९॥

श्री

# वृहत्संहिता

( वराह मिहिरकृत )

मूळश्लोक संस्कृत असून त्याचा अर्थ प्राकृत ( महाराष्ट्र ) भाषेत लिहिला आहे.

# THE BRIHATSANHITÁ

[ BY VARÁHA MIHIRA ]

यात व्यवहारोपयोगी सर्वप्रकारचे विषय आहेत


पुस्तक २ रें तारीख २५ जून १८७४. अंक १४

VOL 2 25th JUNE 1874 No 14


रत्नागिरी

येथे

जनार्दन हरि आठल्ये

यांणीं

आपल्या

जगन्मित्र छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें

प्रत्येक अंकात मोठ्या तक्तीचे साच्याचा चतुष्पत्री ३२ पृष्ठें असून सुमारें ८०० ग्रंथ येत जाईल

# जगन्मित्र ह्पिसांत पुस्तकें विकत मिळतात तीं:—

१० श्रीमद्भागवत.
८ यथार्थदीपिका.
४ धर्मसिंधु (ग्रंथकार यांचे घरचे पुस्तकावरून छापिलेला त्यांतील कठिण शब्दांचे कोशासह.)
४ भारतचंपु सटीक.
४ एकादशीव्रतसार.
३ बृहज्जातक.
२।। गीतार्थबोधिनी.
२ विक्रमचरित्र.
२ फौजदारी ठराव.
१।। कृष्णाली० स०
१।। प्रतोद्यापनकौमुदी.
१।-।।। दिवाणी व फौजदारी निवडक निवाडे सन.१८६३।६९ सालचे.
१। रसमाधव.
१। सर्वार्थचिंतामणि.
१। गोपीचंदराजाचें नाटक मराठी.
१ रुक्मिणीस्वयंवर.
१ बालवैद्य.
१ शिवलीलामृत.
·।।।-मुहूर्तगणपति.
·।।।·मुहूर्तमार्तंड प्राकृत टीका. [ण.
·।।।·पंचायुधमपंचाख्यमा
·।।।·निर्मळमाहात्म्य.
।।।·गीतार्थमंजरी.
·।।= विष्णुसहस्रनामाचा प्राकृत अर्थ.
·।।=पुनर्विवाहाच्या अशास्त्रतेचा बोधक वाद.
·।।=समश्लोकी गीता.
·।।—प्रतिष्ठामयूख.
·।।· वेताळपंचविशी.
·।।· रत्ना० जिं० वर्णन.
.।।. स्वप्नचिंतामण्ि.
·।=लघुजातक.
·।=माघसर्ग २. रा.
·।=वनौषधिसंग्रह.
·।= पांडुरंगमाहात्म्य.
·।— भगवद्गीता.[आक्ट.
·।= नवीन पोलिसचा
·।= बर्थोल्डचरित्र.
·।= माघसर्ग १.रा.
·।= माघसर्ग ३ रा.
·।= अपूर्णांक (शिवराम भास्कर काणेकृत).
·।= गुरुदत्तात्रय स्वामीच्या आरत्या (अक्कलकोटचे स्वामींचे तसबिरीसह).
·।· तर्कदीपिका.
.।— कुंडार्क सटीक.
.।.।।·लवांकुशाख्यान.
.।.।।.विदुरनीति.
·।· स्फुटज्योतिष.
·।· रघुवंशसर्ग ४ था.
·।· सिंहासनबत्तिशी.
·।· आनंदसागर.
८= तीर्थांचीं अष्टकें.
८= शनिमाहात्म्य.
८=। पट्टीपतनकारिका.
८=। गणपतिसहस्रनाम.
८= शिवसहस्रनामावलि.
८= प्रातःस्मरण.
८= बभ्रुवाहनआख्यान.
८= रामदासी श्लोक.
८= गोत्रावली (कऱ्हाडे ब्राह्मणांची).
८=। विष्णुसहस्रनाम.
८= रामजोशीकृत लावण्या व पदें.
८= केकावलि.
८= रासकृत आरत्या.
८= गायनप्रकार.
८= विधवाविवाह सहारसार.
८= केरोपती पंचांग शके १७९६ चें.
८= गंगालहरी.
८—।। विष्णुसहस्रनामावलि.
८—।। विधयानिराहलक्षण.
८—।। अंकलिपि.
८—।। प्राकृत आरत्या.
८—।। रामहृदय व रामगीता.
८—। मेस्तक (तोंडचे हिशेब)
८— नलाख्यान आर्या.
८— व्यंकटेशस्तोत्र.
८— रामदासाचे अभंग.
८— स्फुट आर्या व श्लोक.
८— गर्गाचार्यकृत प्रश्नावलि.
८— एकादशीमाहात्म्य,

माक्षीकधातुमधुपारदलोहचूर्णपथ्याशिलाज तुविडंगघृतानियोद्यात् । सैकानिविंशतिरहा निजरान्वितोपिसोशीतिकोपिरमयत्यबलांयुवेव ३

अर्थ–माक्षीकधातु ( माक्षिकभस्म ), मध, पारा, लोहचूर्ण ( मंडूर ), हरडा, शिलाजित, वावडिंग, घृत हीं सर्व घृत, माक्षिकावांचून, समभाग व घृत, माक्षिक समभाग यांची गुटिका करून जो २१ दिवस भक्षण करील तो ८० वर्षांचा जरी तारा असेल तथापि तरुणासारखा स्त्रीप्रत रमवील ॥३॥

क्षीरंशृतंयःकपिकच्छुमूलैःपिवेत्क्षयंस्त्रीपुनसोभ्युपैति । मापान्पयःसर्पिषिवाविपक्कान्प ड्ग्रासमात्रांश्चपयोनुपानात् ॥४॥

अर्थ–कुहलीच्या पाळाचा दुधांत काढा करून तो, जो कामी पुरुष प्राशन करील, तो स्त्रियांचाठाईं रतिसमर्थी अशक्ततेतें प्राप्त होणार नाहीं. दुधाचे मथन करून काढिलेल्या लोण्याचे तुपांत उडीद पक्ककरून ते सहा ग्रास भक्षण करून पश्चात् दुग्धपान केलें असतां स्त्रीच्या रतीमध्यें अशक्त होत नाहीं ॥४॥

विदारिकायाःस्वरसेनचूर्णमुहुर्मुहुर्भावितशोषितंच । शृतेनदुग्धेनसशर्करेणपिवेत्सयस्यप्रमदाःप्रभूताः ॥५॥

अर्थ–भुयकोहळीच्या कांदाचें चूर्ण करून त्याचेच रसाचीं त्या चूर्णास ७ पुटें पुनःपुनः शुष्ककरून द्यावीं तें चूर्ण, ज्यास स्त्रिया बहुत असतील त्याणें शर्करायुक्त तापलेल्या दुधासहवर्तमान प्राशन करावें ॥५॥

धात्रीफलानांस्वरसेनचूर्णसुभावितंक्षौद्रसिताज्ययुक्तं । लीढ्वानुपीत्वाचपयोग्निशक्त्याकामंनिकामंपुरुषोनिषेवेत् ॥६॥

अर्थ–आवळकाठीचें चूर्णास आंवळ्यांच्या रसाचीं उत्तम पुटें देऊन तें चूर्ण, मध, साकर, आज्य समभाग घेऊन तें मिश्रण चाटून नंतर जठराग्नीचे शक्तीप्रमाणे दुग्धपान करणारा पुरुष यथेच्छ मैथुन करितो ॥६॥

क्षीरेणवस्तांडयुजाशृतेनसंप्लाव्यकामीवहुश

स्तिलाद्यः । सुशोषितान्तिपिबेत्पयश्चत
स्याग्रतःकिंचटकःकरोति ॥७॥

अर्थ–चेकडाच्या आटानें युक्त असें दुग्ध तापवून त्याणें तिळ सातवेळ भिजवून शुष्क करून भक्षण करावे नतर दुग्धपान करणाऱ्या पुरुषापुढें चिमणापक्षी बहुत स्त्रीगमन काय करतो. ( बहुत स्त्रियांप्रत बहुतवेळ शीघ्र गमन करतो ) ॥७॥

माषसूपसहितेनसर्पिषापष्टिकौदनमदंतियेनराः ।
क्षीरमप्यनुपिबंतितासुतेशर्वरीषुमदनेनशेरते ॥८॥

अर्थ–जे पुरुष उडदांच्या वरणासहवर्तमान घृतानें युक्त साठक्या ( अथवा चिखा ) तांदुळाच्या भाताते भक्षण करितात. नतर दुग्धपानही करितात. ते त्या रात्रीचाठाईं मदनासहवर्तमान निद्रा करितात. (वारंवार स्त्रीगमनच करतात निद्रा येत नाहीं ) ॥८॥

तिलाश्वगंधाकपिकच्छुमूलैर्विदारिकाषष्टिक
पिष्टयोगः । आजेनपिष्टःपयसाघृतेनपक्त्वा
भवेच्छष्कुलिकातिवृष्या ॥९॥

अर्थ–तिळ, अश्वगधा ( वनस्पतिविशेष, आसध ), कुइलीचीं पाळें, भुयकोहळी, साठके तांदुळाचे पीठ ( सर्व औषधें अर्धी व तांदुळाचें पीठ अर्धे ) असा योग करून बकरीच्या दुधात भिजवून त्याच्या करंज्या करून तुपात तळल्या असता, त्या शुक्रवृद्धि करणाऱ्या होतात ॥९॥

क्षीरेणवागोक्षुरकोपयोगंविदारिकाकंदकभक्ष
णंवा । कुर्वन्नसीदेद्यदिजीर्यतेस्यमंदाग्नितायें
दिदमत्रचूर्णं ॥१०॥

अर्थ–दुधाबरोबर सराटयाचा उपयोग अथवा भुयकोहळीच्या कदाचें भक्षण केलें असता, स्त्रियांचाठाईं रेतस्खलन होत नाहीं. ते जर पुरुषास जिरेल तर अग्निमांद्य होईल. त्यास हें पुढील चूर्ण घ्यावें ॥१०॥

साजमोदलवणाहरीतकीशृंगवेरसहिताचपिप्पली ।
मद्यतक्रतरलोष्णवारिभिश्चूर्णपानमुदराग्निदीपनं ११

अर्थ–ओवा, लवण ( सैंधव ), हरडेदळ, सुंठ, पिंपळी हीं समभाग चूर्ण करून

मद्य, ताक, पेज, उष्णोदक यांतील एकाद्या बरोबर त्या चूर्णाचें पान करील तर जठराग्नि प्रदीप्त होतो ॥११॥

अत्यम्लतिक्तलवणानिकटूनिवान्नियःक्षार
शाकवहुलानिचभोजनानि । दृक्शुक्रवीर्य
रहितःसकरोत्यनेकान्व्याजान्जरन्निवयुवा
प्यबलामवाप्य ॥१२॥

अर्थ—फार आंबट, फार कडु, फार खारट, फार तिखट, क्षारयुक्त शाकाबहुत ज्यामध्यें अशीं भोजनें जो पुरुष भक्षण करतो तो दृष्टि, रेत, बल यांणीं रहितहोरसाता स्त्रीतें प्राप्त होऊन, तरुण असतांही, वृद्धासारखा बहुत निमित्तें, कपटे करतो. ( त्याकडून स्त्रीचें रतीमध्यें समाधान होत नाहीं ) ॥१२॥

॥ इतिबृहत्संहितायामंतःपुरचिंतायांकांदर्पिकं
नामसप्तसप्ततितमोध्यायः ॥७७॥

---

## ॥ अथगंधयुक्तिः ॥

---

स्रग्गंधधूपांवरभूषणाद्यंनशोभतेशुक्लशिरोरुहस्य ।
यस्मादतोमूर्धजरागसेवांकुर्याद्यथैवांजनभूषणानां ॥१॥

अर्थ—माळा, सुगंधद्रव्यें, सुधूप, वस्त्र, अलंकार, अनुलेपन इ० पांढऱ्या केशांच्या पुरुषास शोभवीत नाहीत. यास्तव केशांची रंजनरूप सेवा, जशी अंजनानें नेत्रांची व भूषणांची सेवा करतात तशी करावी ॥१॥

लोहेपात्रेतंडुलान्कोद्रवाणांशुक्लेपक्कांल्लोहचूर्ण
नसाकं । पिष्टान्सूक्ष्मंमूर्ध्निशुक्लाम्लकेशेदत्वा
तिष्ठेद्वेष्टयित्वार्कपत्रैः ॥२॥ यातेद्वितीयेप्रहरे
विहायदद्याच्छिरस्यामलकप्रलेपं ।संछाद्यपत्रैः
प्रहरद्वयेनप्रक्षालितंकार्ष्ण्यमुपैतिशीर्षं ॥३॥

अर्थ—हरकांचे तांदुळ लोखंडाच्या भांड्यांत पांढऱ्या आंबट पेजेमध्यें पक्ककरून

नंतर लोहचूर्णासहित त्यांचें बारीक पिष्ट करून शुभ आंवट पेज इत्यादिकांनें आर्द्रकेश अशा मस्तकाचाठाईं लेप करून रुईच्या पानांनीं वेष्टन करून दोन प्रहर रहावें ॥२॥ दुसरा प्रहर गेला असतां तो लेप काढून मस्तकीं आंवळकाटीचा लेप द्यावा आणि दोन प्रहर पर्यंत ओल्या पानांनीं आच्छादन करून मस्तक धुवावें ह्म० काळे होतें. ( मस्तकावरील केंस काळे होतात) ॥३॥

पश्चाच्छिरःस्नानसुगंधतैलैर्लोहाम्लगंधंशिरसो पनीय । हृद्यैश्चगंधैर्विविधैश्चधूपैरंतःपुरेराज्य सुखंनिषेवेत् ॥४॥

अर्थ—नंतर मस्तकस्नान, सुगंधतेल यांहीं करून मस्तकाचा लोहाम्लगंध धुवून नंतर मनोहर असे नानाप्रकारचे गंध व धूप यांहीं युक्त अशा अंतःपुरामध्यें राज्यसुखातें सेवन करावें. ( स्त्रियांसहवर्तमान क्रीडा करावी ) ॥४॥

त्वक्कुष्ठरेणुनलिकास्पृक्कारसतगरवालकैस्तुल्यैः । केसरपत्रविमिश्रैर्नरपतियोग्यंशिरःस्नानं ॥५॥

अर्थ—दालचिनी, कोलिंजन, मेंदीचें बीं, गुलछबू किंवा पवारी, मोगरी, बोळ किंवा राळ, तगर, वाळा, नागकेशर, तमालपत्र, हीं समभाग चूर्ण करून त्याणें शिरस्नान राजास योग्य होय. ( हें उटणें मस्तकास लावावें ) ॥५॥

मंजिष्ठयाव्याघ्रनखेनशुक्त्यात्वचासकुष्ठेनर सेनचूर्णः । तैलेनयुक्तोर्कमयूखतप्तःकरोति तच्चंपकगंधितैलं ॥६॥

अर्थ—मंजिष्ठ, नखला, शंखोद्भवचर्म, दालचिनी, कोलिंजन, बोळ किंवा राळ, यांचें चूर्ण समभाग करून तैलयुक्त करावें आणि सूर्यकिरणांमध्यें तापवावें तें तैल चंपकगंधि होतें ॥६॥

तुल्यैःपत्रतुरुष्कवालतगरैर्गंधःस्मरोद्दीपनःस व्यामोवकुलोयमेवकटुकाहिंगुप्रधूपान्वितः । कुष्ठेनोत्पलगंधिकःसमलयःपूर्वोभवेच्चंपकोजा तीत्वक्सहितोतिमुक्तकइतिज्ञेयःसकुस्तुंबुरुः ॥७॥

अर्थ—तमालपत्र, ऊद, वाळा, तगरमूळ, हीं समभाग घेऊन चूर्ण करावें तो गंध

कामोद्दीपक होतो. हाच रोहिसगवताने सहित व कटुका ( सुगंधि तृणवि० ) व हिंगुळ यांच्या धुराने धूपित करावा हा० बकुलसं० गंध होतो. तो पूर्वोक्त गंध कोळिजनयुक्त केला हा० उत्पलगंधिक होतो. तो पूर्वोक्त चंदनयुक्त केला हा० चंपकसं० होतो. तो पूर्वोक्त जायपत्री व दालचिनी यांणीं युक्त व धने यांणीं सहित केला हा० अतिमुक्तकसदृश गंध होतो ॥७॥

शतपुष्पाकुंदुरुकौपादेनार्धेननखतुरुष्कौच ।
मलयप्रियंगुभागौगंधोधूप्योगुडनखेन ॥८॥

अर्थ—बाळंतशोप व कवड्या ऊद हीं २ चतुर्थांश; नख ( शंखोद्भव चर्म किंवा नखला ) हीं अर्धभाग; चंदन व गव्हला हे २ भाग; असें एकत्र करावें. हा गंध गुळ व नख यांबरोबर अर्मीत घालून धूप करावा ( तो अत्यंत सुगंध होतो )॥८॥

गुग्गुलवालकलाक्षामुस्तानखशर्कराःक्रमाद्धूपः ।
अन्योमांसीवालकतुरुष्कनखचंदनैःपिंडः ॥९॥

अर्थ—गुग्गुल, वाळा, लाख, नागरमोथा, नखला, साखर, हीं समभाग घेऊन धूप करावा. जटामांसी, वाळा, धूप, नखला, चंदन, हीं समभाग घेऊन धूप दुसरा करावा तो पिंडधूप होतो ॥९॥

हरीतकीशंखघनद्रवांबुभिर्गुडोत्पलैःशैलकमु
स्तकान्वितैः । नवांतपादादिविवर्धितैःक्रमा
द्भवंतिधूपाबहवोमनोहराः ॥१०॥

अर्थ—१ हरडेदळ, २ नखला, ३ नागरमोथा, ४ वोळ, ५ वाळा, ६ गुळ, ७ कोष्ठ, ८ दगडफूल, ९ कचूर किंवा नागरमोथा. हीं नऊ चतुर्थांशवर्धित एकत्र करून बहुत मनोहर धूप होतात. ( हरडे १ भाग, नखला २ भाग, नागरमोथा ३ भाग इ० मुस्तक ९ भाग एकत्र केलीं हा० धूप होतो. अथवा हरीतकी, नखला, नागरमोथा, वोळ, वाळा हीं पादादिविवर्धित व गुड व कोष्ठ यांणीं युक्त केले हा० दुसरा धूप. हेच दगडफूल व कचूर यांणीं युक्त केले हा० तिसरा धूप. असे बहुत धूप होतात ). ॥१०॥

भागैश्चतुर्भिःसितशैलमुस्ताःश्रीसर्जभागौन
खगुग्गुलूच । कर्पूरबोधोमधुपिंडितोयंकोप
च्छदोनामनरेंद्रधूपः ॥११॥

अर्थ-साकर, दगडफूल, नागरमोथा यांचे चार चार भाग; निशागधूप, राळ यांचे दोन दोन भाग; नखल्या, गुगुळ यांचे दोन दोन भाग हे बारीक करून यांत कापूर बारीक करून त्याचा एक भाग घालावा. नंतर मधानें गोळा करावा. हा कोपच्छदनामक, राजधूप होतो ॥११॥

त्वगुशीरपत्रभागैःसूक्ष्मैलार्धेनसंयुतैश्चूर्णः ।
पटवासःप्रवरोयंमृगकर्पूरप्रबोधेन ॥१२॥

अर्थ-दालचिनी, वाळा, तमालपत्र यांचे ३ भाग; यांचे अर्धे ल्हानएल्चीचें चूर्ण घालावे हा० पटवास (अंगोळुल्न) सुगंध होतो. यांत कस्तूरी व कापूर यांचें चूर्ण मिश्र केलें हा० श्रेष्ठ होतो ॥१२॥

घनवालकशैलेयककर्पूरोशीरनागपुष्पाणि ।
व्याघ्रनखस्पृक्कागुरुदमनकनखतगरधान्यानि ॥१३॥
कर्पूरचोरमलयैःस्वेच्छापरिवर्तितैश्चतुर्भिरतः ।
एकद्वित्रिचतुर्भिर्भागैर्गंधार्णवोभवति ॥१४॥

अर्थ-१ नागरमोथा, २ कवड्याऊद, ३ दगडफूल, ४ कापूर, ५ वाळा, ६ नागकेशर, ७ समुद्रफेन, ८ मोगरी, ९ अगुरु, १० दवना, ११ नखला, १२ तगरमूल, १३ धने, १४ कापूर, १५ चोरओवा, १६ चंदन, हीं १६ द्रव्ये चार चार स्वेच्छेनें एक, दोन, तीन, चार भागांनीं फिरवून मिश्रित करावीं. हा० गंधसमुद्र होतो ( बहुतगंध होतात ) ते असे-नागरमोथा १ भाग, कवड्याऊद २ भा., दगडफूल ३ भा., कर्पूर ४ भाग, हा एक गंध. नाग० १ भा० कव० २, दगड० ४, कर्पूर ३ भाग. हा दुसरा. घ० १, क० ३, द० २, कापूर ४ हा तिसरा. घ० १, क० ३, द० ४, का० २ हा चवथा. घ० १, क० ४, द० २, का० ३ हा पंचम. घ० १, क० ४, द० ३, का० २ हा सहावा गंध. अशा प्रकारें अनेक गंध होतात. ॥१३॥१४॥

अत्युल्वणधूपत्वादेकांशोनित्यमेवधान्यानां ।
कर्पूरस्यतदूनोनैतौद्वित्र्यादिभिर्देयौ ॥१५॥

अर्थ-धन्यांस बहुत धूपत्व आहे यास्तव सर्वगंधांत त्यांचा एकच अंश द्यावा. कापुरासही अत्युल्वण गंधत्व आहे यास्तव कमी द्यावा २।३ इत्यादि भाग जरी अनुक्रमानें प्राप्त झाले तथापि देऊंनयेत कापुराचा तर सर्वांपेक्षां कमी असावा ( कारण त्याचा गंध फार यास्तव अन्य द्रव्यांचा गंध नाश होतो ) ॥१५॥

**श्रीसर्जगुडनखैस्तैर्धूपयितव्याःक्रमान्नपिंडस्थैः ।**
**बोधःकस्तूरिकयादेयःकर्पूरसंयुतया ॥१६॥**

अर्थ–विशेषधूप, राळ, गुळ, शंखोद्भवचर्म या चार द्रव्यांनीं ते पूर्वोक्त अनुक्रमानें प्रत्येक मिश्रित करावे, एकत्र करून मिश्रित न करावे. नंतर कर्पूरयुक्त कस्तुरिकेनें बोध ( वारिकांत वारिकाचें मिश्रण ) करावा ॥१६॥

**अत्रसहस्रचतुष्टयमन्यानिचसप्ततिसहस्राणि ।**
**लक्षंशतानिसप्तविंशतियुक्तानिगंधानां ॥१७॥**

अर्थ–येथें गंधद्रव्यगणांमध्यें १,७४,७२० एकलक्ष, चव्याहात्तर हजार, सातशें, वीस गंध होतात ॥१७॥

**एकैकमेकभागंद्वित्रिचतुर्भागिकैर्युतंद्रव्यैः ।**
**षड्गंधकरंतद्वद्द्वित्रिचतुर्भागिकंकुरुते ॥१८॥**

अर्थ–पूर्वोक्त ( श्लो० १३।१४ ) एक एक द्रव्याचा एक भाग अन्य तीन द्रव्यांचे २।३।४ भागिकद्रव्यांनीं युक्त केले असतां सहागंध होतात. तसेंच २।३।४ भागयुक्त करावें ॥१८॥

**द्रव्यचतुष्टययोगाद्गंधचतुर्विंशतिर्यथैकस्य ।**
**एवंशेषाणामपिषण्णवतिःसर्वपिंडोत्र ॥१९॥**

अर्थ–पूर्वोक्त चार द्रव्यांच्या योगानें एकाचे २४ गंध होतात. असेच शेष तीन चतुष्कांचेही होतात. एकदर सर्व गंधसमुदाय ९६ होतो ॥१९॥

**षोडशकेद्रव्यगणेचतुर्विकल्पेनभिद्यमानानां ।**
**अष्टादशजायंतेशतानिसहितानिविंशत्या ॥२०॥**

अर्थ–सोळा द्रव्यें ( श्लोक १३।१४ ) चव्वीस विकल्पानें भिद्यमान अ० वीससहित १८ शतें गंध होतात ( १८२० ) ॥२०॥

**षण्णवतिभेदभिन्नश्चतुर्विकल्पोगणोयतस्तस्मात् ।**
**षण्णवतिगुणःकार्यःसासंख्याभवतिगंधानां ॥२१॥**

अर्थ–चोहोंनीं विकल्पित जो गंधसमूह त्याचे ९६ भेद होतात यास्तव तो ९६ नीं गुणावा ह्मणजे जितकी संख्या येईल तितकी गंधांची संख्या होते ॥२१॥

पूर्वेणपूर्वेणगतेनयुक्तंस्थानंविनांत्यंप्रवदंतिसंख्यां ।
इच्छाविकल्पःक्रमशोभिनीयनीतेनिवृत्तिःपुनरन्यनीतिः

अर्थ--१६ पासून एकापर्यंत अंक मांडून पूर्वांत द्वितीय मिश्रित करावा. याप्रमाणे १६ यांचून करावें ह्म० संख्या होते असें बोलतात. इच्छेप्रमाणें अनुक्रमानें नेऊन पुनः मागें परतावें असें केलें ह्मणजे अनेक गंधसंख्या होते ॥२२॥.

द्वित्र्यंद्रियाष्टभागैरगुरुःपत्रंतुरुष्कशैलेयौ ।
विषयाष्टपक्षदहनाःप्रियंगुमुस्तारसाःकेशः ॥२३॥
स्पृक्कात्वक्तगराणांमांस्याश्चकृतैकसप्तषड्भागाः ।
सप्तर्तुवेदचंद्रैर्मलयनखश्रीककुंदुरुकाः ॥२४॥

अर्थ—अगुरु २ भाग, तमालपत्र ३, धूप ५, दगडफूल ८; गवला ५, नागरमोथा ८, वाळ २ पाळा ३, ॥२३॥ मोगरी ४, दालचिनी १, तगर ७, जटामांसी ६; चंदन ७, नखला ६, विशेषधूप ४, कचऱ्याऊद १; असे चार चार द्रव्यांचे याप्रमाणें भाग एकत्र करावे ह्म० गंध होतात ॥२४॥

षोडशकेकच्छपुटेयथातथामिश्रितैश्चतुर्द्रव्यैः ।
येत्राष्टादशभागास्तेस्मिन्गंधादयोयोगाः ॥२५॥
नखतगरतुरुष्कयुताजातीकर्पूरमृगकृतोद्बोधाः ।
गुडनखधूप्यागंधाःकर्तव्याःसर्वतोभद्राः ॥२६॥

अर्थ—या पूर्वोक्त षोडशक कच्छपुटीं कोणत्याही प्रकारें मिश्रित जीं चार द्रव्यें त्यांहींकरून जे येथें १८ भाग होतात ते येथें गंधयोग जाणावे ॥२५॥ नखला, तगरमूळ, ऊद, यांहीं युक्त व जायपत्री, कापूर, कस्तुरी, यांणीं उद्बोधित ( मिश्रित) व गुळ, नखला यांणीं धूप्य असे गंध करावे ह्म० ते सर्वतोभद्र होतात ॥२६॥

जातीफलमृगकर्पूरबोधितैःससहकारमधुसिक्तैः ।
बहवोत्रपारिजाताश्चतुर्भिरिच्छापरिगृहीतैः ॥२७॥

अर्थ—स्वेच्छापरिगृहीत पूर्वोक्त चार चार द्रव्यें जायफळ, कस्तुरी, कापूर यांणीं बोधित व आम्ररसयुक्त मधानें सिंचित केलें असतां, बहुत पारिजातसदृश गंध होतात ॥२७॥

संर्जरसश्रीवासकसमन्वितायेत्रधूपयोगास्तैः ।
श्रीसर्जरसवियुक्तैःस्नानानिसवालकत्वग्भिः ॥२८॥

अर्थ–राळ, धूप, यांहीं युक्त जे धूपयोग त्यांहींकरून व धूप व राळ यांहीं रहित आणि वाळा व दालचिनी यांहीं युक्तकरून चूर्ण स्नानयोग्य होतें ( उटणें ) ॥२८॥

रोध्रोशीरनतागुरुमुस्तापत्रप्रियंगुवनपथ्याः ।
नवकोष्ठात्कच्छपुटाद्द्रव्यत्रितयंसमुत्सृत्य ॥२९॥
चंदनतुरुष्कभागौशुक्त्यर्धपादिकातुशतपुष्पा ।
कटुहिंगुलगुडधूप्याःकेसरगंधाश्चतुरशीतिः ॥३०॥

अर्थ–१ लोध्र, २ वाळा, ३ तगरमूळ, ४ अगरु, ५ नागरमोथा, ६ तमालपत्र, ७ गव्हला, ८ लहान नागरमोथा, ९ हरडा हीं नवकोष्ठकच्छपुटापासून तीन तीन द्रव्यें काढून ॥२९॥ त्यांत चंदन व धूप यांचा एक एक भाग व शंखोद्भवचर्म याचे दोन भाग, बाळंतशोपेचा चतुर्थभाग असे योजून कापूर, हिंगूळ, गूळ यांहीं धूपित केले ह्मणजे ८४ केसरगंध होतात ॥३०॥

सप्ताहंगोमूत्रेहरीतकीचूर्णसंयुतेक्षिप्त्वा ।
गंधोदकेचभूयोविनिक्षिपेद्दंतकाष्ठानि ॥३१॥
एलात्वक्पत्रांजनमधुमरिचैर्नागपुष्पकुष्ठैश्च ।
गंधांभःकर्तव्यंकंचित्कालंस्थितान्यस्मिन् ॥३२॥
जातीफलपत्रैलाकर्पूरैःक्रमयमैकशिखिभागैः ।
अवचूर्णितानिभानोर्मरीचिभिःशोषणीयानि॥३३॥

अर्थ–दंतकाष्ठलक्षणाध्यायोक्त दंतकाष्ठें हरड्यांनीं मिश्रित गोमूत्रामध्यें सात दिवस ठेवावीं. पुनः वक्ष्यमाण गंधोदकामध्यें अर्धादिवस ठेवावीं. ॥३१॥ तें गंधोदक–एलची, दालचिनी, तमालपत्र, बदर ( बोर ), मध, मिरीं, नागकेशर, कोळिंजन, यांच्या समभागांहींकरून युक्त उदक केलें ह्म० तें गंधोदक होतें ॥३२॥ जायफळ ४ भाग, तमालपत्र २ भाग, नारीकएलची १ भाग, कापूर ३ भाग हीं एकत्र करून त्यांणीं अवचूर्णितकरून तीं दंतकाष्ठें सूर्यकिरणांत शुष्क करावीं ॥३३॥

वर्णप्रसादंवदनस्यकांतिंवैशद्यमास्यस्यसुगंधितांच ।

संसेवितुःश्रोत्रसुखांचवाचंकुर्वंतिकाष्ठान्यसकृद्भवानां ३४

अर्थ—पूर्वोक्तगंधयुक्त दंतकाष्ठांनीं दंतधावन केलें असतां दंतधावन करणारास, उत्तमकांति, मुखसुंदर, मुखस्वच्छ व सुगंध; वाणी श्रोत्रसुखकरणारी असे गुण दंतकाष्ठें करतात ॥३४॥

कामंप्रदीपयतिरूपमभिव्यनक्तिसौभाग्यमा
वहतिवक्त्रसुगंधितांच । ऊर्जंकरोतिकफजांश्च
निहंतिरोगांस्तांबूलमेवमपरांश्चगुणान्करोति ॥३५॥

अर्थ—तांबूल सेवन केलें असतां हे गुण व अन्यही गुण होतात. कामोत्पत्ति होते. शरीर शोभा करितें. सौभाग्य करितें. मुखास सुगंधिता करितें. बल करितें. कफोत्पन्न रोगांचा नाश करितें. असे हे व अन्य पूर्वोक्त गुणही करितें ॥३५॥

युक्तेनचूर्णेनकरोतिरागंरागक्षयंपूगफलातिरिक्तं ।
चूर्णाधिकंवक्त्रविगंधकारिपत्राधिकंसाधुकरोतिगंधं ३६
पत्राधिकंनिशिहितंसफलंदिवाचप्रोक्तान्यथाकरण
मस्यविडंबनैव । कक्कोलपूगलवलीफलपारिजातै
रामोदितंमदमुदामुदितंकरोति ॥३७॥

अर्थ—योग्य ( अधिक व कमीहि नव्हे ) चुन्यानें रंग होतो. सुपारी अधिक अ० रंगाचा नाश होतो. चुना अधिक झाला तर मुखास दुर्गंध होतो. पत्राधिक तांबूल अ० उत्तम गंध करतें ॥३६॥ रात्रीस पत्राधिक तांबूल हितकारक होय. दिवसास पूगीफलसहित हित होय. याहून अन्यथा करणें विडंबन होय. कंकोल, सुपारी, लवंग, जायफळ यांहीं सुगंधित तांबूल पुरुषातें मदानंदानें आनंदित करितें ॥३७॥

॥ इतिबृहत्संहितायामंतःपुरचिंतायांगंधयुक्तिर्नाम सप्तसप्ततितमोऽध्यायः ॥७७॥

## ॥ अथपुंस्त्रीसमायोगः ॥

शस्त्रेणवेणीविनिगूहितेनविदूरथंस्वाममहिषी जघान । विषप्रदिग्धेनचनूपुरेणदेवीविरक्ता किलकाशिराजं ॥१॥ एवंविरक्ताजनयंति दोषान्प्राणच्छिदोन्यैरनुकीर्तितैःकिं । रक्ताविरक्ताःपुरुषैरतोर्थात्परीक्षितव्याःप्रमदाःप्रयत्नात् २

अर्थ–विदूरथराजाची स्त्री विदूरथातें वेणीमध्यें गुप्त ठवलेल्या शस्त्रानें मारिती झाली. तशीच काशिराजातें त्याचीच विरक्त स्त्री विषलिप्त पैंजणानें मारिती झाली हें प्रसिद्ध आहे ॥१॥ याप्रकारेंकरून विरक्त स्त्रिया प्राणनाशकारक अशा दोषांतें उत्पन्न करितात. यांहून अन्य सांगून काय उपयोग! यास्तव स्त्रिया अनुरक्त किंवा विरक्त याची परीक्षा पुरुषांनीं प्रयत्नानें करावी ( नंतर संयोग करावा ) ॥२॥

स्नेहंमनोभवकृतंकथयंतिभावानाभीभुजस्तनविभूषणदर्शनानि । वस्त्राभिसंयमनकेशविमोक्षणानिभ्रूक्षेपकंपितकटाक्षनिरीक्षणानि ॥३॥

अर्थ–मदनकृत स्नेहातें चेष्टा ( व्यापार ) कथन करतात. त्या अशा–नाभी, भुज, स्तन, अलंकार हे दाखविणें; वस्त्राचें नियमन ( पदर घेणें ), वेणी सोडणें, भिवया फिरवून कंपितनेत्रप्रांतानें पहाणें, ह्या चेष्टा प्रिय पाहून अनुरक्त स्त्रिया करतात ॥३॥

उच्चैःष्ठीवनमुत्कटप्रहसितंशय्यासनोत्सर्पणं
गात्रास्फोटनजृंभनानिसुलभद्रव्याल्पसंप्रार्थना ।
बालालिंगनचुंबनान्यभिमुखेसख्याःसमालोकनं
दृक्पातश्चपराङ्मुखेगुणकथाकर्णस्यकंडूयनं ॥४॥
इमांचविद्यादनुरक्तचेष्टांप्रियाणिवक्तिस्वधनंददाति ।
विलोक्यसंहृष्यतिवीतरोषाप्रमार्ष्टिदोषान्गुणकीर्तनेन
तन्मित्रपूजातदरिद्विषत्वंकृतस्मृतिःप्रोषितदौर्मनस्यं ।

स्तनौष्ठदानान्युपगूहनंचस्वेदोथचुंबाप्रथमाभियोगः ६

अर्थ–मोठ्यानें मुखशब्द ( खाकरणें ), शब्दयुक्त हसणें, शय्या व आसन पाजव ळ जाणें, शरीरावयवाचा शब्द करणें, जाभई देणें, थोड्याकिंमतीचा व अल्पप दार्थ मागणें, सन्मुख प्रिय अ० मुलाचें आलिंगन व चुंबन करणें, सखीकडे पहा णें, प्रिय अन्यत्र पहात अ० त्याकडे पहाणें व त्याचे गुण वर्णन करणें, आपला काम साजिवणें ॥४॥ गोड बोलणें, सधन देणें, गतक्रोध होऊन प्रियाकडे पा- हून आनंद पावणे, प्रियाचे गुण वर्णन करून त्याचे दोष नाहींसे करणें ॥५॥ प्रियाच्या मित्राचा सत्कार व शत्रूचा द्वेष करणें, प्रियानें केलेल्या उपकाराचें स्म रण करणें, प्रिय प्रवासास गेला असता दुःखित होणें, स्तनस्पर्श व ओष्ठचुंबन देणें, आलिंगन करणें, अगात घर्म येणें, मुखसयोग, हीं सर्व लक्षणें प्रथम सव धाचीं होत ह्या चेष्टा अनुरक्त स्त्रीच्या जाणाव्या ॥६॥

विरक्तचेष्टाभ्रुकुटीमुखत्वंपराङ्मुखत्वंकृतवि स्मृतिश्च । असंभ्रमोदुष्परितोषताचतद्विष्ट मैत्रीपरुषंचवाक्यं ॥७॥ स्पृष्ट्वाथवालोक्यधु नोतिगात्रंकरोतिगर्वंनरुणद्धियांतं । चुंबावि रामेवदनंप्रमार्ष्टिपश्चात्समुत्तिष्ठतिपूर्वसुप्ता ॥८॥

अर्थ–पतीतें दुष्टासारखा पाहून भिवया मुखाकडे करणें, पतीकडे पाठ करणें, उपकाराचें विस्मरण करणें, आदर न करणें, अर्थदानानेंही संतोष न पावणें, प तीच्या शत्रूची मैत्री करणें, कठोर भाषण करणें, त्याला पाहून किंवा स्पर्श क रून शरीर कापविणें, अभिमान करणें, रागेंभरून जात अ० मार्गरोध न करणे, चुंबन समाप्त झाल्यावर मुख पुसणें, पतीचे पूर्वी निजून, पश्चात् उठणें, ह्या चेष्टा विरक्तस्त्रीच्या होत ॥७।८॥

भिक्षुणिकाप्रव्रजितादासीधात्रीकुमारिकारजिका । मालाकारीदुष्टांगनासखीनापितींदूत्यः ॥९॥ कुलजनविनाशहेतुर्दूत्योयस्मादतःप्रयत्नेन । ताभ्यःस्त्रियोभिरक्ष्यावंशयशोमानवृद्ध्यर्थं ॥१०॥

अर्थ–भीकमागणारी, तपस्वीण ( विरक्तासारखी भटकणारी ), दासी, उपमाता, कुमारिका, परटीण, माळीण, दुष्टस्त्री, सखी, न्हावीण, ह्या परपुरुष वश्यकरून

देण्याविषयीं दूती होत ॥९॥ ह्या दूती कुलस्त्रीच्या नाशाविषयीं कारण होतात. यास्तव प्रयत्नानें त्या दूतींपासून, उत्तमवंश, कीर्ति, सन्मान यांचे वृध्यर्थ, कुलीन स्त्रियांचें रक्षण करावें ॥१०॥

रात्रीविहारजागररोगव्यपदेशपरगृहेक्षणिकाः ।
व्यसनोत्सवाश्चसंकेतहेतवस्तेषुरक्ष्याश्च ॥११॥

अर्थ—रात्रीस फिरणें, जागरण, रोगनिमित्त, परगृहीं रहाणें, ज्योतिष्याजवळ प्रश्न विचारणें, किंचित् रोग झाला अ० कांहीं कारण घेऊन दुःख करणें, विवाहादि उत्साह, हीं संकेताचीं कारणें होत यांचाठाईंही स्त्रियांचें रक्षण करावें ॥११॥

आदौनेच्छतिनोज्झतिस्मरकथांव्रीडाविमि
श्रालसामध्येन्हीपरिवर्जिताभ्युपरमेलज्जा
विनम्रानना । भावैर्नैकविधैःकरोत्यभिनयं
भूयश्चयासादराबुध्वापुंप्रकृतिंचयानुचरति
ग्लानेतरैश्चेष्टितैः ॥१२॥

अर्थ—प्रथम बिछान्यावर गेली अ० मैथुन इच्छीत नाहीं, मदन ( काम ) कथा बोलत अ० ऐकत्ये, मैथुनारंभीं लज्जामिश्रितआलस्ययुक्त, मध्यें लज्जारहित व मैथुनांतीं लज्जेनें नम्रमुख होत्ये, पुनःलीलाविलासादि अनेकविध भावांनीं आदरयुक्त चेष्टा करित्ये, पुरुषाची ग्लानि किंवा हुशारी इ० जाणून चेष्टांहीं अनुचरण करत्ये ह्म० पुरुषाची ग्लानि अ० आपलीही ग्लानि व पुरुषाची हुशारी अ० आपलीही हुशारी दाखवित्ये ॥१२॥

स्त्रीणांगुणायौवनरूपवेषदाक्षिण्यविज्ञानवि
लासपूर्वाः । स्त्रीरत्नसंज्ञाचगुणान्वितासुस्त्री
व्याधयोन्याश्चतुरस्यपुंसः ॥१३॥

अर्थ—तारुण्य, सुंदर स्वरूप, अलंकारादि धारण, अनुकूलपणा, कामशास्त्रोक्त कला व पुरुष यांचें चित्तग्रहण, मधुरवचन व कटाक्षनिरीक्षणादि विलास प्रथम करणें, इ० स्त्रियांचे गुण होत. या गुणांनीं युक्त ज्या स्त्रिया त्यांसच स्त्रीरत्न असें नाव होय. इतर स्त्रिया, चतुरपुरुषास, स्त्रीव्याधि ( चित्तास खेद करणाऱ्या ) होतात ॥१३॥

नग्राम्यवर्णैर्मलदिग्धकायानिंद्यांमसंबंधिकथां

चकुर्यात् । नचान्यकार्यस्मरणंरहस्थामनोहि मूलंहरदग्धमूर्तेः ॥१४॥

अर्थ–ग्राम्यवर्णांनी (हलकट भाषेनें) युक्त, मळिण, कुत्सितशरीर अशा स्त्रियांबरोबर मैथुनसंबंधी कथा बोलू नयेत मैथुनाश्रित स्त्रीनें गृहाश्रित कर्मांचें स्मरणही करू नये. कारण मदनाचें मूळ मन आहे ॥१४॥

श्वासंमनुष्येणसमंत्यजंतीबाहूपधानस्तनदानदक्षा । सुगंधकेशासुसमीपरागासुप्तेनुसुप्ताप्रथमंविबुद्धा ॥१५॥

अर्थ–श्वासोच्छ्वास टाकण्यास पतीस जितका काळ लागतो तितक्याच काळात श्वासोच्छ्वास टाकणें, भुजाची उशी व स्तन याच्या दानाविषयीं चतुरता, सुगंध युक्त केश असणें, सुरतारंभींच प्रेम वाटविणें, पति निजल्यावर निजणें व पतीचे आदि उठणें, हे स्त्रियाचे गुण होत ॥१५॥

दुष्टस्वभावाःपरिवर्जनीयाविमर्दकालेपुचनक्षमायाः । यासामसृग्वासितनीलपीतमाताम्रवर्णंचनताःप्रशस्ताः ॥१६॥
यास्वप्नशीलावहुरक्तपित्ताप्रवाहिनीवातकफातिरिक्ता । महाशनास्वेदयुतांगदुष्टायाह्रस्वकेशीपलितान्विताच ॥१७॥
मांसानियस्याश्चचलंतिनार्यामहोदराखिक्खिमिनीचयास्यात् । स्त्रीलक्षणेयाःकथिताश्चपापास्ताभिर्नकुर्यात्सहकामधर्मं ॥१८॥

अर्थ–सुरतकाळीं समर्थ नाहींत त्या दुष्ट स्वभाव स्त्रिया वर्ज्य कराव्या. अथवा ज्यांचें रक्त ( रज ) काळें, निळें, पिवळें, ईषत् तांबडें, अशाही प्रशस्त नव्हत १६ अतिनिद्रायुक्त स्त्री, बहुतरक्त व पित्त यांणीं युक्त, जिची योनि वाहत्ये ती, वात व कफ हे अतिशयित जिला ती, बहुत खाणारी, घर्मयुक्त, सदोषअवयवांची, आखुड केशांची, पांढरे केंस झालेली ॥१७॥ जिच्या शरीराचीं मांसें शिथिल झालीं ती, मोठ्या पोटाची, अस्पष्ट शब्द जिचा ती व स्त्रीलक्षणामध्यें ज्या अशुभ सांगीतल्या त्या, ह्या सर्व स्त्रियांबरोबर मैथुन करू नये ॥१८॥

शशशोणितसंकाशंलाक्षारससंनिकाशमथवायत् ।
प्रक्षालितंविरज्यतियच्चासृक्तद्भवेच्छुद्धं ॥१९॥
यच्छब्दवेदनावर्जितंत्र्यहात्सन्निवर्ततेरक्तं ।
तत्पुरुषसंप्रयोगादविचारंगर्भतांयाति ॥२०॥

अर्थ–जें रक्त ( विटाळ ) सशाच्या रक्तासारखें अथवा लाखेच्या रसासारखें व वस्त्रावर पडलेलें धुतलें अ० जातें, तें रक्त शुद्ध होय ॥१९॥ जें रक्त शब्द व वेदना यांणीं रहित व तीन दिवसांनीं नाहींसें होतें तें पुरुषयोगानें निःसशय गर्भत्वाप्रति पावतें ( गर्भ होतो ) ॥२०॥

नदिनत्रयंनिषेवेत्स्नानंमाल्यानुलेपनंचस्त्री ।
स्नायाच्चतुर्थदिवसेशास्त्रोक्तेनोपदेशेन ॥२१॥
पुष्यस्नानौषधयोयाःकथितास्ताभिरंबुमिश्राभिः ।
स्नायात्तथात्रमंत्रःसएवयस्तत्रनिर्दिष्टः ॥२२॥

अर्थ–तीन दिवसपर्यंत स्त्रीनें स्नान, पुष्प, अनुलेपन हीं सेवन करूं नये. चतुर्थदिवशीं शास्त्रोक्त विधानानें स्नान करावें ॥२१॥ पुष्यस्नान ( अ० ४८ ) यास सांगीतलेल्या औषधिनीं मिश्रित उदक करून, त्या उदकानें रजस्वलेनें स्नान करावें व तेथें सांगितलेले मंत्रही ह्मणावे ॥२२॥

युग्मासुकिलमनुष्यानिशासुनार्योभवंतिविषमासु ।
दीर्घायुषःसुरूपाःसुखिनश्चविकृष्टयुग्मासु ॥२३॥

अर्थ–रजोदर्शन झाल्यापासून समरात्रींचाठाईं पुत्र होतात व विषमरात्रींचाठाईं कन्या होतात. त्यांतही दूरस्थसम ६।८।१२।१४।१६ या रात्रींचाठाईं होणारे गर्भ दीर्घायुषी, सुरूप, सुखी असे होतात. अर्थात् चतुर्थरात्रींचाठाईं विपरीत होतात ॥२३॥

दक्षिणपार्श्वेपुरुषोवामेनारीयमावुभयसंस्थौ ।
यदुदरमध्योपगतंनपुंसकंतन्निबोद्धव्यं ॥२४॥

अर्थ–स्त्रीच्या उजव्या बाजूस जो गर्भ असतो तो पुरुष व डाव्या बाजूस जो तो स्त्री ( कन्या ) असा जाणावा. जुवळ असलें तर तें दोहींबाजूंस असतें. जें पोटाच्या ( गर्भाशयाच्या ) मध्यभागीं असतें तें नपुंसक जाणावें ॥२४॥

केंद्रत्रिकोणेषुशुभस्थितेषुलग्नेशशांकेचशुभैः समेते । पापैस्त्रिलाभारिगतैश्चयायात्पुंजन्म योगेषुचसंप्रयोगं ॥२५॥

अर्थ—केंद्र १।४।७।१० कोण ९।५ या स्थानीं शुभग्रह ( बुध, शुक्र, गुरु ) अ सता, लग्न व चंद्र हे शुभग्रहांनी युक्त अ०, ३।११।६ या स्थानीं पापग्रह अ० व पुंजन्मयोग अ० स्त्रीनरांवर संभोग करावा ॥२५॥

ननखदशनविक्षतानिकुर्यादृतुसमयेपुरुषः स्त्रियाःकथंचित् । ऋतुरपिदशषट्चवासराणिप्रथमनिशात्रितयंनतत्रगम्यं ॥२६॥

अर्थ—ऋतुकालीं म्ह० गर्भसंभवकाळीं पुरुषानें स्त्रीस कधींही नख व दांत यांणीं क्षतें करूं नयेत. ऋतुकाल, रजस्वला झाल्यापासून सोळा दिवस असतो. त्यामध्यें पहिल्या तीन रात्रींत गमन करूं नये ॥२६॥

इतिबृहत्संहितायामंतःपुरचिंतायांपुंस्त्रीसमायोगोनामाष्टसप्ततितमोध्यायः ॥ ७८॥

---

## ॥ अथशय्यासनलक्षणं ॥

---

सर्वस्यसर्वकालंयस्मादुपयोगमेतिशास्त्रमिदं । राज्ञांविशेषतोतःशयनासनलक्षणंवक्ष्ये ॥१॥

अर्थ—शयनासनलक्षणशास्त्राचा सर्व लोकांस सर्वकाल उपयोग होतो व राजांस तर विशेषेकरून होतो. यास्तव पलंगादिकांचें लक्षण सांगतों ॥१॥

असनस्यंदनचंदनहरिद्रसुरदारुतिंदुकीशालाः । काश्मर्यंजनपद्मकशाकावाशिंशपाचशुभाः ॥२॥

अर्थ—असणाचें झाड, तिवस, चंदन, दारुहळद, देवदारु, टेंभुरणी, साग, शिवण, अंजननामकवृक्ष, पद्मकाष्ठवृक्ष, शिरीषवृक्ष, शिसवा, हे वृक्ष पलंगादिशय्या व पाटादिआसन करण्यास शुभ होत ॥२॥

अशनिजलानिलहस्तिप्रपातितामधुविहंगकृतनिलयाः।
चैत्यश्मशानपथिजोर्ध्वशुष्कवल्लीनिवद्धाश्च ॥३॥
कंटकिनोवायेस्युर्महानदीसंगमोद्भवायेच।
सुरभवनजाश्चनशुभायेचापरयाम्यदिक्पतिताः ॥४॥

अर्थ—वीज, उदक, वायु, हत्ती यांणीं पाडलेले, मधपोळे व पक्षी यांणीं राहण्यास गृह केलेले, गांवांतील मोठा वृक्ष, स्मशान व मार्ग यांचे वृक्ष, वर सुकलेले, वेलीनीं बद्ध, ॥३॥ कांट्याचे, मोठ्या नद्यांच्या संगमाजवळ झालेले, देवालयाजवळचे, पश्चिम व दक्षिण दिशांकडे पडलेले असे वृक्ष शय्या व आसनास शुभ नव्हत ॥४॥

प्रतिषिद्धवृक्षनिर्मितशयनासनसेवनात्कुलविनाशः।
व्याधिभयव्ययकलहाभवंत्यनर्थाश्चनैकविधाः ॥५॥

अर्थ—निषिद्धवृक्षानें निर्मित जें शय्या किंवा आसन त्याच्या सेवनानें कुलक्षय होतो. व्याधि, भय, द्रव्यहानि, कलह व नानाप्रकारचे अनर्थ हे होतात ॥५॥

पूर्वच्छिन्नंयदिवादारुभवेत्तत्परीक्ष्यमारंभे।
यद्यारोहेत्तस्मिन्कुमारकःपुत्रपशुदंतत् ॥६॥

अर्थ—पूर्वी तोडलेलें काष्ठ असेल, तर त्याची आरंभीं परीक्षा करावी. त्या पूर्वच्छिन्नकाष्ठावर अकस्मात् बालक येऊन् चढेल तर त्या काष्ठानें केलेलें शयनासन पुत्र व पशु यांतें देणारें होतें ॥६॥

सितकुसुममत्तवारणदध्यक्षतपूर्णकुंभरत्नानि।
मंगल्यान्यन्यानिचदृष्ट्वारंभेशुभंज्ञेयं ॥७॥

अर्थ—श्वेतपुष्प, मत्तगज, दधि, अक्षता, पूर्णकुंभ, रत्नें, अन्य मांगल्यें (शस्तशब्द, वेदध्वनि, गाय, चक्रवाक, कोकिल इ० ध्वनि) हीं शय्यासनारंभीं दृष्टीस पडतील तर शुभ होतें ॥७॥

कर्मांगुलंयवाष्टकमुदरासक्तंतुषैःपरित्यक्तं।
अंगुलशतंनृपाणांमहतीशय्याजयायकृता ॥८॥

अर्थ—कोंड्यानें (करलानें) रहित, मध्यभागाशीं जुळलेलें असे यवाष्टक (आठ

सातु ) ह्र० एक कर्मांगुलसंज्ञक होतें. त्या अंगुलप्रमाणानें १०० अंगुलें राजाची मोठी शय्या करावी ती जयकारक होते ॥८॥

नवतिःसैवपडूनाद्वादशहीनात्रिपट्कहीनाच ।
नृपपुत्रमंत्रिबलपतिपुरोधसांस्युर्यथासंख्यं ॥९॥

अर्थ–ती शय्या ९० अंगुलें लांब राजपुत्राची, ८४ अंगुलें प्रधानाची, ७८ अंगुलें सेनापतीची, ७२ अगुलें उपाध्यायाची असावी ॥९॥

अर्धमतोष्टांशोनंविष्कंभोविश्वकर्मणाप्रोक्तः ।
आयामत्र्यंशसमःपादोच्छ्रायःसकुक्षिशिराः ॥१०॥

अर्थ–पूर्वोक्त अंगुळांचें अर्ध करून आत त्या अर्धाचा अष्टमांश कमी करावा तितकीं अंगुळें विस्तार ( रुंदी ) विश्वकर्म्यानें सांगीतला. लांबीच्या तृतीयांशाइतकी पादांची ( खुरांची ) उंची, शिराचे बाहेरचें वर्तुलसुद्धा असावी ॥१०॥

यःसर्वःश्रीपर्णापर्यंकोनिर्मितःसधनदाता ।
असनकृतोरोगहरस्तिंदुकसारेणवित्तकरः ॥११॥
यःकेवलशिंशपयाविनिर्मितोबहुविधंसवृद्धिकरः ।
चंदनमयोरिपुघ्नोधर्मयशोदीर्घजीवितंकृत् ॥१२॥

अर्थ–संपूर्ण पलंग, शिवणीच्या काष्ठानें केला तर तो धनदाता होतो. असन (असाण्याचें झाड ) काष्ठानें केला तर तो रोगहरण करतो. टेंभुरणीच्या काष्ठाचा द्रव्यदाता होतो ॥११॥ जो पर्यंक केवळ शिसव्याच्या काष्ठानें केला तो नानाप्रकारची वृद्धि करतो. चंदनकाष्ठाचा शत्रुनाश करतो व धर्म, यश, दीर्घजीवित्व हींही करतो ॥१२॥

यःपद्मकपर्यंकःसदीर्घमायुःश्रियंश्रुतंवित्तं ।
कुरुतेशालेनकृतःकल्याणंशाकरचितश्च ॥१३॥
केवलचंदनरचितंकांचनगुप्तंविचित्ररत्नयुतं ।
अध्यासन्पर्यंकंविबुधैरपिपूज्यतेनृपतिः ॥१४॥

अर्थ–पद्मकाष्ठाचा पलंग दीर्घायुष्य, लक्ष्मी, विद्या, द्रव्य यांतें देतो. साग व शिरीप यांचा पलंग कल्याण करतो ॥१३॥ केवळ चंदनानें केलेला, सुवर्णानें आ-

च्छादित, नानाप्रकारच्या रत्नांनीयुक्त, अशा पलंगावर राजा बसला असता त्याची पूजा देवही करतात ॥१४॥

अन्येनसमायुक्तानतिंदुकीशिंशपाचशुभफलदा ।
नश्रीपर्णीनचदेवदारुवृक्षोनचाप्यसनः ॥१५॥

अर्थ–टेंभुरणी व शिसवा हे दोन अन्यवृक्षाशीं जोडून केलेला पर्यंक शुभफल देत नाहीं. तशीच शिवण, देवदारु, असन हेही दुसऱ्याशीं जोडले अ० शुभफल देत नाहींत ॥१५॥

शुभदौतुशाकशालौपरस्परंसंयुतौपृथक्चैव ।
तद्वत्पृथक्प्रशस्तौसहितौचहरिद्रककदंबौ ॥१६॥

अर्थ–शिरीष व साग हे एकमेकाशीं जोडलेले किंवा निरनिराळे पलंगास असले तरी शुभफलद होत. तसेच दारुहळद व कळंब हेही निरनिराळे किंवा पलगास जोडलेले शुभफल देणारे होत ॥१६॥

सर्वःस्यंदनरचितोनशुभःप्राणान्हिनस्तिचांवकृतः ।
असनोन्यदारुसहितःक्षिप्रंदोपान्करोतिवहून् ॥१७॥

अर्थ–तिवसाच्या काष्ठानें केलेला सर्व पलंग प्राणनाशक यास्तव शुभ नव्हे. तसाच आम्रकृतही शुभ नव्हे. असाण्याचें काष्ठ अन्यकाष्ठानें जोडून पलंग केला तर बहुत दोषकारक होतो ॥१७॥

अंवस्यंदनचंदनवृक्षाणांस्यंदनाच्छुभाःपादाः ।
फलतरुणाशयनासनमिष्टफलंभवतिसर्वेण ॥१८॥

अर्थ–आम्र, तिवस, चदन, या वृक्षाचे स्यदनाहून पाद शुभ होत. सर्वफलवृक्षांनीं केलेली शय्या किंवा आसन यांचें शुभफल होतें ॥१८॥

गजदंतःसर्वेषांप्रोक्ततरूणांप्रशस्यतेयोगे ।
कार्योलंकारविधिर्गजदंतेनप्रशस्तेन ॥१९॥

अर्थ–सर्व उक्त वृक्षाच्या योगानें हस्तिदंत प्रशस्त होतो. यास्तव शयनासनास प्रशस्तहस्तिदतानें अलकारविधि करावा ॥१९॥

दंतस्यमूलपरिधिंद्विरायतंप्रोझ्झकल्पयेच्छेषं ।

अधिकमनूपचराणांन्यूनंगिरिचारिणांकिंचित् ॥२०॥

अर्थ–गजदंताची मूळपरिधीच्या दुप्पट लांबी मुळापासून टाकून शेष हस्तिदंत अलंकारादिकांस घ्यावा. या मानाहून अधिक सजलदेशांतील हत्तींचे होय; व याहून कांहीं कमी पर्वतावर फिरणाऱ्या हत्तींचे जाणावें ॥२०॥

श्रीवत्सवर्धमानच्छत्रध्वजचामरानुरूपेषु ।
छेदेदृष्टेष्वारोग्यविजयधनवृद्धिसौख्यानि ॥२१॥
प्रहरणसदृशेषुजयोनंद्यावर्तेप्रनष्टदेशाप्तिः ।
लोष्टेतुलब्धपूर्वस्यभवतिदेशस्यसंप्राप्तिः ॥२२॥
स्त्रीरूपेस्वविनाशोभृंगारेभ्युत्थितेसुतोत्पत्तिः ।
कुंभेननिधिप्राप्तिर्यात्राविघ्नंचदंडेन ॥२३॥
कृकलासकपिभुजंगेष्वसुभिक्षव्याधयोरिपुवशत्वं ।
गृध्रोलूकध्वांक्षश्येनाकारेषुजनमरकः ॥२४॥
पाशेथवाकबंधेनृपमृत्युर्जनविपत्स्रुतेरक्ते ।
कृष्णेश्यावेरूक्षेदुर्गंधेचाशुभंभवति ॥२५॥

अर्थ–श्रीवत्स, वर्धमान, ( माल्टीनामक पात्रविशेष ) हीं २ चिन्हें व छत्र, ध्वज, चामर, यांसारखा हस्तिदंताचा छेद दृष्ट अ० आरोग्य, विजय, धनवृद्धि, सौख्य, हीं होतात ॥२१॥ आयुधासारखा अ० जयप्राप्ति. नंद्यावर्त ( भोंवरा ) या सारखा अ० नष्टदेश प्राप्ति. मृत्पिंडसदृश अ० पूर्वी लब्ध परंतु हस्तगत नाहीं अशा देशांची प्राप्ति होते ॥२२॥ स्त्रीरूप छेद दृष्ट अ० अश्वनाश. भृंगार ( झारी ) सदृश अ० पुत्रप्राप्ति. कुंभसदृश अ० निधिप्राप्ति. दंडसदृश अ० यात्रेस विघ्न ॥२३॥ कोंवडा, वानर, सर्प यांसारखा अ० महागाई, व्याधि, शत्रुवशता हीं होतात. गृध्र, घुबड, कावळा, ससाणा यांसारखा छेद दिसेल तर जनमृत्यु होतो ॥२४॥ पाश, कबंध ( धड ) यांसारखा असेल तर राजमृत्यु. छेदापासून रक्तस्राव झाला तर लोकांस दुःख होतें. तो छेद काळा, मलिन, रूक्ष, दुर्गंध असेल तर अशुभ होतें ॥२५॥

शुक्लःसमःसुगंधिःस्निग्धश्चशुभावहोभवेच्छेदः ।
अशुभशुभच्छेदायेशयनेष्वपितेतथाफलदाः ॥२६॥

अर्थ–शुभ्र, सम, सुगंधि, निर्मळ असा हस्तिदंताचा छेद शुभ होय. जे अशुभ

किंवा शुभ हस्तिदंताचे छेद सांगितले ते तसेच शय्येचाठाईंही फल देणार असे जाणावें ॥२६॥

ईषायोगेदारुप्रदक्षिणाग्रंप्रशस्तमाचार्यैः ।
अपसव्यैकदिगग्रेभवतिभयंभूतसंजनितं ॥२७॥

अर्थ—पलंगाचीं चार लांकडें त्यांत दोनबाजूंचीं जडावयाचीं तीं ईषा. तीं काष्ठें शिरःपादकाष्ठांहीं प्रदक्षिणाग्र जुळावीं तें शुभ असें आचार्यांनीं सांगितलें. (पूर्वेकडील काष्ठाचें अग्र दक्षिणेकडील काष्ठाचे मूलास जडावें. याप्रमाणें पश्चिम व उत्तरेकडील जाणावीं ). अपसव्य किंवा शिरःपादकाष्ठें एकदिगग्र केलीं तर भूतोत्पन्न भय होतें ( उसें व पायथें याचे लांकडांचे शेंडे बाजूचे लांकडांचे शेंड्यांशीं जोडले तर पिशाचभय होतें ) ॥२७॥

एकेनावाक्शिरसाभवतिहिपादेनपादवैकल्यं ।
द्वाभ्यांनजीर्यतेन्नंत्रिचतुर्भिःक्लेशवधबंधाः ॥२८॥

अर्थ—पलंगाचा एक पाय खालीं शेंडा करून लावला तर त्याचे स्वामीचे पाद विकल होतात. दोन पाय तसे केले तर स्वामीस अन्न जिरत नाहीं. तीन किंवा चार पाय तसे केले तर क्लेश, वध, बंध हे स्वामीस होतात ॥२८॥

सुषिरेथवाविवर्णेग्रंथौपादस्यशीर्षगेव्याधिः ।
पादेकुंभेयश्चग्रंथौतस्मिन्नुदररोगः ॥२९॥
कुंभाधस्ताज्जंघातत्रकृतोजंघयोःकरोतिभयं ।
तस्याश्चाधारोधःक्षयकृद्द्रव्यस्यतत्रकृतः ॥३०॥
खुरदेशेयोग्रंथिःखुरिणांपीडाकरःसनिर्दिष्टः ।
ईषाशीर्षण्योश्चत्रिभागसंस्थोभवेन्नशुभः ॥३१॥

अर्थ—पलंगाच्या पायांस शिरोगत ग्रंथि ( गुंज ) किंवा निराळा रंग अ० स्वामीच्या मस्तकीं व्याधि होतो. पलं० पा० जो कुंभभाग त्याच्याठाईं ग्रंथि असेल तर स्वा० उदरामध्यें रोग होतो ॥२९॥ कुंभाचे खालीं जंघा तेथें ग्रंथि अ० तर स्वा० पोटऱ्यांस भय करतो. त्या जंघाचे खालीं जो आधार तेथें ग्रंथि असेल तर धनक्षय होतो ॥३०॥ पादस्थानींचा ग्रंथि, अश्वादि खुऱ्यांस पीडा करतो. ईषा ( बाजूचीं काष्ठें ) व शीर्षण्य ( उसें पायथें याचीं लांकडें ) ह्या काष्ठांच्या तृतीयांशीं ग्रंथि अ० तर शुभ नव्हे ॥३१॥

निष्कुटमथकोलाक्षंसूकरनयनंचवत्सनाभंच ।
कालकमन्यद्धुंधुकमितिकथिताश्छिद्रसंक्षेपः ॥३२॥

अर्थ—निष्कुट, कोलाक्ष, सूकरनयन, वत्सनाभ, कालक, धुंधुक, या नावांचीं छिद्रें होत. यांचा संक्षेप सांगितला ॥३२॥

घटवत्सुपिरंमध्येसंकटमास्येचनिष्कुटंछिद्रं ।
निष्पावमाषमात्रंनीलंछिद्रंचकोलाक्षं ॥३३॥
सूकरनयनंविषमंविवर्णमध्यर्धपर्वदीर्घंच ।
वामावर्तंभिन्नंपर्वमितंवत्सनाभाख्यं ॥३४॥
कालकसंज्ञंकृष्णंधुंधुकमितियद्भवेद्विनिर्भिन्नं ।
दारुसवर्णंछिद्रंनतथापापंसमुद्दिष्टं ॥३५॥

अर्थ—जें छिद्र मध्यभागीं सुषिर मुखाचाठाईं अल्प तें निष्कुटसंज्ञक होय. पावटा व उडीद यांएवढें नीलवर्ण जें छिद्र तें कोलाक्षसं० होय ॥३३॥ सारखें नव्हे, विगतवर्ण, अर्धपर्वाहून दीर्घ, असें छिद्र सूकरनयनसं० होय. वामावर्त, पार गेलेलें, पर्वप्रमाण जें छिद्र तें वत्सनाभसं० होय ॥३४॥ जें कृष्णवर्ण छिद्र तें कालकसं० होय. जें दोहोंकडे दृश्य व कृष्णवर्ण तें धुंधुकसं० होय. काष्ठासारख्या वर्णाचें छिद्र फार अशुभ नव्हे ॥३५॥

निष्कुटसंज्ञेद्रव्यक्षयस्तुकोलेक्षणेकुलध्वंसः ।
शस्त्रभयंसूकरकेरोगभयंवत्सनाभाख्ये ॥३६॥
कालकधुंधुकसंज्ञंकीटैर्विद्धंचनशुभदंछिद्रं ।
सर्वग्रंथिप्रचुरंसर्वत्रनशोभनंदारु ॥३७॥

अर्थ—निष्कुटसं० छिद्र अ० द्रव्यनाश, कोलाक्षसं० अ० कुलनाश, सूकरनयन छिद्र अ० शस्त्रभय, वत्सनाभसं० छिद्र अ० रोगभय, ॥३६॥ कालक व धुंधुकसं० छिद्रें व कीटविद्ध छिद्रें शुभ नव्हत. सर्वकाष्ठास बहुत ग्रंथि ( गुंजटे ) अ० सर्व कामांस शुभ नव्हे ॥३७॥

एकद्रुमेणधन्यंवृक्षद्वयनिर्मितंचधन्यतरं ।
त्रिभिरात्मजवृद्धिकरंचतुर्भिरर्थोयशश्चाग्र्यं ॥३८॥
पंचवनस्पतिरचितेपंचत्वंयातितत्रयःशेते ।

पट्सप्ताष्टतरूणांकाष्ठैर्घटितेकुलविनाशः ॥३९॥

अर्थ—एकवृक्षाच्या काष्ठानें केलेला पलंग शुभ, दोन वृक्षां० का० के० अत्यंत शुभ, तीहींनी केलेला पुत्रवृद्धिकर, चौहोंनीं केलेला द्रव्य, उत्तम यश यांतें करणारा होतो ॥३८॥ पांच वृक्षानीं केलेल्या पलंगावर निजणारा मरतो. ६।७।८ वृक्षांच्या काष्ठांनी केलेला पलंग कुलनाश करतो ॥३९॥

॥ इतिबृहत्संहितायांशय्यासनलक्षणंनामैकोनाशीतितमोध्यायः ॥७९॥

---

## ॥ अथरत्नपरीक्षा ॥

रत्नेनशुभेनशुभंभवतिनृपाणामनिष्टमशुभेन ।
यस्मादतःपरीक्ष्यंदैवंरत्नाश्रितंतज्ज्ञैः ॥१॥

अर्थ—शुभलक्षणयुक्त रत्नानें राजाचें शुभ होतें व अशुभलक्षणयुक्त रत्नानें अशुभ होतें; यास्तव हीरकादि रत्नाश्रित दैवाची परीक्षा रत्नपारख्यानीं करावी ॥१॥

द्विपहयवनितादीनांस्वगुणविशेषेणरत्नशब्दोस्ति ।
इहतूपलरत्नानामधिकारोवज्रपूर्वाणां ॥२॥

अर्थ—हत्ती, घोडा, स्त्री व जातीजातीमध्यें जें उत्कृष्ट त्यास त्याच्यात्याच्या गुणाधिक्यानें रत्न म्हणतात. या रत्नपरीक्षेंत हिरेप्रभृति पाषाणरत्नांचा अधिकार आहे २

रत्नानिबलाद्दैत्याद्दधीचितोन्येवदंतिजातानि ।
केचिद्भुवःस्वभावाद्वैचित्र्यंप्राहुरुपलानां ॥३॥

अर्थ—बलनामक दैत्यापासून (त्यास इंद्रानें मारला तेव्हां त्याच्या हाडांपासून) रत्नें झालीं असें कोणी म्हणतात. दधीचि ऋषीच्या हाडापासून रत्नें झालीं असें अन्य म्हणतात. कोणी, भूमीच्या स्वभावास्तव पाषाणास नानाप्रकारचे रंग होऊन तीं रत्नें झालीं असें म्हणतात ॥३॥

वज्रेंद्रनीलमरकतकर्केतनपद्मरागरुधिराख्याः ।
वैडूर्यपुलकविमलकराजमणिस्फटिकशशिकांताः ॥४॥
सौगंधिकगोमेदकशंखमहानीलपुष्परागाख्याः ।

ब्रह्ममणिज्योतीरससस्यकमुक्ताप्रवालानि ॥५॥

अर्थ—वज्र, इंद्रनील, मरकत, कर्केतन, पद्मराग, रुधिराख्य, वैडूर्य, पुलक, विमलक, राजमणि, स्फटिक, चंद्रकांत, ॥४॥ सौगंधिक, गोमेदक, शंख, महानील, पुष्पराग, ब्रह्ममणि, ज्योतीरस, सस्यक, मुक्ताफळ, प्रवाळ, हे रत्नांचे भेद आहेत (यांत उत्कृष्ट वज्र, मुक्ता, पद्मराग, मरकत हीं चार रत्नें आहेत यास्तव त्यांचेच लक्षण आचार्य करितात) ॥५॥

वेणातटेविशुद्धंशिरीषकुसुमोपमंचकौशलकं ।
सौराष्ट्रकमाताम्रंकृष्णंसौर्पारकंवज्रं ॥६॥
ईषत्ताम्रंहिमवतिमतंगजंवल्लपुष्पसंकाशं ।
आपीतंचकलिंगेश्यामंपौंड्रेषुसंभूतं ॥७॥

अर्थ— वेणानदीच्या तीरीं झालेलें वज्र (हिरा) सत्वरत्न दोषरहित होय शिरसाच्या पुष्पासारखें (श्वेतपीत) तें कोशलदेशोत्पन्न, ईषल्लोहितवर्ण जें वज्र० तें सौराष्ट्रदेशोत्पन्न, कृष्णवर्ण जें वज्ररत्न तें सूर्पारकदेशोत्पन्न, ॥६॥ ईषत्ताम्रवर्ण जें वज्र० तें हिमाचलाचाठाईं झालेलें, वल्ल (कडवा. वाल) पुष्पासारखें जें वज्र० तें मतंगजदेशोत्पन्न, ईषत्पीतवर्ण जें वज्र० तें कलिंगदेशोत्पन्न, श्यामवर्ण जें वज्ररत्न तें पौंड्रदेशोत्पन्न, अशीं सात हिऱ्याचीं उत्पत्तिस्थानें होत ॥७॥

ऐंद्रंषडस्त्रिशुक्लंयाम्यंसर्पास्यरूपमसितंच ।
कदलीकांडनिकाशंवैष्णवमितिसर्वसंस्थानं ॥८॥
वारुणमबलागुह्योपमंभवेत्कर्णिकारपुष्पनिभं ।
शृंगाटकसंस्थानंव्याघ्राक्षिनिभंचहौतभुजं ॥९॥
वायव्यंचयवोपममशोककुसुमप्रभंसमुद्दिष्टं ।
स्रोतःखनिःप्रकीर्णकमित्याकरसंभवस्त्रिविधः ॥१०

अर्थ—जें वज्र० षडस्रि (षट्कोण) व श्वेतवर्ण तें इंद्रदैवत, जें कृष्णवर्ण व सर्पाच्या मुखासारखें तें यमदैवत, जें कदलीखांबवर्ण (नीलपीत) व सर्वाकार (वर सांगितलेल्या २ आकारांशिवाय इतर आकाराचें) तें विष्णुदैवत, ॥८॥ जें स्त्रीच्या गुह्याच्या आकाराचें व कर्णिकार (बाव्याचें झाड) पुष्पासारखें (ईषत्पीत वर्ण) तें वरुणदैवत, जें शृंगाटकसंस्थान (त्रिकोण) व व्याघ्राच्या नेत्रासारखें तें अग्निदैवत, ॥९॥ जें यवासारखें (मध्यें मोठें) व अशोकपुष्पासारखें (लोहितवर्ण) तें वायुदैवत, अशा वज्राच्या देवता सांगितल्या आहेत पाण्याचे प्रवाहामध्ये, खाणीमध्यें व कित्येक ठिकाणीं भूमींत, असे ३ ठिकाणीं हिरे सांपडतात ॥१०॥

रक्तंपीतंचशुभंराजन्यानांसितंद्विजातीनां ।
शैरीषंवैश्यानांशूद्राणांशस्यतेसिनिभं ॥११॥

अर्थ–रक्त व पीतवर्ण हिरा राजास शुभ होय. श्वेतवर्ण ब्राह्मणांस शुभ, शिरीष-पुष्पसदृशवर्ण वैश्यांस शुभ, कृष्णवर्ण शूद्रांस शुभ होय ॥११॥

सितसर्षपाष्टकंतंडुलोभवेत्तंडुलैस्तुविंशत्या ।
तुलितस्यद्वेलक्षेमूल्यंद्विद्व्यूनितेचैतत् ॥१२॥
पादत्र्यंशार्धोनंत्रिभागपंचांशषोडशांशाश्च ।
भागश्चपंचविंशःशतिकःसाहस्रिकश्चेति ॥१३॥

अर्थ–आठ, पांढऱ्या राई ( मोहऱ्या ) भार १ तांदूळ; २० तांदूळभार जो हिरा त्याची किंमत दोनलक्ष कार्षापण ( पावले ) होते. वीस तांदुळांत दोनदोन तांदूळ कमी केले ह्मणजे पुढील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें किंमत होते ॥१२॥ १८ तांदूळ वजन हिऱ्याची किंमत चतुर्थांश कमी दोनलक्ष ह्म० दीडलक्ष, १६ तांदू० तृतीयांश कमी दोनलक्ष ( १३३३३३$\frac{1}{3}$ ), १४ तां० दोन लक्षांचे अर्ध ( १००००० ), १२ तां० दोन लक्षांचा तिसरा हिस्सा ( ६६६६६$\frac{2}{3}$ ), १० तां० दोन लक्षांचा पंचमांश ( ४०००० ), ८ तां० दोन० षोडशांश ( १२-५०० ), ६ तां० दोन० पंचविंशांश ( ८००० ), ४ तां० दो० शंभरावाहिस्सा ( २००० ), २ तांदूळ वजनाच्या हिऱ्याची किंमत दोन लक्षांचा सहस्रांश ( २०० ) कार्षापण ( पावले ) होते ॥१३॥

सर्वद्रव्याभेद्यंलघ्वंभसितरतिरश्मिवत्स्निग्धं ।
तडिदनलशक्रचापोपमंचवज्रंहितायोक्तं ॥१४॥

अर्थ–सर्वप्रकारचे शस्त्रांनीं अभेद्य, लहान, उदकांमध्ये तरणारा, किरणयुक्त, स्निग्ध, वीज, अग्नि, इंद्रधनुष्य यासारखा तेजस्वी हिरा हितकारक होय. ॥१४॥

काकपदमक्षिकाकेशधातुयुक्तानिशर्कराविद्धं ।
द्विगुणाश्रिदग्धकलुषत्रस्तविशीर्णानिनशुभानि १५

अर्थ–काकपदांसारखीं चिन्हें, मक्षिकांसारखीं चिन्हें, केशांसारख्या रेषा, मृतिकादि धातु यांहीं युक्त; बारीक कणांनीं युक्त, वेधित, शुभकोनाच्या दुप्पट कोनांनीं युक्त, अग्निदग्ध, गढूळ ( विवर्ण ), कांतिरहित, विशीर्ण ( जीर्ण ) असा हिरा शुभ नव्हे ॥१५॥

यानिचबुद्बुददलिताग्रचिपिटवासीफलप्रदीर्घाणि ।
सर्वेषांचैतेषांमूल्याद्भागोष्टमोहानिः ॥१६॥

अर्थ–पाण्याचे बौबळ्यासारखे, विदारितप्रांतभाग, चपटे, अडुळशाच्या फळासारखे लांब, अशा हिऱ्यांची किंमत पूर्वोक्त किमतीपेक्षां अष्टमांश कमी जाणावी १६

वज्रंनकिंचिदपिधारयितव्यमेकेपुत्रार्थिनी
भिरबलाभिरुशंतितज्ज्ञाः । शृंगाटकत्रिपु
टधान्यकवत्स्थितंयच्छ्रोणीनिभंचशुभदंत
नयार्थिनीनां ॥१७॥

अर्थ–पुत्रेच्छु स्त्रियांनीं हिरा कोणताही धारण करूं नये असें कोणी आचार्य म्हणतात; परंतु शृंगाटक ( त्रिकोण ), तीन पुटांनीं युक्त, धान्यक ( धणे ) यासारखा, स्त्रीच्या योनीसारखा असा हिरा पुत्रेच्छु स्त्रियांस कल्याणकारक होय ॥१७

स्वजनविभवजीवितक्षयंजनयतिवज्रमनिष्टलक्षणं ।
अशनिविषभयारिनाशनंशुभमुरुभोगकरंचभूभृतां १८

अर्थ–अनिष्टलक्षणयुक्त हिरा, स्वकीयजन ऐश्वर्य व आयुष्य यांचा नाश करितो. शुभलक्षणयुक्त हिरा विजेचें भय, विषभय, शत्रुनाश यांतें करितो व शुभ, बहुत उपभोग, हे राजास करतो ॥१८॥

॥इतिबृहत्संहितायांवज्रपरीक्षानामाशीतितमोध्यायः ८०

---

## ॥ अथमुक्ताफलपरीक्षा ॥

---

द्विपभुजगशुक्तिशंखाभ्रवेणुतिमिसूकरप्रसूतानि ।
मुक्ताफलानितेषांबहुसाधुचशुक्तिजंभवति ॥१॥

अर्थ–हत्ती, सर्प, शिंपा, शंख, मेघ, वेळू, मत्स्य, डुकर या आठांपासून मोतीं होतात त्यामध्यें शिंप्यातलें मोतीं फार उत्तम ( व्यवहारयोग्य ) होतें ॥१॥

सिंहलकपारलौकिकसौराष्ट्रकताम्रपर्णिपारशवाः ।
कौबेरपांड्यवाटकहैमाइत्याकराह्यष्टौ ॥२॥

अर्थ—सिंहलक ( सिलोन ), पारलौक, सुराष्ट्र ( काठेवाड ) हे देश; ताम्रपर्णीनदी, पारशवदेश, कौबेर, पाण्ड्यवाट, हैम हे देश; अशीं हीं आठ मोत्यांचीं उत्पत्तिस्थानें होत ॥२॥

बहुसंस्थानाःस्निग्धाहंसाभाःसिंहलाकराःस्थूलाः ।
ईषत्ताम्राःश्वेतास्तमोवियुक्ताश्चताम्राख्याः ॥३॥
कृष्णाःश्वेताःपीताःसशर्कराःपारलौकिकाविषमाः ।
नस्थूलानात्यल्पानवनीतनिभाश्चसौराष्ट्राः ॥४॥
ज्योतिष्मंतःशुभ्रागुरवोतिमहागुणाश्चपारशवाः ।
लघुजर्जरंदधिनिभंबृहद्विसंस्थानमपिहैमं ॥५॥
विषमंकृष्णंश्वेतंलघुकौवेरंप्रमाणतेजोवत् ।
निंबफलत्रिपुटधान्यकचूर्णाःस्युःपांड्यवाटभवाः ॥६॥

अर्थ—बहुतजागीं उत्पन्न होणारीं, निर्मल, हंसतुल्यकांति, मोठीं अशीं सिंहलद्वीपांतील मोत्यें होत. थोडीं तांबडीं, श्वेत, निर्मल अशीं मोत्यें ताम्रपर्णीनदीमध्यें उत्पन्न होतात ॥३॥ काळीं, पांढरीं, पिंवळीं, वाळूयुक्त, सारखीं नव्हत अशीं पारलौकिक मोत्यें होत. फार मोठीं नव्हत व फार बारीकही नव्हत, लोण्याच्या वर्णाचीं मोत्यें सौराष्टदेशांतील होत ॥४॥ तेजस्वी, श्वेतवर्ण, वजनदार, उत्तम गुणांनीं युक्त अशीं मोत्यें पारशवदेशोत्पन्न होत. लहान, रूक्ष, दह्यासारखें, बृहत्, द्विसंस्थान ( जुगळ्यासारखें ) असें मोतीं हिमालयोत्पन्न होय ॥५॥ सारखें नव्हे, काळें, श्वेत, लहान, मोठया तेजाचें असें मोतीं कौबेर होय. निंबफळासारखें, तीन पुटांचें, धण्यासारखें, फार बारीक असें मोतीं पांड्यवाटोत्पन्न होय ॥६॥

अतसीकुसुमश्यामंवैष्णवमैंद्रंशशांकसंकाशं ।
हरितालनिभंवारुणमसितंयमदैवतंभवति ॥७॥
परिणतदाडिमगुलिकागुंजाताम्रंचवायुदैवत्यं ।
निर्धूमानलकमलप्रभंचविज्ञेयमाग्नेयं ॥८॥

अर्थ—जवसाचे पुष्पासारखें काळें मोतीं विष्णुदैवत्य होय. चंद्रासारखें श्वेतवर्ण, इंद्रदैवत्य; हरताळासारखें पीतवर्ण, वरुणदैवत्य; काळें, यमदैवत होय ॥७॥ पिकलेल्या डाळिंबाच्या दाण्यासारखें व गुंजेसारखें ताम्रवर्ण, वायुदैवत्य होय. धूमरहितअग्नि व कमळ यांसारखें ज्याचें तेज तें मोतीं अग्निदैवत्य जाणावें ॥८॥

मापकचतुष्टयधृतस्यैकस्यशताहतात्रिपंचाशत् ।
कार्षापणानिगदितामूल्यंतेजोगुणयुतस्य ॥९॥
मापकदलहान्यातोद्वात्रिंशद्विंशतिस्त्रयोदशच ।
अष्टौशतानिचशतत्रयंत्रिपंचाशतासहितं ॥१०॥
पंचत्रिंशंशतमितिचत्वारःकृष्णलानवतिमूल्याः ।
सार्धास्तिस्त्रोगुंजाःसप्ततिमूल्यंधृतंरूपं ॥११॥
गुंजात्रयस्यमूल्यंपंचाशद्रूपकागुणयुतस्य ।
रूपकपंचत्रिंशत्त्रयस्यगुंजार्धहीनस्य ॥१२

अर्थ—तेज व उत्तम गुण यांणीं युक्त असे एक मोतीं, पांच गुंजांचा एक मासा याप्रमाणें ४ मासे वजन असेल तर, त्याची किंमत ५३०० कार्षापण ( पावले ) सांगीतले ॥९॥ चार माशांत अर्ध अर्ध कमी केलें अ० पुढील किंमत होत्ये. क्र० ३॥ माशांस ३२०० का०; ३ मा० २००० का०; २॥ मा० १३००; २ मा० ८००; १॥ मा० ३५३; १ मा० १३५; ४ गुंजांस ९०; ३॥ गुं० ७०; ३ गु० ५०; २॥ गुंजास ३५; किंमत होत्ये ॥१०॥११॥१२॥

पलदशभागोधरणंतद्यदिमुक्तास्त्रयोदशसुरूपाः ।
त्रिशतीसपंचविंशारूपकसंख्याकृतंमूल्यं ॥१३॥
षोडशकस्यद्विशतीविंशतिरूपस्यसप्ततिःसशता ।
यत्पंचविंशतिधृतंतस्यशतंत्रिंशतासहितं ॥१४॥
त्रिंशत्सप्ततिमूल्याचत्वारिंशच्छतार्धमूल्याच ।
षष्टिःपंचोनावाधरणंपंचाष्टकंमूल्यं ॥१५॥
मुक्ताशीत्यास्त्रिंशच्छतस्यसापंचरूपकविहिना ।
द्वित्रिचतुःपंचशताद्वादशषट्पंचकात्रितयं ॥१६॥

अर्थ—पलाचा दहावा हिसा धरणसं० होयं. तितकें ( ३२ गुंजा ) वजन सुरूप १३ मोत्यें होतील तर त्याची किंमत ३२५ रुपये केली आहे ॥१३॥ १६ मोत्यें सुरूप धरणतुल्य असतील तर २०० रु० किं०; २० मोत्यें अ० तर १७० रु०; २५ अ० १३०; ॥१४॥ ३० मोत्यें अ० तर ७० रु० किं०; ४० मोत्यें अ० तर ५० रु०; ६० किंवा ५५ मोत्यें अ० तर त्यांची किं० ४० रु०; ॥१५॥ ८० मोत्यें अ० तर ३० रु०; १०० मोत्यें अ० तर ३५ रु० किं०; २००

मोत्यें अ० तर १२ रु०; ३०० असलीं तर ६ रु०; ४०० अ० तर ५ रु०; ५०० मोत्यें धरणतुल्य असल्यीं तर त्यांची किंमत ३ रुपये जाणावी ॥१६॥

पिक्कापिच्चार्घार्धारवकःसिक्थंत्रयोदशाद्यानां ।
संज्ञाःपरतोनिगराश्चूर्णाश्चाशीतिपूर्वाणां ॥१७॥

अर्थ–१३ मोत्यें भार जो धरण तो पिक्कासं० होय. १६ मोत्यें भार ध० तो पिच्चासं०, २० भार धरण अर्घासं०, २५ भार धरण अर्धासं०, ३० भार धरण रवकसं०, ४० भार धरण सिक्थसंज्ञक होय. यापुढें ५५ भार धरण निगरसं०, ८० पासून ५०० पर्यंत सर्व धरणांस चूर्णसंज्ञा जाणावी. (ह्या संज्ञा मोत्यांच्या उत्पत्तिस्थानीं व्यवहारास उपयोगीं पडतात यास्तव सांगितल्या आहेत)॥१७॥

एतद्गुणयुक्तानांधरणधृतानांप्रकीर्तितंमूल्यं ।
परिकल्प्यमंतरालेहीनगुणानांक्षयःकार्यः ॥१८॥
कृष्णश्वेतकपीतकताम्राणामीषदपिचविषमाणां ।
त्र्यंशोनंविषमकपीतयोश्चषड्भागदलहीनं ॥१९॥

अर्थ–ही किंमत गुणयुक्त धरणभार मोत्यांची सांगितली. यांच्यामध्यें स्वबुध्दीनें किंमत कल्पावी. (१४।१६ इ० मोत्यांची व्यस्तत्रैराशिकानें किंमत आणावी) गुणहीन मोत्यें असल्यास वक्ष्यमाणक्रमानें किंमत कमी करावी ॥१८॥ ईषत्कृष्णवर्ण, ईषत्श्वेत, ईषत्पीत, ईषत्ताम्र, ईषत्विषम अशीं मोत्यें असतां, पूर्वोक्त किंमत त्र्यंशोन म्ह० तृतीयांश कमी करावी. अतिविषम असतां षड्भाग व अतिपीत असतां अर्धी पूर्वोक्त किंमत कमी करावी ॥१९॥

ऐरावतकुलजानांपुष्यश्रवणेंदुसूर्यदिवसेषु ।
येचोत्तरायणभवाग्रहणेर्केंद्वोश्चभद्रेभाः ॥२०॥
तेषांकिलजायंतेमुक्ताःकुंभेषुसरदकोशेषु ।
बहवोबृहत्प्रमाणाबहुसंस्थानाःप्रभायुक्ताः ॥२१॥
नैषामर्घःकार्योनचवेधोतीवतेप्रभायुक्ताः ।
सुतविजयारोग्यकरामहापवित्राधृताराज्ञां ॥२२॥

अर्थ–ऐरावतकुलामध्यें उत्पन्न, पुष्यनक्षत्र, श्रवणनक्षत्र, चंद्रवार, रविवार यांचाठाईं झालेले, उत्तरायणीं झालेले, सूर्यचंद्रांच्या ग्रहणीं झालेले, असे जे हत्ती ते भद्रसंज्ञक होत ॥२०॥ त्या भद्रसंज्ञकांच्या गंडस्थळांमध्यें व दंतकोशांमध्यें बहुत, मो-

टीं, अनेक आकृतींचीं, प्रमाणयुक्त अशीं मोत्यें होतात ॥२१॥ त्यांची किंमत करूं नये व वेधही करूं नये; कारण तीं तेजस्वी व महापवित्र आहेत. तीं राजांनीं धारण केलीं असतां पुत्र, विजय, आरोग्य करणारीं होत ॥२२॥

दंष्ट्रामूलेशशिकांतिसप्रभंबहुगुणंचवाराहं ।
तिमिजंमत्स्याक्षिनिभंबृहत्पवित्रंबहुगुणंच ॥२३॥

अर्थ—डुकरांच्या दाढांच्या मुळीं चंद्रासारखें तेजस्वी, अनेकगुण असें वराहसंभव मोतीं होय. माशाच्या डोळ्यासारखें, मोठें पवित्र, बहुगुण असें मत्स्योत्पन्न मोतीं होय ॥२३॥

वर्षोपलवज्जातंवायुस्कंधाच्चसप्तमाद्भ्रष्टं ।
ह्रियतेकिलखाद्दिव्यैस्तडित्प्रभंमेघसंभूतं ॥२४॥

अर्थ—गारेसारखें झालेलें, सप्तम वायुस्कंधापासून पडलेलें, देवांनीं आकाशांत केलेलें, विजेसारखें तेजस्वी, असें मेघोत्पन्न मोतीं होय ॥२४॥

तक्षकवासुकिकुलजाःकामगमायेचपन्नगास्तेषां ।
स्निग्धानीलद्युतयोभवंतिमुक्ताःफणस्यांते ॥२५॥
शस्तेवनिप्रदेशेरजतमयेभाजनेस्थितेचयदि ।
वर्षतिदेवोकस्मात्तज्ज्ञेयंनागसंभूतं ॥२६॥
अपहरतिविषमलक्ष्मींक्षपयतिशत्रून्यशोविकाशयति । भौजंगंनृपतीनांधृतमकृतार्घंविजयदंच ॥२७॥

अर्थ—तक्षक व वासुकि यांच्या वंशांमध्यें झालेले, यथेच्छ गमन करणारे असे जे सर्प त्यांच्या फणेच्या अंतीं स्वच्छ, नीलवर्ण अशीं मोत्यें होतात ॥२५॥ तें नागज मोतीं शुद्ध भूमीवर रुप्याच्या भांड्यांत ठेवलें अ० इंद्र वृष्टि करतो (पाऊस पाडतो) तें मोतीं नागज जाणावें ॥२६॥ तें नागज मोतीं राजानें किंमत केल्यावांचून धारण केलें तर, अलक्ष्मीचें हरण, शत्रुनाश, यशावृद्धि, विजय हीं होतात २७

कर्पूरस्फटिकनिभंचिपिटंविषमंचवेणुजंज्ञेयं ।
शंखोद्भवंशशिनिभंवृत्तंभ्राजिष्णुरुचिरंच ॥२८॥

अर्थ—कापूर व स्फटिकमण्यासारखें, चेपट, असम, असें वेणुजमोतीं जाणावें. चंद्रकांतीसारखें, वाटोळें, तेजस्वी, सुंदर असें शंखोत्पन्न मोतीं जाणावें ॥२८॥

शंखतिमिवेणुवारणवराहभुजगाभ्रजान्यवेध्यानि ।
अमितगुणत्वाच्चैषामर्घःशास्त्रेननिर्दिष्टः ॥२९॥

अर्थ—शंख, मत्स्य, वेळू, हत्ती, वराह, सर्प, मेघ, यांपासून झालेलीं मोत्यें विंधू नयें व बहुतगुणवान् यास्तव शास्त्रामध्यें यांची किंमतही सांगितली नाहीं ॥२९॥

एतानिसर्वाणिमहागुणानिसुतार्थसौभाग्य
यशस्कराणि । रुक्शोकहंतॄणिचपार्थिवानां
मुक्ताफलानीप्सितकामदानि ॥३०॥

अर्थ—हीं सर्वप्रकारचीं मोत्यें महागुणी, पुत्र, द्रव्य, सौभाग्य, यश यांतें करणारीं, रोग व शोक यांचा नाश करणारीं, इच्छित मनोरथ पूर्ण करणारीं अशीं राजास होतात ॥३०॥

सुरभूषणंलतानांसहस्रमष्टोत्तरंचतुर्हस्तं ।
इंद्रच्छंदोनाम्नाविजयच्छंदस्तदर्धेन ॥३१॥
शतमष्टयुतंहारोदेवच्छंदोह्यशीतिरेकयुता ।
अष्टाष्टकोर्धहारोरश्मिकलापश्चनवषट्कः ॥३२॥
द्वात्रिंशतातुगुच्छोविंशत्याकीर्तितोर्धगुच्छाख्यः ।
षोडशभिर्माणवकोद्वादशभिश्चार्धमाणवकः ॥३३
मंदरसंज्ञोष्टाभिःपंचलताहारफलकमित्युक्तं ।
सप्तविंशतिमुक्ताहस्तोनक्षत्रमालेति ॥३४॥
अंतरमणिसंयुक्तामणिसोपानंसुवर्णगुलिकैर्वा ।
तरलकमणिमध्यंतद्विज्ञेयंचाटुकारमिति ॥३५॥
एकावलीनामयथेष्टसंख्याहस्तप्रमाणामणि
विप्रयुक्ता । संयोजितायामणिनातुमध्येयष्टी
तिसाभूषणविद्भिरुक्ता ॥३६॥

अर्थ—१००८ सरांचा ४ हात लांब असा मोत्याचा हार देवास करितात. त्याचें नाव इंद्रच्छंद होय. त्याच्या अर्ध्या सराचा करतात त्याचें नाव विजयच्छंद होय ॥३१॥ एकशें आठ सराचा २ हात लांब व ८१ सराचा दोन हात जो हार त्याचें नाव देवच्छंद; ६४ सरांचा हार अर्धहारस०; ५४ सराचा हार र-

हिमकलापसं०, ॥३२॥ ३२ सरांचा हार गुच्छसं०, २० सरांचा हार अर्धगुच्छसं०; १६ सरांचा हार माणवकसं०, १२ सरांचा अर्धमाणवकसं०; ॥३३॥ ८ सरांचा हार मंदरसं०; पाच सरांचा फलकसं०; २७ मौक्तिकांचा हस्तप्रमाण जो हार तो नक्षत्रमालासं०; ॥३४॥ त्याच नक्षत्रमालेंत मध्यें रत्नें किंवा सोन्याचे मणि घातले तर ती मणिसोपानसं०; त्याचेमध्यें तरलकमणि असल्यास त्यालाच चाटुकार असें ह्मणतात ॥३५॥ यथेष्ट मौक्तिकांनीं युक्त, हस्तप्रमाण, मणिरहित जो हार तो एकावलीसं०; जिच्या मध्यें मणि योजला ती यष्टि असें भूषणवेत्त्यांनीं सांगीतलें ॥३६॥

## इतिबृहत्संहितायांमुक्ताफलपरीक्षानामेकाशीतितमोध्यायः ॥८१॥

---

## ॥ अथपद्मरागपरीक्षा ॥

सौगंधिककुरुविंदस्फटिकेभ्यःपद्मरागसंभूतिः ।
सौगंधिकजाभ्रमरांजनाब्जजंबूरसद्युतयः ॥१॥
कुरुविंदभवाःशबलामंदद्युतयश्चधातुभिर्विद्धाः ।
स्फटिकभवाद्युतिमंतोनानावर्णाविशुद्धाश्च ॥२॥

अर्थ—सौगंधिक व कुरुविंद ( धातुवि० ) व स्फटिक यांपासून पद्मरागमण्यांची उत्पत्ति होते. भ्रमर, काजळ, नीलकमल, जांवळाचा रस यांसारख्या रंगाचे जे पद्मराग ते सौगंधिकापासून झालेले होत ॥१॥ शबल ( श्वेतकृष्ण मिश्रवर्ण ), अल्पकांति, मृत्तिकादिकांनीं विद्ध ( सकलंक ) असे जे पद्मराग ते कुरुविंदोत्पन्न जाणावे. तेजस्वी, अनेकरंगांचे, स्वच्छ असे जे पद्मराग ते स्फटिकापासून उत्पन्न असें जाणावें ॥२॥

स्निग्धःप्रभानुलेपीस्वच्छोर्चिष्मान्गुरुःसुसंस्थानः ।
अंतःप्रभोतिरागोमणिरत्नगुणाःसमस्तानां ॥३॥

अर्थ—स्नेहयुक्त, प्रभायुक्त, स्वच्छ, तेजस्वी, गुरु ( वजनदार ), सुंदर आकृति, मध्यभागीं कांतियुक्त, अतिशोभितवर्ण, हे सर्व पद्मरागमणिरत्नांचे, गुण होत ॥३॥

Registered No 76 of 1874

## सूचना.

विद्वान्, उदार, परोपकारी आणि श्रीमान् इत्यादि सद्गृहस्थांस आह्मी विनयपूर्वक असें सुचवितो कीं, या ग्रंथाचा राजापासून रंकापर्यंत सर्वांस विशेष उपयोग होईल, असें समजून प्राकृत (मराठी) टीकेसह लोकहितो-देशानें हें पुस्तक छापण्याचें काम सुरूं केलें आहे. यास वर्गणीद्वारा साह्य करून, तें पूर्ण करणें सुज्ञ देशाभिमान्यांकडे आहे.

### वर्गणीचे दर.

| | किमत. | हाशील. |
| --- | --- | --- |
| आगाऊ किंवा अंक पोंचतांच दिल्यास दर अंकास | ८ आणे | ६ पै. |
| मागाहून दिल्यास दर अंकास | १० आणे. | ६ पै. |

किमतीबद्दल टिकिटा पाठविणें झाल्यास अर्धा आणा दराच्या पाठवाव्या.

मुंबईत ठाकुरद्वारानजीक हरिजनांचे वाडींत रा० रा० नारोकृष्ण दुमाळ्ये यांजकडे पैसे जमा करून त्यांची पावती घ्यावी.

---

## आश्रयदात्यांस विनंती.

या ग्रंथाचे एकंदर १०७ अध्याय असून २८६२ श्लोक आहेत. त्यांतून आजपर्यंतचे ११ अंकांत २३४४ श्लोक होऊन गेले.. यावरून यापुढें राहिलेल्या ५१८ श्लोकांचे २ अंक निघतील असा अजमास होतो.

श्री

# बृहत्संहिता

( वराह मिहिरकृत )

मूळश्लोक संस्कृत असून त्याचा अर्थ प्राकृत ( महाराष्ट्र ) भाषेत लिहिला आहे.

# THE BRIHATSANHITÁ

[ BY VARÁHA MIHIRA ]

यांत व्यवहारोपयोगी सर्वप्रकारचे विषय आहेत.


पुस्तक २ रें — तारीख २५ जुलई १८७४. — अंक १५

VOL 2 — 25th July 1874 — No. 15


रत्नागिरी

येथें

जनार्दन हरि आठल्ये

यांणी

आपल्या

जगन्मित्र छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

---

प्रत्येक अंकांत मोठ्या तक्तीचे साध्यार्चा चतुष्पत्री ३२ पृष्ठें असून सुमारे ८०० ग्रंथ येत जाईल

कलुषामंदद्युतयोलेखाकीर्णाःसधातवःखंडाः ।
दुर्विद्धानमनोज्ञाःसशर्कराश्चेतिमणिदोषाः ॥४॥

अर्थ–कलुष ( गढूळ ), अल्पकांति, रेषांनीं व्याप्त, मृत्तिकादि धातुयुक्त, फुटलेले, अप्रशस्तवेधानें युक्त, सुंदर नव्हत, बारीक कणांनीं युक्त, हे पद्मरागमण्याचे दोष होत ॥४॥

भ्रमरशिखिकंठवर्णोदीपशिखासप्रभोभुजंगानां ।
भवतिमणिःकिलमूर्धनियोनर्घेयःसविज्ञेयः ॥५॥

अर्थ–भ्रमर व मयूरकंठ याच्या वर्णाचा, दीपाच्या शिखेसारखा, असा मणि सर्पांच्या मस्तकीं होतो, तो अमोलिक जाणावा ॥५॥

यस्तंविभर्तिमनुजाधिपतिर्नतस्यदोषाभवंतिविषरोगकृताःकदाचित् । राष्ट्रेचनित्यमभिवर्षतितस्यदेवःशत्रूंश्चनाशयतितस्यमणेःप्रभावात् ॥६॥

अर्थ–अशा मण्यातें जो राजा धारण करतो त्यास विष व रोग यांपासून पीडा कधींही होत नाहीं. त्याच्या राज्यामध्यें इंद्र नेहमी वृष्टि करतो. त्या मण्याच्या सामर्थ्यानें तो राजा शत्रूंचा नाशही करितो ॥६॥

षड्विंशतिःसहस्राण्येकस्यमणेःपलप्रमाणस्य ।
कर्षत्रयस्यविंशतिरुपदिष्टापद्मरागस्य ॥७॥
अर्धपलस्यद्वादशकर्षस्यैकस्यषट्सहस्राणि ।
यच्चाष्टमाषकधृतंतस्यसहस्रत्रयंमूल्यं ॥८॥
माषकचतुष्टयंदशशतत्रयंद्वौतुपंचशतमूल्यौ ।
परिकल्प्यमंतरालेमूल्यंहीनाधिकगुणानां ॥९॥
वर्णन्यूनस्यार्धंतेजोहीनस्यमूल्यमष्टांशः ।
अल्पगुणोबहुदोषोमूल्यात्प्राप्नोतिविंशांशं ॥१०॥
आधूम्रंव्रणबहुलंस्वल्पगुणंचाप्नुयाद्द्विशतभागं ।
इतिपद्मरागमूल्यंपूर्वाचार्यैःसमुद्दिष्टं ॥११॥

अर्थ–चार तोळे वजन, एका पद्मरागमण्याची किंमत २६ हजार रुपये जाणावी. ३ तोळे वजन, एका पद्मरागमण्याची किंमत २० हजार जाणावी ॥७॥ २ तोळे वजनाची १२ हजार; एक तोळा वजनाची ६ हजार; आठ मासे वजनाची ३ हजार, ॥८॥ चार मासे वजनाची १३१०, दोन मासे वजनाची५०० रु० कि० जाणावी. यांचे मध्ये वजनाचीव कमजास्ती गुणयुक्तांची किंमत बुद्धीनें कल्पावी ॥९॥ रंग कमी असल्यास पूर्वोक्त किंमत अर्धी जाणावी. तेजहीन मण्याची अष्टमांश जाणावी. अल्पगुणयुक्त, व बहुदोषयुक्त मण्याची किंमत पूर्वोक्ताहून विसावा हिस्सा होते ॥१०॥ ईषत्धूम्रवर्ण, बहुत व्रण (खळगे) पडलेला, अल्पगुण, अशा पद्मरागमण्याची किंमत पूर्वोक्ताहून दोनशांवा हिस्सा होते. याप्रकारें प्राचीन आचार्यांनीं पद्मरागमण्याची किंमत सांगितली आहे ॥११॥ येथें ८० गुंजांचा तोळा व पांच गुंजांचा मासा समजावें.

इतिवृहत्संहितायांपद्मरागपरीक्षानामद्व्यशीतितमोध्यायः ॥८२॥

## ॥ अथमरकतपरीक्षा ॥

शुकवंशपत्रकदलीशिरीपकुसुमप्रभंगुणोपेतं ।
सुरपितृकार्येमरकतमतीवशुभदंनृणांविधृतं ॥१॥

अर्थ–पोपटासारख्या रंगाचें (नीलपीतवर्ण), वंशपत्र (हरताळ) व केळ यांसारखें (उदीरगार्चे, पीतवर्ण), शिरीषपुष्पासारखें (श्वेतपीत) यांतील कोणत्याही रंगाचें, गुण (अ० ८२ श्लो० ३) यांतील गुणांनीं युक्त असें मरकतरत्न (पाच) मनुष्यांनीं धारण केलें अ० देव, पितर यांच्या कार्यामध्यें फारच शुभदेणारें होय ॥१॥

इतिवृहत्संहितायांमरकतपरीक्षानामत्र्यशीतितमोध्यायः ॥८३॥

## ॥ अथदीपलक्षणं ॥

वामावर्तोमलिनकिरणःसस्फुलिंगोल्पमूर्तिःक्षिप्रं नाशंव्रजतिविमलस्नेहवर्त्यन्वितोपि । दीपःपापं कथयतिफलंशब्दवान्वेपनश्चव्याकीर्णार्चिर्विशल भमरुद्यश्चनाशंप्रयाति ॥१॥

अर्थ–डावा फिरणारा, मलिनकिरण, ठिणग्यानीं युक्त, अल्पज्योति, स्वच्छ तेल व वात असतांही लवकर नाश पावतो, शब्दयुक्त, कंपयुक्त, पसरटतेज, पतंग व वायु हे नसतांही जो नाश पावतो, याप्रकारचा दीप अशुभफल सांगतो ॥१॥

दीपःसंहतमूर्तिरायततनुर्निर्वेपनोदीप्तिमान्निःश ब्दोरुचिरःप्रदक्षिणगतिर्वैडूर्यहेमद्युतिः । लक्ष्मींक्षि प्रमभिव्यनक्तिरुचिरंयश्चोद्यतंदीप्यतेशेषंलक्षणम ग्निलक्षणसमंयोज्यंयथायुक्तितः ॥२॥

अर्थ–घट्टज्योति, लांब, कंपरहित, तेजस्वी, शब्दरहित, अतिप्रकाश, प्रदक्षिणज्वाला, वैडूर्य म० लसण्या ( नीलपीत ) व सुवर्ण यांसारखी कांति, फारवेळ अतितेजस्वी प्रदीप्त होतो. असा दीप लवकर लक्ष्मीप्राप्ति होईल असे सांगतो. या लक्षणांशिवाय अवशिष्ट राहिलेलीं लक्षणें ( अ० ४३ श्लोक ३३। ३५ ) यांत अग्निलक्षणें सांगीतलीं त्यांसारखी यथायुक्तीनें येथेंही योजना करावी ॥२॥

इतिवराहमिहिरकृतौवृहत्संहितायांदीपल क्षणंनामचतुरशीतितमोध्यायः ॥८४॥

## ॥ अथदंतकाष्ठलक्षणं ॥

वल्लीलतागुल्मतरुप्रभेदैःस्युर्दंतकाष्ठानिसह स्रशोयैः । फलानिवाच्यान्यतितत्प्रसंगोमा भूदतोवच्म्यथकामिकानि ॥१॥

अर्थ–वेळू, खादी, झुडूप, वृक्ष या भेदांनीं दंतकाष्ठें हजारों आहेत. अतिप्रसंग न व्हावा म्हणून इष्टफल देणारींच सांगतों ॥१॥

अज्ञातपूर्वाणिनदंतकाष्ठान्यद्यान्नपत्रैश्चसम
न्वितानि । नयुग्मपर्वाणिनपाटितानिनचो
र्ध्वेशुष्काणिविनात्वचावा ॥२॥

अर्थ–पूर्वी, उत्पत्ति न जाणलेलीं, दंतकाष्ठें चावू नयेत. पानांनीं युक्त, समपर्व (पेरे), फोडलेलीं, वर सुकलेलीं, सालींवांचून अशीं दंतकाष्ठें घेऊं नयेत ॥२॥

वैकंकतश्रीफलकाश्मरीपुब्राह्मींद्युतिःक्षेमत
रौसुदाराः । वृद्धिर्वटेर्कैप्रचुरंचतेजःपुत्रामधू
केककुभेप्रियत्वं ॥३॥

अर्थ–वैकंकत (पेहकळी), आंवळी, शिवण या झाडांचें दंतकाष्ठ केलें तर ब्र॰ ह्मवर्चस्व होतें. क्षेमतरूचें (वृक्षावि॰) केलें तर उत्तमस्त्रीप्राप्ति होते. वडाचें के॰ अर्थवृद्धि होते. रुईचें के॰ बहुत तेज होतें. मोहाचें के॰ पुत्रप्राप्ति होते. अर्जुनसादड्याचें केलें तर लोकप्रिय होतो ॥३॥

लक्ष्मीःशिरीषेचतथाकरंजेप्लक्षेर्थसिद्धिःसम
भीप्सितास्यात् । मान्यत्वमायातिजनस्य
जात्यांप्राधान्यमश्वत्थतरौवदंति ॥४॥

अर्थ–शिरसाचें व करंजाचें दंतकाष्ठ केलें तर लक्ष्मीप्राप्ति, पायरीचें के॰ इच्छित द्रव्यप्राप्ति, जाईचें के॰ मान्यत्वप्राप्ति, पिंपळाचें के॰ श्रेष्ठत्व होतें ॥४॥

आरोग्यमायुर्बदरीबृहत्योरैश्वर्यवृद्धिःखदिरे
सबिल्वे । द्रव्याणिचेष्टान्यतिमुक्तकेस्युःप्रा
प्नोतितान्येवपुनःकदंबे ॥५॥

अर्थ–बोर व डोरली यांचें द॰ केलें तर आरोग्य व आयुष्यवृद्धि हीं होतात. खैर व बेल यांचें के॰ ऐश्वर्यवृद्धि होते. मोगरीचें व कळंबाचें के॰ इष्टद्रव्यप्राप्ति होते ॥५॥

निंबेर्थाप्तिःकरवीरेन्नलब्धिर्भांडीरेस्यादिदमे

वप्रभूतं । शम्यांशत्रूनपहंत्यर्जुनेचश्यामायां
चद्विषतामेवनाशः ॥६॥

अर्थ–निंबाचें दं० केलें तर द्रव्यप्राप्ति. कण्हेरीचें केलें तर अन्नप्राप्ति. भांडीर वृक्षाचें केलें तर बहुत अन्नप्राप्ति. शमीवृक्षाचें व अर्जुनवृक्षाचें के० शत्रुनाश होतो. काळ्या तुळशीचें केलें तर शत्रुनाशच होतो॥६॥

शालेश्चकर्णेचवदंतिगौरवंसभद्रदारावपिचा
टरूषके । वाल्लभ्यमायातिजनस्यसर्वतःप्रि
यंग्वपामार्गसजंबुदाडिमैः ॥७॥

अर्थ–चार, साग, देवदार, अडुळसा यांचें दंतकाष्ठ के० सन्मानप्राप्ति होते. काग, आघाडा, जांबूळ, डाळिंब या वृक्षांचें केलें तर सर्वलोकांस प्रिय होतो ॥७॥

उदङ्मुखःप्राङ्मुखएववाब्दंकामंयथेष्टंहृदये
निवेश्य । अद्यादनिंद्यंचसुखोपविष्टःप्रक्षा
ल्यजह्याच्चशुचिप्रदेशे ॥८॥

अर्थ–दंतकाष्ठ भक्षण कर्ता ह० दांत घांसणारा, यानें उत्तराभिमुख किंवा प्राङ्मुख बसून, यथेष्ट इच्छा हृदयामध्यें करून सुखोपविष्टहोऊनतो निंद्य नव्हे असें दंतकाष्ठ भक्षावें ( दांत घांसावे ). नंतर तें दंतकाष्ठ धुवून शुद्धजागीं टाकावें ॥८॥

अभिमुखपतितंप्रशांतदिक्स्थंशुभमतिशोभ
नमूर्ध्वसंस्थितंयत् । अशुभकरमतोन्यथाप्र
दिष्टंस्थितपतितंचकरोतिमृष्टमन्नं ॥९॥

अर्थ–टाकलेलें दंतकाष्ठ कर्त्याच्या संमुख पडलें किंवा शांतदिशेस पडलें तर शुभ होय. वरतें राहिलें तर फारच शुभहोय. याहून अन्यथा पडलें तर अशुभकारक सांगितलें. राहून पडलें तर स्वच्छ अन्नातें करतें ( स्वच्छ अन्न मिळतें ) ॥९॥

इतिबृहत्संहितायांदंतकाष्ठलक्षणंनामपंचा
शीतितमोध्यायः ॥८५॥

# ॥ अथसर्वशाकुनं ॥

यच्छुक्रशक्रवागीशकपिष्ठलगरुत्मतां ।
मतेभ्यःप्राहऋषभोभागुरेर्देवलस्यच ॥१॥
भारद्वाजमतंदृष्ट्वायच्चश्रीद्रव्यवर्धनः ।
आवंतिकःप्राहनृपोमहाराजाधिराजकः ॥२॥
सप्तर्षीणांमतंयच्चसंस्कृतंप्राकृतंचयत् ।
यानिचोक्तानिगर्गाद्यैर्यात्राकारैश्चभूरिभिः ॥३॥
तानिदृष्ट्वाचकारेमंसर्वशाकुनसंग्रहं ।
वराहमिहिरःप्रीत्याशिष्याणांज्ञानमुत्तमं ॥४॥

अर्थ–जें शाकुन शुक, इंद्र, बृहस्पति, कपिष्ठलऋषि, गरुड हे शास्त्रकर्ते यांचीं व भागुरि आणि देवल यांचीं मतें पाहून ऋषभाचार्य सांगता झाला ॥१॥ तसाच भारद्वाजऋषीचें मत पाहून महाराजाधिराज श्रीद्रव्यवर्धननामक उज्जयिनीचा राजा जें शाकुन सांगताझाला ॥२॥ जें शा० मरीच्यादि सप्तर्षींस मान्य व जें संस्कृत किंवा प्राकृत शाकुन, जीं शाकुनें गर्ग, वसिष्ठ, पराशर, कश्यप, ऋषिपुत्र इत्यादि बहुत यात्राकार (यात्रिकरूं) ऋषींनीं सांगीतलीं तीं पाहून वराहमिहिराचार्य शिष्यांच्या प्रीत्यर्थ उत्तमज्ञानरूप अशा ह्या सर्वशाकुनसंग्रहातें संक्षेपानें करिता झाला ॥३।४॥

अन्यजन्मांतरकृतंकर्मपुंसांशुभाशुभं ।
यत्तस्यशकुनःपाकंनिवेदयतिगच्छतां ॥५॥

अर्थ–अन्यजन्मामध्यें केलेलें पुरुषाचें जें शुभाशुभकर्म त्याच्या पाकातें (भोक्तृत्वातें) गमन करणाऱ्या पुरुषांस शकुन सांगतो ॥५॥

ग्राम्यारण्यांबुभूव्योमद्युनिशोभयचारिणः ।
रुतयातेक्षितोक्तेषुग्राह्याःस्त्रीपुंनपुंसकाः ॥६॥

अर्थ–ग्रामचर, अरण्यवासी, अंबुचर, भूमिचर, आकाशचर, दिवसचारी, रात्रिचर,

दिवसरात्रिचर असे शकुन आहेत ( यांचे लक्षण पुढें आहे ). त्यांचा शब्द, गमनं, अवलोकन यांवरून सांगितले जे पुस्त्रीनपुंसक ते घ्यावे. ( शब्दादिकांवरून शकुन स्त्री, पुरुष, नपुंसक हें जाणावें ह० स्त्रीचा शब्द अ० स्त्रीशकुन इ०)॥६॥

पृथक्जात्यनवस्थानादेषांव्यक्तिर्नलक्ष्यते ।
सामान्यलक्षणोद्देशेश्लोकावृषिकृताविमौ ॥७॥

अर्थ—या शकुनांचा पृथक्पृथक् जाति देश न समजल्यामुळें पुस्त्रीनपुंसक हें स्पष्ट लक्षांत येत नाहीं. यास्तव सामान्यलक्षण समजण्याविषयीं वृद्धगर्गऋषीनें सांगीतलेले वक्ष्यमाण दोन श्लोक पहावे ॥७॥

पीनोन्नतविकृष्टांसाःपृथुग्रीवाःसुवक्षसः ।
स्वल्पगंभीरविरुताःपुमांसःस्थिरविक्रमाः ॥८॥
तनूरस्कशिरोग्रीवाःसूक्ष्मास्यपदविक्रमाः ।
प्रशस्तमृदुभाषिण्यःस्त्रियोतोन्यन्नपुंसकं॥९॥

अर्थ—पुष्ट, उंच, विस्तीर्ण असे स्कंध, विस्तीर्ण मान, सुंदर वक्षस्थल, स्वल्प व गंभीर शब्द, स्थिर पराक्रम हीं पुरुषलक्षणें होत ॥८॥ उर, मस्तक, मान, हीं बारीक; मुख, चरण, पराक्रम हीं सूक्ष्म; प्रशस्त, मृदुभाषण हीं स्त्रियांचीं लक्षणें होत. यांहून अन्य नपुंसक जाणावें ॥९॥

ग्रामारण्यप्रचाराद्यंलोकादेवोपलक्षयेत् ।
संचिक्षिप्सुरहंवच्मियात्रामात्रप्रयोजनं ॥१०॥

अर्थ—या शकुनांचें ग्रामचर, अरण्यचर इत्यादि लोकप्रचारानें व अन्यशास्त्रानेंच जाणावें. ग्रंथाचा संक्षेप करण्यास इच्छिणारा जो मी तो यात्रेस जितकें उपयोगी तितकेंच सांगतों ॥१०॥

पथ्यात्मानंनृपंसैन्येपुरेचोद्दिश्यदेवतां ।
सार्थेप्रधानंसाम्येस्याज्जातिविद्यावयोधिकं ॥११॥

अर्थ—मार्गामध्यें स्वशरीरास उद्देशून, सैन्यामध्यें राजास उ०, पुर शब्द उपलक्षणार्थ ह० गांवांत ग्रामाधिपतीस उ०, जनसमूहामध्यें मुख्यास उ०, ते बहुत अ-

सत्यास जाति, विद्या, वय यांणी अधिक जो असेल त्यास उद्देशून शकुनांचें शु-
भाशुभफल होतें ॥११॥

मुक्तप्राप्तैष्यदर्कासुफलंदिक्षुतथाविधं ।
अंगारिदीप्तधूमिन्यस्ताश्चशांतास्ततोपराः ॥१२॥

अर्थ—मुक्त, प्राप्त, एष्य आहे सूर्य ज्यांचाठाईं अशा दिशांचाठाईं झालेले जे शकुन त्यांचें अशुभफल गत, वर्तमान, भविष्य असें जाणावें. त्या मुक्त, प्राप्त एष्य, दिशा अंगारि, दीप्त, धूमिनी अशा होत. यांहून इतर पांच दिशा शांत होत. उ० सूर्योदयापासून प्रहरपर्यंत ईशानी मुक्तसूर्या, पूर्व प्राप्तसूर्या, आग्नेयी एष्यसूर्या; दुसऱ्या प्रहरीं पूर्व मुक्तसूर्या, आग्नेयी प्राप्तसूर्या, दक्षिण एष्यसूर्या; तृतीयप्रहरीं आग्नेयी मु०, द० प्रा० नि० ए०; चतुर्थप्र० दक्षि० मु०, नि० प्रा०, प० ए०; रात्रीच्या प्रथम प्रहरीं निर्ऋति मु०, प० प्रा०, वा० ए०; द्वि० पश्चिम मु०, वा० प्रा०, उ० ए०; तृती० वायव्य मुक्त०, उ० प्रा०, ई० ए०; चतुर्थप्रहरीं उत्तर-मुक्तसूर्या, ई० प्राप्त०, पूर्व एष्यसूर्या अशा होतात. याप्रमाणें अशुभफल. सूर्य-मुक्तदिशेस शकुनाचें गतफल, प्राप्तसूर्यदिशेचें वर्तमानफल, एष्य सूर्यदिशेचें भविष्यफल जाणावें. सूर्यमुक्तदिशा अंगारिणी, प्राप्तसूर्यदिशा दीप्ता, एष्यसूर्यदिशा धूमिनी याप्रकारें ३ व बाकी ५ दिशा शांत होत ॥१२॥

तत्पंचमदिशांतुल्यंशुभंत्रैकाल्यमादिशेत् ।
परिशेषयोर्दिशोर्वाच्यंयथासन्नंशुभाशुभं ॥१३॥

अर्थ—त्या अंगारि, दीप्त, धूमिनी या ३ दिशांपासून त्यांचे त्यांचे पांचवे दिशांचे भूत, भविष्य, वर्तमानकाळीं त्या त्या दिशेप्र० शुभाशुभफल सांगावें. राहिलेल्या दोन दिशांचें, समीपदिशांसारखें शुभाशुभफल सांगावें ॥१३॥

शीघ्रमासन्ननिम्नस्थैश्चिरादुन्नतदूरगैः ।
स्थानवृध्युपघाताच्चतद्वद्ब्रूयात्फलंपुनः ॥१४॥

अर्थ—समीप व सखलभागीं झालेल्या शकुनांचें शुभाशुभफल शीघ्र होतें. उंच प्रदेशीं व दूर झालेल्यांचें फल अवकाशानें येतें. आणखी ज्या स्थानीं प्रतिदिवशीं वृद्धि होत असेल तेथें झालेला शुभशकुन वृद्धि करितो व जेथें नाश होत असेल तेथील अशुभशकुन नाश करतो. नाशस्थानीं झालेला शुभशकुन अल्पशुभ करतो असें सांगावें ॥१४॥

क्षणतिथ्युडुवातार्कैर्दैवदीप्तोयथोत्तरं ।
क्रियादीप्तोगतिस्थानभावस्वरविचेष्टितैः ॥१५॥

अर्थ—आर्द्रादि मुहूर्त, तिथि, नक्षत्र, वायु, सूर्य या पांचांवर झालेला शकुन दैवदीप्त. गमन, स्थान, भाव, स्वर, विचेष्टित यांवर झालेला शकुन क्रियादीप्त. हे उत्तरोत्तर बलिष्ठ होत. (क्षणापेक्षां तिथि इ०) (चतुर्थी, षष्ठी, अष्टमी, नवमी, चतुर्दशी ह्या तिथि दीप्त. मूळ, ज्येष्ठा, आश्लेषा, आर्द्रा, विशाखा, भरणी, मघा, कृत्तिका हीं नक्षत्रें दीप्त. या पूर्वोक्त नक्षत्राचे मुहूर्त (आर्द्रादि) ते क्षणदीप्त. चंड, खर, परुष, प्रतिलोमादि वातदीप्त. सूर्याभिमुख व दीप्तदिक्स्थ अर्कदीप्त. अर्क, वायु यांचें संमुख जो धांवतो तो गतिदीप्त. कुभूम्यादिस्थ जो तो स्थानदीप्त. स्वल्पसंज्ञ जो तो भावदीप्त. भयंकर स्वरादि स्वरदीप्त. छिन्नभिन्नादि चेष्टादीप्त. असे दहाप्रकारचे शकुन आहेत) ॥१५॥

दशधैवंप्रशांतोपिसौम्यस्तृणफलाशनः ।
मांसामेध्याशनोरौद्रोविमिश्रोन्नाशनःस्मृतः ॥१६॥

अर्थ—या दहाप्रकारचाही शकुन शांत झाला तथापि तृणभक्षक किंवा फलभक्षक असेल तर शुभ जाणावा. मांसभक्षक व अमेध्य (विष्ठादि) भक्षक असेल तर रौद्र (अतिदीप्त) जाणावा. अन्नभक्षक असेल तर तो मिश्र (शांतदीप्त) सांगीतला ॥१६॥

हर्म्यप्रासादमंगल्यमनोज्ञस्थानसंस्थिताः ।
श्रेष्ठामधुररसक्षीरफलपुष्पद्रुमेषुच ॥१७॥

अर्थ—गृह, देवालय, मंगल्य (देव ब्राह्मण गाई राहिलेलें), मनोज्ञ (ओलेंतृण, शीतल छायायुक्त) अशास्थानीं व मधुर, रसिक फलें व पुष्पें यांणीं युक्त अशा वृक्षांचा ठाई झालेले शकुन श्रेष्ठ (शुभ) होत ॥१७॥

स्वकालेगिरितोयस्थाबलिनोद्युनिशाचराः ।
क्लीबस्त्रीपुरुषाश्चैवबलिनःस्युर्यथोत्तरं ॥१८॥

अर्थ—गिरि (पर्वत, उच्चप्रदेश) यांवर राहणारे दिवसास फिरणारे दिवाबलिष्ठ व उदकांत राहणारे, रात्रीस फिरणारे, रात्रिबलिष्ठ शकुन होत. नपुंसक, स्त्रिया, पुरुष असे शकुन यांमध्यें उत्तरोत्तर बलिष्ठ होत. म्ह० नपुंसकापेक्षां स्त्रिया बलवान्, स्त्रियांपेक्षां पुरुष बलवान् ॥१८॥

जवजातिबलस्थानहर्षसत्वस्वरान्विताः ।
स्वभूमावनुलोमाश्चतदूनाःस्युर्विवर्जिताः॥१९॥

अर्थ—वेगयुक्त गति, जाति, बल, स्थान, हर्ष, धैर्य, स्वर यांहीं युक्त व स्वभूमीचाठाई अनुकूल राहिलेले असे शकुन बलिष्ठ होत. इ० दोन शकुन झाले असतां जो वेगयुक्तगति इत्यादिकेंकरून अधिक तो बलवान् अन्य निर्बल असें जाणावें. वेगादिकेंकरून जे कमी ते निर्बलशकुन जाणावे ॥१९॥

कुक्कुटेभपिरिल्यश्चशिखिवंजुलछिक्कराः ।
बलिनःसिंहनादश्चकूटपूरीचपूर्वतः ॥२०॥

अर्थ—कोंबडा, हत्ती, पिरिल्य ( पक्षिवि० ), मयूर, वंजुल ( पक्षिवि० ), छिक्कर ( मृगजाति ), सिंहनाद ( पक्षिवि० ), कूटपूरी ( बकपक्षीण ) हे शकुन पूर्वेस बलिष्ठ होत ॥२०॥

क्रोष्टुकोलूकहारीतकाककोकर्क्षपिंगलाः ।
कपोतरुदिताक्रंदक्रूरशब्दाश्चयाम्यतः ॥२१॥

अर्थ—कोल्हा, घुबड, हिरवा खबुतर, कावळा, चक्राक, आस्वल, पिंगळा, कबूतर, रोदन, ओरडणें, क्रूरशब्द हे दक्षिणदिशेस बलिष्ठ होत ॥२१॥

गोशशक्रौंचलोमाशहंसोत्क्रोशकपिंजलाः ।
विडालोत्सववादित्रगीतहासाश्चवारुणाः ॥२२॥

अर्थ—गाय, ससा, क्रौंचपक्षी, मेंढा, हंस, कुररपक्षी, कवडा, मार्जर, विवाहादिउत्सव, वाद्ये, गायन, हास्य हीं पश्चिमेस बलिष्ठ होत ॥२२॥

शतपत्रकुरंगाखुमृगैकशफकोकिलाः ।
चापशल्यकपुण्याहघंटाशंखरवाउदक् ॥२३॥

अर्थ—सुतारपक्षी, हरिण, उदीर, मृग, एकशफ ( अश्वादि ), कोकिल, चाष, शाळमीवन, आशीर्वादसूचकशब्द, घंटा, शंख याचे शब्द; हे उत्तरेस बलिष्ठ होत ॥२३॥

नग्राम्योरण्यगोग्राह्योनारण्योग्रामसंस्थितः ।
दिवाचरोनशर्वर्यांनचनक्तंचरोदिवा ॥२४॥

अर्थ—गांवातील शकुन अरण्यांत अ० याचे शुभाशुभफल घेऊ नये. तसेंच अर·

ण्यांतील गांवांत अ०, दिवाचरांचें रात्रीस, रात्रींचरांचें दिवसास असे, शुभफल घेऊनये ॥२४॥

द्वंद्वरोगार्दितत्रस्ताःकलहामिषकांक्षिणः ।
आपगांतरितामत्तानग्राह्याःशकुनाःक्वचित् ॥२५॥

अर्थ–सारसपक्ष्याचे मिथुनावांचून द्वंद्व, रोगपीडित, भीत, कलह व मांस यांतें इच्छिणारे, नदीनें अंतरित, मत्त असे शकुन शुभाशुभफलाविषयीं कधींही घेऊं-नयेत ॥२५॥

रोहिताश्वाजवालेयकुरंगोष्ट्रमृगाःशशः ।
निष्फलाःशिशिरेज्ञेयावसंतेकाककोकिलौ ॥२६॥

अर्थ–रोहित (रोही), घोडा, मेंढा, गाढव, कुरंग (मृगवि०), उंट, हरिण, स-सा, हे सर्व शिशिरऋतूमध्यें निष्फल जाणावे. काक व कोकिल हे वसंतऋतूम-ध्यें निष्फल जाणावे ॥२६॥

नतुभाद्रपदेग्राह्याःसूकरश्ववृकादयः ।
शरद्यब्जादगोक्रौंचाःश्रावणेहस्तिचातकौ ॥२७॥

अर्थ–डुकर, कुतरा, लांडगा इ० भाद्रपदमासीं न घ्यावे. कमलभक्षक (हंस), गाई, क्रौंचपक्षी, हे शरदृतूमध्यें न घ्यावे. हत्ती व चातक हे श्रावणमासीं न घ्यावे. (हे या महिन्यांत मदयुक्त असतात यास्तव शुभाशुभशकुनांविषयीं न घ्यावे) ॥२७॥

व्याघ्रर्क्षवानरद्वीपिमहिषाःसविलेशयाः ।
हेमंतेनिष्फलाज्ञेयाबालाःसर्वेविमानुषाः ॥२८॥

अर्थ–व्याघ्र, रीस, वानर, चिता, महिष, बिलेशय (साळजीवत, मुंगस इ०), मनुष्यरहित सर्व बाल हे हेमंतऋतूमध्यें निष्फल होत ॥२८॥

ऐंद्रानलदिशोर्मध्येत्रिभागेषुव्यवस्थिताः ।
कोशाध्यक्षानलाजीवितपोयुक्ताःप्रदक्षिणं ॥२९॥

अर्थ–पूर्व व आग्नेयी याच्यामध्यें जे तीन भाग तेथें प्रथमभागीं कोशाध्यक्ष (खजिनदार), २ भागीं सुवर्णकारादि अग्निजीवी, ३ भागीं तपस्वी हे प्रदक्षिण राहवात ॥२९॥

शिल्पीभिक्षुर्विवस्त्राश्चयाम्यानलदिगंतरे ।

परतश्चापिमातंगगोपधर्मसमाश्रयाः ॥३०॥

अर्थ—दक्षिण व आग्नेयी याच्या मध्यमार्गी प्रथम शिल्पी, २ सन्यासी, ३ वस्त्ररहित स्त्री, हीं राहतात. निर्ऋति व दक्षिण यांच्या मध्ये प्रथममार्गी हत्तीचा आश्रय करणारा, २ गोपाचा आ०, ३ धर्माचा आ० हे राहतात ॥३०॥

नैर्ऋतीवारुणीमध्येप्रमदासूतितस्कराः ।
शौंडिकःशाकुनीहिंस्रोवायव्यपश्चिमांतरे ॥३१॥

अर्थ—नैर्ऋती व पश्चिम याच्या मध्ये प्रथम प्रमदा, २ सूतिका, ३ चोर हे राहतात. वायव्य व पश्चिम यामध्ये प्रथम मद्यपानरत, २ धीवर, ३ क्रूर हे राहतात ॥३१॥

विषघातकगोस्वामिकुहकज्ञास्ततःपरं ।
धनवानीक्षणीकश्चमालाकारस्ततःपरं ॥३२

अर्थ—वायव्य व उत्तर यांमध्ये प्रथम विषघातक, २ वृषभ, ३ गौडबगाल जाणणारा, हे राहतात. उत्तर व ईशानी यांमध्ये प्रथम द्रव्यवान्, २ ज्योतिषी, ३ माळी, हे राहतात ॥३२॥

वैष्णवश्चरकश्चैववाजिनांरक्षणेरतः ।
एवंद्वात्रिंशतोभेदाःपूर्वदिग्भिःसहोदिताः ॥३३॥

अर्थ—ईशानी व पूर्व यांमध्ये प्रथमभागी विष्णुभक्त, २ भागी चरक ( गुप्त बातमीदार ), ३ भागी अश्वरक्षणपर हे राहतात. यामकारें हे भेद २४ व पूर्वादि दिशा ८ यांणी युक्त केले अ० ३२ भेद प्रदक्षिण सांगितले ॥३३॥

राजाकुमारोनेताचदूतःश्रेष्ठीचरोद्विजः ।
गजाध्यक्षश्चपूर्वाद्याःक्षत्रियाद्याश्चतुर्दिशं ॥३४॥

अर्थ—पूर्वदिशेस राजा, आग्नेयीस कुमार, दक्षिणेस सेनापति, नैर्ऋतीस दूत, पश्चिमेस श्रेष्ठी ( अत्युत्तम, कुलपरंपरागत शिल्पज्ञ ), वायव्येस बातमीदार, उत्तरेस ब्राह्मण, ईशानीस गजाध्यक्ष, असे राहतात. तसेच पूर्वेस क्षत्रिय, दक्षिणेस वैश्य, पश्चिमेस शूद्र, उत्तरेस ब्राह्मण राहतात ॥३४॥

गच्छतस्तिष्ठतोवापिदिशियस्यांव्यवस्थितः ।
विरौतिशकुनोवाच्यस्तद्दिग्जेनसमागमः ॥३५॥

अर्थ–पुरुष, गमन करीत अ० किंवा स्थिर अ० त्या पूर्वादिदिशेस राहिलेला शकुन ( प्राणी किंवा पक्षी ) शब्दकरील त्या दिशेच्या आश्रयकरणाऱ्याबरोबर समागम त्या पुरुषास त्या दिवशी होईल. इ० पूर्व व आग्नेयी यांमध्ये प्रथम त्रिभागस्थ शकुन अ० कोशाध्यक्षाबरोबर भेट होईल, द्वि० शकुन अ० सुवर्णकारादिकांबरोबर, तृ० शकुन अ० तपस्व्याबरोबर इ० जाणावें ॥३५॥

भिन्नभैरवदीनार्तपरुषक्षामजर्जराः ।
स्वरानेष्टाःशुभाःशांताह्लृष्टप्रकृतिपूरिताः ॥३६॥

अर्थ–फुटलेले ( विषम ), क्रूर, दीन, पीडित, कठोर, ग्लान, फुटलेल्या भांड्यासारखे असे शब्द शुभ नव्हत. शांतदिक्स्थित व अनर्काभिमुख व हर्षयुक्तप्रकृतीनें केलेले असे शब्द शुभ होत ॥३६॥

शिवाश्यामारलाछुच्छुःपिंगलागृहगोधिका ।
सूकरीपरपुष्टाचपुन्नामानश्चवामतः ॥३७॥

अर्थ–भालू, श्यामा ( काळ्या रंगाची चिमणी ), रला ( पक्षिवि० ), चिचोंद्री, पिंगला ( उलूकस्त्री ), पाल, डुकरीण, कोकिला, पुरुषनामक पक्षी, हे सर्व गमनकर्त्याच्या वामभागीं शुभ होत ॥३७॥

स्त्रीसंज्ञाभासभषककपिश्रीकर्णछिक्कराः ।
शिखिश्रीकंठपिप्पीकरुरुश्येनाश्चदक्षिणाः ॥३८॥

अर्थ–स्त्रीसंज्ञक पक्षी, गृध्रपक्षी, कुत्रा, वानर, श्रीकर्ण ( पक्षिवि० ), छिक्कर ( मृगवि० ), मयूर, श्रीकंठ ( पक्षिवि० ), पिप्पीक ( पक्षिवि० ), रुरु ( मृगवि० ) ससाणा हे दक्षिणभागीं गमनकर्त्यास शुभ होत ॥३८॥

क्ष्वेडास्फोटितपुण्याहगीतशंखांबुनिःस्वनाः ।
सतूर्याध्ययनाःपुंवत्स्त्रीवदन्यागिरःशुभाः ॥३९॥

अर्थ–क्ष्वेडा ( मुखशब्द सिंहनाद ) आस्फोटित ( उर किंवा बाहु यांचें ताडण ), आशीर्वादसूचकशब्द प्रशस्तगायन, शंख, उदक यांचे शब्द; वाद्यशब्द व अध्ययनशब्द हे सर्व पुंवत् इ० गमनकर्त्याच्या वामभागीं शुभ होत अन्य सर्व शब्द स्त्रीवत् इ० दक्षिणभागीं शुभ होत ॥३९॥

ग्रामौमध्यमषड्जौतुगांधारश्चेतिशोभनाः ।

षड्जमध्यमगांधाराऋषभश्चस्वराहिताः ॥२०॥

अर्थ—मध्यम, षड्ज, गांधार, हे ग्राम शुभ होत. षड्ज, मध्यम, गांधार, ऋषभ हे स्वर गमनकर्त्यास शुभ होत ॥२०॥

रुतकीर्तनदृष्टेषुभारद्वाजाजबर्हिणः ।
धन्यानकुलचाषौचसरटःपापदोग्रतः ॥२१॥

अर्थ—कोकडकुंभा, बकरा, मयूर, मुंगस, चाष यांचे शब्द, यांचे नामसंकीर्तन, हे पाहिले असतांही गमनकर्त्यास शुभ होत. सरडा पुढें पाहिला तर अशुभ होय॥२१॥

जाहकाहिशशक्रोडगोधानांकीर्तनंशुभं ।
रुतंसंदर्शनंनेष्टंप्रतीपंवानरर्क्षयोः ॥२२॥

अर्थ—मांजर, सर्प, ससा, डुकर, घोरपड, यांचें नामग्रहण शुभ होय. शब्द व दर्शन शुभ नव्हे. वानर व रीस यांचें नामसंकीर्तन अशुभ. शब्द व दर्शन शुभ होय ॥२२॥

ओजाःप्रदक्षिणंशस्तामृगाःसनकुलांडजाः ।
चाषःसनकुलोवामोभृगुराहापराण्हतः ॥२३॥

अर्थ—मृग, मुंगस, पक्षी हे विषमसंख्याक ( १।३।५ इ० ) प्रदक्षिण गेले अ० शुभ होत. मुंगसानेंयुक्त चाषपक्षी वामभागीं अपराण्हापासून शुभ होय, असें भृगुऋषि सांगताझाला ॥२३॥

छिक्करःकूटपूरीचपिरिलीचाह्निदक्षिणाः ।
अपसव्याःसदाशस्तादंष्ट्रिणःसबिलेशयाः ॥२४॥

अर्थ—छिक्कर (मृगवि० ), कूटपूरी ( बकपक्षीण ), पिरिली (पक्षिवि० ) हे दिवसास उजवे गेले तर गमनकर्त्यास शुभ होत. डुकरादि दंष्ट्री व शाळनीवत, मुंगस इ० बिलेशय हे डावे गेले तर शुभ होत ॥२४॥

श्वेतहयसितेप्राच्यांशवमांसेचदक्षिणे ।
कन्यकादधिनीपश्चादुदग्गोविप्रसाधवः ॥२५॥

अर्थ—अश्व व श्वेतपदार्थ पूर्वेस, प्रेत व मांस दक्षिणेस, कन्यका व दधि पश्चिमेस, गाई, ब्राह्मण व साधु उत्तरेस, हे या दिशांस शुभ होत ॥२५॥

आलब्धचरणौनेष्टौप्राग्याम्यौशस्त्रघातकौ ।

पश्चादासवषंढौचखलासनहलान्युदक् ॥४६॥

अर्थ—जाळें व कुतरे बरोबर घेऊन जाणारे पूर्वेस अशुभ, शस्त्रधारी व घातक हे दक्षिणेस, मद्यकार व नपुसक हे पश्चिमेस, दुष्ट, आसन, नागर हे उत्तरेस, हे या दिशास गमनकर्त्यास अशुभ होत ॥४६॥

कर्मसंगमयुद्धेषुप्रवेशेनष्टमार्गणे ।
यानव्यस्तगताग्राह्याविशेषश्चात्रवक्ष्यते ॥४७॥

अर्थ—जें कांहीं केलें जातें तें कर्म, बध्वादिकांशी संयोग, युद्ध, गृहप्रवेश, नष्टवस्तुशोधन यांचाठाईं; प्रयाणास जे शकुन सांगितले ते विपरीत घ्यावे. ह्म० प्रयाणास जे दक्षिणभागीं शुभ ते येथें वामभागीं शुभ व जे पूर्वेस ते पश्चिमेस असें जाणावें. यांविषयीं जो विशेष आहे तो पुढें सांगतों ॥४७॥

दिवाप्रस्थानवद्ग्राह्याःकुरंगरुरुवानराः ।
अन्हश्चप्रथमेभागेचापवंजुलकुक्कुटाः ॥४८॥
पश्चिमेशर्वरीभागेनप्तृकोलूकपिंगलाः ।
सर्वएवविपर्यस्ताग्राह्याःसार्थेयुयोपितां ॥४९॥

अर्थ—दिवसास हरिण, रुरु (मृगवि०), वानर हे प्रयाणासारखे व दिवसाच्या प्रथमभागीं चाष, वंजुल (पक्षिवि०), कोंबडा, प्रयाणासारखे जाणावे ॥४८॥ रात्रीच्या पश्चिमभागीं चटकपक्षी, घुबड, पिंगळा, हे प्रस्थानासारखे घ्यावे. स्त्रियांविषयीं सर्वच विपरीत घ्यावे ॥४९॥

नृपसंदर्शनेग्राह्याःप्रवेशेपिप्रयाणवत् ।
गिर्यरण्यप्रवेशेचनदीनांचावगाहने ॥५०॥
वामदक्षिणगौशस्तौयौतुतावग्रपृष्ठगौ ।

अर्थ—राजदर्शनाविषयीं राजवाड्यांत प्रवेश असतांही प्रयाणासारखेच शुभाशुभ शकुन घ्यावे. पर्वत व अरण्य यांचाठाईं प्रवेश, नदीमध्यें स्नान यांचाठाईं॥५०॥ यात्रेस जे शकुन वामभागीं शुभ, ते अग्रभागीं व जे दक्षिणभागीं शुभ, ते पृष्ठभागीं शुभ होत ॥

क्रियादीप्तौविनाशाययातुःपरिघसंज्ञितौ ॥५१॥
तावेवतुयथाभागंप्रशांतरुतचेष्टितौ ।

षड्जमध्यमगांधाराऋषभश्चस्वराहिताः ॥४०॥

अर्थ–मध्यम, षड्ज, गांधार, हे ग्राम शुभ होत. षड्ज, मध्यम, गांधार, ऋषभ हे स्वर गमनकर्त्यास शुभ होत ॥४०॥

रुतकीर्तनदृष्टेषुभारद्वाजाजबर्हिणः ।
धन्यानकुलचाषौचसरटःपापदोग्रतः ॥४१॥

अर्थ–कोकडकुंभा, बकरा, मयूर, मुगस, चाष यांचे शब्द, यांचे नामसंकीर्तन, हे पाहिले असताही गमनकर्त्यास शुभ होत. सरडा पुढें पाहिला तर अशुभ होय॥४१॥

जाहकाहिशशक्रोडगोधानांकीर्तनंशुभं ।
रुतंसंदर्शनंनेष्टंप्रतीपंवानरर्क्षयोः ॥४२॥

अर्थ–माजर, सर्प, ससा, डुकर, घोरपड, यांचें नामग्रहण शुभ होय. शब्द व दर्शन शुभ नव्हे. वानर व रीस यांचें नामसंकीर्तन अशुभ. शब्द व दर्शन शुभ होय ॥४२॥

ओजाःप्रदक्षिणंशस्तामृगाःसनकुलांडजाः ।
चाषःसनकुलोवामोभृगुराहापराण्हतः ॥४३॥

अर्थ–मृग, मुगस, पक्षी हे विषमसंख्याक ( १।३।५ ६० ) प्रदक्षिण गेले अ० शुभ होत. मुंगसानेयुक्त चाषपक्षी वामभागीं अपराण्हापासून शुभ होय, असें भृगुऋषि सांगताझाला ॥४३॥

छिक्करःकूटपूरीचपिरिलीचान्हिदक्षिणाः ।
अपसव्याःसदाशस्तादंष्ट्रिणःसबिलेशयाः ॥४४॥

अर्थ–छिक्कर ( मृगवि० ), कूटपूरी ( बकपक्षीण ), पिरिली ( पक्षिवि० ) हे दिवसास उजवे गेले तर गमनकर्त्यास शुभ होत. डुकरादि दष्टी व शाळजीवत, मुंगस इ० बिलेशय हे डावे गेले तर शुभ होत ॥४४॥

अश्वेहयसितेप्राच्यांशवमांसेचदक्षिणे ।
कन्यकादधिनीपश्चादुदग्गोविप्रसाधवः ॥४५॥

अर्थ–अश्व व श्वेतपदार्थ पूर्वेस, प्रेत व मांस दक्षिणेस, कन्यका व दही पश्चिमेस, गाई, ब्राह्मण व साधु उत्तरेस, हे या दिशांस शुभ होत ॥४५॥

आलक्ष्वचरणौनेष्टौप्राग्याम्यौशस्त्रघातकौ ।

पश्चादासवषंढौचखलासनहलान्युदक् ॥४६॥

अर्थ—जाळें व कुतरे बरोबर घेऊन जाणारे पूर्वेस अशुभ, शस्त्रधारी व घातक हे दक्षिणेस, मद्यकार व नपुंसक हे पश्चिमेस, दुष्ट, आसन, नागर हे उत्तरेस, हे या दिशास गमनकर्त्यास अशुभ होत ॥४६॥

कर्मसंगमयुद्धेषुप्रवेशेनष्टमार्गणे ।
यानव्यस्तगताग्राह्याविशेषश्चात्रवक्ष्यते ॥४७॥

अर्थ—जें कांहीं केलें जातें तें कर्म, बंधादिकांशी संयोग, युद्ध, गृहप्रवेश, नष्टवस्तुशोधन यांचाठाईं; प्रयाणास जे शकुन सांगितले ते विपरीत घ्यावे. उ० प्रयाणास जे दक्षिणभागीं शुभ ते येथें वामभागीं शुभ व जे पूर्वेस ते पश्चिमेस असें जाणावें. याविषयीं जो विशेष आहे तो पुढें सांगतों ॥४७॥

दिवाप्रस्थानवद्ग्राह्याःकुरंगरुरुवानराः ।
अन्हश्चप्रथमेभागेचापवंजुलकुक्कुटाः ॥४८॥
पश्चिमेशार्वरीभागेनृकोलूकपिंगलाः ।
सर्वएवविपर्यस्ताग्राह्याःसार्थेपुयोपिताः ॥४९॥

अर्थ—दिवसास हरिण, रुरु ( मृगवि० ), वानर हे प्रयाणासारखे व दिवसाच्या प्रथमभागीं चाष, वंजुल ( पक्षिवि० ), कोंबडा, प्रयाणासारखे जाणावे ॥४८॥ रात्रीच्या पश्चिमभागीं चटकपक्षी, घुबड, पिंगळा, हे प्रस्थानासारखे घ्यावे. स्त्रियाविषयीं सर्वच विपरीत घ्यावे ॥४९॥

नृपसंदर्शनेग्राह्याःप्रवेशोपिप्रयाणवत् ।
गिर्यरण्यप्रवेशेचनदीनांचावगाहने ॥५०॥
वामदक्षिणगौशस्तौयौतुतावग्रपृष्ठगौ ।

अर्थ—राजदर्शनाविषयीं राजवाड्यांत प्रवेश असतांही प्रयाणासारखेच शुभाशुभशकुन घ्यावे. पर्वत व अरण्य यांचाठाईं प्रवेश, नदीमध्यें स्नान यांचाठाईं॥५०॥ यत्रेस जे शकुन वामभागीं शुभ, ते अग्रभागीं व जे दक्षिणभागीं शुभ, ते पृष्ठभागीं शुभ होत ॥

क्रियादीप्तौविनाशाययातुःपरिघसंज्ञितौ ॥५१॥
तावेवतुयथाभागंप्रशांतरुतचेष्टितौ ।

शकुनैःशकुनद्वारसंज्ञितावर्थसिद्धये ॥५२॥

अर्थ–क्रियादीप्त ( श्लोक० १६ ) शकुन गमनकर्त्याच्या दोनबाजूस असतील तर मरण होतें ॥५१॥ तेच जर शांतशब्द व चेष्टायुक्त शकुन असतील तर शुभश कुनाचे मार्गभूतहोत्सातें कार्यसिद्धि करणारे होतात ॥५२॥

केचित्तुशकुनद्वारमिच्छंत्युभयतःस्थितैः ।
शकुनैरेकजातीयैःशांतचेष्टाविराविभिः॥५३॥

अर्थ–कोणी आचार्य दोहोंबाजूनीं राहिलेले, एकजातीचे, शांत आहे चेष्टा व शब्द ज्याचा असा ( शांतचेष्टा वक्ष्यमाण ), शकुनाहींकरून शकुनद्वारातें ( कार्यसिद्धीतें ) इच्छितात ॥५३॥

विसर्जयतियद्येकएकश्चप्रतिपेधति ।
सविरोधोशुभोयातुर्ग्राह्योवावलवत्तरः ॥५४॥

अर्थ–एक शकुन शुभ व एक अशुभ असे होतील तर तो विरोध गमनकर्त्यास अशुभ होय. अथवा त्यामध्यें जो बलिष्ठ ( श्लो० १९) तो घ्यावा ॥५४॥

पूर्वंप्रावेशिकोभूत्वापुनःप्रास्थानिकोभवेत् ।
सुखेनसिद्धिमाचष्टेप्रवेशेतद्विपर्ययः ॥५५॥

अर्थ–प्रथम प्रवेशासंबधी ( श्लो० ६० ) शकुन होऊन नंतर प्रयाणसंबधी शकुन होईल तर तो शकुन गमनकर्त्यास सुखानें सिद्धि सांगतो. यात्रेपासून फिरून गमनकर्ता जर गृहप्रवेश करील तर पूर्वीचा विपर्यय ह्म० पूर्वी प्रयाणशकुन नंतर प्रवेशशकुन जर होईल तर सुखानें सिद्धि होय ॥५५॥

विसृज्यशकुनःपूर्वंसएवनिरुणद्धिचेत् ।
प्राहयातुररेर्मृत्युंडमरंरोगमेववा ॥५६॥

अर्थ–प्रथम शकुन यात्रेचाठाई शुभ सुचवून तोच शकुन जर यात्रेविषयीं अशुभ सुचवील तर तो शकुन गमनकर्त्यास शत्रूपासून मृत्यु, भयानें पलायन, रोग यातें सांगतो ॥५६॥

अपसव्यास्तुशकुनादीप्ताभयनिवेदिनः ।
आरंभेशकुनोदीप्तोवर्षांतस्तद्भयंकरः ॥५७॥

अर्थ–अपसव्य जाणारे व दीप्त ( दीप्तदिक्स्थ, सूर्याभिमुख ) असे शकुन भय सांगतात. कार्यारंभीं जो दीप्तशकुन त्याचें भय वर्षामध्यें त्या कार्यास होतें ॥५७॥

तिथिवाय्वर्कभस्थानचेष्टादीप्तायथाक्रमं ।
धनसैन्यबलांगेष्टकर्मणांस्युर्भयंकराः ॥५८॥

अर्थ–तिथि, वायु, अर्क, नक्षत्र, स्थान, चेष्टा हे दीप्तशकुन; धन, सैन्य, बल, शरीर, इष्ट, कर्म यांस अनुक्रमानें भय करतात ॥५८॥

जीमूतध्वनिदीप्तेषुभयंभवतिमारुतात् ।
उभयोःसंध्ययोर्दीप्ताःशस्त्रोद्भवभयंकराः ॥५९॥

अर्थ–मेघध्वनीनें दीप्तशकुन अ० वायूपासून भय होतें. प्रातःसायसंध्येचाठाई दीप्तशकुन झाले अ० शस्त्रोत्पन्न भय करतात ॥५९॥

चितिकेशकपालेषुमृत्युबंधवधप्रदाः ।
कंटकीकाष्ठभस्मस्थाःकलहायासदुःखदाः ॥६०॥
अप्रसिद्धिंभयंवापिनिःसाराश्मव्यवस्थिताः ।
कुर्वंतिशकुनादीप्ताःशांतायाप्यफलास्तुते ॥६१॥

अर्थ–प्रेताग्निसमीप, केश, कपाल ( करटें), यांचाठाई झालेले शकुन अनुक्रमानें मृत्यु, बंधन, वध हे करतात. कांटेरा वृक्ष, काष्ठ, भस्म यांचाठाई झालेले शकुन अनुक्रमानें कलह, उपद्रव, दुःख यांतें करतात ॥६०॥ निःसार ( आंत पोकळ ) व पाषाण यांचाठाई राहिलेले शकुन अनु०कार्याची अप्रसिद्धि व भय करतात. हे पूर्वोक्त शकुन दीप्त असले तर ही पूर्वोक्त फलें करतात. शांत असले तर स्वल्पफल देतात ॥६१॥

असिद्धिसिद्धिदौज्ञेयौनिर्हादाहारकारिणौ ।
स्थानाद्रुवन्व्रजेद्यात्रांशंसतेत्वन्यथागमं ॥६२॥

अर्थ–मलविसर्जन करणारा शकुन कार्यांची असिद्धि करणारा, भोजन करणारा शकुन सिद्धि करणारा होय. जेथें शकुन रहात असेल तेथून शब्द करीत जर गमन करील तर तो यात्रा करण्यास सांगतो. अन्यथा म्ह० शब्द करीत राहण्याच्या जागी येऊन शकुन जर बसेल तर कोणाचें तरी येणें होईल असें सांगतो॥६२

कलहःस्वरदीप्तेषुस्थानदीप्तेषुविग्रहः ।
उच्चमादौस्वरंकृत्वानीचंपश्चाच्चमोपकृत् ॥६३॥

अर्थ–स्वर दीप्त ज्यांचा अशा शकुनांहीं कलह होतो. दीप्तस्थानी झालेल्या शकु-

नानीं युद्ध होतें. प्रथम उच्चशब्द करून पश्चात् नीचशब्द करील तर तो शकुन चोरी करणारा होय ( चोरी होते ) ॥६३॥

**एकस्थानेरुवन्दीप्तःसप्ताहात्ग्रामघातकृत् ।**
**पुरदेशनरेन्द्राणामृत्वर्धायनवत्सरात् ॥६४॥**

अर्थ—दीप्तशकुन एकजागीं रोदनशब्द करीत सर्व दिवस राहील तर सात दिवसांनी गावाचा नाश करील नगराचा २ महिन्यानीं, देशाचा ३ महिन्यानीं, राजाचा एक वर्षानें नाश करील ॥६४॥

**सर्वेदुर्भिक्षकर्तारःस्वजातिपिशिताशनाः ।**
**सर्पमूषकमार्जारपृथुरोमविवर्जिताः ॥६५॥**

अर्थ—स्वजातीचें मांस खाणारे असे सर्व शकुन दुर्भिक्षकरणारे होत; परतु सर्प उंदीर, मांजर, मत्स्य यावांचून, (हे स्वजातीचें मांस स्वाभाविक भक्षण करतात)६५

**परयोनिषुगच्छंतोमैथुनंदेशनाशनाः ।**
**अन्यत्रवेसरोत्पत्तेर्नृणांचाजातिमैथुनात् ॥६६॥**

अर्थ—सर्व प्राणी परयोनींचाठाई मैथुन करतील तर देशनाश होतो; परतु खेचराची उत्पत्ति व मनुष्याचें अन्यजातिमैथुन यावांचून (घोडी व गर्दभ यापासून खेचर होतो व मनुष्य, घोडी इत्यादिकांशीं मैथुन करतात हें स्वाभाविक आहे)६६

**वधघातभयानिस्युःपादोरुमस्तकांतिगैः ।**
**अप्तृणपिशितान्नादैर्वर्षचौरोपक्षतग्रहाः ॥६७॥**

अर्थ— पाय, मांड्या, मस्तक यांजवळ येणारे शकुन अनु० वध, घात, भय, यांतें करतात. उदक, तृण, मांस, अन्न यातें भक्षण करणारे शकुन अनु० वृष्टि, चोरी, अंगास खत, ग्रह ( मित्राची भेट ), यातें करतात ॥६७॥

**क्रूरोग्रदोषदुष्टश्चप्रधाननृपवृत्तकैः ।**
**चिरकालैश्चदीप्ताद्याःस्वागमोदिक्षुतन्नृणां ॥६८॥**

अर्थ—दीप्तादि ( श्लो० १२ ) आठ दिशांचाठाईं राहिलेला शकुन अनुक्रमानें क्रूर, उग्र, दोषी, दुष्ट, प्रधान, नृप, वृत्तक, चिरकालगत यांसहवर्तमान कोणी मनुष्य त्या दिशेकडून येतो असे सांगतो अथवा दीप्त, धूमित, शांत, अंगारिणी अशा चार दिशांस राहिलेला शकुन अनु० क्रूर, उग्रदोषानीं दुष्ट, मुख्य

राजाचें वृत्त सांगणारा, चिरकालगत, अशा पुरुषासहित कोणी मनुष्य या दिशेकडून येतो असें सांगतो. हाच अर्थ श्रेष्ठ होय ॥६८॥

सद्रव्योवल्ववांश्चस्यात्सद्रव्यस्यागमोभवेत् ।
द्युतिमान्विनतप्रेक्षीसौम्योदारुणवृत्तकृत् ॥६९॥

अर्थ—कांहीं भक्ष्यपदार्थानें सहित व बलिष्ठ असा शकुन असेल तर द्रव्ययुक्त पुरुषाचें येणें होईल. तेजस्वी व खाली पाहणारा असा शकुन सौम्यही असला तरी भयंकर वर्तणूक करतो ॥६९॥

विदिक्स्थःशकुनोदीप्तोवामस्थेनानुवाशितः ।
स्त्रियाःसंग्रहणंप्राहतद्दिगाख्यातयोनितः ॥७०॥

अर्थ—ईशान्यादि विदिशांस राहणारा जो दीप्तशकुन तो वामभागस्थशकुनानें युक्त अ० त्या दिशेस प्रसिद्ध ज्याची उत्पत्ति अशा पुरुषापासून स्त्रीची प्राप्ति सांगतो ॥७०॥

शांतःपंचमदीप्तेनविरुतोविजयावहः ।
दिग्गगमकारीवादोपकृत्तद्विपर्यये ॥७१॥

अर्थ—शांतशकुन तत्पंचमदिक्स्थ दीप्तशकुनानें शब्दित अ० विजयप्रद होतो; अथवा त्या दिशेस गेलेल्या मनुष्याचें येणें होतें. त्याचा विपर्यास अ० दुःख प्राप्त होतें ॥७१॥

वामसव्यरुतोमध्यःप्राहस्वपरयोर्भयं ।
मरणंकथयंत्येतेसर्वेसमविराविणः ॥७२॥

अर्थ—मध्यें राहणारा शकुन वामभागस्थशकुनानें शब्दित केला तर स्वकीयांस भय होतें व सव्यभागस्थानें केल्या तर इतरास भय सांगतो. हे पूर्वोक्त तीनही शकुन एककालीं शब्द करतील तर मरण सांगतात ॥७२॥

वृक्षाग्रमध्यमूलेषुगजाश्वरथिकागमः ।
दीर्घाब्जमुपिताग्रेपुनरनौशिविकागमः ॥७३॥

अर्थ—वृक्षाचें अग्र, मध्य, मूळ यांच्याठाईं राहिलेला शकुन अनु० गजारूढ, अश्वारूढ, रथारूढ यांचें आगमन सांगतो. दीर्घ, जलज, छिन्नाग्र अशा वृक्षादिकांच्याठाईं राहिलेला शकुन अनु० नगारूढ, नौकारूढ, शिबिका ( पालखी ) रूढ यांचें येणें सांगतो ॥७३॥

शकटेनोन्नतस्थेचछायास्थेछत्रसंयुतः ।
एकत्रिपंचसप्ताहात्पूर्वाद्यास्वंतरासुच ॥७४॥

अर्थ—उंचप्रदेशीं ( पर्वतादिकीं ) राहिलेला शकुन गाडीवर बसून येतो असें सांगतो. छायेस राहिलेला शकुन छत्रयुक्त येतो असें सांगतो. पूर्वादि दिशा आग्नेयादि विदिशा यांच्याठाई राहिलेल्या शकुनानें सुचविलेलें शुभाशुभफल अनु० १।३।५।७ दिवसांनीं होतें ॥७४॥

सुरपतिहुतवहयमनिर्ऋतिवरुणपवनेंदुशंकराःक्रमशः।
प्राच्यादीनांपतयोदिशःपुमांसोंगनाविदिशाः ॥७५॥

अर्थ—इंद्र, अग्नि, यम निर्ऋति, वरुण, वायु, चंद्र, शिव हे अनु० पूर्वादि आठ दिशांचे स्वामी होत. पूर्वादि चार दिशा पुरुष व आग्नेयी इ० चार विदिशा स्त्रिया होत ॥७५॥

तरुतालीविदलांवरसलिलजशरचर्मपट्टलेखाःस्युः ।
द्वात्रिंशत्प्रविभक्तेदिक्चक्रेतेषुकार्याणि ॥७६॥

अर्थ—पूर्वादि दिशांचाठाई शकुन झाले अ० अनु० तरु ( वृक्षावयव साल, पान ), ताडपत्र, अर्धपत्र, वस्त्र, कमलपत्र, शर ( कांड ), कातडें, पट्टवस्त्र, यांवर लेख येतात. द्वात्रिंशत्प्रविभक्त जें दिक्चक्र ( श्लो० २९ ) त्याचाठाई जीं , कार्यें तीं या पत्रांवर लिहून येतात ॥७६॥

व्यायामशिखिनिकूजितकलहांभोनिगडमंत्रगोशब्दाः ।
वर्णाश्चरक्तपीतककृष्णसिताःकोणगामिश्राः ॥७७॥

अर्थ—पूर्वादि दिशांचाठाई शकुन झाला अ० बाहुयुद्ध, अग्निसमीप, शब्दश्रवण, कलह, जल, बंधनादि, वेदमंत्र, गोशब्द, हीं जेथे होत असतील तेथें पूर्वादि अनु० शुभशकुनोत्पन्न संयोगादि फल होतें. पूर्वादि चार दिशांचाठाई शकुन झाला तर अनु० वर्ण तांबडा, पिवळा, काळा, पांढरा, हे होते. आग्नेयादि विदिशांचाठाई मिश्रवर्ण ह्म० रक्तपीत, पीतरक्त, कृष्णसित, सितरक्त, असेवर्ण जाणावे॥७७

चिन्हंध्वजोदग्धमथश्मशानंदरीजलंपर्वतयज्ञघोषाः । एतेषुसंयोगभयानिविंद्यादन्यानिवास्थानविकल्पितानि ॥७८॥

अर्थ–पूर्वादि ८ दिशांचाठाईं अनु० ध्वज, दग्धभूमि, श्मशान, पर्वतगुहा, उदक, पर्वत, यज्ञ, गवळ्यांचें स्थान, हीं चिन्हें होत. यास्थानीं संयोगभयें जाणावीं. अन्यकार्ये स्थानपरत्वें कल्पावीं ॥७८॥

स्त्रीणांविकल्पेबृहतीकुमारीव्यंगाविगंधात्व
थनीलवस्त्रा । कुस्त्रीप्रदीर्घाविधवाचताश्चसं
योगचिंतापरिवेदिकाःस्युः ॥७९॥

अर्थ–स्त्रीविषयक चिंता अ० पूर्वादिदिशांचाठाईं संयोगशकुन झाले तर अनु० बृहच्छरीर, कुमारी, व्यंग, दुर्गंधा, नीलवस्त्रा, कुत्सितस्त्री, प्रदीर्घ ( उंच ), विधवा, या स्त्रियांचा संयोग होतो ॥७९॥

पृच्छासुरूप्यकनकातुरभामिनीनांमाषाद्यया
नमखगोकुलसंश्रयासु । न्यग्रोधरक्ततरुरोध्र
ककीचकाख्याभूतद्रुमाःखदिरबिल्वनगार्जुनाश्च ८०

अर्थ–प्रश्नकालीं पूर्वादि ८ दिशांचाठाईं शकुन किंवा पृच्छक राहिला असतां अनु० रुपें, सोनें, रोगी, स्त्री, माषादिधान्य, अश्वादि यान किंवा गमन, यज्ञ, गोकुलाश्रित यांची चिंता सांगावी. तसेच पूर्वादिदिशांचाठाईं अनु० वट, तांबडावृक्ष, लोध्र, वेळु, आम्रवृक्ष, खैर, बिल्व, अर्जुनवृक्ष किंवा पर्वत व अर्जुनवृक्ष हे राहतात ॥८०॥

॥ इतिसर्वशाकुनेमिश्रकाध्यायःप्रथमः ॥

इतिश्रीवराहमिहिरकृतौबृहत्संहितायांषड
शीतितमोध्यायः॥८६॥

---

## ॥ अथांतरचक्रं ॥

ऐंद्र्यांदिशिशांतायांविरुवन्नृपसंश्रितागमंवक्ति ।
शकुनिःपूजालाभंमणिरत्नद्रव्यसंप्राप्तिं ॥१॥

अर्थ–शांतपूर्वदिशेचाठाईं पक्षी शब्द करील किंवा शकुन होईल तर राजाश्रित पुरुष येईल, सत्कारप्राप्ति व मणि, रत्न, द्रव्य यांची प्राप्ति हीं होतील असें सांग-

तो. शकुन शुभ असेल तर हीं फलें पूर्ण, मध्यम असेल तर मध्यम, अशुभ असेल तर अल्प होतील हें पुढें सर्वत्र जाणावें. ( हें वक्ष्यमाण ३२ विभक्त ( श्लोक ९९ ) पूर्वादि दिशास फल जाणावें ) ॥१॥

तदनंतरदिशिकनकागमोभवेद्वांछितार्थसिद्धिश्च ।
आयुधधनपूगफलागमस्तृतीयेभवेद्भागे ॥२॥

अर्थ—या पूर्वदिशेसच प्रदक्षिण दुसऱ्या भागीं पक्षिशब्द किंवा शकुन होईल तर सुवर्णप्राप्ति व इच्छितार्थसिद्धि हीं होतील. तृतीयभागीं आयुध, धन, पूगफलप्राप्ति हीं होतात ॥२॥

स्निग्धद्विजस्यसंदर्शनंचतुर्थेतथाहिताग्नेश्च ।
कोणेनुजीविभिक्षुप्रदर्शनंकनकलोहाप्तिः ॥३॥

अर्थ—चतुर्थभागीं शकुन झाला तर इष्टब्राह्मणाचें व अग्निहोत्र्याचें दर्शन होतें. आग्नेयकोणीं शब्द झाला तर अनुजीवी म्ह० सेवक याचें दर्शन व सुवर्ण, शस्त्र यांची प्राप्ति होते ॥३॥

याम्येनाद्येनृपपुत्रदर्शनंसिद्धिरभिमतस्याप्तिः ।
परतःस्त्रीधर्माप्तिःसर्षपयवलब्धिरप्युक्ता ॥४॥

अर्थ—आग्नेयकोणापुढें दक्षिणेकडे द्वितीयभागीं राजपुत्रदर्शन, कार्यसिद्धि, इच्छितप्राप्ति होते. तिसऱ्याभागीं स्त्री, धर्म यांची प्राप्ति व सर्षप, यव, यांचीही प्राप्ति होते ॥४॥

कोणाच्चतुर्थखंडेलब्धिर्द्रव्यस्यपूर्वनष्टस्य ।
यद्वातद्वाफलमपियात्रायांप्राप्नुयाद्याता ॥५॥

अर्थ—कोणापासून चतुर्थभागीं पूर्वी नष्ट झालेल्या द्रव्याची प्राप्ति होते व यात्रेचाठाईं गमनकर्ता, कोणत्यातरी प्रकारें फलातें प्राप्त होतो ॥५॥

यात्रासिद्धिःसमदक्षिणेनशिखिमहिषकुक्कुटाप्तिश्च ।
याम्याद्वितीयभागेचारणसंगःशुभंप्रीतिः ॥६॥

अर्थ—दक्षिणसमभागीं शकुन झाला तर यात्रासिद्धि, मयूर, महिष, कोंबडा यांची प्राप्ति होते दक्षिणेपासून दुसऱ्याभागीं नटनर्तकाचा संग, शुभ, कार्यप्रीति, हीं होतात ॥६॥

ऊर्ध्वंसिद्धिःकैवर्तसंगमोमीनतित्तिराद्याप्तिः ।

**प्रव्रजितदर्शनंतत्परेचपक्कान्नफललब्धिः ॥७॥**

अर्थ–द० तिसऱ्याभागीं कार्यसिद्धि, कैवर्तसग, मत्स्य व तित्तिरपक्षी इत्यादिका ची प्राप्ति हीं होतात चतुर्थभागी सन्याशाचें दर्शन, पक्क अन्न व फल याची प्राप्ति होते ॥७॥

**नैर्ऋत्यांस्त्रीलाभस्तुरगालंकारदूतलेखाप्तिः ।**
**परतोस्यचर्मतच्छिल्पिदर्शनंचर्ममयलब्धिः ॥८॥**

अर्थ–नैर्ऋतीस स्त्रीलाभ, अश्व, अलकार, दूत, लेख याची प्राप्ति होते. नैऋती पासून दुसऱ्या भागीं चर्म व चर्मशिल्पी ( चाभार ) याचें दर्शन व चर्ममयपात्र ( वाहणा इ० ) याची प्राप्ति हीं होतात ॥८॥

**वानरभिक्षुश्रवणावलोकनंनैर्ऋतात्तृतीयांशे ।**
**फलकुसुमदंतघटितागमश्चकोणाच्चतुर्थांशे ॥९॥**

अर्थ–नै० तृती० वानर, सन्यासी, बौद्ध याचें दर्शन होतें. नै० चतु० फल, पुष्प हस्तिदतानें केलेले पदार्थ याची प्राप्ति होते ॥९॥

**वारुण्यामर्णवजातरत्नवैडूर्यमणिमयप्राप्तिः ।**
**परतोतःशबरव्याधचौरसंगःपिशितलब्धिः ॥१०॥**

अर्थ–पश्चिमेस शकुन झाला तर समुद्रोत्पन्न रत्नें, वैडूर्यमणि व मणिमय भाडीं याची प्राप्ति होते. पश्चिमेपासून द्वि० शबर, व्याध, चोर याची सगति व मांस प्राप्ति हीं होतात ॥१०॥

**परतोपिदर्शनंवातरोगिणांचंदनागुरुप्राप्तिः ।**
**आयुधपुस्तकलब्धिस्तद्वृत्तिसमागमश्चोर्ध्वं ॥११॥**

अर्थ–प० तृ० वातरोग्याचें दर्शन व चदनवृक्षाची व सुगधिद्रव्याची प्राप्ति हो ते. पश्चि० चतु० आयुध, पुस्तक याची प्राप्ति व आयुधजीवी, पुस्तकजीवी याचा समागम होतो ॥११॥

**वायव्येफेनकचामरौर्णिकाप्तिःसमेतिकायस्थः ।**
**मृन्मयलाभोन्यस्मिन्वैतालिकडिंडिभांडानां ॥१२**

अर्थ वायव्येस शकुन झाला तर समुद्रफेन, चवरी, कबलादिक यांची प्राप्ति व कायस्थाची सगति होते द्वि० मृन्मयपात्राचा लाभ, स्तुतिपाठक, डिंडि

( पटह, मृदंग, करट या ३ वाद्यांचा समुदाय ) यांची संगति होते ॥१२

वायव्यांचतृतीयेमित्रेणसमागमोधनप्राप्तिः ।
वस्त्राश्वाप्तिरतःपरमिष्टसुहृत्संप्रयोगश्च ॥१३॥

अर्थ—वाय० तृ० मित्राबरोबर समागम व धनप्राप्ति होते. चतु० वस्त्र, अश्व, यांची प्राप्ति, इष्टमित्रांचा संयोग होतो ॥१३॥

दधितंडुललाजानांलब्धिरुदग्दर्शनंचविप्रस्य ।
अर्थावाप्तिरनंतरमुपगच्छतिसार्थवाहश्च ॥१४॥

अर्थ—उत्तरेस शकुन झाला तर दधि, तांदूळ, लाह्या यांची प्राप्ति व ब्राह्मणाचें दर्शन हीं होतात. द्वि० द्रव्यप्राप्ति व व्यापाऱ्याबरोबर संगति हीं होतात ॥१४

वेश्यावटुदाससमागमःपरेशुक्लपुष्पफललब्धिः ।
अतऊर्ध्वंचित्रकरस्यदर्शनंचित्रवस्त्रसंप्राप्तिः ॥१५॥

अर्थ—उत्त० तृ० वेश्या, बटु, दास यांचा समागम व श्वेतपुष्पें, फळें यांची प्राप्ति हीं होतात. उत्त० चतु० चित्रकाराचें दर्शन व चित्रवस्त्राची प्राप्ति हीं होतात १५

ऐशान्यांदेवलकोपसंगमोधान्यरत्नपशुलब्धिः ।
प्राक्प्रथमेवस्त्राप्तिःसमागमश्चापिबंधक्या ॥१६॥

अर्थ—ईशानीदिशेस शकुन होईल तर गुरवाचा समागम व धान्य, रत्न, पशु यांची प्राप्ति हीं होतात. ईशानीपुढें पूर्वेकडे प्रथमभागीं वस्त्रप्राप्ति व वेश्येचा समागम, हीं होतात ॥१६॥

रजकेनसमायोगोजलजद्रव्यागमश्चपरतोतः ।
हस्त्युपजीविसमाजश्चास्माद्धनहस्तिलब्धिश्च ॥१७॥

अर्थ—पूर्वेकडे द्वि० रजकाशीं समागम व जलोत्पन्न द्रव्यांची प्राप्ति, हीं होतात. पू० तृ० हत्तीवर जीविका करणाराचा समागम व त्याचपासून धन, हत्ती यांची प्राप्ति हीं होतात ॥१७॥

द्वात्रिंशत्प्रविभक्तंदिक्चक्रंवास्तुबंधनेप्युक्तं ।
अरनाभिस्थैरंतःफलानिनवधाविकल्प्यानि ॥१८॥

अर्थ—३२ भाग हें दिक्चक्र वास्तुबंधनींही सांगीतलें. अर व नाभि यांचाठाईं राहिलेल्या शकुनींही मध्ये नऊ प्रकारांनी फळें कल्पावीं. ( तीं पुढें सांगतो)॥१८॥

नाभिस्थेबंधुसुहृत्समागमस्तुष्टिरुत्तमाभवति ।
प्राग्रक्तपट्टवस्त्रागमस्त्वरेनृपतिसंयोगः ॥१९॥

अर्थ–नवधाविभक्तचक्राचाठाईं नाभिस्थ शकुन झाला अ० बंधु व मित्र यांचा स-मागम, उत्तम संतोष होतो. पूर्वकडे अरावर शकुन झाला तर तांबड्या, पट्टवस्त्रांची प्राप्ति व राजाचा समागम होतो ॥१९॥

आग्नेयेकौलिकतक्षपारिकर्माश्वसूतसंयोगः ।
लब्धिश्चतत्कृतानांद्रव्याणामश्वलब्धिर्वा ॥२०॥

अर्थ–आग्नेयीचे अरेवर शकुन झाला तर कोष्टी, सुतार, सेवक, अश्व, सारथि यांचा समागम व कोष्टी इत्यादिकांनीं केलेल्या पदार्थांचा व अश्वांचा लाभ होतो २०

नेमीभागंबुध्वानाभीभागंचदक्षिणेयोरः ।
धार्मिकजनसंयोगस्तत्रभवेद्धर्मलाभश्च ॥२१॥

अर्थ–नेमी ( चाकाचा घेर ) चा भाग व नाभी ( चाकाचा मध्य ) चा भाग जाणून जो दक्षिणेस अर, त्यावर शकु० धार्मिकजनाचा संयोग व धर्मलाभ होतो२१

उस्राक्रीडककापालिकागमोनैर्ऋतेसमुद्दिष्टः ।
वृषभस्यचात्रलब्धिर्माषकुलत्थाद्यमशनंच ॥२२॥

अर्थ–नैर्ऋतदिशेकडील अरावर शकु० तर गाय, खेळणारा, कापालिक ( बौद्ध ) यांचा समागम, वृषभाचा लाभ, माष व कुळीद इत्यादिकांचें भक्षण हीं होतात२२

अपरस्यांदिशियोरस्तत्रासक्तिःकृषीवलैर्भवति ।
सामुद्रद्रव्यसुसारकाचफलमद्यलब्धिश्च ॥२३॥

अर्थ–पश्चिमादिशेस जो अर तेथें शकु० शेतीलोकांबरोबर समागम होतो. समुद्रोत्पन्नद्रव्यें, सुसार ( खैराचा साड किंवा मणिवि० ), आम्रादिफलें, मद्य यांचा लाभ होतो ॥२३॥

भारवहतक्षभिक्षुकसंदर्शनमपिचवायुदिक्संस्थे ।
तिलककुसुमस्यलब्धिःसनागपुन्नागकुसुमस्य ॥२४॥

अर्थ–वायव्येस अराचाठाईं शकु० भारवाहक, सुतार, संन्यासी यांचे दर्शन, तिलपुष्प, नागचांपा, सुरंगी यांचे पुष्पांची प्राप्ति होते ॥२४॥

कौबेर्यांदिशिशकुनःशांतायांवित्तलाभमाख्याति ।
भागवतेनसमागममाचष्टेपीतवस्त्रैश्च ॥२५॥

अर्थ–शांतउत्तरदिशेस शकु० द्रव्यलाभ होईल. वैष्णवाचा व पीतवस्त्राचा समागम होईल असें सांगतो ॥२५॥

ऐशान्येव्रतयुक्तावनितासंदर्शनंसमुपयाति ।
लब्धिश्चपरिज्ञेयाकृष्णायोवस्त्रघंटानां ॥२६॥

अर्थ–ईशानीस शां० शकुन० व्रतस्थस्त्रीचें दर्शन होतें. शस्त्र, वस्त्र, घंटा यांचा लाभ होतो असें जाणावें ॥२६॥

याम्येष्टांशेपश्चाद्द्विषट्त्रिसप्ताष्टमेषुमध्यफला ।
सौम्येनचद्वितीयेशेषेष्वतिशोभनायात्रा ॥२७॥

अर्थ–दक्षिणेस ८ वा व पश्चिमेस २।६।३।७।८ या अरीं व उत्तरेस २ अरीं शांतशकुन झाला तर यात्रा मध्यफल देईल. शेष राहिलेल्या २९ भागीं शकुन झाला तर शुभयात्रा होते. (याप्रमाणें ३२ अराचें फल सांगीतलें) ॥२७॥

अभ्यंतरेतुनाभ्यांशुभफलदाभवतिषट्सुचारेषु ।
वायव्यानैर्ऋतयोरुभयोःक्लेशावहायात्रा ॥२८॥

अर्थ–अभ्यंतरीं नाभीचाठाईं ६ अरीं यात्रा शुभ व वायव्य, नैर्ऋती या दोहों दिशेस यात्रा क्लेशकारक होय ॥२८॥

शांतासुदिक्षुफलमिदमुक्तंदीप्तास्वतोभिधास्यामि ।
ऐंद्र्यांभयंनरेंद्रात्समागमश्चैवशत्रूणां ॥२९॥

अर्थ–शांतदिशांचाठाईं शकुन झाले तर हें पूर्वोक्त फल सांगीतलें आतां दीप्तदिशांचाठाईं शकुन झाले तर त्यांचें फल पुढें सांगतो. दीप्तपूर्वदिशेस शकुन झाला तर राजापासून भय व शत्रुसमागम होतो ॥२९॥

तदनंतरदिशिनाशःकनकस्यभयंसुवर्णकाराणां ।
अर्थक्षयस्तृतीयेकलहःशस्त्रप्रकोपश्च ॥३०॥

अर्थ–पूर्वदिशेकडे दुसऱ्याभागीं शकु० सुवर्णनाश व सोनारांस भय होतें. तिसऱ्याभागीं शकु० द्रव्यनाश, कलह, शस्त्रकोप हीं होतात ॥३०॥

अग्निभयंचचतुर्थेभयमाग्नेयेचभवतिचौरेभ्यः ।
कोणादपिद्वितीयेधनक्षयोनृपसुतविनाशः ॥३१॥

अर्थ—चतुर्थभागीं अग्निभय होतें. आग्नेयभागीं चोरांचें भय होतें. आग्नेयकोणापासून २ भागीं धननाश व राजपुत्रनाश हीं होतात ॥३१॥

प्रमदागर्भविनाशस्तृतीयभागेभवेच्चतुर्थेच ।
हैरण्यककारुकयोःप्रध्वंसःशस्त्रकोपश्च ॥३२॥

अर्थ—तृतीयभागीं स्त्रीचा गर्भनाश होतो. चतुर्थभागीं दीप्तशकुन झाला तर सोनार व शिल्पकार ( सुतार ) यांचा नाश व शस्त्रकोप हे होतात ॥३२॥

अथपंचमेनृपभयंमारीमृतदर्शनंचवक्तव्यं ।
षष्ठेतुभयंज्ञेयंगंधर्वाणांसडोंबानां ॥३३॥

अर्थ—आग्नेयकोणापासून पंचमभागीं ( दक्षिणेस ) दीप्तशकुन झा० राजभय, मरणोन्मुख व मृत यांचें दर्शन हीं होतात. ६ भागीं शकुन झा० गंधर्व व डोंब यांचें भय होतें ॥३३॥

धीवरशाकुनिकानांसप्तमभागेभयंभवतिदीप्ते ।
भोजनविघातउक्तोनिर्ग्रंथभयंचतत्परतः ॥३४॥

अर्थ—दीप्तसप्तमभागीं शकु० कोळी व पक्षीधरणारा यांपासून भय होतें. अष्टमभागीं शकु० भोजननाश व निर्ग्रंथ ( नग्नक्षपणिक किंवा वेडा ) यांपासून भय होतें ॥३४॥

कलहोनैर्ऋतभागेरक्तस्रावोथशस्त्रकोपश्च ।
अपरायेचर्मकृतंविनश्यतेचर्मकारभयं ॥३५॥

अर्थ—नैर्ऋतभागीं दीप्तशकु० कलह, रक्तस्राव, शस्त्रकोप हे होतात. २ भागीं चर्मकृत ( उपानहादिकांचा ) नाश व चर्मकारापासून भय होतें ॥३५॥

तदनंतरेपरिव्राट्प्लवणभयंतत्परेत्वनशनभयं ।
वृष्टिभयंवारुण्यांश्चतस्कराणांभयंपरतः ॥३६॥

अर्थ—३ भागीं शकु० संन्याशाच्या सेनेपासून भय होतें. ४ भागीं शकु० उपवासभय होतें. पश्चिमेस दीप्तशकु० वृष्टिभय ( अवर्षण, अतिवृष्टि ) होतें. २ भागीं शकु० कुत्रे व चोर यांचें भय होतें ॥३६॥

वायुग्रस्तविनाशःपरेपरेशस्त्रपुस्तवार्तानां ।
कोणेपुस्तकनाशःपरेविषस्तेनवायुभयं ॥३७॥

अर्थ—पश्चि० ३ भागीं श० वायुग्रस्तांचा नाश होतो. ४ भागीं शस्त्र व लेप ( गिलावा इ० ) करणारापासून भय होते. वायुकोणीं पुस्तकनाश होतो. २ भागीं विष, चौर्य, वायु यांचें भय होतें ॥३७॥

परतोवित्तविनाशोमित्रैःसहविग्रहश्चविज्ञेयः ।
तस्यासन्नेश्ववधोभयमपिचपुरोधसःप्रोक्तं ॥३८॥

अर्थ—वायव्येस ३ भागीं दीप्तशकु० द्रव्यनाश, मित्रांसहवर्तमान युद्ध, हीं होतात. ४ भागीं अश्वभय व उपाध्यायास भय हीं होतात ॥३८॥

गोहरणशस्त्रघातावुदक्परेसार्थघातधननाशौ ।
आसन्नेचश्वभयंव्रात्यद्विजदासगणिकानां ॥३९॥

अर्थ—उत्तरेस दीप्तशकु० गोहरण, शस्त्रघात हे होतात. द्वितीयभागीं सावकारांचा नाश व धननाश हे होतात. ३ भागीं श० कुत्र्याचें भय, व्रात्य ( १६ वर्षांपर्यंत मुंजरहित ), ब्राह्मण, दास, वेश्या यांचें भय हीं होतात ॥३९॥

ऐशानस्यासन्नेचित्रांबरचित्रकृद्भयंप्रोक्तं ।
ऐशानेत्वग्निभयंदूषणमप्युत्तमस्त्रीणां ॥४०॥

अर्थ—ईशानीच्या पूर्वीच्या जवळच्या ४ भागीं श० चित्रवस्त्रधारणकरणारे व चित्रकार यांपासून भय होतें. ईशानकोणीं श० अग्निभय व उत्तमस्त्रियांस दूषण हीं होतात ॥४०॥

प्रोक्तस्यैवासन्नेदुःखोत्पत्तिःस्त्रियाविनाशश्च ।
भयमूर्ध्वंरजकानांविज्ञेयंकाच्छिकानांच ॥४१॥

अर्थ—ईशानकोणाच्या पुढें जवळच्याभागीं दुःखोत्पत्ति व स्त्रीनाश हीं होतात. त्यापुढील भागीं रजकांचें व काच्छिकांचें ( पाणथळ देशांतील लोकांचें ) भय होतें ॥४१॥

हस्त्यारोहभयंस्याद्विरदविनाशश्चमंडलसमाप्तौ ।
अभ्यंतरेतुदीप्तेपत्नीमरणंध्रुवंपूर्वे ॥४२॥

अर्थ—३२ भागांच्या समाप्तीच्या भागीं श० पूर्वेच्या मागीलभागीं दीप्तशकुन श-

ला तर हत्तीवर बसणारांचें भय व हत्तीचा नाश हीं होतात. पूर्वेकडे मध्यभागीं जो अर त्यावर दीप्तशकु० स्त्रीमरण होतें ॥४२॥

शस्त्रानलप्रकोपावाग्नेयेवाजिमरणशिल्पिभयं ।
याम्येधर्मविनाशःपरेग्न्यवस्कंदचोक्षवधाः ॥४३॥
अपरेतुकर्मिणांभयमथकोणेचानिलेखरोष्ट्रवधः ।
अत्रैवमनुष्याणांविपूचिकाविषभयंभवति ॥४४॥
उदगर्थविप्रपीडादिश्यैशान्यांतुचित्तसंतापः ।
ग्रामीणगोपपीडाचतत्रनाभ्यांतथात्मवधः ॥४५॥

अर्थ—आग्नेयकोणीं जो अर तेथें दीप्तशकुन झाला तर शस्त्र व अग्नि यांचा प्रकोप, अश्वनाश, शिल्पीलोकांपासून भय हीं होतात. दक्षिणेस शकु० धर्मनाश होतो. नैर्ऋतकोणीं अग्निभय व स्तुत्यपुरुषवध हीं होतात ॥४३॥ पश्चिमेस शकु० कर्मकरांस भय होतें. वायुकोणीं अरावर शकु० गर्दभ व उंट यांचा वध हीं व येथेंच मनुष्यांस विपूचिका ( तरळ, मोडशी ), विष यांचें भय हीं होतात ॥४४॥ उत्तरेस शकु० द्रव्य व ब्राह्मण यांस पीडा होते. ईशानीदिशेस शकु० चित्तसंताप होतो व गांवांतील लोक व गोप यांस पीडा होते. नाभिस्थित दीप्तशकुन झाला तर आत्मवध होतो ॥४५॥

॥ इतिसर्वशाकुनेंतरचक्रंनामाध्यायोद्वितीयः ॥
॥इतिबृहत्संहितायांसप्ताशीतितमोध्यायः ॥८७॥

---

## ॥ अथशकुनरुतं ॥

श्यामाश्येनशशघ्नवंजुलशिखिश्रीकर्णचक्राव्हयाश्चा
पांडीरकखंजरीटकशुकध्वांक्षाःकपोतास्त्रयः । भार
द्वाजकुलालकुक्कुटखराहारीतगृध्रौकपिःफेंटःकुक्कुटपू
र्णकूटघटकाश्चोक्तादिवासंचराः ॥१॥

अर्थ—कोकिल, ससाणा, शशघ्न ( पक्षिवि० ) सुतार ( पक्षिवि० ), मयूर, श्रीकर्ण ( पक्षिवि० ), चक्रवाक, चाप, बगळा, खंजन, पोपट, कावळा, तीन कपोत

( १ आपाडुर, (पारवा), कवडा, होला प० ), कोंकडकुभा, कुलाल, कुक्कुट ( रान कोंबडा ), गर्दभ, हिरवा खबुतर, गिधाड, वानर, फेट ( पक्षिवि० ), कोंबडा, पूर्णकूट ( पक्षिवि ० ), चिमणापक्षी, हेसर्व दिवसास फिरणारे असें सांगीतलें आहे १

लोमाशिकापिंगलछिप्पिकाख्यौवल्गुलूकौशशकश्चरात्रौ । सर्वेस्वकालोत्क्रमचारिणःस्युर्देशस्यनाशायनृपांतदावा ॥२॥

अर्थ–खोंकड ( हें कोल्ह्यासारखें असून ल्हान असतें ), पिंगल, छिप्पिक (पक्षिवि०), वाघूळ, घुबड, हे सर्व रात्रीस फिरणारे होत. सर्व आपला फिरण्याचा काळ सोडून दुस याकाळीं फिरावयास लागले तर देशनाश अथवा राजाचा नाश होतो ॥२॥

हयनरभुजगोष्ट्रद्वीपिसिंहर्क्षगोधावृकनकुलकुरंगश्वाजगोव्याघ्रहंसाः । पृषतमृगसृगालश्वाविदाख्यान्यपुष्टाद्युनिशमपिविडालाःसारसःसूकरश्च ॥३॥

अर्थ–घोडा, मनुष्य, सर्प, उट, चिता, सिंह, रीस, घोरपड, लांडगा, मुगस, हरिण, कुतरा, बकरा, गाय, वाघ, हस, हरिणवि० ( पृषित ), कोल्हा, शाळजीवत, कोकिला, माजर, सारसपक्षी, डुकर, हे दिवसरात्र फिरणारे होत ॥३॥

भपकूटपूरिकरवककरायिकाःपूर्णकूटसंज्ञाःस्युः ।
नामान्युलूकचेटयाःपिंगलिकापेचिकाहक्का ॥४॥
कपोतकीचश्यामावंजलकःकीर्त्यंतेखदिरचंचुः ।
छुच्छुंदरीनृपसुतावालेयोगर्दभःप्रोक्तः ॥५॥
स्रोतस्तडागभेद्येकपुत्रकःकलहकारिकाचरला ।
भृंगारवज्रवाशतिनिशिभूमौद्व्यंगुलशरीरा ॥६॥
दुर्बलिकोभांडीकःप्राच्यानांदक्षिणःप्रशस्तोसौ ।
छिक्कारोमृगजातिः कृकवाकुःकुक्कुटःप्रोक्तः ॥७॥
गर्ताकुक्कुटकस्यप्रथितंतुकुलालकुक्कुटोनाम ।
गृहगोधिकेतिसंज्ञाविज्ञेयाकुडयमत्स्यस्य ॥८॥

दिव्योधन्वनउक्तःक्रोडःस्यात्सूकरोथगोरुस्रा ।
श्वासारमेयउक्तोजात्याचटिकाचसूकरिका ॥९॥

अर्थ-भष, कूटपूरिक, रवक, करायिक, ही पूर्णकूटाचीं नावें होत. पिंगलिका, पेचिका, हक्का ही उलूकचेटीचीं नावें होत ॥४॥ श्यामा, कपोतकी होय. वंजुलक, खदिरचंचु होय. छुच्छुंदरी ( सुगंधमूषिका ), नृपसुता होय. वालेय, गर्दभ होय ॥५॥ स्रोतोभेदी, तडागभेदी, एकपुत्रक, कलहकारिका हीं रला (राळ) इचीं नावें होत. ही भृंगारासारखा शब्द रात्रीस भूमीचाठाईं करते व हिचें दोन अंगुलें लांब शरीर आहे ॥६॥ दुर्बलिक, भांडीक होय. हा पूर्वकडील लोकांस उजना शुभ होय. छिक्कार हा मृगजाति होय. कृकवाकु हा कुक्कुट होय ॥७॥ गर्ताकुक्कुटाचें नाम कुलालकुकुट असें प्रसिद्ध आहे. कुड्य ( भिंत ) मत्स्य हें नाव गृहगोधा (पाल) इचें जाणावें ॥८॥ दिव्य, धन्वन होय. क्रोड, सूकर होय. उस्रा, गाय होय. सारमेय, हा श्वा ( कुत्रा ) होय. जातीनें जी चटका ती सूकरी सांगीतली ॥९॥

एवंदेशेदेशेतद्विद्भ्यःसमुपलभ्यनामानि ।
शकुनरुतज्ञानार्थंशास्त्रेसंचिंत्ययोज्यानि ॥१०॥

अर्थ-याप्रकारें देशादेशाचाठाईं तीं पूर्वोक्त पक्ष्यादिकांचीं नावें जाणणाऱ्यांपासून नावांची उपलब्धि करून शकुनशब्दाच्या ज्ञानार्थ शास्त्राचा विचार करून तीं नावें योजावीं ॥१०॥

वंजुलकरुतंतित्तिडितिदीप्तमथकिल्किलीतितत्पूर्णं ।
श्येनशुकगृध्रकंकाःप्रकृतेरन्यस्वरादीप्ताः ॥११॥

अर्थ-वंजुलकपक्ष्याचा तित्तिड् असा शब्द अशुभ होय व किल्किल् असा शब्द शुभ होय. ससाणा, पोपट, गिधाड, कंक यांचा स्वाभाविकशब्दाहून अन्यशब्द अशुभ होय ॥११॥

यानासनशय्यानिलयनंकपोतस्यसद्मविशनंवा ।
अशुभप्रदंनराणांजातिविभेदेनकालोन्यः ॥१२॥
आपांडुरस्यवर्षाच्चित्रकपोतस्यचैवषण्मासात् ।
कुंकुमधूम्रस्यफलंसद्यःपाककपोतस्य ॥१३॥

अर्थ-अश्वादियान, आसन, शय्या यांचाठाईं कपोताचें रहाणें होईल अथवा तो घरामध्यें आईल तर मनुष्यांस अशुभफल देतो. याच्या जातिभेदानें फलाचा

काल आहे तो पुढे सांगतों ॥१२॥ थोडा पांढरा जो कपोत त्याचें फल वर्षाने, चित्रवर्णकपोताचें सहा महिन्यांनीं, कुंकुमवर्ण व धूम्रवर्ण कपोताचें तत्काल शुभाशुभफल होतें ॥१३॥

चिचिदितिशब्दः पूर्णः श्यामायाः शूलिशूलितिचधन्यः ।
चच्चेतिचदीप्तः स्यात्स्वप्रिययोगायचिक्चिगिति ॥१४॥

अर्थ-श्यामा ( कपोतकी ) इचा चिचित् असा शब्द शुभ होय. शूलिशूल् असा ही शब्द धन्य ( शुभ ) होय. चचा असा शब्द अशुभ होय. चिकुचिक् असा शब्द आपल्या प्रियपत्नीच्या योगार्थ होतो ॥१४॥

हारीतस्यतुशब्दोगुग्गुः पूर्णोपरेप्रदीप्ताः स्युः ।
स्वरवैचित्र्यंसर्वंभारद्वाज्याः शुभंप्रोक्तं ॥१५॥

अर्थ-हारीताचा गुग्गु असा शब्द शुभ होय. इतर सर्व शब्द अशुभ होत. भारद्वाजीचे नानाप्रकारचे सर्व शब्द शुभ सांगीतले ॥१५॥

किष्किपिशब्दः पूर्णः करायिकायाः शुभः कहकहेति ।
क्षेमायकेवलंकरकरोतिनत्वर्थसिद्धिकरः ॥१६॥
कोटुक्लीतिक्षेम्यः स्वरः कटुक्लीतिवृष्टयेतस्याः ।
अफलः कोटिकिलीतिचदीप्तः खलुगुंकृतः शब्दः ॥ १७

अर्थ-करायिका ( पूर्णकूटा ) इचा किष्किपि असा शब्द व कहकह असा शब्द शुभ होय. करकर असा शब्द केवल कल्याणकारक होतो, कार्यसिद्धिकारक होत नाहीं ॥१६॥ कोटुक्ली असा शब्द कल्याणकर होय. करायिकेचा कटुक्ली असा शब्द वृष्टिकारक होतो. कोटिकिली असा शब्द निष्फल होय. गुं असा केलेला शब्द अशुभ होय ॥१७॥

शस्तंवामेदर्शनंदिव्यकस्यसिद्धिर्ज्ञेयाहस्त
मात्रोच्छ्रितस्य । तस्मिन्नेवप्रोन्नतस्थेशरीरा
द्धात्रीवश्यंसागरांताभ्युपैति ॥१८॥

अर्थ-दिव्यकाचें वामभागीं दर्शन शुभ होय. हस्तमात्र उंच दिव्यकाच्या दर्शनानें सिद्धि होये. तोच फार उंच असता, सर्व पृथ्वी स्वाधीन होये ॥१८॥

फणिनोभिमुखागमोरिसंगंकथयातिबंधवधा
स्यंचयातुः । अथवासमुपैतिसव्यभागा
न्नसिद्ध्यैकुशलोगमागमेच ॥१९॥

अर्थ—गमनकर्त्यास सर्प सन्मुख आला तर शत्रुसमागम व बंध, वध यांणीं नाश, हे होतात. अथवा उजव्या अंगाहून डाव्या अंगास येईल तर तो कार्यसिद्धि व जाणेंयेणें यांविषयीं शुभ नव्हे ॥१९॥

अब्जेषुमूर्धसुचवाजिगजोरगाणांराज्यप्रदःकुशल
कृच्छुचिशाड्वलेषु । भस्मास्थिकाष्ठतुषकेशतृणेषु
दुःखंदृष्टःकरोतिखलुखंजनकोव्दमेकं ॥२०॥

अर्थ—कमल व घोडा, गज, सर्प यांच्या मस्तकीं खंजनकपक्षी पाहिला तर राज्यप्राप्ति होते. शुद्धप्रदेश व दूर्वा यांमध्यें पाहिला तर कल्याणकारक होय. भस्म, हाडें, काष्ठें, कोंडा, केश, तृण, यांचाठाई खंजनकपक्षी पाहिला तर एक वर्षपर्यंत दुःख करितो ॥ २० ॥

किलिकिलिकिलितिसिरिस्वनःशांतःशस्तफलो
न्यथापरः । शशकोनिशिवामपार्श्वगोवाशं
च्छस्तफलोनिगद्यते ॥२१॥

अर्थ—तित्तिरपक्ष्याचा किलिकिल्किलि असा शब्द शांत व शुभ फल देणारा होय. इतर शब्द अशुभ होय. ससा रात्रीस डाव्या बाजूस जाऊन शब्द करील तर शुभफल देतो असें सांगतात ॥२१॥.

किलिकिलिविरुतंकपेःप्रदीप्तंनशुभफलप्रद
मुद्दिशंतियातुः । शुभमपिकथयंतिचुग्लुश
व्दंकपिसदृशंचकुलालकुक्कुटस्य ॥२२॥

अर्थ—वानराचा किलिकिलि शब्द दीप्त; तो गमनकर्त्यास शुभफल देणारा नव्हे. चुग्लु शब्द शुभ होय. वानरासारखेंच कुलालकुक्कुटाच्या शब्दांचें शुभाशुभ जाणावें ॥२२॥

पूर्णाननःकृमिपतंगपिपीलिकाद्यैश्चापःप्रदक्षिणमु
पैतिनरस्ययस्य । खेस्वस्तिकंयदिकरोत्यथवापि

यासोऽस्तस्यार्थलाभमचिरात्सुमहत्करोति ॥२३॥

अर्थ—कृमि, पतंग, मुंग्या इत्यादि प्राण्यानीं पूर्णमुख असा चाष ज्या मनुष्याच्या प्रदक्षिण जाईल; अथवा आकाशामध्यें स्वस्तिकाकार चाष गमन करील तर त्या मनुष्यास मोठा अर्थलाभ शीघ्र होतो ॥२३॥

चापस्यकाकेनविरुध्यतश्चेत्पराजयोदक्षिणभागगस्य ।
वधःप्रयातस्यतदानरस्यविपर्ययेतस्यजयःप्रदिष्टः ॥२४

अर्थ—चापाचें कावळ्याबरोबर युद्ध होत अ० दक्षिणभागीं चाप होईल तर त्याचा पराजय झाला. त्यावेळीं निघालेल्या मनुष्याचा वध होतो. उत्तरभागीं चाप झाला तर जय झाला, तसाच गमनकर्त्याचा जय होतो ॥२४॥

केकेतिपूर्णकुटवद्यदिवामपार्श्वेचापःकरोति
विरुतंजयकृत्तदास्यात् । क्रकेतितस्यविरुतंन
शिवायदीप्तंसंदर्शनंशुभदमस्यसदैवयातुः ॥२५॥

अर्थ—चाष, केका, असा व पूर्णकुटासारखा ( श्लोक १६।१७ ) वामबाजूस शब्द करील तर जय होतो. क्रक असा चापाचा शब्द दीप्त; तो अशुभ होय. याचें दर्शन गमनकर्त्यास सर्वकाळ शुभ होय ॥२५॥

अंडीरकइतिरुतेनपूर्णटिट्टिटिशब्देनतुदीप्तउक्तः ।
फेंटःशुभोदक्षिणभागसंस्थोनवाशितेतस्यकृतोविशेषः॥

अर्थ—अंडीरकपक्षी टी असा शब्दानें पूर्ण ( शुभ ) होय. टिट्टिटि शब्दानें दीप्त ( अशुभ ) होय. दक्षिणबाजूस फेंट शुभ होय. त्याच्या शब्दाविषयीं विशेष केलेला नाहीं ॥२६॥

श्रीकर्णरुतंतुदक्षिणेक्रकक्रकेतिशुभंप्रकीर्तितं ।
मध्यंखलुचिक्चिकीतियच्छेषंसर्वमुशंतिनिष्फलं ॥२७

अर्थ—श्रीकर्णपक्ष्याचा क्रकक्र असा शब्द दक्षिणभागीं शुभ होय. चिक्चिक् असा शब्द मध्यम होय. शेष सर्व शब्द निष्फल होत ॥२७॥

दुर्वेलेरपिचिरिल्विरिल्वितिप्रोक्तमिष्टफलदंहिवामतः ।
वामतश्चयदिदक्षिणंव्रजेत्कार्यसिद्धिमचिरेणयच्छति २८

अर्थ—दुर्वलीचा ( भंडीरक ) चिरिल्विरिल्वि असा शब्द वामभागीं शुभ होय. तो डाव्याआंगून उजवीकडे जाईल तर शीघ्र कार्यसिद्धि होईल ॥२८॥

**चिक्चिकिवाशितमेवतुकृत्वादक्षिणभागमुपैतिचवामात् । क्षेमकृदेवनसाधयतेर्थान्व्यत्ययगोवधबंधभयाय ॥२९॥**

अर्थ—भंडीरक, चिक्चिकि असा शब्द करून डावीकडून उजवीकडे जाईल तर तो कल्याणमात्र करील अर्थसाधन करणार नाहीं. याच्या विपरीत जाईल तर वध, बंध, भय हीं होतील ॥२९॥

**क्रक्रेतिचसारिकाद्रुतंत्रेत्रेवाप्यभयाविरौतिया । सावक्तियियासतोचिराद्गात्रेभ्यःक्षतजस्यविस्रुतिं ३०**

अर्थ—जी सारिका ( शाळुंखी ) क्रक्र किंवा त्रेत्रे असे शब्द शीघ्र निर्भयहोत्साती करिते ती, गमनकर्त्यांच्या अंगापासून रक्तस्राव होईल असें सांगते ॥३०॥

**फेंटकस्यवामतश्चिरिल्विरिल्वितिस्वनः । शोभनोनिगद्यतेप्रदीप्तउच्यतेपरः ॥३१॥**

अर्थ—फेंटकपक्ष्याचा वामभागीं चिरिल्विरिल्वि असा शब्द शुभ होय; इतर शब्द दीप्त ( अशुभ ) होत ॥३१॥

**श्रेष्ठंखरस्थास्नुमुशंतिवाममोंकारशब्देनहितंचयातुः । अतःपरंगर्दभनादितंयत्सर्वाश्रयंतत्प्रवदंतिदीप्तं ॥३२॥**

अर्थ—वामभागीं एकस्थानस्थित गर्दभाचा शब्द श्रेष्ठ होय. गर्दभाच्या ओंकार-शब्दानें गमनकर्त्याचें हित होतें. याहून अन्य गर्दभाचा सर्व शब्द दीप्त ( अशुभ ) होय ॥३२॥

**आकाररावीसमृगःकुरंगओकाररावीपृषतश्चपूर्णः । येन्येस्वरास्तेकथिताःप्रदीप्ताःपूर्णाःशुभाःपापफलाःप्रदीप्ताः ॥३३॥**

अर्थ—कुरंग ( मृगजाति वि० ) अन्यमृगासहित आ, असा शब्द करील व पृषत-मृग ओ, असा शब्द करील तर ते दोनही शुभ होत. या मृगांचे जे अन्य शा-

ट्द ते दीप्त होत. सर्व शकुनांचे जे पूर्ण शब्द ते शुभ व जे दीप्त ते अशुभ होत ॥३३॥

भीतारुवंतिकुकुकुंकितिताम्रचूडास्त्यक्त्वारुतानिभ
यदान्यपराणिरात्रौ । स्वस्थैःस्वभावविरुतानिनि
शावसानेताराणिराष्ट्रपुरपार्थिववृद्धिदानि ॥३४॥

अर्थ–कोंबडे रात्रीस भिऊन कुकुकुक असे शब्द करतात ते सोडून अन्य शब्द भयप्रद होत. ते स्वस्थहोत्साते रात्रीच्या, अंतीं स्वाभाविक उच्चस्वरानें शब्द करतात ते राष्ट्र, नगर, राजा यांस वृद्धि देणारे होतात ॥३४॥

नानाविधानिविरुतानिहिछिप्पिकायास्तस्याःशुभाःकु
लुकुलुर्नशुभास्तुशेषाः । यातुर्विडालविरुतंनशुभंसदैव
गोस्तुक्षुतंमरणमेवकरोतियातुः ॥३५॥

अर्थ–छिप्पिकेचे नानाप्रकारचे शब्द आहेत त्यांत तिचे कुलुकुलु, असे शब्द शुभ होत; इतर अशुभ होत. गमनकर्त्यास मांजराचा शब्द सर्वकाल अशुभ होय. गाईची शिंक गमनकर्त्यास मरणच करते ॥३५॥

हुंहुंगुग्लुगितिप्रियामभिलपन्क्रोशत्युलूकोमुदा
पूर्णस्याद्गुरुलुप्रदीप्तमपिचज्ञेयंसदाकिस्किसि ।
विज्ञेयःकलहोयदावलवलंतस्याःसकृद्वाशितंदो
षायैवटटट्टेतिनशुभाःशेषाश्चदीप्ताःस्वराः ॥३६॥

अर्थ–घुबड, आपल्या स्त्रीची इच्छा करितहोत्साता, आनंदानें हुंहुंगुग्लुक, असा शब्द करतो व गुरुलु, असा शब्द करतो ते शब्द पूर्ण होत. त्याचा किस्किसि, असा शब्द दीप्त होय. जेव्हां वलवल असा शब्द स्त्रीचा होतो तेव्हां कलह जाणावा. टटट्ट, असा शब्द अशुभच होय. अन्य सर्व शब्द दीप्त; ते अशुभ होत. ( तस्यासकृत् ) असा पाठ आहे तेव्हां त्या उलूकाचा वलवल असा वारंवार शब्द होतो तेव्हां कलह जाणावा असा अर्थ होतो ॥३६॥

सारसकूजितमिष्टफलंतद्युगपद्विरुतंमिथुनस्य ।
एकरुतंनशुभंयदिवास्यादेकरुतेप्रतिरौतिचिरेण ॥३७॥

अर्थ–सारसपक्ष्याचा शब्द स्त्रीपुरुषांचा एकवेळच होईल तर शुभ होय. एकाचाच अशुभ होय. जर एकाचाच शब्द बहुतवेळानें होईल तर अशुभ होय ॥३७॥

चिरिल्विरिल्विति स्वनैः शुभं करोति पिंगला ।
अतोपरे तु ये स्वराः प्रदीप्तसंज्ञितास्तु ते ॥३८॥

अर्थ—पिंगलापक्षी, चिरिल्विरिल्वि; या शब्दानीं शुभ करतो. यांहून अन्य जे शब्द ते दीप्तसंज्ञक ( अशुभ ) होत ॥३८॥

इशिविरुतं गमनप्रतिषेधि कुशुकुशु चेत्कलहं
प्रकरोति । अभिमतकार्यगतिं च यथा सा कथ
यति तं च विधिं कथयामि ॥३९॥

अर्थ—पिंगलापक्ष्याचा इशि, असा शब्द गमननिषेध करतो. कुशुकुशु, असा शब्द कलहकारक होय. ती पिंगला इष्टकार्यसिद्धि जशी सांगते तो प्रकार पुढे सांगतो ॥३९॥

दिनांतसंध्यासमये निवासमागम्य तस्याः प्रय
तश्च वृक्षं । देवान्समभ्यर्च्य पितामहादीन्न
वांबरैस्तं च तरुं सुगंधैः ॥४०॥ एको निशीथे नल
दिक्स्थितश्च दिव्येतरैस्तां शपथैर्नियोज्य । पृ
च्छेद्यथाचिंतितमर्थमेवमनेन मंत्रेण यथा शृणोति ४१

अर्थ—सायंसंध्यासमयीं त्या पिंगलेच्या राहण्याच्या वृक्षाप्रत जाऊन नम्र होत्साता ब्रह्मादिदेवांची पूजा करून, नूतन वस्त्रें व सुगंधें यांहींकरून त्या वृक्षाचीही पूजा करून ॥४०॥ नंतर त्याच मध्यरात्रीस एकटा आग्नेयीदिशेस उभा राहून दिव्य व लौकिक शपथांनीं तिला योजून, ती जशी आयकेल तसा चिंतित अर्थ या वक्ष्यमाण मंत्रानें विचारावा ॥४१॥

विद्धि भद्रे मया यत्त्वमिममर्थं प्रचोदिता ।
कल्याणि सर्ववचसां वेदित्री त्वं प्रकीर्त्यसे ॥४२॥
आपृच्छे द्य गमिष्यामि वेदितश्च पुनस्त्वहं ।
प्रातरागम्य पृच्छे त्वामाग्नेयीं दिशमाश्रितः ॥४३॥
प्रचोदयाम्यहं यत्त्वां तन्मे व्याख्यातुमर्हसि ।
स्वचेष्टितेन कल्याणि यथा वेद्मि निराकुलं ॥४४॥

अर्थ—हे भद्रे या अर्थाविषयीं तूं जाणतेस यास्तव मी प्रेरित तूं सर्व वाक्यांची जाण-

णारीं असें ह्मणतात ॥४२॥ तुला मी विचारतों, आज मी गमन करीन पुनः प्रातःकालीं येऊन आग्नेयी दिशेस उभा राहून विचारीन ॥४३॥ जें विचारीन तें, हे कल्याणि जसें मी स्पष्ट जाणेन तसें आपल्या शब्दादि व्यापारानें सांगण्यास योग्य आहेस ॥४४॥

इत्येवमुक्तेतरुमूर्धगायाश्चिरिल्विरिल्वीतिरुतेर्थसिद्धिः । अत्याकुलत्वंदिशिकारशब्देकुचाकुचेत्येवमुदाहृतेवा ॥४५॥ अवाक्प्रदानेविहितार्थसिद्धिःपूर्वोक्तदिक्चक्रफलैरथान्यत् । वाच्यंफलंचोत्तममध्यनीचशाखास्थितायांवरमध्यनीचं ॥४६॥

अर्थ–पूर्वोक्तप्रकारें बोललें असतां वृक्षावर राहणारी पिंगला चिरिल्विरिल्वि, असा शब्द करील तर कार्यसिद्धि, दिशिकारशब्दीं व कुचाकुचशब्दीं चित्तव्याकुलत्व, हीं होतात ॥४५॥ कोणताच शब्द करणार नाहीं तर कार्यसिद्धि होय. पूर्व अध्यायोक्त "ऐंद्र्यांदिशिशांतापा" अशीं दिक्चक्रफलें सांगीतलीं तीं येथेंही पहावीं. वृक्षाच्या मुख्य खांदीवर ती असली तर उत्तम, मध्यखांदीवर मध्यम, कनिष्ठखांदीवर कनिष्ठफल सांगावें ॥४६॥

दिग्मंडलेभ्यंतरवाह्यभागेफलानिविंद्याद्गृहगोधिकायाः । छुच्छुंदरीचिच्चिडितिप्रदीप्तापूर्णातुसातित्तिडितिस्वनेन ॥४७॥

अर्थ–पालीच्या शब्दाचीं फलें, द्वात्रिंशत्प्रविभक्तदिक्चक्रासारखीं आतबाहेर जाणावीं. चिचुंद्रीचा चिच्चिड असा शब्द प्रदीप्त ( अशुभ ), तित्तिड असा शब्द पूर्ण ( शुभ ) होय ॥४७॥

॥ इतिसर्वशाकुनेशकुनरुताध्यायस्तृतीयः ॥३॥

॥ इतिश्रीवराहमिहिरकृतौवृहत्संहितायामष्टाशीतितमोध्यायः ॥८८॥

---

## ॥ अथश्वचक्रं ॥

नृतुरगकरिकुंभपर्याणसक्षीरवृक्षेष्टकासंचयच्छ
त्रशय्यासनोलूखलानिध्वजंचामरंशाड्वलंपु
ष्पितंवाप्रदेशंयदाश्वावमूत्र्याग्रतोयातियातु
स्तदाकार्यसिद्धिर्भवेदार्द्रकेगोमयेमिष्टभोज्यागमः
शुष्कसंमूत्रणेशुष्कमन्नंगुडोमोदकावाप्तिरेवाथवा।

अर्थ–मनुष्य, अश्व, हत्ती, कुंभ, खोगीर, रुवी इ० क्षीरवृक्ष, इटांची राशि, छत्र, शय्या, आसन, उखळ, ध्वज, चंवरी, दूर्वादि हरिततृण, पुष्पयुक्तस्थान, यांचाठाईं; कुत्रा मुतून गमनकर्त्याच्यापुढें जाईल तर कार्यसिद्धि होईल. ओल्या शेणावर मुतेल तर मिष्टान्नप्राप्ति होईल. शुष्क गोमयावर मुतेल तर शुष्कान्न अथवा गूळ, मोदक यांची प्राप्ति होईल।

अथविषतरुकंटकीकाष्ठपाषाणशुष्कद्रुमास्थि
श्मशानानिमूत्र्यावहत्याथवायायिनोग्रेसरो
निष्टमाख्यातिशय्याकुलालादिभांडान्यभुक्ता
न्यभिन्नानिवामूत्रयन्कन्यकादोषकृत्भुज्य
मानानिचेद्दुष्टतांतद्गृहिण्यास्तथास्यादुपान
त्फलंगोस्तुसंमूत्रणेवर्णजःसंकरः ॥

अर्थ–विषवृक्ष, कांट्यांचा वृक्ष, काष्ठ, दगड, शुष्कवृक्ष, हाडें, श्मशान, यांचाठाईं कुत्रा मुतून अथवा पायानें ताडन करून गमनकर्त्याच्या पुढें जाईल तर अशुभ होईल. बिछाना, कुंभारानें केलेलीं मातीचीं भांडीं, लाकडांचीभांडीं, नवीं व फुटलेलीं नाहीं अशांवर कुत्रा मुतेल तर कन्या दोष करील. तीं भांडीं भुक्त असतील तर स्त्रीस दोष होतो. तसेंच उपानत् (वाहणा, जोडा इ०) यांचेंहीं फल भांड्यांसारखेंच जाणावें. गाईच्या तर मुतण्यानें, वर्णसंकर, त्याच्या गृहीं होतो ॥

गमनमुखमुपानहंसंप्रगृह्योपतिष्ठेयदास्यात्तदा
सिद्धयेमांसपूर्णाननेर्थाप्तिरार्द्रेणचास्थ्नाशुभं
साग्न्यलातेनशुष्केणचास्थ्नागृहीतेनमृत्युःप्र
शांतोल्मुकेनाभिघातोथपुंसःशिरोहस्तपादा
दिवक्त्रेभुवोह्यागमोवस्त्रचीरादिभिर्व्यापदःके

चिदाहुःसवस्त्रेशुभं । प्रविशतितुगृहंसशुष्का
स्थिवक्रेप्रधानस्यतस्मिन्वधःशृंखलाशीर्णवल्ली
वरत्रादिवावंधनंचोपगृह्योपतिष्ठेद्यदास्यात्त
दावंधनंलेढिपादौविधुन्वन्स्वकर्णावुपर्याक्र
मंश्चापिविघ्नाययातुर्विरोधेविरोधस्तथास्वांग
कंडूयनेस्यात्स्वपंश्चोर्ध्वपादःसदादोषकृत् ॥१॥

अर्थ—कुत्रा उपानह मुखात घेऊन गमनकर्त्यांच्या पुढें येईल तर कार्यसिद्धि होईल. मुखात मांस घेऊन येईल तर द्रव्यप्राप्ति, ओलें हाड घेऊ० अशुभ, जळकें लाकूड अथवा शुष्क हाड घेऊ० मृत्यु, अग्निरहित जळकेंलाकूड घेऊ० घात होईल. पुरुषाचें डोकें किंवा हात, पाय इ० मुखामध्यें घेऊन ये० भूमिलाभ, वस्त्र वल्कल हीं घेऊ० विपत्ति, सवस्त्र कुत्रा आला तर शुभ, असें कोणी ऋषि ह्मणतात. शुष्क हाड मुखांत घेऊन गृहामध्यें प्रवेश करील तर गृहपतीस मृत्यु होईल. शृंखला (बेडी), जीर्णवल्ली, वरात रज्जु दोरी इ० बंधन मुखांत घेऊन येईल तर बंधन होईल. पाय चोळील, कान कापवील, आंगावर चढेल तर गमनकर्त्यास विघ्न होईल. गमनकर्त्याबरोबर विरोध करील तर मार्गामध्यें रोध होईल. कुत्रा आपलें आंग खाजवील तर चोरादिकांनीं मार्गरोध होईल. कुत्रा निजून वर पाय करील तर सर्वकाल अशुभ होय ॥१॥

सूर्योदयेर्काभिमुखोविरौतिग्रामस्यमध्येयदि
सारमेयः । एकोयदावाबहवःसमेताःशंसंति
देशाधिपमन्यमाशु ॥२॥

अर्थ—सूर्योदयीं सूर्याकडे मुख करून गांवाच्या मध्यभागीं जर कुत्रा एकटा किंवा बहुत कुत्रे एकत्र मिळून रोदनशब्द करतील तर लवकरच देशाधिपति दुसरा होईल असें सांगतात ॥२॥

सूर्योन्मुखःश्वानलदिक्स्थितश्चचौरानलत्रा
सकरोचिरेण । मध्यान्हकालेनलमृत्युशंसी
सशोणितःस्यात्कलहोपराण्हे ॥३॥

अर्थ—कुत्रा सूर्योदयीं आग्नेयीकडे राहून सूर्याभिमुख रोदनशब्द करील तर चोर व अग्नि यांचें भय शीघ्र होईल. मध्यान्हीं अग्नि व मृत्यु हे होतील. अपरान्हीं रक्तस्रावयुक्त कलह (युद्ध) होईल असें सांगतो ॥३॥

रुवन्दिनेशाभिमुखोस्तकालेकृषीवलानांभ
यमाशुधत्ते । प्रदोषकालेनिलदिङ्मुखस्तुध
त्तेभयंमारुततस्करोत्थं ॥४॥

अर्थ–कुत्रा सूर्यास्तीं सूर्याभिमुख रोदनशब्द करील तर शेतीलोकांस शीघ्र भय होईल. प्रदोषकाळीं वायव्यदिशेकडे मुख करून रोदनशब्द करील तर वायु व चोर यांचें भय होईल ॥४॥

उदङ्मुखश्चापिनिशार्धकालेविप्रव्यथांगोहर
णंचशास्ति । निशावसानेशिवदिङ्मुखश्च
कन्याभिदूषानलगर्भपातान् ॥५॥

अर्थ–कुत्रा मध्यरात्रीं उत्तरेकडे मुख करून रोदनश० ब्राह्मणास पीडा व गाईंचें हरण हीं होतील. रात्रीच्या शेवटीं ईशानीकडे मुख करून रोद० कुमारीस दोष, अग्निभय, स्त्रियांचे गर्भपात हीं होतील ॥५॥

उच्चैःस्वराःस्युस्तृणकूटसंस्थाःप्रासादवेश्मो
त्तमसंस्थितावा । वर्षासुवृष्टिंकथयंतितीव्रा
मन्यत्रमृत्युंदहनंरुजश्च ॥६॥

अर्थ–कुत्रे, गवताचा गंज, देवालय, मुख्यगृह यांवर राहून उच्चस्वरानें रोदनशब्द वर्षाकालीं करतील तर महान् वृष्टि होईल. अन्यऋतूत करतील तर मृत्यु, अग्नि, रोग यांचें भय होईल ॥६॥

प्रावृट्कालेऽवग्रहेंभोवगाह्यप्रत्यावृत्तैरेचकै
श्चाप्यभीक्ष्णं । आधुन्वंतोवापिवंतश्चतोयंवृ
ष्टिंकुर्वन्त्यंतरेद्वादशाहात् ॥७॥

अर्थ–कुत्रे, वर्षाकाळीं अवर्षण ( वृष्टि बंद झाली ) असतां पाण्यांत राहून भाजूनी सभोंवतें वारंवार फिरतील, पाणी हालवितील व पितील तर १२ दिवसांत पर्जन्य पडेल ॥७॥

द्वारेशिरोन्यस्यवहिःशरीरंरोरूयतेश्वागृहिणीं
विलोक्य । रोगप्रदःस्यादथमंदिरांतर्वहिर्मुखः
शंसतिबंधकींतां ॥८॥

अर्थ–कुत्रा गृहद्वारामध्ये ( आंत ) तोंड घालून बाहेर शरीर ठेवून गृहपतीच्या

स्त्रीकडे पाहून रोदनशब्द करील तर त्या स्त्रीस रोग होईल. कुत्रा घरात राहून बाहेर तोंड करील आणि गृह० स्त्रीस पाहील तर ती स्त्री जारिणी आहे असे सांगतो ॥८॥

कुड्यमुत्किरतिवेश्मनोयदातत्रखानकभयंभ
वेत्तदा । गोष्ठमुत्किरतिगोग्रहंवदेद्धान्यल
ब्धिमपिधान्यभूमिषु ॥९॥

अर्थ–कुत्रा, घराचा कूड ( भिंत ) उकरील तर खानक ( उंदीर, चोर, डुकर ) यांचें भय होईल. गोठा उकरील तर गाईचें हरण होईल. धान्यभूमि उक रील तर धान्यप्राप्ति होईल ॥९॥

एकेनाक्ष्णासाश्रुणादीनदृष्टिर्मंदाहारोदुःखकृ
त्तद्गृहस्य । गोभिःसार्धंक्रीडमाणःसुभिक्षंक्षेमा
रोग्यंचाभिधत्तेमुदंच ॥१०॥

अर्थ–कुत्रा एका डोळ्यांतून पाणी येत असून दीनदृष्टि व अल्पाहार असा जर होईल तर त्या गृहास दुःखकारक होतो. गाईबरोबर खेळेल तर सुभिक्ष, कल्याण, आरोग्य व हर्ष यांतें देतो ॥१०॥

वामंजिघ्रेज्जानुवित्तागमायस्त्रीभिःसाकंविग्र
होदक्षिणंचेत् । ऊरुंवामंचेंद्रियार्थोपभोगाः
सव्यंजिघ्रेदिष्टमित्रैर्विरोधः ॥११॥

अर्थ–कुत्रा, गमनकर्त्याचा डावा गुडघा हुंगील तर द्रव्यप्राप्ति होईल. उजवा हुंगील तर स्त्रियांबरोबर विरोध होईल. डावी मांडी हुंगील तर द्रव्यप्राप्ति होऊन इंद्रियसुख भोगील. उजवी मांडी हुंगील तर इष्टमित्रांबरोबर विरोध होईल ११

पादौजिघ्रेद्यायिनश्चेदयात्रांप्राहार्थाप्तिंवांछितां
निश्चलस्य । स्थानस्थस्योपानहौचेद्विजिघ्रेत्
क्षिप्रंयात्रांसारमेयःकरोति ॥१२॥

अर्थ–कुत्रा, गमनकर्त्याचे पाय हुंगील तर जाणें होणार नाहीं व तेथेंच राहून इच्छितद्रव्यप्राप्ति सांगतो. स्थानावर गमनकर्ता असता, त्याच्या वाहणा किंवा जोडे हुंगील तर शीघ्र गमन होईल ॥१२॥

उभयोरपिजिघ्रणेहिवाह्वोर्विज्ञेयोरिपुचौरसं

**प्रयोगः । अथभस्मनिगोपयीतभक्षान्मांसा
स्थीनिचशीघ्रमग्निकोपः ॥१३॥**

अर्थ–कुत्रा गमनकर्त्याचे दोनही बाहू हुंगील तर शत्रु, चोर यांचे भय होते. अ-पूपादि भक्ष्यपदार्थ अथवा मांस, हाडें हीं भस्मामध्यें लपवून ठेवील तर लवकर-च अग्निभय होईल ॥१३॥

**ग्रामेभषित्वाचवहिःश्मशानेभषंतिचेदुत्तमपुं
विनाशः । यियासतश्चाभिमुखोविरौतियदा
तदाश्वानिरुणद्धियात्रां ॥१४॥**

अर्थ–कुत्रे गांवांत शब्द करून बाहेर श्मशानांत शब्द करतील तर मुख्यपुरु-षाचा नाश होईल. कुत्रा गमनकर्त्याच्या सन्मुख जर शब्द करील तर यात्रे-चा रोध ( प्रतिबंध ) होतो ॥१४॥

**उकारवर्णेनरुतेर्थसिद्धिरोकारवर्णेनचवामपार्श्वे ।
व्याक्षेपमौकाररुतेनविद्यान्निषेधकृत्सर्वरुतैश्चपश्चात् १५**

अर्थ–कुत्रा उ या वर्णानें शब्द करील तर अर्थसिद्धि, ओ याणें शब्द करील तर डाव्या बाजूस अर्थसिद्धि होईल. औ अशा शब्दानें रोद० तर चित्त व्याकुल होईल. पूर्वोक्तांतून कोणताहि शब्द गमनकर्त्याच्या मागें, कुत्रा करील तर, यात्रेचा निषेध जाणावा ॥१५॥

**खंखेतिचोच्चैश्चमुहुर्मुहुर्येरुवंतिदंडैरिवताड्यमानाः ।
श्वानोभिधावंतिचमंडलेनतेशून्यतांमृत्युभयंचकुर्युः १६**

अर्थ–कुत्रे वारंवार उच्चस्वरानें खंख असा शब्द करतील अथवा दांड्यानें मारल्या-सारखे, दीनशब्द करतील अथवा मंडलाकार धावतील, तर ते, नगर शून्य कर-तील व मृत्युभयहि करतील ॥१६॥

**प्रकाश्यदंतान्यदिलेढिसृक्किणीतदाशनंमिष्ट
मुशंतितद्विदः । यदाननंचावलिहेन्नसृक्कि
णीप्रवृत्तभोज्येपितदान्नविघ्नकृत् ॥१७॥**

अर्थ–कुत्रा, दांत दाखवून, ओष्ठप्रांत चाटील तर, मिष्टान्नप्राप्ति होईल असें श-कुनशास्त्रज्ञ सांगतात. मुखच चाटील, ओष्ठप्रांत चाटील नाहीं, तर भोजन प्रवृत्त-असतांही, अन्नास विघ्न होईल ॥१७॥

ग्रामस्यमध्येयदिवापुरस्यभषंतिसंहत्यमुहुर्मुहुर्ये । तेक्लेशमाख्यंतितदीश्वरस्यश्वारण्यसंस्थोमृगवद्विचिंत्यः ॥१८॥

अर्थ–कुत्रे गांवाच्या अथवा नगराच्या मध्ये एकत्र मिळून, वारंवार शब्द करतील तर, गांवाच्या किंवा नगराच्या स्वामीस क्लेश होईल. अरण्यांतील कुत्र्याचें फळ मृगासारखें ( अ० ९१ ) पहावें ॥१८॥

वृक्षोपगेक्रोशतितोयपातःस्यादिंद्रकीलेस्वविवस्यपीडा।
वायोर्गृहेसस्यभयंगृहांतःपीडापुरस्यैवचगोपुरस्थे॥१९॥
भयंचशय्यासुतदीश्वराणांयानेभषंतोभयदाश्वपश्चात्।
अथापसव्याजनसंनिवेशेभयंभषंतःकथयंत्यरीणां २०

अर्थ–कुत्रा वृक्षाजवळ राहून आरडेल तर वृष्टि होईल. द्वाराच्या खिळीजवळ राहून आरडेल तर प्रधानास पीडा होईल ॥१९॥ घराच्या वायव्यकोनांत आरडेल तर धान्यनाश होईल. नगरद्वारीं राहून आरडेल तर नगरास पीडा होईल. बिछान्यावर राहून आरडेल तर बिछान्याच्या धन्यास भय होतें. प्रयाणकालीं मार्गे भोंकेल तर भय होईल. जनसमुदायाच्या डाव्या बाजूस शब्द करतील तर शत्रूचें भय होईल असें सांगतात ॥२०॥

॥ इतिसर्वशाकुनेश्वचक्रंनामाध्यायश्चतुर्थः ॥४॥

॥ इतिश्रीवरा०बृहत्संहितायामेकोननवतितमोध्यायः८९

---

## ॥ अथशिवारुतं ॥

श्वभिःसृगालाःसदृशाःफलेनविशेषएषांशिशिरेमदाप्तिः । हूहूरुतांतेपरतश्चटाटापूर्णःस्वरोन्येकथिताःप्रदीप्ताः ॥१॥

अर्थ–कुत्र्यांसारखेंच कोल्ह्यांचेही शब्दांचें फल जाणावें; परंतु त्यांस शिशिर ( माघ व फाल्गुन व कुंभ आणि मीन ) ऋतुमध्यें उन्माद ( मस्ती ) येतो, यास्तव त्यांत शब्दांचें फल नाहीं. कोल्हे शब्दांतीं, हू हू, असा शब्द करून पुढें, टा टा, असा शब्द करतील तर तो शुभ होय. यांहून अन्यशब्द अशुभ होत ॥१॥

लोमाशिकायाःखलुकक्कशब्दःपूर्णःस्वभाव
प्रभवःसतस्याः । येन्येस्वरास्तेप्रकृतेरपेताः
सर्वेचदीप्ताइतिसंप्रदिष्टाः ॥२॥

अर्थ–लोमाशिकेचा ( खोकड, हें जनावर कोल्ह्यासारखें असतें ) कक्क हा शब्द, स्वाभाविक आहे. यास्तव पूर्ण ( शुभ ) होय. जे इतर सर्व शब्द ते स्वाभाविक नव्हत, यास्तव दीप्त ( अशुभ ) होत. ( पहा अ० ८६ श्लो० ३४ )॥२॥

पूर्वोदीच्योःशिवाशस्ताशांतासर्वत्रपूजिता ।
धूमिताभिमुखीहंतिस्वरदीप्तादिगीश्वरान् ॥३॥

अर्थ–शिवा ( भालू ) पूर्व व उत्तर, या दिशांकडे शुभ होय. तिचा शांतशब्द असतां सर्व दिशांकडे शुभ होय. धूमितदिशेकडे मुख व प्रखर स्वर अशी असेल तर त्या दिशेकडील राजाचा नाश करते ॥३॥

सर्वदिक्ष्वशुभादीप्ताविशेषेणान्हशोभना ।
पुरेसैन्येपसव्याचकष्टासूर्योन्मुखीशिवा ॥४॥

अर्थ–भालू दीप्त अ० सर्व दिशांस अशुभ होय. दिवसास तर फारच अशुभ होय. दक्षिणभागीं राहणारी व सूर्यसन्मुख शब्द करणारी अशी शिवा नगरास व सैन्यास अशुभ होय ॥४॥

याहीत्यग्निभयंशास्तिटाटेतिमृतवेदिका ।
धिग्धिग्दुःकृतमाचष्टेसज्वालादेशनाशिनी ॥५॥

अर्थ–भालू, याहि, असा शब्द करील तर अग्निभय, टाटा, शब्द० तर बंधु इत्यादिकांचा मृत्यु सांगते; धिक्धिक् शब्द क० तर अशुभ सांगते. ज्वालायुक्त भालू देशाचा नाश करते. ( भालूच्या तोंडांतून ज्वाळा निघत असतील असें वाटतें ) ॥५॥

नैवदारुणतामेकेसज्वालायाःप्रचक्षते ।
अर्काद्यनलवत्तस्यावक्त्रंलालास्वभावतः ॥६॥

अर्थ–कश्यपादि ऋषि, सज्वाला शिवा अशुभ नाहीं असें ह्मणतात. जसा सूर्यादि तेजस्वी पदार्थ स्वभावानेंच तेजस्वी, तसें भालूचें मुख स्वभावानेंच लालयुक्त आहे, यास्तव ती शुभहोय ॥६॥

अन्यप्रतिरुतायाम्यासोद्बंधमृतशंसिनी ।
वारुण्यनुरुतासैवशंसतेसलिलेमृतं ॥७॥

अर्थ—भालू, दक्षिणदिशेकडे राहून दुसरीस प्रतिशब्द करील तर गळफासानें मृत्यु सांगत्ये. ती भालू पश्चिमेकडे राहून प्रतिशब्द करील तर उदकामध्यें नक्रादि मृत झाला असें सांगत्यें ॥७॥

अक्षोभःश्रवणंचेष्टंधनप्राप्तिःप्रियागमः ।
क्षोभःप्रधानभेदश्चवाहनानांचसंपदः ॥८॥
फलमासप्तमादेतदग्राह्यंपरतोरुतं ।
याम्यायांतद्विपर्यस्तंफलंषट्पंचमादृते ॥९॥

अर्थ—भालूच्या प्रथमशब्दीं, निर्भय, २ इष्टार्थश्रवण, ३ धनप्राप्ति, ४ प्रियागमन, ५ क्षोभ, ६ प्रधानमंडळींत कलह, ७ अश्वादिवाहनवृद्धि. ॥८॥ सप्तमशब्दापर्यंत हीं फलें घ्यावीं; पुढें अष्टमापासून शब्दफल घेऊनये. भालू दक्षिणदिशेकडे राहून शब्द करील तर तेंचफल विरुद्ध जाणावें. ( १ भय २ अनिष्टश्रवण ३ धनहानि ४ प्रियवियोग ५ निर्भय ६ प्रधानसख्य ७ वाहननाश.) ॥९॥

यारोमांचंमनुष्याणांशकृन्मूत्रंचवाजिनां ।
रावात्रासंचजनयेत्साशिवानशिवप्रदा ॥१०॥

अर्थ—ज्या भालूच्या शब्दानें मनुष्याचे रोमांच उभे राहतात व घोडे विष्ठा, मूत्र सोडतात. तसाच, शब्दानें त्रास होतो, ती भालू अशुभ होय ॥१०॥

मौनंगताप्रतिरुतेनरद्विरदवाजिनां ।
याशिवासाशिवंसैन्येपुरेवासंप्रयच्छति ॥११॥

अर्थ—जी भालू, मनुष्य, हत्ती, अश्व याचा प्रतिशब्द झाला असतां, मौन धरत्ये ती ही सैन्यांत व नगरांत कल्याण करत्ये ॥११॥

भेभेतिशिवाभयंकरीभोभोव्यापदमादिशेच्चसा ।
मृतिवंधनिवेदिनीफिफहूहूचात्महिताशिवास्वरे ॥१२

अर्थ—भालू, भेभे, असा शब्द करील तर भयकारक; भोभो, असा शब्द विपत्तिकारक, फिफ, असा शब्द० मृत्यु व बंध सांगते, हूहू, असा शब्द करील तर कल्याणकारक. हे सर्व फळ गमनकर्त्यास समजावें ॥१२॥

शांतात्स्ववर्णात्परमौरुवंतीटाटामुदीर्णामिति
वाश्यमाना । टेटेचपूर्वंपरतश्चथेथेतस्याःस्व
तुष्टिप्रभवंरुतंतत् ॥१३॥

अर्थ—जी भालू, शांतदिशेस राहून, शांतहोत्साती प्रथम अ, असा शब्द करून पुढें, औ, असा श० अथवा, टाटा, असा शब्द करील किंवा प्रथम, टेटे, असा श० क० पुढें, थेथे असा शब्द करील तर, तो शब्द तिणें संतोषानें केलेला, यास्तव त्याचें फल नाहीं ॥१३॥

उच्चैर्घोरंवर्णमुच्चार्यपूर्वंपश्चात्क्रोशेत्क्रोष्टु
कस्यानुरूपं । यासाक्षेमंप्राहवित्तस्यचाप्तिं
संयोगंवाप्रोषितेनप्रियेण ॥१४॥

अर्थ—जी भालू, प्रथम भयंकर शब्द करून, नंतर कोल्ह्यासारखी शब्द करते. ती कल्याण व द्रव्यप्राप्ति व प्रवासास गेलेल्या प्रियाचा संयोग यांतें सांगते ॥१४

॥ इतिसर्वशाकुनेशिवारुतंनामपंचमोध्यायः ॥५॥
॥ इतिबृहत्संहितायांनवतितमोध्यायः ॥९०॥

---

## ॥ अथमृगचेष्टितं ॥

सीमागतावन्यमृगारुवंतःस्थितात्रजंतोथस
मापतंतः । संप्रत्यतीतैष्यभयानिदीप्ताःकु
र्वंतिशून्यंपरितोभ्रमंतः ॥१॥

अर्थ—वन्य ( वनांतील ) मृग (जनावरें) गांवाचे सीमेवर उभी राहून, शब्द करतील, अथवा तेथून जातानां शब्द करतील, अथवा तेथें येत असतां शब्द करतील व ते दीप्त ( प्रखर ) असतील तर अनुक्रमानें वर्तमान, भूत, भविष्यकाळीं भय होईल असें जाणावें. तसेंच वन्यमृग गांवांत किंवा नगरांत, फिरतील तर, शून्य ( जनरहित ) करतील ॥१॥

तेग्राम्यसत्त्वैरनुवाश्यमानाभयायरोधायभवं
तिवन्यैः । द्वाभ्यामपिप्रत्यनुवाशितास्तेवं
दिग्रहायैवमृगाभवंति ॥२॥

अर्थ—वनपशूंच्या मागून, ग्राम्यपशु शब्द करतील तर भय होईल. ग्राम्यपशूंच्या मागून वनपशु शब्द करतील तर शत्रु नगराचा रोध करतील. वन्य व ग्राम्यपशु शिमेवर येऊन, त्यांचे शब्दा नंतर (त्यामागून) वन्य व ग्राम्यपशु शब्द करतील तर तें नगर नवरीनें शत्रु घेतील ॥२॥

वन्येसत्त्वेद्वारसंस्थेपुरस्यरोधोवाच्यःसंप्रविष्टेविनाशः । सूतेमृत्युःस्याद्भयंसंस्थितेच गेहंयातेबंधनंसंप्रदिष्टं ॥३॥

अर्थ—वनपशु नगराच्या द्वारीं राहील तर नगराचा रोध शत्रु करतील. नगरामध्यें प्रवेश करतील तर नाश होईल. प्रसूत होईल तर मरण होईल. मरेल तर भय होईल. गृहांत शिरेल तर गृहस्वामीस बंधन होईल ॥३॥

॥ इतिसर्वशाकुनेमृगचेष्टितंनामपष्ठोध्यायः ॥६॥
॥ इतिबृहत्संहितायामेकनवतितमोध्याय ॥९१॥

## ॥ अथगवेंगितं ॥

गावोदीनाःपार्थिवस्याशिवायपादैर्भूमिंकुट्टयंत्यश्चरोगान् । मृत्युंकुर्वंत्यश्रुपूर्णायताक्ष्यःपत्युर्भीतास्तस्करानारुवंत्यः ॥१॥

अर्थ—गाई, दीन झाल्या असतां राजाचें अनिष्ट होतें. पायांनीं भूमीतें विदारण करतील तर रोग होतील. अश्रूनें पूर्णनयन अ० धन्यास मृत्यु होतो भ्याल्या होत्सात्या शब्द करतील तर चौरभय होईल.॥१॥

अकारणेक्रोशतिचेदनर्थोभयायरात्रौवृषभःशिवाय । भृशंनिरुद्धायदिमक्षिकाभिस्तदाशुवृष्टिंसरमात्मजैर्वा ॥२॥

अर्थ—गाय कारणावांचून ( वासरूं, पाणी, गवत या वांचून ) शब्द करील तर अनर्थ होईल रात्रीस शब्द करील तर भय होईल. बैल रात्रीस शब्द करील तर कल्याण होईल. गाई मक्षिकांनीं अथवा कुत्र्यानीं अत्यंत रोधिली तर, शीघ्र बहुत वृष्टि: रत्तू उपडन होतील ॥२॥

आगच्छंत्योवेश्मवंभारवेणसंसेव्यंत्योगो
प्रवृध्यैगवांगाः । आर्द्रांग्योवात्हृष्टरोम्ण्यः
प्रत्हृष्टाधन्यागावःस्युर्महिष्योपिचैवं ॥३॥

अर्थ—गाई हंबारत घरांत येतील तर आपल्या गोष्ठाची वृद्धि करतील. गाई आर्द्रांग, आनंदित, आनंदाने आंगावर केश उभारलेले अशा असतां शुभ होत. म्हशींचेही गाईसारखेंच शुभाशुभफल जाणावे ॥३॥

॥ इतिसर्वशाकुनेगवेंगितंनामसप्तमोध्यायः ॥७॥

॥ इतिवराह०वृहत्संहितायांद्वानवतितमोध्यायः॥९२॥

---

## ॥ अथअश्वचेष्टितं ॥

---

उत्सर्गान्नशुभदमासनापरस्थंवामेचज्वलन
मतोपरंप्रशस्तं । सर्वांगज्वलनमवृद्धिदंह
यानांद्विवर्षेदहनकणाश्चधूपनंवा ॥१॥

अर्थ—पुढें सांगितलेला नियम सामान्य होय. घोड्याच्या खोगिराच्या मागच्या जागीं ह० शेपटीकडे व डाव्याभागीं अग्नि दिसेल तर शुभ नव्हे. पुढें व उजव्या आंगी शुभ होय (उत्पातवशानें अश्वांचे अंगावर ज्वालारूप अग्नि दिसतो). घोड्यांचे सर्वांगज्वलन वृद्धिकारक नव्हे व सतत दोन वर्षे अग्निकण व धूम घोड्याचे आंगांतून निघतील तर नाश होतो ॥१॥

अंतःपुरंनाशमुपैतिमेढ्रेकोशःक्षयंयात्युदरे
प्रदीप्ते । पायौचपुच्छेचपराजयःस्याद्वक्त्रो
त्तमांगज्वलनेजयश्च ॥२॥

अर्थ—अश्वाचें लिंग प्रदीप्त ह० तप्त असल्यास राजाच्या अंतःपुरांचा (स्त्रियांचा) नाश होतो. उदर प्रदीप्त अ० कोश (तिजोरी) क्षय होतो. गुद, पुच्छ हीं प्रदीप्त अ० पराजय होतो. मुख व मस्तक हीं प्रदीप्त असतां जय होतो ॥२॥

स्कंधासनांसज्वलनंजयायवंधायपाद
ज्वलनंप्रदिष्टं । ललाटवक्षोक्षिभुजेषु
धूमःपराभवायज्वलनंजयाय. ॥३॥

अर्थ–घोड्याचे मानेचे दोहोंकडील भाग ( स्कंध ) व त्याचे तालूचे भाग ( अंत ) आणि खोगीर ठेवण्याची जागा यांचेठाईं ज्वलन अ० जय होतो. पादांचाठाईं ज्वलन अ० स्वामीस भय होतो. ललाट, उर, नेत्र, भुज यांचाठाईं धूम दृष्टिगोचर होईल तर पराजय होतो व ज्वलन ( अग्नि ) दिसेल तर जय होतो ॥३॥

नासापुटप्रोथशिरोश्रुपातनेत्रेपुरात्रौज्वलनं जयाय । पालाशताम्रासितकर्बुराणांनित्यं शुकाभस्यसितस्यचेष्टं ॥४॥

अर्थ–घोड्याचे नाकाचीं भोंकें, नाक, मस्तक, नेत्रोदक पडण्याचे स्थान, नेत्र, यांचाठाईं रात्रीस अग्नि दिसेल तर जय होईल. पळसाच्या फुलाचा, तांबडा, काळा, कबरा, पोपटी, पांढरा, या रंगांच्या घोड्यांस सर्वकाल ज्वलन शुभ होय४

प्रद्वेषोयवसांभसांप्रपतनंस्वेदोनिमित्ताद्विनाकंपोवा वदनाच्चरक्तपतनंधूमस्यवासंभवः । अस्वप्नश्चविरोधितानिशिदिवानिद्रालसध्यानतासादोधोमुखता विचेष्टितमिदंनेष्टंस्मृतंवाजिनां ॥५॥

अर्थ–वैरण व पाणी न घेणें, पडणे, घर्म येणें, निमित्तावांचून कंप, मुखांतून रक्तस्राव किंवा धूर येणें, रात्रीस निद्रा न येणें, वैर करणे, दिवसास निद्रायुक्त आळस, चिंता ( वर पहाणें ), ग्लानि, अधोमुखत्व, हीं घोड्यांचीं चेष्टितें अशुभ होत५

आरोहणमन्यवाजिनांपर्याणादियुतस्यवाजिनः । उपवाह्यतुरंगमस्यवाकल्यस्यैवविपन्नशोभना ॥६॥

अर्थ–खोगीर अथवा पुरुष यांणी युक्त अश्व अन्यअश्वावर चढेल, नेहमी बसावयाच्या घोड्यास किंवा निरोगी घोड्यास रोग होईल तर अशुभ होय ॥६॥

क्रौंचवद्रिपुवधायहेषितंग्रीवयात्वचलयाचसोन्मुखं । स्निग्धमुच्चमनुनादिहृष्टवद्ग्रासरुद्धवदनैश्चवाजिभिः७

अर्थ–अश्वांचा क्रौंचपक्ष्यासारखा शब्द, मान न हालतां वर तोंड करून शब्दकरणें, जयप्रद होय. मधुर, उच्चस्वर, घाटेचा नाद ऐकून शब्द करणें, आनंदयुक्त्त घास तोंडांत असून शब्द, असे जे घोड्याचे शब्द ते जयप्रद होत ॥७॥

पूर्णपात्रदधिविप्रदेवतागंधपुष्पफलकांचनादिवा ।

द्रव्यमिष्टमथवापरंभवेद्धेषतांयदिसमीपतोजयः ॥८॥

अर्थ–पूर्णपात्र ( तंडुलादिकाने भरलेले ), दहीं, ब्राह्मण, देव, गंध, पुष्प, फल, सुवर्ण, रुपे, मौक्तिकादि, अथवा दुसरे कांहीं इष्टद्रव्य, हीं शब्दकरणाऱ्या घोड्याजवळ असतील तर जय होतो ॥८॥

भक्ष्पानखलिनाभिनंदिनःपत्युरौपयिकनंदिनोथवा ।
सव्यपार्श्वगतदृष्टयोथवावांछितार्थफलदास्तुरंगमाः ॥९

अर्थ–भक्षणीयपदार्थ, उदक, लगाम, यांहींकरून आनंदपावणारे अथवा धन्यास आनंदकारक अथवा डाव्याबाजूस पाहणारे असे घोडे इच्छितफल देणारे होत॥९

वामैश्चपादैरभिताडयंतोमहींप्रवासायभवंतिभर्तुः ।
संध्यासुदीप्तामवलोकयंतोहेषंतिचेद्बंधपराजयाय ॥१०

अर्थ–घोडा डाव्या पायांनीं भूमीचे ताडन करील तर धन्यास प्रवास होईल. चार संध्या ( सूर्योदय, मध्यान्ह, अस्तमय, अर्धरात्र ) यांचाठाईं दीप्तदिशाकडे पाहून घोडा शब्द करील तर धन्यास बंध व पराजय हे होतील ॥१०॥

अतीवहेषंतिकिरंतिवालान्निद्रारताश्चप्रवदंतियात्रां ।
रोमत्यजोदीनखरस्वराश्चपांसून्ग्रसंतश्चभयायदृष्टाः ११

अर्थ–घोडे फारच शब्द करतील, त्यांचे आगावरचे केश पसरतील, निरंतर निद्रिस्थ असे घोडे असतील तर धन्यास यात्रा होईल. घोडे आगावरचे केश टाकतील, दीन व कठिण शब्द करतील, धूळ खातील, तर भय होईल ॥११॥

समुद्गवद्दक्षिणपार्श्वशायिनःपदंसमुत्क्षिप्यच
दक्षिणंस्थिताः । जयायशेषेष्वपिवाहनेष्विदं
फलंयथासंभवमादिशेद्बुधः ॥१२॥

अर्थ–उजव्या आंगावर निजणारे, उजवा पाय उचलून उभे राहणारे असे घोडे जयप्रद होतात. अन्य वाहनांसही हीं फळें यथासंभव पंडिताने योजावीं ॥१२॥

आरोहतिक्षितिपतौविनयोपपन्नोयात्रानुगो
न्यतुरगंप्रतिहेषतेच। वक्त्रेणवास्पृशतिदक्षिणमा
त्मपार्श्वंयोऽश्वःसभर्तुरचिरात्प्रचिनोतिलक्ष्मीं १३

अर्थ–हत्तीच्या दंतमूलीं देव, मध्यभागीं दैत्य, दंताग्रीं मनुष्य, हे राहतात; या- स्तव त्यांचें फल अनुक्रमानें पूर्ण, मध्यम, अल्प असें व शीघ्र, मध्यम, चिरकाळ, असें होतें ॥८॥

दंतभंगफलमत्रदक्षिणेभूपदेशवलविद्रवप्रदं ।
वामतःसुतपुरोहितेभपान्हंतिसाटविकदारनायकान् ९

अर्थ–उजव्या दंतभंगाचें फल–मूळ, मध्य, अग्र यांचाठाईं भग झाला तर अनु- क्रमानें राजा, देश, सैन्य याचें पलायन होईल. डाव्या दंताचें फळ–मूळ, मध्य, अ- ग्र, याचाठाईं अनुक्र० पुत्र, पुरोहित, हात यांस मृत्यु व अनु० रानटी, स्त्री, मु- ख्य पुरुष यांचा नाश हे होतात ॥९॥

आदिशेदुभयभंगदर्शनात्पार्थिवस्यसकलंकुलक्षयं ।
सौम्यलग्नतिथिभादिभिःशुभंवर्धतेशुभमतोन्यथाभवेत्

अर्थ–दोहोंही दातांचा भग एककाळींच होईल तर राजाचा कुलक्षय होईल. शु- भग्रहाचें लग्न, शुभतिथि, शुभनक्षत्र इ० असतां शुभ होतें अन्यथा अशुभ होतें १०

क्षीरवृक्षफलपुष्पपादपेष्वापगातटविघट्टितेनवा ।
वाममध्यरदभंगखंडनंशत्रुनाशकृदतोन्यथापरं ॥११॥

अर्थ–चिकाचा वृक्ष व फलें, पुष्पें यांहीं युक्त वृक्ष अथवा नदीतीर यांत घांसण्यानें हत्तीचा डावा दात मध्यें मोडेल किंवा फुटेल तर शत्रुनाश होईल. याहून अन्य- था होईल तर शत्रुवृद्धि होते ॥११॥

स्खलितगतिरकस्मात्त्रस्तकर्णोतिदीनःश्वसितिमृदु
सुदीर्घंन्यस्तहस्तःपृथिव्यां । द्रुतमुकुलितदृष्टिःस्वप्न
शीलोविलोमोभयकृदहितभक्षीनैकशोसृक्छकृच्च १२

अर्थ–अडखळत चालणारा, अकस्मात् त्रस्तकर्ण, अतिदीन, मृदु व लांब श्वास टाकणारा, पृथिवीवर शुंडा टेंकणारा, चकित व कांहीं मिटलेली दृष्टि ज्याची अ- सा, निद्रायुक्त, विरुद्ध दिशेस जाणारा, अपथ्य खाणारा, बहुत वेळ रक्तस्राव व विष्ठा करणारा असा हत्ती भयकारक होय ॥१२॥

वल्मीकस्थाणुगुल्मक्षुपतरुमथनःस्वेच्छयात्दृष्टदृष्टि
र्यायाद्यात्रानुलोमंत्वरितपदगतिर्वक्त्रमुन्नाम्यचोच्चैः।
कक्षासन्नाहकालेजनयतिचमुहुःशीकरंबृंहितंवात

रूकालंवामदासिर्जयकृदथरदंवेष्टयन्दक्षिणंवा ॥१३॥

अर्थ—वारूळ, खांबांशिवाय वृक्ष, झुडप, लहान खांबांचा वृक्ष यांतें मोडणारा; सं-च्छेनें आनंदितदृष्टि, यत्रिला अनुकूळ जाणारा, शीघ्र गमन करणारा, मुख वर करून जाणारा, पोटास दोरी बांधित असतां वारंवार मुखांतून पाणी फेंकणारा व शब्द करणारा, स्वारी करण्याच्या वेळीं मस्त होणारा, अथवा उजव्या दांतास सोंडेने वेष्टन करणारा, असा हत्ती जयकारक होय ॥१३॥

प्रवेशनंवारिणिवारणस्यग्राहेणनाशायभवेन्नृपस्य ।
ग्राहंगृहीत्वोत्तरणंद्विपस्यतोयात्स्थलंवृद्धिकरंनृभर्तुः१४

अर्थ—उदकामध्यें सुसरीनें हत्तीचें ग्रहण केलें तर राजाचा नाश होतो. त्या सु-सरीला घेऊन उदकापासून भूमीवर हत्ती येईल तर राजाची वृद्धि होईल॥ १४॥

॥ इतिसर्वशाकुनेहस्तींगितंनामाध्यायोनवमः ॥९॥
॥ इतिश्रीवराहमिहिरकृतौबृहत्संहितायांचतुर्नव
तितमोध्यायः ॥९४॥

## ॥ अथवायसरुतं ॥

प्राच्यानांदक्षिणतःशुभदःकाकःकरायिकावामा ।
विपरीतमन्यदेशेष्ववधिर्लोकप्रसिद्ध्यैव ॥१॥

अर्थ—पूर्वेकडील देशांत उजव्या आंगीं कावळा व डाव्या आंगीं करायिका (ब-गळी) शुभ होय. अन्यदेशीं डाव्या आंगीं कावळा व उजव्या आंगीं बगळी शु-भ होय. प्राच्यादि मर्यादा लोकप्रसिद्धीनेंच घ्याव्या ॥१॥

वैशाखेनिरुपहतेवृक्षेनीडःसुभिक्षशिवदाता ।
निंदितकंटकिशुष्केष्वसुभिक्षभयानितद्देशे ॥२॥

अर्थ—वैशाखमासीं निरुपद्रववृक्षावर कावळा घरटा करील तर सुभिक्ष व कल्याण होईल. वाईट, कांट्यांचा, शुष्क अशा वृक्षावर घरटा करील तर महागाई व भयें हीं त्या देशांत होतील ॥२॥

नीडेप्राक्शाखायांशरदिभवेत्प्रथमवृष्टिरपरस्यां ।

यम्योत्तरयोर्मध्याप्रधानवृष्टिस्तरोरुपरि ॥३॥
शिखिदिशि मंडलवृष्टिर्नैर्ऋत्यां शारदस्य निष्पत्तिः ।
परिशेषयोः सुभिक्षं मूषकसंपत्तु वायव्ये ॥४॥

अर्थ–कावळ्याचा घरटा वृक्षाच्या पूर्वेकडील अथवा पश्चिमेकडील खांदीवर असेल तर शरदृतूमध्यें ( आश्विन, कार्तिक ) प्रथम वृष्टि होईल. दक्षिण व उत्तर या दिशांकडे असेल तर भाद्रपद व आश्विन यांत वृष्टि होईल. वृक्षाच्या शेंड्यावर असेल तर श्रावणादि चारही महिन्यांत वृष्टि होईल ॥३॥ आग्नेयीदिशेस असेल तर कोठेंकोठें वृष्टि होईल. निर्ऋतीस असेल तर शरदृतूंतील धान्य होईल. वायव्य व ईशानीकडे असेल तर सुभिक्ष होईल. वायव्येस असेल तर उंदिरादिकांची वृद्धिही होईल ॥४॥

शरदर्भगुल्मवल्लीधान्यप्रासादगेहनिम्नेषु ।
शून्यो भवति स देशश्चौरानावृष्टिरोगार्तः ॥५॥

अर्थ–शर ( तृणवि० ), दर्भ, गुल्म, वल्ली, धान्य, देवालय, गृह, सखलभूमि, यांत कावळ्याचा घरटा होईल तर चोर, अवर्षण, रोग यांहींकरून तो देश मनुष्यरहित होतो ॥५॥

द्वित्रिचतुःशावत्वं सुभिक्षदं पंचभिर्नृपान्यत्वं ।
अंडावकिरणमेकांडता प्रसूतिश्च नशिवाय ॥६॥

अर्थ–कावळ्यास २।३।४ पिलें होतील तर सुभिक्ष होईल. पांच पिलीं झालीं तर राजा दुसरा होतो. अंडीं चोहींकडे पसरतील, एक अंडें होईल, किंवा अंडेंच होणार नाहीं तर अकल्याण होईल ॥६॥

चोरकवर्णैश्चौराश्चित्रैर्मृत्युः सितैश्च वन्हिभयं ।
विकलैर्दुर्भिक्षभयं काकानां निर्दिशेच्छिशुभिः ॥७॥

अर्थ–कावळ्याच्या पिलांचा चोरक ( गंधद्रव्य) यासारखा वर्ण असल्यास चोरभय, चित्रवर्ण अ० मृत्यु, श्वेत अ० अग्निभय, विकल ( अंगहीन ) असतां, दुर्भिक्षभय, हीं होतात ॥७॥

अनिमित्तसंहतैर्ग्राममध्यगैः क्षुद्भयं प्रवाशद्भिः ।
रोधश्चक्राकारैरभिघातो वर्गवर्गस्थैः ॥८॥

अर्थ–कावळे गांवाच्या मध्यभागीं निमित्तावांचून जमून शब्द करतील तर दुर्भिक्ष, चक्राकार फिरतील तर गांवाचा रोध, थव्याथव्यांनीं बसले तर ग्रामनाश हीं होतील ॥८॥

**अभयाश्चतुंडपक्षैश्चरणविघातैर्जनानभिभवंतः ।**
**कुर्वंतिशत्रुवृद्धिंनिशिविचरंतोजनविनाशं ॥९॥**

अर्थ–कावळे निर्भय होऊन चोंच, पाख, पाय मारून लोकांस त्रास देतील तर शत्रुवृद्धि होईल. रात्रीस फिरतील तर लोकाचा नाश होईल. ॥९॥

**सव्येनखेभ्रमद्भिःस्वभयंविपरीतमंडलैश्चपरात् ।**
**अत्याकुलंभ्रमद्भिर्वातोद्भ्रामोभवतिकाकैः ॥१०॥**

अर्थ–कावळे आकाशामध्यें सव्य भ्रमण करतील तर स्वकीयापासून भय होतें. अपसव्य भ्रमण करतील तर शत्रूपासून भय होतें. फार आयासानें कावळे फिरतील तर वारा बहुत सुटेल ॥१०॥

**ऊर्ध्वमुखाश्चलपक्षाःपथिभयदाःक्षुद्भयायधान्यमुपः ।**
**सेनांगस्थायुद्धंपरिमोपंचान्यभृतपक्षाः ॥११॥**

अर्थ–कावळे वर मुखें करून, पक्ष हालवितील तर मार्गामध्यें भय होईल. धान्य चोरून नेतील तर दुर्भिक्ष होईल. सेनांग (तोफीर, लगामादि) यावर बसतील तर युद्ध होईल. कोकिलासारखे, फार काळे, कावळ्यांचे पाख असतील तर चोरभय होईल ॥११॥

**भस्मास्थिकेशपत्राणिविन्यसन्पतिवधायशय्यानां ।**
**मणिकुसुमाद्यवहननेसुतस्यजन्मान्यथांगनायाश्च ॥१२॥**

अर्थ–कावळे निछान्यावर भस्म, हाडें, केश, पानें हीं टाकतील तर पतिवध होईल. मणि, पुष्प, फल इत्यादि बिछान्यावर टाकितील तर पुत्र होईल. तृण काष्ठादि टाकितील तर कन्या होईल ॥१२॥

**पूर्णाननेर्थलाभःसिकताधान्यार्द्रमृत्कुसुमपूर्वैः ।**
**भयदोजनसंवासाद्यदिभांडान्यपनयेत्काकः ॥१३॥**

अर्थ–कावळ्याचें मुख रेती, धान्य ओलीमाती, पुष्प, फळ, ओलेगवत इत्यादिकानें भरलेलें असेल तर अर्थलाभ होईल. ( हें प्रयाणकाळीं पहावें असें वाटतें ) कावळा लोकांच्या सहवासानें भांडीं नेईल तर भय होईल ॥१३॥

**वाहनशस्त्रोपानच्छत्रच्छायांगकुट्टनेमरणं ।**
**तत्पूजायांपूजाविष्ठाकरणेन्नसंप्राप्तिः ॥१४॥**

अर्थ—अश्वादि वाहन, खड्गादि शस्त्र, वाहणा, छत्र, छाया, आग याचे कुट्न ( तुकडे ) कावळा करील तर त्याचे स्वामीस मृत्यु होईल. वाहनादिकाची पुष्पादिकेंकरून कावळा पूजा करील तर तत्स्वामीचा सत्कार होईल. वाहनादिकांवर विष्ठा करील तर अन्नप्राप्ति होईल ॥१४॥

**यद्द्रव्यमुपनयेत्तस्यलब्धिरपहरतिचेत्प्रणाशःस्यात् ।**
**पीतद्रव्येकनकंवस्त्रंकार्पासिकेसितेरूप्यं ॥१५॥**

अर्थ—कावळा जो पदार्थ आणून टाकतो त्याची प्राप्ति होते. जो पदार्थ नेऊन जातो त्याचा नाश होतो. पीत (पिंवळें) द्रव्य आणील तर सुवर्णाचा लाभ व त्याचें हरण करील तर त्याचाच नाश होईल. कापूससंबंधी आ० वस्त्र, श्वेतपदार्थ, आ० रुपें याचा लाभ व हरण करील तर नाश होईल ॥१५॥

**सक्षीरार्जुनवंजुलकूलद्वयपुलिनगारुवंतश्च ।**
**प्रावृषिवृष्टिंदुर्दिनमनृतौस्नाताश्चपांशुजलैः ॥१६॥**

अर्थ—कावळे, रुची इ० दुधाचे वृक्ष, अर्जुन, अशोक या वृक्षावर व नदीच्या दोहों बाजूच्या तीरावर वर्षाऋतूंत बसून शब्द करतील तर वृष्टि होईल. अन्य ऋतूंत दुर्दिन ( अभ्रानें आच्छादित ) होईल. कावळे धुरळ्यात व जलात वर्षाऋतूंत स्नान करतील तर वृष्टि व अन्य ऋतूंत दुर्दिन होईल ॥१६॥

**दारुणनादस्तरुकोटरोपगोवायसोमहाभयदः ।**
**सलिलमवलोक्यविरुवन्वृष्टिकरोब्दानुरावीवा ॥१७**

अर्थ—कावळा वृक्षाच्या ढोलींत राहून मोठा शब्द करील तर मोठें भय होईल उदकाकडे पाहून शब्द करील किंवा मेघासारखा शब्द करील तर पर्जन्य पडेल.

**दीप्तोद्विग्नोविटपेविकुट्टयन्वान्हिकृद्विधुतपक्षः ।**
**रक्तद्रव्यंदग्धंतृणकाष्ठंवागृहेविदधत् ॥१८॥**

अर्थ—कावळा पारा हालवून सूर्याभिमुख, दुःखित होऊन वृक्षावर टोंकानें बोचील तर अग्निभय होईल. घरावर तांबडें द्रव्य ( पदार्थ ) किंवा जळकें तृण, काष्ठ ठेवील तर अग्निभय होईल ॥१८॥

**ऐंद्र्यादिदिगवलोकीसूर्याभिमुखोरुवन्गृहेगृहिणः ।**
**राजभयचोरबंधनकलहाःस्युःपशुभयंचेति ॥१९॥**

अर्थ—कावळा पूर्वादि दीप्तदिशाकडे पाहून सूर्याभिमुख असून घरावर बसून शब्द

करील तर गृहस्वामीस हीं फळें होतील ( पूर्वेस राजभय, दक्षिणेस चोरभय, प-श्चिमेस बंधन, उत्तरेस कलह व आग्नेयादि विदिशांस पशुभय हीं होतात ) ॥१९

**शांतामैंद्रीमवलोकयन्रुयाद्राजपुरुषमित्राप्तिः ।**
**भवतिचसुवर्णलब्धिःशाल्यन्नगुडाशनाप्तिश्च ॥२०॥**

अर्थ—कावळा शांत पूर्वादिदिशांकडे पाहून शब्द करील तर राजपुरुषाचे मित्राचें येणें, सुवर्णलाभ, शाल्यन्न व गूळ यांचें भोजन हीं प्राप्त होतील ॥२०॥

**आग्नेय्यामनलाजीविकयुवतिप्रवरधातुलाभश्च ।**
**याम्येमाषकुलत्थाभोज्यंगांधर्विकैर्योगः ॥२१॥**

अर्थ—कावळा शांत आग्नेयीकडे पाहून शब्द करील तर सुवर्णकारादि अग्निजीवी, स्त्री, श्रेष्ठधातु ( सुवर्णादि ) यांचा लाभ होतो. दक्षिणेस पा० उडीद, कुळीद यांचें भोजन व गांधर्विक ( गौडबंगाली ) यांशीं योग, हे होतील ॥२१॥

**नैर्ऋत्यांदूताश्वोपकरणदधितैलपललभोज्याप्तिः ।**
**वारुण्यांमांससुरासवधान्यसमुद्ररत्नाप्तिः ॥२२॥**

अर्थ— कावळा निर्ऋतीस पाहून शब्द करील तर दूत, अश्व, अश्वोपयोगी भांडीं, दहीं, तेल, मांस, भोजन यांची प्राप्ति होईल. पश्चिमेस पा० मांस, मद्य, पान, धान्य, समुद्रांतील रत्नें यांची प्राप्ति होईल ॥२२॥

**मारुत्यांशस्त्रायुधसरोजवल्लीफलाशनाप्तिश्च ।**
**सौम्यायांपरमान्नाशनंतुरंगांबरप्राप्तिः ॥२३॥**

अर्थ—कावळा वायव्येस पा० शस्त्र ( लोह ), खड्गादि आयुध, कमल, वेलीचीं फळें ( कूष्मांडादि ), भोजन यांची प्राप्ति होते. उत्तरेस पा० क्षीरभक्षण, अश्व, वस्त्र, यांची प्राप्ति होईल ॥२३॥

**ऐशान्यांसंप्राप्तिर्घृतपूर्णानांभवेदनडुहश्च ।**
**एवंफलंगृहपतेर्गृहपृष्ठसमाश्रितेभवति ॥२४॥**

अर्थ—कावळा ईशानीस पाहून शब्द करील तर घृतपूर्ण ( घिवर, अनरसे ) यांची प्राप्ति व बैलाचा लाभ हीं होतील. गृहाच्या पृष्ठभागीं कावळा बसेल तर गृहपतीस असेंच फळ होईल ॥२४॥

**गमनेकर्णसमश्रेत्क्षेमायनकार्यसिद्धयेभवति ।**

अभिमुखमुपेतियातुर्विरुवन्विनिवर्तयेद्यात्रां ॥२५॥

अर्थ–कावळा प्रयाणकाली यात्राकर्त्याच्या कानाबरोबर जाईल तर कल्याण होई-ल, कार्यसिद्धि होणार नाहीं. गमनकर्त्याच्या सन्मुख कावळा येऊन शब्द करील तर गमन होणार नाहीं ॥२५॥

वामेवाशित्वादौदक्षिणपार्श्वेनुवाशतेयातुः ।
अर्थापहारकारीतद्विपरीतोर्थसिद्धिकरः ॥२६॥

अर्थ–कावळा प्रयाणकर्त्याच्या डाव्या बाजूस प्रथम शब्द करून नंतर उजव्या बाजूस शब्द करील तर द्रव्यहरण होईल. त्याहून विपरीत ( उजव्या बाजूस प्र-थम शब्द करून नंतर डाव्या बाजूस करील तर ) अर्थसिद्धि होईल ॥२६॥

यदिवामएवविरुयान्मुहुर्मुहुर्यायिनोनुलोमगतिः ।
अर्थस्यभवतिसिद्ध्यैप्राच्यानांदक्षिणश्चैवं ॥२७॥

अर्थ–गमनकर्त्याच्या डाव्या आंगीच मागून जाऊन वारंवार शब्द करील तर अ-र्थाची सिद्धि होये. हें फल पूर्वेकडील लोकांत दक्षिणेकडील कावळ्याचें होतें२७

वामःप्रतिलोमगतिर्वाशन्गमनस्यविघ्नकृद्भवति ।
तत्रस्थस्यैवफलंकथयतितद्वांछितंगमने ॥२८॥

अर्थ–कावळा गमनकर्त्याच्या सन्मुख येऊन डाव्या आंगी शब्द करील तर गम-नात विघ्न करील. त्यासाठीं जावयाचें तें फल तेथेंच राहून मिळेल असें सांगतो२८

दक्षिणविरुतंकृत्वावामेविरुयाद्यथेप्सितावाप्तिः ।
प्रतिवाश्यपुरोयायाद्द्रुतमग्रेर्थागमोतिमहान् ॥२९॥

अर्थ–कावळा गमनकर्त्याच्या उजव्या आंगीं शब्द करून डाव्या आंगीं शब्द क-रील तर इच्छित अर्थाची प्राप्ति होईल. कावळा शब्द करून शीघ्र पुढें जाईल तर गमनकर्त्यास पुढें मोठी द्रव्यप्राप्ति होईल ॥२९॥

प्रतिवाश्यपृष्ठतोदक्षिणेनयायाद्द्रुतंक्षतजकर्ता ।
एकचरणोर्कमीक्षन्विरुवंश्चपुरोरुधिरहेतुः ॥३०॥

अर्थ–कावळा गमनकर्त्याच्या मागें शब्द करून उजव्या आंगानें शीघ्र जाईल तर रक्तस्राव होईल. एक पायावर उभा राहून सूर्याकडे पाहून शब्द करील तर पुढें रक्तस्रावाचें कारण होईल ॥३०॥

दृष्ट्वार्कमेकपादस्तुंडेनलिखेद्यदास्वपिच्छानि ।
पुरतोजनस्यमहतोवधमभिधत्तेतदावलिभुक् ॥३१॥

अर्थ—कावळा सूर्याकडे पाहून एक पायावर उभा राहून आपल्या पिसांवर तोंडानें रेघा काढील तर पुढें महाजनाचा वध होईल ॥३१॥

सस्योपेतेक्षेत्रेविरुवतिशांतेससस्यभूलब्धिः ।
आकुलचेष्टोविरुवन्सीमांतेक्लेशकृद्यातुः ॥३२॥

अर्थ—कावळा धान्ययुक्त शेतांत शांत होऊन शब्द करील तर धान्ययुक्त भूमीची प्राप्ति होईल. सीमांतीं उद्योगयुक्त कावळा शब्द करील तर गमनकर्त्यास दुःख होईल ॥३२॥

सुस्निग्धपत्रपल्लवकुसुमफलानम्रसुरभिमधुरेषु ।
सक्षीराव्रणसुस्थितमनोज्ञवृक्षेषुचार्थकरः ॥३३॥

अर्थ—रखरखीत नव्हत अशीं पानें, पल्लव, पुष्पें, फळें यांहींकरून नमलेला, सुगंध, गोड, चिकाळ, अच्छिद्र, चांगला राहिलेला, सुंदर अशा वृक्षावर कावळा असेल तर कार्यसिद्धि होईल ॥३३॥

निष्पन्नसस्यशाड्वलभवनप्रासादहर्म्यहरितेषु ।
धान्योच्छ्रयमंगल्येषुचैवविरुवन्धनागमदः ॥३४॥

अर्थ—धान्यपिकलेलें शेत, कोमल तृण, गृह, देवालय, गृहपृष्ठ, हिरवाप्रदेश, धान्य, उंचप्रदेश, शुभस्थान यांचाठाई कावळा शब्द करील तर द्रव्यप्राप्ति होईल३४

गोपुच्छस्थेवल्मीकगेथवादर्शनंभुजंगस्य ।
सद्योज्वरोमहिषगेविरुवतिगुल्मेफलंस्वल्पं ॥३५॥

अर्थ—गाईच्या पुच्छावर किंवा वारुळावर कावळा बसेल तर सर्पाचें दर्शन होईल. महिषावर बसून शब्द करील तर तत्काल ज्वर होईल. झुडपावर बसून शब्द करील तर शुभाशुभफल स्वल्प होतें ॥३५॥

कार्यस्यव्याघातस्तृणकूटेवामगेस्थिसंस्थेवा ।
ऊर्ध्वाग्निप्लुष्टेशनिहतेचकाकेवधोभवति ॥३६॥

अर्थ—गमनकर्त्याच्या डाव्या अंगीं गवताच्या गंजीवर अथवा हाडांवर कावळा बसून शब्द करील तर कार्यनाश होईल. जळलेल्या किंवा वीज पडलेल्या वृक्षावर बसून कावळा शब्द करील तर वध होतो ॥३६॥

कंटकिमिश्रेसौम्येसिद्धिःकार्यस्यभवतिकलहश्च ।
कंटकिनिभवतिकलहोवल्लीपरिवेष्टितेबंधः ॥३७॥

अर्थ–कांट्यांच्या वृक्षांनी युक्त शुभवृक्षावर कावळा शब्द करील तर कार्यसिद्धि व कलह होतील. केवळ कंटकिवृक्षावर बसून श० कलह होईल. वेलींनी वेष्टित वृक्षावर बसून शब्द करील तर बंधन होईल ॥३७॥

छिन्नाग्रेंगच्छेदःकलहःशुष्कद्रुमस्थितेध्वांक्षे ।
पुरतश्चपृष्ठतोवागोमयसंस्थेधनप्राप्तिः ॥३८॥

अर्थ–कावळा शेंडा मोडलेल्या झाडावर बसेल तर अंगच्छेदन, शुष्क वृक्षावर बसेल तर कलह, गमनकर्त्याच्या मागें किंवा पुढें गोमयावर बसेल तर धनप्राप्ति होईल.

मृतपुरुषांगावयवस्थितोभिवाशन्करोतिमृत्युभयं ।
भंजन्नस्थिचचंच्वायदिवाशत्यस्थिभंगाय ॥३९॥

अर्थ–कावळा मृतपुरुषाच्या अंगाच्या अवयवावर बसून शब्द करील तर मृत्युभय होतें. चंचूनें हाड फोडून शब्द करील तर गमनकर्त्याच्या हाडांचा भग होतो ३९

रज्ज्वस्थिकाष्ठकंटकिनिःसारशिरोरुहाननेरुवति ।
भुजगगदंष्ट्रितस्करशस्त्राग्निभयान्यनुक्रमशः ॥४०॥

अर्थ–कावळा दोरी, हाड, काष्ठ, कांटा, असार, (सत्व नाहीं असा पदार्थ) केंस हे मुखांत घेऊन शब्द करील तर अनुक्रमानें सर्प, रोग, डुकरादि दंष्ट्री, चोर, शस्त्र, अग्नि, यांचें भय होईल. (दोर तोंडांत घेईल तर सर्पभय, हाड घेईल तर रोगभय इ०) ॥४०॥

सितकुसुमाशुचिमांसाननेर्थसिद्धिर्यथेप्सितायातुः ।
धुन्वन्पक्षावूर्ध्वाननेचविघ्नंमुहुःक्वणति ॥४१॥

अर्थ–कावळा पांढरें पुष्प, अशुद्ध पदार्थ, मास हीं मुखांत घेऊन शब्द करील तर गमनकर्त्याची यथेच्छ सिद्धि होईल. पाख हालवून वर तोंड करून वारंवार शब्द करील तर गमनकर्त्यास विघ्न होईल ॥४१॥

यदिशृंखलांवरत्रांवल्लींवादायवाशतेबंधः ।
पाषाणस्थेचभयंक्लिष्टापूर्वाध्विकयुतिश्च ॥४२॥

अर्थ–कावळा बेडी, चामड्याची दोरी, वेल हीं मुखांत घेऊन शब्द करील तर

बंध होतो. दगडावर बसून शब्द करील तर भय व क्लेशयुक्त, अपूर्ण, अशा मार्गस्थाचा योग हे होतात ॥४२॥

अन्योन्यभक्षसंक्रामितानने तुष्टिरुत्तमा भवति ।
विज्ञेयः स्त्रीलाभो दंपत्योर्वाशतोर्युगपत् ॥४३॥

अर्थ—कावळे अन्योन्यांच्या मुखांत भक्ष्यपदार्थ घालीत असले तर गमनकर्त्यास उत्तम संतोष होतो. स्त्रीपुरुष कावळे एककाली शब्द करतील तर स्त्रीलाभ होईल.

प्रमदाशिरउपगतपूर्णकुंभसंस्थेंगनार्थसंप्राप्तिः ।
घटकुट्टने सुतविपद्घटोपहदनेन्नसंप्राप्तिः ॥४४॥

अर्थ—स्त्रीच्या मस्तकावर राहिलेल्या पूर्णकुंभावर कावळा बसेल तर स्त्री व द्रव्य यांची प्राप्ति गमनकर्त्यास होईल. कावळा घागरीस ताडण करील तर पुत्रास दुःख होईल. घागरींत कावळा विष्ठा करील तर भोजनप्राप्ति होईल ॥४४॥

स्कंधावारादीनां निवेशसमये रुवंश्चलत्पक्षः ।
सूचयतेन्यस्थानं निश्चलपक्षस्तु भयमात्रं ॥४५॥

अर्थ—रावटीमध्ये प्रवेशसमयीं चंचलपक्ष कावळा शब्द करील तर अन्यस्थानास जाणें सुचवितो. निश्चलपक्ष शब्द करील तर भयमात्र सुचवितो ॥४५॥

प्रविशद्भिः सैन्यादीन्सगृध्रकंकैर्विनामिपं ध्वांक्षैः ।
अविरुद्धैस्तैः प्रीतिर्द्विपतां युद्धं विरुद्धैश्च ॥४६॥

अर्थ—गिधाड व कंक ( पक्षिवि०, यांच्या पक्षांचे बाणास पिसारे करितात ) यांणीं युक्त कावळे सैन्य, नगर, गांव यांत प्रवेश करतील व त्यांचा विरोध नसेल तर शत्रूची प्रीति होईल; आणि विरोध असेल तर युद्ध होईल ॥४६॥

बंधः सूकरसंस्थे पंकाक्ते सूकरे द्विकेर्थाप्तिः ।
क्षेमं खरोष्ट्रसंस्थे केचित्प्राहुर्वधं तु खरे ॥४७॥

अर्थ—कावळा डुकरावर बसेल तर बंधन होईल. चिखलानें भरलेल्या डुकरावर बसेल तर द्रव्यप्राप्ति होईल. द्विक ह्म० कावळा, गाढव व उंट यांवर बसेल तर कल्याण होईल. गाढवावर बसला तर वध होईल असें कोणी ह्मणतात ॥४७॥

वाहनलाभोश्वगते विरुवत्यनुयायि निक्षतजपातः ।
अन्येप्यनुव्रजंतो यातारं काकवद्विहगाः ॥४८॥

अर्थ—कावळा घोड्यावर बसून शब्द करील तर वाहनांचा लाभ होईल. गमनकर्त्याच्या मागून कावळा शब्द करीत जाईल तर रक्तपतन होईल. मागून जाणारे अन्यपक्ष्यांचेंही फल गमनकर्त्यास कावळ्यासारखेंच जाणावें ॥४८॥

द्वात्रिंशत्प्रविभक्तेदिक्चक्रेयद्यथासमुद्दिष्टं ।
तत्तत्तथाविधेयंगुणदोषफलंयियासूनां ॥४९॥

अर्थ–३२ कोष्टकांचे चकात असें फल सांगीतलें तसेंच काकशब्दाचें फल गमन-कर्त्यांस होतें ॥४९॥

काइतिकाकस्यरुतंस्वनिलयसंस्थस्यनिष्फलंप्रोक्तं ।
कवइतिचात्मप्रीत्यैकइतिरुतेस्निग्धमित्राप्तिः ॥५०॥
करइतिकलहंकुरुकुरुचहर्पमथकटकटेतिदधिभक्तं ।
केकेविरुतंकुकुवाधनलाभंयायिनःप्राह ॥५१॥

अर्थ–कावळा आपल्या घरट्यावर राहून, का, असा शब्द करील तर तो शब्द निष्फल ( त्याचें शुभाशुभ फल नाहीं ) कव, असा शब्द स्वप्रीतीनें करतो. क असा शब्द करील तर प्रियमित्राची प्राप्ति होईल ॥५०॥ कर, असा श० कलह, कुरुकुरु, असा श० आनंद, कटकट, असा श० दहींभाताचें भोजन, केके किंवा कुकु असे शब्द करील तर गमनकर्त्यास धनलाभ होईल ॥५१॥

खरेखरेपथिकागममाहकखाखेतियायिनोमृत्युं ।
गमनप्रतिषेधिकमाखलखलसद्योभिवर्पाय ॥५२॥

अर्थ–कावळा, खेरखेरे, असा शब्द करील तर मार्गस्थ येईल. करवाख, असा श० गमनकर्त्यास मृत्यु होईल. आ, असा श०-जाणें बंद होईल. खलखल, असा-श० तत्काल वृष्टि होईल ॥५२॥

काकेतिविघातंकाकटीतिचाहारदूपणंप्राह ।
प्रीत्यास्पदंकवकवेतिवंधमेवंकगाकुरिति ॥५३॥

अर्थ–काका, असा श० नाश होईल. काकटि, असा श० विषादिकानें अन्न दूषित असें सांगतो. कवकव, असा श० स्नेहस्थानप्राप्ति. कगाकु, असा श० बंधन होईल ॥५३॥

करकौविरुतेवर्पंगुडवत्रासायवडितिवस्त्राप्तिः ।
कलयेतिचसंयोगःशूद्रस्यब्राह्मणैःसाकं ॥५४॥

अर्थ–कावळा, करकौ, असा शब्द करील तर पर्जन्यवृष्टि होईल. गुडवत्, असा श० भय होईल. वड, असा श० वस्त्रप्राप्ति होईल. कलय, असा श० करील तर शूद्राची ब्राह्मणाशीं भेट होईल ॥५४॥

द्वात्रिंशत्प्रविभक्तेदिक्चक्रेयद्यथासमुद्दिष्टं ।
तत्तत्तथाविधेयंगुणदोषफलंयियासूनां ॥४९॥

अर्थ—३२ कोष्टकांचे चक्रांत जसें फल सांगीतलें तसेंच काकशब्दाचें फल गमनकर्त्यांस होतें ॥४९॥

काइतिकाकस्यरुतंस्वनिलयसंस्थस्यनिष्फलंप्रोक्तं ।
कवइतिचात्मप्रीत्यैकइतिरुतेस्निग्धमित्राप्तिः ॥५०॥
करइतिकलहंकुरुकुरुचहर्षमथकटकटेतिदधिभक्तं ।
केकेविरुतंकुकुवाधनलाभंयायिनःप्राह ॥५१॥

अर्थ—कावळा आपल्या घरट्यावर राहून, का, असा शब्द करील तर तो शब्द निष्फल (त्याचें शुभाशुभ फल नाहीं ). कव, असा शब्द स्वप्रीतीनें करतो. क असा शब्द करील तर प्रियमित्राची प्राप्ति होईल ॥५०॥ कर, असा श० कलह, कुरुकुरु, असा श० आनंद, कटकट, असा श० दहींभाताचें भोजन, केके किंवा कुकु असे शब्द करील तर गमनकर्त्यास धनलाभ होईल ॥५१॥

खरेखरेपथिकागममाहकखाखेतियायिनोमृत्युं ।
गमनप्रतिषेधिकमाखलखलस्योभिवर्षाय ॥५२॥

अर्थ—कावळा, खरेखरे, असा शब्द करील तर मार्गस्थ येईल. कखाख, असा श० गमनकर्त्यास मृत्यु होईल. आ, असा श०-जाणें बंद होईल. खलखल, असा-श० तत्काल वृष्टि होईल ॥५२॥

काकेतिविघातंकाकटीतिचाहारदूषणंप्राह ।
प्रीत्यास्पदंकवकवेतिबंधमेवंकगाकुरिति ॥५३॥

अर्थ—काका, असा श० नाश होईल. काकटि, असा श० विषादिकानें अन्न दूषित असें सांगतो. कवकव, असा श० स्नेहस्थानप्राप्ति. कगाकु, असा श० बंधन होईल ॥५३॥

करकौविरुतेवर्षंगुडवत्रासायवडितिवस्त्राप्तिः ।
कलयेतिचसंयोगःशूद्रस्यब्राह्मणैःसाकं ॥५४॥

अर्थ—कावळा, करकौ, असा शब्द करील तर पर्जन्यवृष्टि होईल. गुडवत्, असा श० भय होईल. वड, असा श० वस्त्रप्राप्ति होईल. कलय, असा श० करील तर शूद्राची ब्राह्मणाशीं भेट होईल ॥५४॥

श्री

# वृहत्संहिता

(वराह मिहिरकृत)

मूळश्लोक संस्कृत असून त्याचा अर्थ प्राकृत (महाराष्ट्र) भाषेत लिहिला आहे.

# THE BRIHATSANHITÁ

[BY VARÁHA-MIHIRA]

यांत व्यवहारोपयोगी सर्वप्रकारचे विषय आहेत.



| पुस्तक २ रें | तारीख २५ सपटंबर १८७४. | अंक १७ |
| --- | --- | --- |
| VOL 2 | 25th September 1874. | No. 17 |



रत्नागिरी

येथें

जनार्दन हरि आठल्ये

यांणी

आपल्या

जगन्मित्र छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

---

प्रत्येक अंकांत मोठ्या तक्तीचे सांच्याची चतुष्पत्री ३२ पृष्ठें असून सुमारें ८०० ग्रंथ येत जाईल.

फडितिफलाप्तिःफलवाहिदर्शनंटादितिप्रहाराःस्युः ।
स्त्रीलाभःस्त्रीतिरुतेगडितिगवांपुडितिपुष्पाणां ॥५५॥

अर्थ—कावळा, फड, असा शब्द करील तर फळप्राप्ति व फळें घेऊन येणाराचे दर्शन हीं होतात. टड, असा श० प्रहार ( युद्ध ) होईल. स्त्री, असा शब्द० स्त्रीप्राप्ति होईल. गड, असा श० गाईची प्राप्ति. पुड, असा श० पुष्पांची प्राप्ति होईल ॥५५॥

युद्धायटाकुटाकितिगुहुवन्हिभयंकटेकटेकलहः ।
टाकुलिचिंटिचिकेकेकेतिपुरंचेतिदोषाय ॥५६॥

अर्थ—कावळा, टाकुटाकु, असा शब्द० युद्ध होतें. गुहु, असा श० अग्निभय, कटेकटे, असा श० कलह होतो. टाकुलि, चिंटिचि, केकेके, पुरंच, असे शब्द करील तर अशुभ होत ॥५६॥

काकद्वयस्यापिसमानमेतत्फलंयदुक्तंरुत
चेष्टिताद्यैः । पतत्रिणोन्येपियथैवकाको
वन्याःश्ववच्चोपरिदंष्ट्रिणोये ॥५७॥

अर्थ—वर कावळ्याविषयीं जें फळ सांगितलें. तेंच फळ, दोन, तीन, चार कावळ्यांनीं शब्द वगैरे केले तर जाणावें. जें कावळ्याचें फळ तेंच येथें न सांगितलेल्या पक्ष्याचें फळ जाणावें. वन्य पशूंचें फल कुत्र्यासारखें जाणावें व दाढांचे डुकर इ० पशूंचेंही फळ कुत्र्यासारखें जाणावें ॥५७॥

स्थलसलिलचराणांव्यत्ययोमेघकालेप्रचुरसलिल
वृष्टयैशेषकालेभयाय । मधुभवननिलीनंतत्करो
त्याशुशून्यंमरणमपिनिलीनामक्षिकामूर्ध्निनीला ॥५८॥

अर्थ—वर्षाकाळीं जमिनीवरील प्राणी बकरे वगैरे पाण्यांत जातील व पाण्यांतील प्राणी मासे वगैरे जमिनीवर येतील तर बहुत वृष्टि होईल. अन्यकाळीं भय होईल. मधमाशाचें पोळें बराबर असेल तर तें घर मनुष्यरहित होईल. नी माशी मस्तकीं नीळवर्ण असेल तर प्राण्यांस मृत्युही करील ॥५८॥

विनिक्षिपंत्यःसलिलेंडकानिपिपीलिकावृष्टि
निरोधमाहुः । तरुस्थलंवापिनयंतिनिम्नाद्या
दातदाताःकथयंतिवृष्टिं ॥५९॥

अर्थ–मुंग्या आंडी उदकामध्ये ठेवतील तर वृष्टि बंद होईल असे सांगतात. सजल भूमीपासून वृक्षावर किंवा उच्च प्रदेशावर नेतील तर वृष्टि होईल असे या सांगतात ॥५९॥

कार्यंतुमूलशकुनेंतरजेतदन्हिविंद्यात्फलंनि
यतमेवमिमेविचिंत्याः । प्रारंभयानसमये
पुतथाप्रवेशेग्राह्यंक्षुतंनशुभदंक्वचिदप्युशंति ॥६०॥

अर्थ–पहिल्या शकुनावरून यात्रेचें शुभाशुभफल पहावें. निघाल्यावर मध्यें जो शकुन होईल त्याचें फल त्याच दिवशीं जाणावें. या अध्यायामध्यें सांगितलेले जे शकुन ते सर्वकाल पहावे. सर्व कार्यांचा प्रारभ, यात्रा, गृहप्रवेश इत्यादिकांचा-ठाई सर्व शकुन पहावे. शिंका कोणत्याही कर्मीं शुभ नव्हे असे सांगतात ॥६०॥

शुभंदशापाकमविघ्नसिद्धिंमूलाभिरक्षामथ
वासहायान् । इष्टस्यसंसिद्धिमनामयत्वंवदं
तितेमानयितुर्नृपस्य ॥६१॥

अर्थ–शुभशकुन झाले तर दशेचें फल, निर्विघ्न कार्यसिद्धि, मूलस्थानाचें पालन, मार्गामध्ये सहाय, इच्छितकार्यसिद्धि, नीरोगत्व, ही फळें लोकांचा सत्कार करणाऱ्या राजास होतात असे सांगतात ॥६१॥

क्रोशादूर्ध्वंशकुनिविरुतंनिष्फलंप्राहुरेकेतत्रा
निष्टेप्रथमशकुनेमानयेत्पंचपट्च । प्राणाया
मान्नृपतिरशुभेषोडशैवद्वितीयेप्रत्यागच्छेत्स्व
भवनमतोयद्यनिष्टस्तृतीयः ॥६२॥

अर्थ–कोसापुढें पक्ष्यांचा शब्द निष्फल ( व्यर्थ ) असें कश्यपादि कोणी ऋषि ह्मणतात. राजानें पहिला अपशकुन झाला तर आवश्यक कार्याचाठाईं ११ प्राणायाम करावे नंतर जावें. दुसरा अपशकुन झाला तर १६ प्राणायाम करून प्रयाण करावें. तिसरा झाला तर परत स्वगृहास यावें ( राजास सांगितलें ते सर्वांनी करावें ) ॥६२॥

॥ इतिसर्वशाकुनेवायसरुतंनामदशमोध्यायः ॥ १० ॥

॥ इतिश्रीवरा० बृहत्सं० पंचनवतितमोध्यायः ॥९५॥

## ॥ अथशाकुनोत्तराध्यायः ॥

दिग्देशचेष्टास्वरवासरर्क्षमुहूर्तहोराकरणोदयांशान् ।
चरस्थिरोन्मिश्रबलाबलंचबुध्वाफलानिप्रवदेद्दुतज्ञः १

अर्थ– अंगारितादिदिशा, शुभाशुभस्थान, व्यापार, दीप्तादिशब्द, वार, नक्षत्र, शिवादिमुहूर्त, होरा, बवादिकरण, लग्न, नवांश, द्रेष्काणादि, चर, स्थिर, द्विभाव, शकुनांचें बलाबल, हीं जाणून पक्ष्यादि शब्द जाणणारानें फळें सांगावीं ॥१॥

द्विविधंकथयंतिसंस्थितानामागामिस्थिरसंज्ञि
तंचकार्यं । नृपदूतचरान्यदेशजातान्यभिधा
तःस्वजनादिचागमाख्यं ॥२॥

अर्थ–संस्थित ह्म० प्रश्नकर्ते, यांचीं चर आणि स्थिर अशीं प्रश्नकार्यें असतात. राजा, दूत, हेर, परदेश यांसंबंधी उपद्रव, बंधुसुहृदादिकाचें येणें यासंबंधी प्रश्न असतात ॥२॥

उद्बद्धसंग्रहणभोजनचौरवन्हिवर्षोत्सवात्म
जवधाःकलहोभयंच । वर्गःस्थिरोयमुदयेंदु
युतेस्थिरर्क्षेविंद्यात्स्थिरंचरगृहेचचरंयदुक्तं ॥३॥

अर्थ–उद्बंध ( टांगलेलें ), संयोग, सहभोजन, चोर, अग्नि, वृष्टि, विवाहादिउत्सव, अपत्य, मरण,कलह, भय यांसंबंधी प्रश्न, स्थिरलग्नीं, स्थिरनक्षत्रीं व स्थिरराशीस चंद्र असतां, झाला तर तो स्थिरफल.( याचें फल झालें आहे किंवा आजच होणार आहे ) समजावा. चरलग्नीं, चरनक्षत्रीं, चरराशीस चंद्र असतां प्रश्न होईल तर तो चरफल, पुढें व्हावयाचें आहे, असें समजावें ॥३॥

स्थिरप्रदेशोपलमंदिरेषुसुरालयेभूजलसंनिधौच ।
स्थिराणिकार्याणिचराणियानिचलप्रदेशादिपुचा
गमाय ॥४॥

अर्थ–स्थिरप्रदेश, पाषाण, गृह, देवालय, भूमि, जलसमीपभाग या स्थानीं शकुन झाले तर, कार्य स्थिर ( झालीं किंवा आज होतील ) असें सांगावें. चलप्रदेशादिकांचाठाईं शकुन झाले तर कार्य पुढें होईल असें सांगावें ॥४॥

आप्योदयर्क्षक्षणदिग्जलेषुपक्षावसानेषुचये प्रदीप्ताः । सर्वेपितेवृष्टिकरारुवंतःशांतोपि वृष्टिंकुरुतेंबुचारी ॥५॥

अर्थ—जललग्न, जलनक्षत्र, जलमुहूर्त, जलदिशा (पश्चिम), व अमावास्या पूर्णिमा यांचाठाईं स्थित व प्रदीप्त असे जे शकुन ते सर्व वृष्टि करणारे होत. उदकचारी शांतही शकुन वृष्टि करतो ॥५॥

आग्नेयदिग्लग्नमुहूर्तदेशेष्वर्कप्रदीप्तोग्निभयाय रौति । विष्टयांयमर्क्षोदयकंटकेषुनिष्पत्रवल्ली पुचमोपकृत्स्यात् ॥६॥

अर्थ—आग्नेयीदिशा, क्रूरग्रहाचें लग्न, आग्नेयमुहूर्त, कत्तिकानक्षत्र, उग्रदेश यांचाठाईं अर्कप्रदीप्त शकुन झाला तर अग्निभय होतें. कल्याणी, शनीचीं लग्नें (मकर कुंभ), कांट्यांचावृक्ष, पत्ररहितवृक्ष, वल्ली याचाठाईं शकुन झाला तर चोरी होईल ॥६॥

ग्राम्यःप्रदीप्तःस्वरचेष्टिताभ्यामुग्रोरुवन्कंटकिनिस्थितश्च । भौमर्क्षलग्नेयदिनैर्ऋतांचस्थितोभितश्चेत्कलहायदृष्टः ॥७॥

अर्थ—गावात सालेला, शब्द व चेष्टा यांहीं दीप्त, उग्रशब्दकरणार, कांट्यांच्या झाडावर राहलेला, मंगळाच्या ऋक्षीं (मेष, वृश्चिक,) झालेला, निर्ऋतीस स्थित असा शकुन संमुख पाहिला तर कल्ह होतो ॥७॥

लग्नेथवेंदोर्भृगुभांशसंस्थेविदिक्स्थितोधोवदनश्चरौति । दीप्तःसचेत्संग्रहणंकरोतियोन्यातयायाविदिशिप्रदिष्टा ॥८॥

अर्थ—चंद्राचेलग्नीं (कर्क) शुक्राचे राशीस व नवांशीं शकुन आग्नेयादि विदिशांस राहून अधोमुख शब्द करील व दीप्त असेल तर स्त्रीचें ग्रहण करील. ज्या विदिशेस जी योनी (उत्पत्ति) सांगितली तिचें ग्रहण (संयोग) करतो ॥८॥

पुंराशिलग्नेविषमेतिथौचदिक्स्थःप्रदीप्तःशकुनोनरारव्यः । वाच्यंतदासंग्रहणंनराणांमिश्रेभवेत्पंडकसंप्रयोगः ॥९॥

अर्थ—पुंराशि, विषम लग्न व विषम तिथि यांचाठाईं प्रदीप्तदिशेस राहणारा श-

कून पुरुषाख्य होय. तसा झाला तर पुरुषांचे संग्रहण ( संयोग ) होईल. असें सांगावें. मिश्र असल्यास नपुंसकयोग होईल ॥९॥

एवंरवेःक्षेत्रनवांशलग्नेलग्नेस्थितेवास्वयमेवसूर्ये ।
दीप्तोभिधत्तेशकुनोविवासंपुंसःप्रधानस्यहिकारणंतत्

अर्थ–असेंच सूर्याचाराशि ( सिंह ) त्याचा नवांश व त्याच्या लिक लग्न अ० अथवा लग्नीं सूर्य अ० दीप्तशकुन होईल तर मुख्यपुरुषाचें प्रवासाचें हेंच कारण होय ( प्रवास होईल ) ॥१०॥

प्रारभ्यमाणेषुचसर्वकार्येष्वर्कान्विताद्वाद्गण
येद्विलग्नं । संपद्विपच्चेतियथाक्रमेणसंपद्विप
द्वापितथैववाच्या ॥११॥

अर्थ–सर्वकार्यांच्या प्रारंभीं सूर्ययुक्त राशीपासून लग्न मोजावें १ संपत्, २ विपत् इ० जें येईल त्याप्रमाणें संपत् किंवा विपत् असें लग्नाचें फल सांगावें ॥११॥

काणेनाक्ष्णादक्षिणेनेतिसूर्येचंद्रेलग्नात्द्वादशे
चेतरेण । लग्नस्थेर्केपापदृष्टेंधएवकुब्जःस्वर्क्षे
श्रोत्रहीनोजडोवा ॥१२॥

अर्थ–प्रश्नसमयीं जें लग्न त्यापासून सूर्य १२ व्या लग्नीं असेल. तर ज्याचा संयोग होईल तो उजव्या डोळ्यानें काणा असेल. १२ व्या स्थानीं चंद्र अ० डाव्याडोळ्यानें काणा असेल. चंद्रसूर्य दोघेही १२ वे असतील तर अंधच असेल. प्रश्नलग्नीं सूर्य असेल व तो पापग्रहांनीं दृष्ट असेल तर अंध असेल. स्वराशीस ( सिंहास ) सूर्य असेल तर कर्णहीन ( बधिर ) किंवा जड ( मूर्ख ) असेल १२

क्रूरःपष्ठेक्रूरदृष्टोविलग्नाद्यास्मिन्राशौतद्गृहांगे
व्रणःस्यात् । एवंप्रोक्तंयन्मयाजन्मकालेचि
न्हंरूपंतत्तदस्मिन्विचिंत्यं ॥१३॥

अर्थ–चरलग्नीं चरनवांश असेल तर येणाराचें किंवा प्रश्नकर्त्याचें दोन अक्षराचें नाव आहे असें सांगावें. स्थिरलग्नीं स्थिरनवांश असेल तर ४ अक्षराचें नाव आहे द्विस्वभावलग्नीं द्विस्वभाव नवांश असेल तर दोन नांवें आहेत पहिलें ती न अक्षराचें व दुसरें पांच अक्षराचें असें सांगावें ॥१४॥

कादयास्तुवर्णाःकुजशुक्रसौम्यजीवार्कजानांक्रमशःप्रदिष्टाः । वर्णाष्टकंयादिचशीतरश्मेरवेरकारात्क्रमशःस्वराःस्युः ॥१५॥ नामानिचाग्न्यंबुकुमारविष्णुशक्रेंद्रपत्नीचतुराननानां । तुल्यानिसूर्यात्क्रमशोविचिंत्यद्वित्र्यादिवर्णैर्घटयेत्स्वबुध्या ॥१६॥

अर्थ–कादिवर्ण कुज, शुक्र, बुध, गुरु, शनि यांचे अनुक्रमानें सांगीतले. उ० क ख ग घ ङ याचा मंगळ, च छ ज झ ञ याचा शुक्र, ट ठ ड ढ ण यांचा बुध, त थ द ध न याचा गुरु, प फ ब भ म याचा शनि, य र ल व श ष स ह या आठ वर्णांचा चंद्र व अकारादि १६ स्वराचा सूर्य स्वामी होय ॥१५॥ सूर्यापासून अनुक्रमानें अग्नि, उदक, कुमार, विष्णु, इंद्र, इंद्राणी, ब्रह्मा या सात देवता सात ग्रहांच्या होत. सूर्यादि ग्रहयोगाचा स्वबुद्धीनें विचार करून त्र्यादिवर्णांचीं नांवें योजावीं ॥१६॥

वयांसितेषांस्तनपानबाल्यव्रतस्थितायौवनमध्यवृद्धाः । अतीववृद्धाइतिचंद्रभौमज्ञशुक्रजीवार्कशनैश्चराणां ॥१७॥

अर्थ–चंद्र शिशु, भौम ६ वर्षांपर्यंत, बुध व्रतस्थ १६ पर्यंत, शुक्र ३० वर्षांपर्यंत, गुरु ५० वर्षांप०, शनि ८० वर्षांपर्यंत अशीं त्यांचीं वये होत प्रश्नकालीं जो ग्रह असेल त्याचें वय सांगावें ॥१७॥

॥ इतिशाकुनोत्तराध्यायः ॥

॥ इतिश्रीवराहमिहिरकृतौबृहत्संहितायां षण्णवतितमोध्यायः ॥९६ ॥

## ॥ अथपाकाध्यायः ॥

पक्षाद्भानोःसोमस्यमासिकोंगारकस्यवक्रोक्तः ।
आदर्शनाच्चपाकोबुधस्यजीवस्यवर्षेण ॥१॥
षड्भिःसितस्यमासैरब्देनशनेःसुरद्विषोब्दार्धात् ।
वर्षात्सूर्यग्रहणेसद्यःस्यात्त्वाष्ट्रकीलकयोः ॥२॥
त्रिभिरेवधूमकेतोर्मासैःश्वेतस्यसप्तरात्रांते ।
सप्ताहात्परिवेषेंद्रचापसंध्याभ्रसूचीनां ॥३॥

अर्थ—अर्कचारामध्यें सूर्याचें जें शुभाशुभफल सांगीतलें तें सर्व १५ दिवसांनी होतें. चंद्राचें एक महिन्यानें होतें. मंगळाचें फल तद्वक्रमुष्णमुदये इ० प्रथानें (अ० ६ श्लो० १ ) सांगीतलें. बुधाच्या शुभाशुभाचें फल तो दृष्टीस पडत आहे तेथ पर्यंतच होतें. गुरूचें एक वर्षानें होतें. शुक्राचा सहा महिन्यांनीं पाक (फल) होतो. शनीचा एक वर्षानें होतो. राहूचा ६ महिन्यांनीं होतो. सूर्यग्रहणाचा वर्षानें होतो. त्वाष्ट्र व कीलक या केतूचा तत्काल ( त्याच दिवशीं ) पाक होतो. धूमकेतूचा ३ महिन्यांनीं होतो. श्वेतकेतूचा ७ दिवसांनीं पाक होतो. खळें, इंद्रधनुष्य, संध्याभ्रसूचन याचा ७ दिवसांनीं पाक होतो ॥१।२।३॥

शीतोष्णविपर्यासःफलपुष्पमकालजंदिशांदाहः ।
स्थिरंचरयोरन्यत्वंप्रसूतिविकृतिश्चषण्मासात् ॥४॥

अर्थ—शीत व उष्ण याचा विपर्यास ( शीतकालीं उष्णता व उष्णकालीं शीतता; अथवा स्वभावानें शीत पदार्थ उष्ण होणें इ० ), अकालीं फलें व पुष्पें येणें, दिक्दाह, स्थिर व चर पदार्थांचें अन्यत्व ( वृक्षादि स्थिरपदार्थ चर होणें इ० ), प्रसवविकार याचें शुभाशुभफल सहा महिन्यांनीं होतें ॥४॥

अक्रियमाणककरणंभूकंपोनुत्सवोदुरिष्टंच ।
शोषश्चाशोष्याणांस्रोतोन्यत्वंचवर्षार्धात् ॥५॥

अर्थ—कर्त्यानें केलें नसताही होणें, भूमिकंप, प्राप्त उत्साहाचें अकरण, फार अशोभन, शुष्क न होणाऱ्याचा शोष, नदी इत्यादिकाचा प्रवाह दुसरीकडे जाणें, याचें फल ६ महिन्यांनीं येतें ॥५॥

स्तंभकुसूलार्चानांजल्पितरुदितप्रकंपितस्वेदाः ।
मासत्रयेणकलहेंद्रचापनिर्घातपाकाश्च ॥६॥

अर्थ—स्तंभ, कुसूल (कोठार), प्रतिमा यांचे भाषण, रोदन, कंपन, घर्म हीं व कलह, इंद्रधनुष्य, निर्घात यांचा पाक ३ महिन्यानीं होतो. (इंद्रधनुष्याचा, पूर्वी ७ दिवसांनीं सांगीतला तो न झाला तर तीन महिन्यानीं होतो) ॥६॥

कीटाखुमक्षिकोरगबाहुल्यंमृगविहंगमरुतंच ।
लोष्टस्यचाप्सुतरणंत्रिभिरेवविपच्यतेमासैः ॥७॥

अर्थ—किडे, उंदीर, माशा, सर्प हे बहुत होणें, पशु व पक्षि यांचा रोदनशब्द, मृत्पिंड (ढिपळ) उदकांत तरणें, या सर्वांचा पाक ३ महिन्यानीं होतो ॥७॥

प्रसवःशुनामरण्येवन्यानांग्रामसंप्रवेशश्च ।
मधुनिलयतोरणेंद्रध्वजाश्ववर्षात्समधिकाद्वा ॥८॥

अर्थ—कुत्र्याची अरण्यामध्यें प्रसूति, व वनपशूचा गावांत प्रवेश, मधपोळें धरणें, तोरण, इंद्रयष्टि यांचा पाक एक वर्षानें अथवा कांहीं अधिक दिवसानींहि होतो॥८॥

गोमायुगृध्रसंघादशाहिकाःसद्यएवतूर्यरवः ।
आक्रुष्टंपक्षफलंवल्मीकोविदरणंचभुवः ॥९॥

अर्थ—कोल्हे, गृध्र, यांचे संघाचें फल १० दिवसानीं; वाद्याच्या शब्दाचें फल तत्काल, ओरडणें, वारुळ, भूमिविदारण यांचें फल १५ दिवसानीं होतें ॥९॥

अहुताशप्रज्वलनंघृततैलवसादिवर्षणंचापि ।
सद्यःपरिपच्यंतेमासेध्यर्धेचजनवादः ॥१०॥

अर्थ—अग्नि नसतां पेटणें, घृत, तेल, मांस, रक्तादिक यांची वृष्टि; यांचें त्या दिवशींच फल. जनवाद (लोकापवाद) यांचें फल दीड महिन्यानें होतें ॥१०॥

छत्रचितियूपहुतवहबीजानांसप्तभिर्भवतिपक्षैः ।
छत्रस्यतोरणस्यचकेचिन्मासात्फलंप्राहुः ॥११॥

अर्थ—छत्र, चिति, यज्ञस्तंभ, अग्नि बीजें यांचे विकाराचें फल साडेतीन महिन्यानीं होतें. छत्र व तोरण यांचें फल महिन्यानें होतें, असें कोणी ऋषि म्हणतात ११

अत्यंतविरुद्धानांस्नेहःशब्दश्चवियतिभूतानां ।
मार्जारनकुलयोर्मूषकेणसंगश्चमासेन ॥१२॥

अर्थ—फार द्वेषी प्राण्यांचा परस्पर स्नेह, भुतांचा आकाशामध्यें शब्द, मार्जार व मुंगूस यांचा उंदराबरोबर संग या वैकृतांचें फल महिन्यानें होतें ॥१२॥

गंधर्वपुरंमासाद्रसवैकृत्यंहिरण्यविकृतिश्च ।
ध्वजवेश्मपांशुधूमाकुलादिशश्चापिमासफलाः १३

अर्थ–गंधर्वनगराचें फल एक महिन्यानें होतें- रसविकार, सुवर्णविकार, ध्वजभग, गृहविकार, धुरळा व धूर यांणीं व्याप्त दिशा, यांचे फल एक महिन्याने होते ॥१३॥

नवकैकाष्टदशैकैकषट्त्रिकत्रिकसंख्यमासपाकानि ।
नक्षत्राण्यश्विनिपूर्वकाणिसद्यःफलाश्लेषा ॥१४॥

अर्थ–अश्विन्यादि नक्षत्रांच्या योगतारांस उपसर्ग झाला तर त्यांचें फल ९ १० मा सांनीं होतें. अश्विनी ९, भरणी १, कृत्तिका ८, रोहिणी १०, मृग १ आर्द्रा ६, पुनर्वसु ३, पुष्य ३, इतक्या महिन्यांनीं फलपाक होतो. आश्लेषाचें फल त्या दिवशीं च होतें ॥१४॥

पित्र्यान्मासःषट्षट्त्रयोर्धमष्टौचत्रिपदैकैकाः ।
मासचतुष्केषाढेसद्यःपाकाभिजितारा ॥१५॥

अर्थ–मघादिनक्षत्रांच्या योगतारांला उपसर्ग झाला तर त्याचा पाक एक महि ना इत्यादिकानें होतो. उ० मघा १, पूर्वा ६, उत्तरा ६, हस्त ३, चित्रा अर्धमास ( १५ दि० ), स्वाती ८, विशाखा ३, अनुराधा १, ज्येष्ठा १, मूळ १, पूर्वाषाढा ४, उत्तराषाढा ४, इतक्या महिन्यांनीं फलपाक होतो. अभिजित्ता राचा त्यादिवशीं फलपाक होतो ॥१५॥

सप्ताष्टावध्यर्धंत्रयस्त्रयःपंचचैवमासाःस्युः ।
श्रवणादीनांपाकोनक्षत्राणांयथासंख्यं ॥१६॥

अर्थ–श्रवणादिनक्षत्रांचा पाक सप्तादि मासांनीं होतो. उ० श्रवण ७, धनिष्ठा ८, शततारका दीडमास, पूर्वाभाद्रपदा ३, उत्तराभा० ३, रेवती ५ इतक्या महिन्यांनीं फलपाक होतो ॥१६॥

निगदितसमयेनदृश्यतेचेदधिकतरंद्विगुणेप्र
पच्यतेतत् । यदिनकनकरत्नगोप्रदानैरुपश
मितंविधिवद्द्विजैः ...

**श्रवणात्त्रयमादित्यानिलेचचरकर्मणिहितानि॥११॥**

अर्थ–कृत्तिका व विशाखा हीं मृदुतीक्ष्ण ( मिश्र ) होत याचाठाईं मिश्रफल होतें श्रवण, धनिष्ठा, शततारका, हस्त, स्वाती हीं चरकर्माचाठाईं हित होत॥११

**हस्तात्त्रयंमृगशिरःश्रवणात्त्रयंचपूपाश्विशक्र गुरुभानिपुनर्वसुश्च । क्षौरेतुकर्मणिहितान्युदये क्षणेवायुक्तानिचाडुपतिनाशुभतारयाच ॥१२॥**

अर्थ–हस्त, चित्रा, स्वाती, मृगशीर्ष, श्रवण, धनिष्ठा, शततारका, रेवती, अश्विनी, ज्येष्ठा, पुष्य, पुनर्वसु हीं नक्षत्रें क्षौरकर्मी शुभ होत नक्षत्र उक्त न सांपडे तर दिवसाचीं लग्नें १२ त्यात २७ नक्षत्रें भोगतात. यास्तव त्याप्रमाणें मेषादिलग्नीं उक्तनक्षत्र काढून तें घ्यावें अथवा या नक्षत्राच्या मुहूर्तीं अथवा या नक्षत्रीं चंद्रबल किंवा ताराबल असतां क्षौरकर्म करावें ॥१२॥

**नस्नातमात्रगमनोत्सुकभूषितानामभ्यक्तभुक्तरण कालनिरासनानां । संध्यानिशोःकुजयमार्कदिने चरिक्तेक्षौरंहितंननवमेऽन्हिनचापिविष्ट्यां ॥१३॥**

अर्थ–स्नान केलेला, यात्रोत्सुक, अलंकारयुक्त, अभ्यंग केलेला, भोजन केलेला, युद्धोन्मुख, आसनरहित, संध्या, रात्रि, मंगळ, शनि, क्वचित् रवि, या वारीं, रिक्ता ( ४।९।१४ ) या तिथींत, नवव्या दिवशीं, विष्टि ( भद्रा ) करणीं क्षौर शुभ नव्हे ॥१३॥

**नृपाज्ञयाब्राह्मणसंमतेचविवाहकालेमृतसूतकेच । बद्धस्यमोक्षेक्रतुदीक्षणासुसर्वेषुशस्तंक्षुरकर्मभेषु १४**

अर्थ–राजाची आज्ञा, ब्राह्मणाची आज्ञा, विवाहकाल, मृतसूतक, बंधमोक्ष, यज्ञदीक्षा, याचाठाईं सर्व नक्षत्रें क्षौरास शुभ होत ॥१४॥

**(हस्तोमूलंश्रवणःपुनर्वसुर्मृगशिरस्तथापुष्यः । पुंसंज्ञितेषुकार्येष्वेतानिशुभानिधिष्ण्यानि ॥१५॥)**

अर्थ–हस्त, मूळ, श्रवण, पुनर्वसु, मृगशीर्ष, पुष्य हीं नक्षत्रें पुंसवनादिकर्माचाठाईं शुभ होत ॥१५॥

**सावित्रपौष्णानिलमैत्रतिष्येत्वाष्ट्रेस्तथाचोडु**

गणाधिपर्क्षे । संस्कारदीक्षाव्रतमेखलादिकु
र्याद्गुरौशुक्रबुधेंदुयुक्ते ॥१६॥

अर्थ–हस्त, रेवती, स्वाती, अनुराधा, पुष्य, चित्रा, मृगशीर्ष या नक्षत्रीं; गुरु, शुक्र, बुध, चंद्र या वारीं नामकरणादि संस्कार, यज्ञदीक्षा, व्रत, मेखलाबंधनादि कर्मे करावीं ॥१६॥

लाभेतृतीयेचशुभैःसमेतेपापैर्विहीनेशुभराशि
लग्ने । वेध्यौतुकर्णौत्रिदशेज्यलग्नेतिष्येंदु
चित्राहरिरेवतीषु ॥१७॥

अर्थ–११।३ या स्थानीं शुभ ग्रह असतां, पापग्रहांनीं रहित शुभग्रहाच्या लग्नीं पूर्वोक्त नामकरणादि कर्म करावें. गुरूच्यालग्नीं पुष्य, मृग, चित्रा, श्रवण, रेवती या नक्षत्रीं कर्णवेध करावा ॥१७॥

शुद्धैर्द्वादशकेंद्रनैधनगृहैःपापैस्त्रिषष्ठायगैर्लग्ने
केंद्रगतेथवासुरगुरौदैत्येंद्रपूज्येपिवा । सर्वारं
भफलप्रसिद्धिरुदयेराशौचकर्तुःशुभेसग्राम्य
स्थिरभोदयेचभवनंकार्यंप्रवेशोपिवा ॥१८॥

अर्थ–द्वादश, केंद्र ( १।४।७।१० ) नैधन ( ८ ) हीं स्थानें शुद्ध (पापग्रहरहित) असतां, ३।६।११ या स्थानीं पापग्रह असतां, लग्नीं किंवा केंद्रीं बृहस्पति किंवा शुक्र अ० सर्वारंभाच्या फळाची प्रसिद्धि होते. याचलग्नीं कर्त्याची जन्मराशि व जन्मलग्न शुभग्रहयुक्त अ० सग्राम्य ( अन्यप्रसंगांत सांगितल्याप्रमाणें अनुकूलग्राम ) स्थिरलग्नीं गृहारंभ व गृहप्रवेश करावा ॥१८॥

॥ इतिवरा०बृह०नक्षत्रगुणानामाष्टानवतितमोध्यायः९८

---

## ॥ अथतिथिकरणगुणाः ॥

कमलजविधातृहरियमशशांकषड्वक्त्रशक्रवसुभुजगाः।
धर्मेशसवितृमन्मथकलयोविश्वेचातिथिपतयः ॥१॥

अर्थ–१ ब्रह्मा २ विधाता ३ हरि ४ यम ५ चंद्र ६ स्कंद ७ इंद्र ८ वसु ९ भुजग १० धर्म ११ ईश १२ सूर्य १३ काम १४ कलि १५ विश्वे हे प्रतिपदादि तिथींचे स्वामी होत ॥१॥

पितरोमावास्यायांसंज्ञासदृशाश्चतैःक्रियाःकार्याः ।
नंदाभद्राविजयारिक्तापूर्णाश्चतास्त्रिविधाः ॥२॥

अर्थ–अमावास्येचे स्वामी पितर होत. या तिथींचाठाई नावासारखीं कार्ये करावीं. नदा, भद्रा, विजया, रिक्ता, पूर्णा या प्रकारें तिथी होत क्र० १ नदा, २ भद्रा ३ विजया ४ रिक्ता ५ पूर्णा ६ नदा ७ भद्रा ८ विजया ९ रिक्ता १० पूर्णा ११ नदा १२ भद्रा १३ विजया १४ रिक्ता १५ पूर्णा व अमावास्या अशा जाणाव्या ॥२॥

यत्कार्यंनक्षत्रेतद्दैवत्यासुतिथिषुतत्कार्यं ।
करणमुहूर्तेष्वपितत्सिद्धिकरंदेवतासदृशं ॥३॥

अर्थ– जें कार्य ज्या नक्षत्रीं करावयाचें तें नक्षत्र न मिळे तर त्या नक्षत्राची देवता पाहून त्या देवतेच्या तिथीस तें कार्य करावें तसेंच करण व मुहूर्त याचाठाईंही देवतेसारखें कार्य सिद्धिकारक होतें ॥३॥

ववबालवकौलवतैतिलाख्यगरवणिजविष्टिसंज्ञानां ।
पतयःस्युरिंद्रकमलजमित्रार्यमभूश्रियःसयमाः ॥४॥

अर्थ–१ वव २ बाल्व ३ कौलव ४ तैतिल ५ गर ६ वणिज ७ विष्टि या करणाचे अनुक्रमानें इंद्र, ब्रह्मा, मित्र, अर्यमा, भूमि, लक्ष्मी, यम हे स्वामी होत॥४॥

कृष्णचतुर्दश्यर्धात्ध्रुवाणिशकुनिश्चतुष्पदंनागं ।
किंस्तुघ्नमितिचतेषांकलिवृषफणिमारुताःपतयः ॥५॥

अर्थ–कृष्णपक्षी चतुर्दशीच्या उत्तरार्धापासून, उत्तरार्धी शकुनि, अमावास्येच्या पूर्वार्धी चतुष्पात्, उत्तरार्धी नाग, प्रतिपदेच्या पूर्वार्धी किंस्तुघ्न; या चार करणांचे अनुक्रमानें कलि, वृष, सर्प, वायु हे स्वामी होत ॥५॥

कुर्याद्ववेशुभचरस्थिरपौष्टिकानिधर्मक्रियाद्वि
जहितानिचबालवाख्ये ।संप्रीतिमित्रवरणा
निचकौलवेस्युःसौभाग्यसंश्रयगृहाणिचतैति
लाख्ये॥६॥ कृषिबीजगृहाश्रयजानिगरेवाणि
जिध्रुवकार्यवणिग्युतयः। नहिविष्टिकृतंविद
धातिशुभंपरघातविषादिषुसिद्धिकरं ॥७॥

अर्थ–शुभकार्यें, स्थलपकारस्थान, कालांतरीं राहणारीं, शरीरपुष्टिकारक, अशीं का

यें बवकरणीं करावी. धर्मक्रिया व ब्राह्मणाचें हित अशी बालवकरणीं करावीं. सप्रीति, मित्रवरण हीं कौलवकरणीं करावीं. जेणेकरून लोकप्रिय होतो तें, आश्रय, गृहकर्म हीं तैतिलकरणीं करावीं ॥६॥ कृषिकर्म, बीजवाप, गृहकर्म, आश्रयापासून होणारीं, हीं गरकरणीं करावीं. स्थिरकार्ये, वाणिज्ययोग हीं वणिक्करणीं करावीं. विष्टिकरणीं केलेलें कार्य शुभकारक होत नाहीं; परंतु शत्रूचा घात व विष, अग्नि यांचा प्रयोग हीं क्रूरकर्मे सिद्धीस जातात ॥७॥

कार्यंपौष्टिकमौषधादिशकुनौमूलानिमंत्रास्तथा
गोकार्याणिचतुष्पदेद्विजपितॄनुद्दिश्यराज्यानिच ।
नागेस्थावरदारुणानिहरणंदौर्भाग्यकर्माण्यतः
किंस्तुघ्नेशुभमिष्टपुष्टिकरणंमंगल्यसिद्धिक्रियाः ॥८॥

अर्थ—शरीरपुष्टिकारक, औषध तयार करणें व देणें इ० शकुनिकरणाचाठाई करावें. मूळें ( औषधी काढणें ) मंत्रप्रयोग इत्यादि, गोकार्ये, ब्राह्मण व पितर यांच्या उद्देशानें कर्मे, राजकार्ये, हीं चतुष्पदकरणीं करावीं. स्थिरकार्ये, क्रूरकर्मे, परधनग्रहण, दुर्भगत्व ( सर्वजनद्वेष्यत्व ) हीं कर्मे नागकरणीं करावीं. शुभकर्म, पुत्रकाम्यादि इष्टि, शरीरपुष्टिकरण, विवाहादि मंगलकार्यसिद्धि हीं किंस्तुघ्नकरणीं करावीं ॥८॥

॥ इतिश्रीवरा०बृहत्संहितायांतिथिकरणगुणानामैकोनशततमोध्यायः ॥९९॥

## ॥ अथविवाहनक्षत्रलग्ननिर्णयः ॥

रोहिण्युत्तररेवतीमृगशिरोमूलानुराधामघाह
स्तस्वातिषुषष्ठतौलिमिथुनेषूद्यत्सुपाणिग्रहः ।
सप्ताष्टांत्यबहिःशुभैरुडुपतावेकादशद्वित्रिगे
क्रूरैस्त्र्यायषडष्टगैर्नतुभृगौषष्ठेकुजेचाष्टमे ॥१॥

अर्थ—रोहिणी, उत्तरा, उ०षा०, उ०भा०, रेवती, मृगशीर्ष, मूळ, अनुराधा, मघा, हस्त, स्वाती या नक्षत्रीं; कन्या, मूळ, मिथुन या लग्नीं; विवाह करावा. लग्नापासून ७।८।१२ या स्थानांवांचून शुभग्रह असतां, ११।२।३ या स्थानीं चंद्र अ०, ३।११।६।८ या स्थानीं पापग्रह अ०, विवाह करावा. शुक्र ६ वा व भौम ८ वा शुभ नव्हे ॥१॥

दंपत्योर्द्विनवाष्टराशिरहितेचारानुकूलेरवौचं
द्रेचार्ककुजार्किशुक्रवियुतेमध्येथवापापयोः ।
त्यक्त्वाचव्यतिपातवैधृतदिनंविष्टिंचरिक्तां
तिथिंक्रूराहायनचैत्रपौषविरहेलग्नांशकेमानुषे ॥२॥

अर्थ–वधूचे राशीपासून वराची व वराचे राशीपासून वधूची राशि, दुसरी, नववी, व आठवी नसावी. सूर्यबळ असता, सूर्य, भौम, शनि, शुक्र याहींयुक्त चंद्र नसता व पापग्रहांच्यामध्ये चंद्र नसता, व्यतिपात, वैधृति, कल्याणी, रिक्तातिथि, हा सोडून पापग्रहाचे वार, दक्षिणायन, चैत्र, पौष यासोडून; लग्न व नवमांश हे द्विपदराशीचे असतां विवाह करावा ॥२॥

॥ इतिश्रीवरा०बृहत्संहितायांविवाहनक्षत्र
लग्ननिर्णयोनामशततमोध्यायः ॥१००॥

## ॥ अथनक्षत्रजातकं ॥

प्रियभूषणःसुरूपःसुभगोदक्षोश्विनीषुमतिमांश्च ।
कृतनिश्चयसत्यारुग्दक्षःसुखितश्चभरणीषु ॥१॥

अर्थ–अलंकारप्रिय, उत्तमरूपवान्, भाग्यवान्, चतुर, बुद्धिवान् असा अश्विनीनक्षत्रावाठाई जन्मलेला प्राणि होतो. कृतनिश्चय ( कार्याचा शेवट करणारा ), सत्यभाषी, रोगरहित, चतुर, सुखी असा भरणीनक्षत्रीं जन्मलेला होतो ॥१॥

बहुभुक्परदाररतस्तेजस्वीकृत्तिकासुविख्यातः ।
रोहिण्यांसत्यशुचिःप्रियंवदःस्थिरसुरूपश्च ॥२॥

अर्थ–बहुत भक्षण करणारा, परस्त्रीरत, तेजस्वी, कीर्तिवान् असा कृत्तिकानक्षत्रीं झालेला होतो. सत्यवक्ता, शुद्ध, प्रियबोलणारा, स्थिरबुद्धि, सुरूप असा रोहिणीन० जन्मतो ॥२॥

चपलश्चतुरोभीरुःपटुरुत्साहीधनीमृगेभोगी ।
शठगर्वितचंडकृतघ्नहिंस्रपापश्चरौद्रर्क्षे ॥३॥

अर्थ–चपलबुद्धि, चतुर, भित्रा, कुशल, आनंदी, धनवान, भोगयुक्त असा मृगनक्षत्रीं झालेला होतो. परकार्यविमुख, गर्वित, क्रोधी, कृतघ्न, हिंसा करणारा, पापी असा आर्द्रा नक्षत्रीं झालेला होतो ॥३॥

दांतःसुखीसुशीलोदुर्मेधारोगभाक्पिपासुश्च ।
अल्पेनचसंतुष्टःपुनर्वसौजायतेमनुजः ॥४॥

अर्थ–जितेंद्रिय, सुखी, उत्तम स्वभाव, दुष्टबुद्धि, रोगी, तृषार्त, अल्पाने संतुष्ट, असा पुनर्वसुनक्षत्रीं झालेला मनुष्य होतो ॥४॥

शांतात्मासुभगःपंडितोधनीधर्मसंश्रितःपुष्ये ।
शठसर्वभक्षपापःकृतघ्नधूर्तश्चभौजंगे ॥५॥

अर्थ–जितेंद्रिय, सर्वजनप्रिय, पंडित, धनवान्, धार्मिक असा पुष्यनक्षत्रीं झा० होतो. परकार्यविमुख, संचय न करणारा, पापी, दुर्जन, परवंचक, असा आश्लेषानक्षत्रीं झालेला होतो ॥५॥

बहुभृत्यधनोभोगीसुरपितृभक्तोमहोद्यमःपित्र्ये ।
प्रियवाग्दाताद्युतिमानटनोनृपसेवकोभाग्ये ॥६॥

अर्थ–बहुतसेवक, बहुतधन, भोगयुक्त, देव व पितर यांचा भक्त, महोत्साह असा मघानक्षत्रीं झा० हो०. प्रियभाषण, दाता, तेजस्वी, भ्रमणशील, राजसेवक, असा पूर्वाफल्गुनीनक्षत्रीं झालेला होतो ॥६॥

सुभगोविद्याप्तधनोभोगीसुखभाक्द्वितीयफल्गुन्यां ।
उत्साहीधृष्टःपानपोघृणीतस्करोहस्ते ॥७॥

अर्थ–सर्वजनप्रिय, विद्येने प्राप्तधन, भोगयुक्त, सुखी असा उ० फ० नक्षत्रीं झा० हो०. आनंदी, धीट, मद्यपानासक्त, निर्दय, चोर असा हस्तनक्षत्रीं झा० हो०॥७॥

चित्रांबरमाल्यधरःसुलोचनांगश्चभवतिचित्रायां ।
दांतोवणिक्कृपालुःप्रियवाग्धर्माश्रितःस्वातौ ॥८॥

अर्थ–चित्रवर्णवस्त्र व मालाधारक, सुंदरनेत्र व शरीर, असा चित्रानक्षत्रीं झा०हो०. इंद्रियदमनशील, क्रयविक्रय जाणणारा, कृपालु, प्रियभाषण, धार्मिक असा स्वातीनक्षत्रीं झालेला होतो ॥८॥

ईर्ष्युर्लुब्धोद्युतिमान्वचनपटुःकलहकृद्विशाखासु ।
आढ्योविदेशवासीक्षुधालुरटनोनुराधासु ॥९॥

अर्थ–परवृद्धि न सहनकरणारा, लोभी, तेजस्वी, वक्ता, कलहकर्ता, असा विशाखानक्षत्रीं झालेला होतो. धनी, परदेशीं रहाणारा, भुकाळु, भ्रमणशील, असा अनुराधानक्षत्रीं झालेला होतो ॥९॥

ज्येष्ठासुनबहुमित्रःसंतुष्टोधर्मकृत्प्रचुरकोपः ।

मूलेमानीधनवान्सुखीनहिंस्रःस्थिरोभोगी ॥१०॥

अर्थ–अल्पमित्र, संतुष्ट, धर्मपर, बहुक्रोधवान् असा ज्येष्ठान० झा० हो०. अभिमानी, धनवान्, सुखी, क्रूर नव्हे, स्थिरबुद्धि, भोगयुक्त असा मूलन० झालेला होतो ॥१०॥

इष्टानंदकलत्रोवीरोदृढसौहृदश्चजलदेवे ।
वैश्वेविनीतधार्मिकबहुमित्रकृतज्ञसुभगश्च ॥११॥

अर्थ–आनद व स्त्री हीं प्रिय ज्यास असा, संग्रामशूर, स्थिरमित्र असा पू०षा०न० झा० हो०. नम्र, धार्मिक, बहुमित्र, प्रत्युपकारी, सर्वलोकप्रिय असा उ०. षा० नक्षत्रीं झालेला होतो ॥११॥

श्रीमान्श्रवणेश्रुतवानुदारदारोधनान्वितःख्यातः ।
दाताढ्यशूरगीतप्रियोधनिष्ठासुधनलुब्धः ॥१२॥

अर्थ–लक्ष्मीवान्, पंडित, उदार आहे स्त्री ज्याची असा, द्रव्यवान्, कीर्तियुक्त, असा श्रवणन० झा० हो०. दानशूर, अभिमानी, शूर, गायनप्रिय, धनलोभी असा धनिष्ठानक्षत्रीं झालेला होतो ॥१२॥

स्फुटवाग्व्यसनीरिपुहासाहसिकःशतभिषक्षुदुर्ग्राह्यः ।
भद्रपदासूद्विग्नःस्त्रीजितधनपटुरदाताच ॥१३॥

अर्थ–निष्ठुरभाषणकर्ता, स्त्रियादिव्यसनी, शत्रुहंता, साहसकर्मकर्ता, दुराराध्य, (कोणी ज्याशीं स्नेह करूं शकत नाहीं) असा शततारकानक्षत्रीं झालेला होतो. दुःखी, स्त्रीनें जिंकिलें आहे धन ज्याचें असा, कुशल, लोभी असा पू० भा० न० झालेला होतो ॥१३॥

वक्तासुखीप्रजावान्जितशत्रुर्धार्मिकोद्वितीयासु ।
संपूर्णांगःसुभगःशूरःशुचिरर्थवान्पौष्णे ॥१४॥

अर्थ–वक्ता, सुखी, पुत्रपौत्रादियुक्त, शत्रूस जिंकणारा, धार्मिक असा उ० भा० न० झा० होतो. अविकलशरीर, सौभाग्यवान्, शूर, पवित्र, द्रव्यवान्, असा रेवतीनक्षत्रीं झालेला प्राणी होतो ॥१४॥

इतिश्रीवरा०बृहत्संहितायांनक्षत्रजातकंनामैकोत्तरशततमोध्यायः ॥१०१॥

---

## ॥ अथराशिप्रविभागः ॥

अश्विन्योथभरण्योवहुलापादश्चकीर्त्यतेमेपः ।
वृपभोवहुलाशेपंरोहिण्यर्धंचमृगाशिरसः ॥१॥

अर्थ–अश्विनी, भरणी, कृत्तिकेचा प्रथमपाद अशी मेपराशि होत्ये. कृत्तिकाचे तीन चरण, रोहिणी, मृगशीर्पाचें पूर्वार्ध अशी वृपभराशि होत्ये ॥१॥

मृगशिरसोर्धंरौद्रंपुनर्वसोश्चांशकत्रयंमिथुनं ।
पादश्चपुनर्वसोःसतिष्योश्लेपाचकर्कटकः ॥२॥

अर्थ–मृगशीर्पाचे उत्तरार्ध, आर्द्रा, पुनर्वसूचे प्रथम तीन चरण अशी मिथुनराशि होत्ये. पुनर्वसूचा अंत्यचरण, पुष्य, आश्लेपा, कर्कराशि होत्ये ॥२॥

सिंहोथमघापूर्वाचफल्गुनीपादउत्तरायाश्च ।
तत्परिशेपंहस्तश्चित्राद्यर्धंचकन्याख्यः ॥३॥

अर्थ–मघा, पूर्वा, उत्तराचा प्रथमचरण, सिंहराशि होत्ये. उत्तराचे तीन चरण, हस्त, चित्राचें प्रथमार्ध, कन्याराशि होत्ये ॥३॥

तौलिनिचित्रांत्यार्धंस्वातिःपादत्रयंविशाखायाः ।
अलिनिविशाखापादस्तथानुराधान्विताज्येष्ठा ॥४॥

अर्थ–चित्राचें अंत्यार्धं, स्वाति, विशाखाचे प्रथम तीन चरण, तुळराशि होत्ये. विशाखाचा अंत्यचरण, अनुराधा, ज्येष्ठा वृश्चिकराशि होत्ये ॥४॥

मूलमपाढापूर्वाप्रथमश्चाप्युत्तरांशकोधन्वी ।
मकरस्तत्परिशेपंश्रवणःपूर्वंधनिष्ठार्धं ॥५॥

अर्थ–मूळ, पू० पा०, उत्तरापाढाचा प्रथमचरण, धनराशि होत्ये. उत्तरापाढाचे अन्य तीन चरण, श्रवण, धनिष्ठाचें पूर्वार्ध, मकरराशि होत्ये ॥५॥

कुंभोंत्यधनिष्ठार्धंशततभिपगंशत्रयंचपूर्वायाः ।
भद्रपदायाःशेपंतथोत्तरारेवतीचझपः ॥६॥

अर्थ–धनिष्ठाचें अंत्यअर्ध, शततारका, पूर्वाभाद्रपदाचे प्रथम तीन चरण, कुंभराशि होत्ये. पू० भा० चा अंत्यचरण, उ० भा०, रेवती अशी मीनराशि होत्ये ॥६॥

अश्विनीपित्र्यमूलाद्यामेपसिंहहयादयः ।
विपमर्क्षान्निवर्ततेपादवृत्थ्यायथोत्तरं ॥७॥

अर्थ—अश्विनी, मघा, मूळ या नक्षत्रापासून अनुक्रमानें मेष, सिंह, धन या राशी विषम ( तिसरे, पाचवें व सातवें ) नक्षत्रावर उत्तरोत्तर पादवृद्धीनें ( एक पाद, २ पाद, ३ पाद, ४ पाद याप्र० ) समाप्त होतात. ( क्र० १ पाद मेष. मृग २ पाद वृषभ. पुन० ३ पाद मिथुन. आश्लेषा ४ पा.कर्क.उत्तरा१ पाद सिंह. चित्रा २ पा. कन्या. विशा. ३पा.तूळ. ज्येष्ठा ४ पाद वृश्चिक. उ. पा. १ पाद धन. धनि. २ पा. मकर. पू. भा. ३ पा. कुंभ. रेवती ४ पा. मीन ) ॥७॥

इतिवृ०राशिप्रविभागोनामद्व्युत्तरशततमोध्यायः ॥१०२॥

## ॥ अथविवाहपटलं ॥

मूर्तौकरोतिदिनकृद्विधवांकुजश्चराहुर्विपन्नतनयांर
विजोदरिद्रां । शुक्रःशशांकतनयश्चगुरुश्चसाध्वी
मायुःक्षयंप्रकुरुतेथविभावरीशः ॥१॥

अर्थ—विवाहमुहूर्तलग्नीं सूर्य अथवा मंगळ असेल तर कन्या विधवा होते. राहु असे० मृतपुत्रा, शनि अ० निर्धना, शुक्र, बुध, गुरु हे अ० पतिव्रता; चंद्र अ० आयुष्यनाश हीं फळें होतात ॥१॥

कुर्वंतिभास्करशनैश्चरराहुभौमादारिद्र्यदुःखमतुलं
नियतंद्वितीये । वित्तेश्वरीमविधवांगुरुशुक्रसौम्या
नारींप्रभूततनयांकुरुतेशशांकः ॥२॥

अर्थ—विवाहलग्नापासून द्वितीयस्थानीं सूर्य, शनि, राहु, मंगळ, यांतील असला तर बहुत दारिद्र्यदुःख होतें. गुरु, शुक्र, बुध यांतून अ० धनयुक्त व सौभाग्यवती होते. चंद्र अ० बहुत पुत्रवती अशी कन्या होते ॥२॥

सूर्येंदुभौमगुरुशुक्रबुधास्तृतीयेकुर्युःसदाबहुसुतांधन
भागिनींच । व्यक्तंदिवाकरसुतःसुभगांकरोतिमृत्युं
ददातिनियमात्खलुसैंहिकेयः ॥३॥

अर्थ—विवा० तृतीयस्थानीं सूर्य, चंद्र, मंगळ, गुरु, शुक्र, बुध, यांतून अ० बहुपुत्रवती व धनवती अशी कन्या होते. शनि अ० सौभाग्ययुक्त होते. राहु अ० नियमानें मृत्यु होतो ॥३॥

स्वल्पंपयःस्रवतिसूर्यसुतेचतुर्थेदौर्भाग्यमुष्णकिरणः

कुरुतेशशीच । राहुःसपत्न्यमपिचक्षितिजोल्पवित्तां
दद्याद्भृगुःसुरगुरुश्चबुधश्चसौख्यं ॥४॥

अर्थ–विवा० चतुर्थस्थानीं शनि अ० अल्पदुग्धवती होत्ये. सूर्य अथवा चंद्र अ० दुर्भगत्व होते. राहु अ० शत्रुत्व होते. मगळ अ० अल्पधनवती होत्ये. शुक्र, गुरु, बुध यांतून अ० सौख्ययुक्त कन्या होत्ये ॥४॥

नष्टात्मजांरविकुजौखलुपंचमस्थौचंद्रात्मजोवहुसु
तांगुरुभार्गवौच । राहुर्ददातिमरणंशनिरुग्ररोगंक
न्याप्रसूतिमचिरात्कुरुतेशशांकः ॥५॥

अर्थ–वि० ल० पासून पंचमस्थानीं सूर्य किंवा मंगळ असेल तर नष्टपुत्रा, बुध, गुरु, शुक्र यांतून अ० बहुपुत्रा; राहु अ० मरण, शनि अ० भयंकर रोग, चंद्र अ० कन्याप्रसूति, हीं फळें होतात ॥५॥

षष्ठाश्रिताःशनिदिवाकरराहुजीवाःकुर्युःकुजश्चसुभ
गांश्वशुरेषुभक्तां । चंद्रःकरोतिविधवामुशनादरिद्रा
मृद्धांशशांकतनयःकलहप्रियांच ॥६॥

अर्थ–विवा० षष्ठस्थानीं शनि, सूर्य, राहु, गुरु, मंगळ यांतून असेल तर सुभगा व सासु सासरा इत्यादिकांची भक्त अशी कन्या होत्ये. चंद्र अ० विधवा, शुक्र अ० दरिद्रा, बुध अ० सधना व कलहप्रिया अशी कन्या होत्ये ॥६॥

सौरारजीवबुधराहुरवींदुशुक्राःकुर्युःप्रसह्यखलु
सप्तमराशिसंस्थाः । वैधव्यवंधनवधक्षयमर्थ
नाशंव्याधिप्रवासमरणानियथाक्रमेण ॥७॥

अर्थ–वि० ल० पासून सप्तमस्थानीं शनि, मंगळ, गुरु, बुध, राहु, सूर्य, चंद्र, शुक्र हे ग्रह असले तर अनुक्रमानें वैधव्य, बंधन, वध, नाश, अर्थनाश, रोग, प्रवास, मरण हीं फळें होतात ॥७॥

स्थानेष्टमेगुरुबुधौनियतंवियोगंमृत्युंशशीभृगु
सुतश्चतथैवराहुः । सूर्यःकरोत्यविधवांसरुजं
महीजःसूर्यात्मजोधनवतींपतिवल्लभांच ॥८॥

अर्थ–विवा० अष्टमस्थानीं गुरु किंवा बुध असेल तर निरंतर स्त्रीपुरुषांचा वियोग होतो. चंद्र, शुक्र, राहु, यांतून असेल तर मृत्यु होतो. सूर्य असेल तर सौभाग्यवती, मगळ अ० रोगयुक्त, शनि अ० धनवती व पतिप्रिय अशी होत्ये ॥८॥

धर्मेस्थिताभृगुदिवाकरभूमिपुत्राजीवश्चधर्मनि
रतांशशिजस्त्वरोगां। राहुश्चसूर्यतनयश्चकरोति
वंध्यांकन्याप्रसूतिमटनंकुरुतेशशांकः ॥९॥

अर्थ—विवाह० नवमस्थानीं शुक्र, सूर्य, मगळ, गुरु यातून असेल तर धर्मपर, बुध अ० रोगरहित, राहु किंवा शनि असेल तर वध्या, चद्र अ० कन्याप्रसूति व भ्रमणशील अशी होये ॥९॥

राहुर्नभस्तलगतोविधवांकरोतिपापेरतांदिनकर
श्चशनैश्चरश्च । मृत्युंकुजोर्थरहितांकुलटांचचंद्रः
शेषाग्रहाधनवतींसुभगांचकुर्युः ॥१०॥

अर्थ—विवा० दशमस्थानीं राहु असेल तर विधवा, सूर्य किंवा शनि अ० पापपर, मगळ अ० मृत्यु, चद्र अ० द्रव्यरहित व कुलटा ( जारिणी ), शेष राहिलेले ग्रह ( बुध, गुरु, शुक्र ) असतील तर धनवती व सुभगा अशी कन्या होये ॥१०॥

आयेरविर्बहुसुतांधनिनींशशांकःपुत्रान्वितांक्षिति
सुतोरविजोधनाढ्यां। आयुष्मतींसुरगुरुःशशि
जःसमृद्धांराहुःकरोत्यविधवांभृगुरर्थयुक्तां ॥११॥

अर्थ—विवा० एकादशस्थानीं सूर्य असे० बहुपुत्रवती, चद्र अ० धनयुक्त, मगळ अ० पुत्रयुक्त, शनि अ० धनयुक्त, गुरु अ० चिरजीवी, बुध अ० धनयुक्त, राहु अ० अविधवा, शुक्र अ० द्रव्ययुक्त अशी कन्या होये ॥११॥

अंतेगुरुर्धनवतींदिनकृद्दरिद्रांचंद्रोधनव्ययकरींकु
लटांचराहुः। साध्वींभृगुःशशिसुतोबहुपुत्रपौत्रां
पानप्रसक्तहृदयांरविजःकुजश्च ॥१२॥

अर्थ—विवा० द्वादशस्थानीं गुरु असे० धनयुक्त, सूर्य अ० दरिद्री, चद्र अ० द्रव्यनाश करणारी, राहु अ० जारिणी, शुक्र अ० पतिव्रता, बुध अ० बहुत पुत्र पौत्र यांनीं युक्त, शनि किंवा मगळ यांतून असेल तर मद्यपानरत अशी कन्या होये ॥१२॥

गोपैर्यष्ट्याहतानांखुरपुटदलितायातुधूलिर्दिनांते
तेसोद्वाहेसुंदरीणांविपुलधनसुतारोग्यसौभाग्य
कर्त्री । तस्मिन्कालेनचर्क्षंनचतिथिकरणंनैव

लग्नंनयोगःस्यातःपुंसांसुखार्थंशमयतिदुरिता
न्युत्थितंगोरजस्तु ॥१३॥

अर्थ—गाई राखणारांनीं काठीनें ताडित ज्या गाई त्यांच्या खुराग्रांनीं विदारित जो सायंकालीं धूलि ती ( तो गोधूलि मुहूर्त ) कन्यांच्या विवाहीं बहुतधन, पुत्र, आरोग्य, सौभाग्य यांतें करत्ये. त्या गोधूलिमुहूर्तीं विवाहोक्त नक्षत्र, तिथि, करण, लग्न, योग, हीं पाहू नये. तो मुहूर्त पुरुषांच्या सुखार्थ सांगीतला आहे. त्या मुहूर्तीं उत्पन्न झालेले गोरज दोषांतें शमवितें ॥१३॥

॥ इतिश्रीवराहमिहिरकृतौबृहत्संहितायांविवाहपट
लंनामत्र्युत्तरशततमोध्यायः ॥१०३॥

## ॥ अथग्रहगोचराध्यायः ॥

प्रायेणसूत्रेणविनाकृतानिप्रकाशरंध्राणिचिरं
तनानि । रत्नानिशास्त्राणिचयोजितानिन
वैर्गुणैर्भूषयितुंक्षमाणि ॥१॥

अर्थ—बहुतकरून सूत्रानें ( सुतानें ) रहित, प्राचीन ( जीर्ण ), प्रकटच्छिद्र अशीं रत्नें नव्या गुणानीं ( दोऱ्यानीं ) युक्त केलीं असतां, शोभविण्याविषयीं योग्य होतात. तशीं बहुतकरून सूत्रानें रहित, प्रकाशित आहेत अपशब्द ( अशुद्धें ) ज्यांचे अशीं प्राचीन शास्त्रें नव्या श्रवणीयवस्तु ( शब्द ) रचनेनें योजिलीं असतां पठन करण्यास योग्य होतात ॥१॥

प्रायेणगोचरोव्यवहार्योतस्तत्फलानिवक्ष्यामि ।
नानावृत्तैस्तन्नोमुखचपलत्वंक्षमंत्वार्याः ॥२॥

अर्थ—बहुतकरून ग्रहगोचराचा ( ग्रहपाण्याचा ) व्यवहारांत उपयोग फार होतो यास्तव त्याचीं फलें अनेकवृत्तांनीं सांगतों; ह्या माझ्या मुखचपलत्वातें ( बहुभाषणातें ) पंडित सहन करोत ( ह्या आर्येचा मुखचपलाछंद हेंही यांत सुचविलें असेंच पुढेंही आहे ) ॥२॥

मांडव्यगिरंश्रुत्वानमदीयारोचतेयवानैवं ।
साध्वीतथानपुंसांप्रियायथास्याज्जघनचपला ॥३॥

अर्थ—मांडव्यकृषीचें भाषण श्रवण करून, माझें भाषण लोकांस गोड लागणार

नाहीं. अथवा असें नव्हे. जशी जघनचपला ( वेश्या ) प्रिय होते; तशी पतिव्रता स्त्री पुरुषास प्रिय होत नाहीं. ( असा स्वभावच आहे यास्तव माझे नीरसही भाषण प्रिय होईल. असा अभिप्राय ) ॥३॥

सूर्यःषट्त्रिदशस्थितस्त्रिदशषट्सप्ताद्यगश्चंद्रमाजी
वःसप्तनवद्विपंचमगतोवक्रार्कजौषट्त्रिगौ । सौ
म्यःषड्द्विचतुर्दशाष्टमगतःसर्वेप्युपांतेशुभाःशुक्रः
सप्तमषड्दशर्क्षसहितःशार्दूलवत्त्रासकृत् ॥४॥

अर्थ–सूर्य जन्मराशीपासून ६।३।१० यास्थानीं शुभ होय. चंद्र ३।१०।६।७।१ यास्थानीं शुभ. गुरु ७।९।२।५ या स्थानीं शुभ. मंगळ व शनि ६।३ यास्थानीं शुभ. बुध ६।२।४।१०।८ या स्थानीं शुभ. सूर्यादि सर्व ग्रह ११ वे शुभ होत. शुक्र ७।६।१० या स्थानीं असतां सिंहासारखा त्रास करतो, यास्तव अशुभ होय. अर्थात् इतरस्थानीं शुभ होय. ( हें शार्दूलविक्रीडित वृत्त ) ॥४॥

जन्मन्यायासदोर्कःक्षपयतिविभवान्कोष्ठरोगाध्वदा
ताविचभ्रंशंद्वितीयेदिशतिचनसुखंवंचनांदृग्रुजंच ।
स्थानप्राप्तिंतृतीयेधननिचयमुदाकल्यकृच्चारिहंतारो
गान्धत्तेचतुर्थेजनयतिचमुहुःस्रग्धराभोगविघ्नं ॥५॥

अर्थ–सूर्य जन्मराशीस अ० उपद्रव देतो, ऐश्वर्यनाश करतो, उदररोग व मार्ग गमन यातें देतो. जन्मराशीपासून द्वितीयस्थानीं अ० द्रव्यनाशकारक, सुख देत नाहीं, वचना ( ठकवणें ) व नेत्ररोग यातें देतो. तृतीयस्थानीं अ० स्थानलाभ, द्रव्यसमूहानें आनंद व अरोगित्व करतो, शत्रूचा नाश करतो. चतुर्थस्थानीं अ० रोग करतो, वारंवार स्त्रीसंभोगास विघ्न उत्पन्न करतो ( हें स्रग्धरावृत्त ) ॥५॥

पीडाःस्युःपंचमस्थेसवितरिबहुशोरोगारिजनिताः
षष्ठेर्कोहंतिरोगान्क्षपयतिचरिपूञ्छोकांश्चनुदति ।
अध्वानंसप्तमस्थोजठरगदभयंदैन्यंचकुरुतेरुक्त्रा
सौचाष्टमस्थेभवतिसुवदनानस्वापिवनिता ॥६॥

अर्थ–सूर्य पंचमस्थानीं अ० रोग व शत्रु यापासून झालेल्या बहुत पीडा होतात. सूर्य षष्ठस्थानीं अ० रोगनाश, शत्रुक्षय, शोकनाश यातें करतो. सप्तमस्थानीं अ० मार्गगमन, उदररोगाचें भय, दैन्य यातें करतो अष्टमस्थानीं असतां रोगवभयही होतात. आपली स्त्रीही शोभनमुखी (आनंदयुक्त) होत नाहीं. हें (सुवदनावृत्त)॥६॥

रवावापद्दैन्यंरुगितिनवमेचित्तचेष्टाविरोधोजयंप्रा
प्नोत्युग्रंदशमगृहगेकर्मसिद्धिंक्रमेण । जयंस्थानंमा
नंविभवमपिचैकादशेरोगनाशंसुवृत्तानांचेष्टाभव
तिसफलाद्वादशेनेतरेषां ॥७॥

अर्थ—सूर्य नवमस्थानीं अ० विपत्ति, दैन्य, रोग, चित्तव्यापारांचा नाश, हे होतात. दशमस्थानीं अ० उत्तमजय, क्रमानें कार्यांची सिद्धि हीं प्राप्त होतात. एकादशस्थानीं अ०जय, स्थान, मान, ऐश्वर्य, रोगनाश हे होतात. द्वादशस्थानीं अ०सुस्वभावपुरुषांचीं कर्मे सफल होतात. इतरांचीं सफल होत नाहीत (सुवृत्तछंद)॥७॥

शशीजन्मन्यन्नप्रवरशयनाच्छादनकरोद्वितीये
मानार्थौग्लपयतिसविघ्नश्चभवति । तृतीये
वस्त्रस्त्रीधननिचयसौख्यानिलभतेचतुर्थेविश्वा
सःशिखरिणिभुजंगेनसदृशः ॥८॥

अर्थ—चंद्र जन्मराशीस असतां भोजन, उत्तमशय्या, वस्त्र हीं प्राप्त होतात. जन्मराशीपासून द्वितीयस्थानीं अ० मान व द्रव्य यांचा नाश करतो व बहुत विघ्नें होतात. तृतीयस्थानीं अ० वस्त्र, स्त्री, द्रव्यसमूह, सौख्य हीं प्राप्त होतात. चतुर्थस्थानीं अ०, पर्वतावर सर्प असतां तेथें जाण्याचा जसा अविश्वास होतो तसा, लोकांचा अविश्वास होतो. ( हें शिखरिणीवृत्त ) ॥८॥

दैन्यंव्याधिंशुचमपिशशीपंचमेमार्गविघ्नंषष्ठे
वित्तंजनयतिसुखंशत्रुरोगक्षयंच । यानंमा
नंशयनमशनंसप्तमेवित्तलाभंमंदाक्रांतेफणि
निहिमगौचाष्टमेभीर्नकस्य ॥९॥

अर्थ—चंद्र जन्मराशीपासून पंचमस्थानीं अ० दैन्य, व्याधि, शोक, मार्गांत विघ्न हीं होतात. षष्ठस्थानीं अ० द्रव्य, सुख, शत्रु, रोग यांचा नाश होतो. सप्तमस्थानीं अ० वाहन, पूजा, शय्या, भोजन, द्रव्य यांचा लाभ होतो. अष्टमस्थानीं चंद्र, अल्प जोरानें सर्प धरला तर कोणास भय करीत नाहीं स० सर्वांस भय करतो, तसें भय करतो ( हें मंदाक्रांतवृत्त ) ॥९॥

नवमगृहगोवंधोद्वेगश्रमोदररोगकृद्दशमभव
नेचाज्ञाकर्मप्रसिद्धिकरः । उपचयसुत्दृत्सं

**योगार्थप्रमोदमुपांत्यगोवृषभचरितान्दोपा नंतकरोतिहिसव्ययान् ॥१०॥**

अर्थ–चद्र नवमस्थानीं अ० बधन, उद्वेग, श्रम, उदररोग यातें करतो. दशमस्थानीं अ० प्रभुत्व व कर्मसिद्धि हीं करतो. एकादशस्थानीं अ० वृद्धि, मित्रप्राप्ति, अर्थलाभ, आनद यातें करतो. द्वादशस्थानीं अ० वृषभानें केलेलें पादताडन, शृंगानें ताडन इ० दुःख व व्यय यातें करतो ( हें वृषभचरितवृत्त ) ॥१०॥

**कुजेभिघातःप्रथमेद्वितीयेनरेंद्रपीडाकलहा दिदोपैः । भृशंचपित्तानलरोगचौरैरुपेंद्रवज्र प्रतिमोपियःस्यात् ॥११॥**

अर्थ–मगळ जन्मराशीस अ० उपद्रव होतो. द्वितीयस्थानीं अ० राजापासून पीडा, कलह इ० दोपानीं व पित्त, अग्नि, रोग, चोर यांणीं अत्यत उपद्रव, जरी नारायण व वज्र यांसारखा असेल तथापि होईल. ( हें उपेंद्रवज्रवृत्त ) ११

**तृतीयगश्चोरकुमारकेभ्योभौमःसकाशात्फल मादधाति । प्रदीप्तिमाज्ञांधनमौर्णिकानिधा त्वाकराख्यानिकिलापराणि ॥१२॥**

अर्थ–मगळ तृतीयस्थानीं अ० चोर व कुमार ( ८ वर्षांपर्यंत ) यांपासून शुभफल करतो. कांति, प्रभुत्व, धन, कबलादिवस्त्रें, सुवर्णादि धातूचीं उत्पत्तिस्थानें व अन्य स्थानें यातें देतो. ( हें उपजातिवृत्त ) ॥१२॥

**भवतिधरणिजेचतुर्थगेज्वरजठरगदासृगुद्भवः । कुपुरुपजनिताचसंगमात्प्रसभमपिकरोतिचाशुभं॥१३॥**

अर्थ–मगळ चतुर्थस्थानीं अ० ज्वर, उदररोग, रक्तस्राव हीं उत्पन्न होतात व दुष्टपुरुषाच्या सगतीपासून बहुत अकल्याणही होतें. ( हें प्रसभवृत्त) ॥१३॥

**रिपुगदकोपभयानिपंचमेतनयकृताश्वशुचो महीसुते । द्युतिरपिनास्यचिरंभवेत्स्थिरा शिरसिकपेरिवमालतीकृता ॥१४॥**

अर्थ–मगळ पचमस्थानीं अ० शत्रु, रोग, क्रोध, भय, पुत्रानें केलेले शोक हे होतात व जसें वानराच्या मस्तकीं ठेवलेलें मालती (मोगरी) पुष्प चचलतास्तव स्थिर रहात नाहीं तसें याचें तेजही चिरकाल स्थिर रहात नाहीं. ह्मणजे तेजहीन पुरुष होतो. ( हें मालतीवृत्त ) ॥१४॥

रिपुभयकलहैर्विवर्जितःसकनकविद्रुमताम्रकागमः।
रिपुभवनगतेमहीसुतेकिमपरंवक्त्रविकारमीक्षते ॥१५॥

अर्थ–मंगळ षष्ठस्थानीं अ० शत्रु, भय, कलह यांहीं रहित होतो व सुवर्ण, पोवळें, तांबें यांची प्राप्ति होत्ये. असा पुरुष अन्याचें दुर्मुख कधींही पाहणार नाहीं. ( हें अपरवक्त्रवृत्त ) ॥१५॥

कलत्रकलहाक्षिरुग्जठररोगकृत्सप्तमेक्षरत्
क्षतजरूक्षितःक्षयितवित्तमानोष्टमे । कुजेन
वमसंस्थितेपरिभवार्थनाशाविभिर्विलंबित
गतिर्भवत्यबलदेहधातुक्रमैः ॥१६॥

अर्थ–मंगळ सप्तमस्थानीं अ० स्त्रीबरोबर कलह, नेत्ररोग, उदररोग, हे होतात. अष्टमस्थानीं अ० स्रवणाऱ्या रक्तानें विवर्ण ( तेजरहित ), धन व मान यांहींरहित असा होतो. नवमस्थानीं अ० पराजय, द्रव्यनाश, पीडा इत्यादिकांनीं व निर्बलत्वानें व शरीराच्या धातुक्षयानें विलंबित ( विप्रयुक्त ) आहे गति ( गमन ) ज्याची असा होतो. ( हें विलंबितगतिवृत्त ) ॥१६॥

दशमगृहगतेसमंमहीजेविविधधनाप्तिरुपांत्यगेजयश्च ।
जनपदमुपरिस्थितश्चभुंक्तेवनमिवषट्चरणःसुपुष्पिताग्रं।

अर्थ–मंगळ दशमस्थानीं अ० सम ( फार शुभ व अशुभ नाहीं ) होतें. एकादशस्थानीं अ० नानाप्रकारच्या द्रव्यांची प्राप्ति व जय हे होतात व श्रेष्ठत्वानें सर्व लोकांच्या मस्तकीं राहून, भ्रमर बहुत फुललेलें आहे अग्र ज्याचें अशा अरण्यातें जसा भोगितो तसा देशाचा उपभोग करतो. ( हें पुष्पिताग्रवृत्त ) ॥१७॥

नानाव्ययैर्द्वादशगेमहीसुतेसंताप्यतेनर्थशतै
श्चमानवः । स्त्रीकोपपित्तैश्चसनेत्रवेदनैर्योपी
द्रवंशाभिजनेनगर्वितः ॥१८॥

अर्थ–मंगळ द्वादशस्थानीं असतां, अनेक प्रकारच्या खर्चांनीं व शेंकडों अनर्थांनीं ( उपद्रवांनीं ) मनुष्य संताप पावतो व श्रेष्ठवंशाच्या बांधवत्वानें गर्वितही मनुष्य स्त्रीचा कोप, पित्त, नेत्रपीडा यांहींकरून संताप पावतो. ( हें इंद्रवंशावृत्त ) ॥१८॥

दुष्टवाक्यपिशुनाहितभेदैर्वधनैःसकलहैश्चरह
तस्वः । जन्मगेशशिसुतेपथिगच्छन्स्वागते
पिकुशलंनशृणोति ॥१९॥

अर्थ—बुध जन्मराशीस अ० दुष्टवाक्य, दुर्जन, शत्रु, भेद ( फुटाफुट ), बंधन, कलह यांहींकरून निर्धन होतो. व मार्गामध्यें जात असतां, खुशाल आलों, असें सांगितलेलेंही कोणी श्रवण करीत नाहीं ( हें स्वागतावृत्त ) ॥१९॥

परिभवोधनगतेधनलब्धिःसहजगेशशिसुते
सुहृदाप्तिः । नृपतिशत्रुभयशंकितचित्तोद्रुत
पदंव्रजतिदुश्चरितैःस्वैः ॥२०॥

अर्थ—बुध द्वितीयस्थानीं अ० पराजय व धनलाभ हे होतात. तृतीयस्थानीं अ० मित्रप्राप्ति होते. आपल्या वाईट आचरणांनीं व राजा, शत्रु यांच्या भयानें शंकितचित्त होत्साता शीघ्र गमन करतो. ( अपराधी यास्तव पळतो ) (हें द्रुतपदवृत्त)२०

चतुर्थगेस्वजनकुटुंबवृद्धयोधनागमोभवतिच
शीतरश्मिजे । सुतस्थितेतनयकलत्रविग्रहो
निषेवतेनचरुचिरामपिस्त्रियं ॥२१॥

अर्थ—बुध चतुर्थस्थानीं अ० स्वजन व कुटुंब यांची वृद्धि व द्रव्यलाभ हीं होतात. पंचमस्थानीं अ० पुत्र व स्त्री यांबरोबर कलह होतो व सुंदरही स्त्रीचें ग्रहण विशीहीनास्तव करीत नाहीं ( हें रुचिरावृत्त ) ॥२१॥

सौभाग्यंविजयमथोन्नतिंचषष्ठेवैवर्ण्यंकलह
मतीवसप्तमेज्ञः । मृत्युस्थेसुतजयवस्त्रवित्त
लाभानैपुण्यंभवतिमतिप्रहर्षणीयं ॥२२॥

अर्थ—बुध षष्ठस्थानीं अ० सौभाग्य, विजय, उन्नति हीं होतात. सप्तमस्थानीं अ० विवर्णत्व, कलह, हे अतिशयित होतात. अष्टमस्थानीं अ० सुत, जय, वस्त्र, द्रव्य यांचा लाभ होतो व जेणेंकरून बुद्धीला आनंद होतो असें निपुणत्व होतें ( हें प्रहर्षणीवृत्त ) ॥२२॥

विघ्नकरोनवमःशशिपुत्रःकर्मगतोरिपुहाधनदश्च ।
सप्रमदंशयनंचविधत्तेतन्नहदोथकुथास्तरणंच ॥२३॥

अर्थ—बुध नवमस्थानीं अ० सर्व कार्यांस विघ्न करतो. दशमस्थानीं अ० शत्रुहंता व धनदाता होतो, स्त्रीयुक्त शय्या, स्त्रीगृह यांतें देतो, अनेकरंगांच्या कंबलाचें आस्तरण ( शय्या ) ही देतो ( हें दोधकवृत्त ) ॥२३॥

धनसुखसुतयोषिन्मित्रवाह्याप्तितुष्टिस्तुहिनकिरणपु

त्रैलाभगेमृष्टवाक्यः । रिपुपरिभवरोगैःपीडितोद्वाद
शस्थेनसहतिपरिभोक्तुंमालिनीयोगसौख्यं ॥२४॥

अर्थ–बुध एकादशस्थानीं अ० धन, सुख, पुत्र, स्त्री, मित्र, अश्वादिवाहन, यांच्या लाभानें संतोष होतो व सुंदर भाषण होतें. द्वादशस्थानीं अ० शत्रु, पराजय, रोग यांहीं पीडित होत्साता स्त्रीभोगाचें सौख्य भोगण्यास समर्थ होत नाहीं (हें मालिनीवृत्त) ॥२४॥

जीवेजन्मन्यपगतधनधीःस्थानभ्रष्टोबहुकलहयुतः ।
प्राप्यार्थैर्थान्मुनिरपिकुरुतेकांतास्याब्जेभ्रमरविलसितं ॥

अर्थ–गुरु जन्मराशीस अ० धन व बुद्धि हीं जातात, स्थानच्युत व बहुत कलह युक्त होतो. द्वितीयस्थानीं अ० धन प्राप्त होऊन, मुनीही स्त्रीच्या मुखकमलीं भ्रमरासारखें विलसित (विलास चुंबनादि) करतो. (हें भ्रमरविलसितवृत्त) २५

स्थानभ्रंशात्कार्यविघाताच्चतृतीयेनैकैःक्लेशैर्बं
धुजनोत्थैश्चचतुर्थे । जीवेशांतिंपीडितचित्तश्च
सविंदेन्नैवग्रामेनापिवनेमत्तमयूरे ॥२६॥

अर्थ–गुरु तृतीयस्थानीं अ० स्थानभ्रंश व कार्यनाश यांणीं पीडितचित्त होतो. चतुर्थस्थानीं अ० बंधुजनांपासून झालेल्या अनेक क्लेशांनीं पीडितचित्त होत्साता गांवांत किंवा मत्तमयूर अशा वनांतही शांतीतें पावत नाहीं. (हें मत्तमयूरवृत्त) ॥२६

जनयतिचतनयभवनमुपगतःपरिजनशुभ
सुतकरितुरगवृषान् । सकनकपुरगृहयुवति
वसनरुन्मणिगुणनिकररुदपिविबुधगुरुः ॥२७॥

अर्थ–गुरु पंचमस्थानीं अ० सेवकजन, धर्मादिशुभकर्म, पुत्र, हत्ती, अश्व, बैल यांतें उत्पन्न करतो (लाभ होतो), सुवर्णयुक्त नगर, गृह, स्त्री, वस्त्र यांतें करतो, रत्नें व विद्यादिगुण यांतें करतो इ० या सर्वांचा लाभ होतो. (हें मणिगुणनिकरवृत्त) ॥२७॥

नसखीवदनंतिलकोज्ज्वलंनचवनंशिखिको
किलनादितं । हरिणप्लुतशावविचित्रितंरिपु
गतेमनसःसुखदंगुरौ ॥२८॥

अर्थ–गुरु षष्ठस्थानीं अ० तिलकानें उज्ज्वल असें सखीचें (स्त्रीचें) मुख व मोर, कोकिला यांच्या शब्दानें नादयुक्त; हरिणांच्या उड्या मारणाऱ्या बाळकांनीं शोभित असें अरण्यही, मनाला सुख देणारें होत नाहीं. (हें हरिणप्लुतवृत्त)॥२८॥

त्रिदशगुरुःशयनंरतिभोगंधनमशनंकुसुमा
न्युपवाह्यं । जनयतिसप्तमराशिमुपेतोल
लितपदांचगिरंधिपणांच ॥२९॥

अर्थ–गुरु सप्तमस्थानीं अ० शय्या, रतिसुख, धन, भोजन, पुष्पें, अश्वादिवाहन, सुंदरपदयुक्त वाणी, बुद्धि यांतें उत्पन्न करतो ह० देतो. ( हें ललितपदवृत्त )२९

बंधंव्याधिंचाष्टमेशोकमुग्रंमार्गक्लेशंमृत्युतुल्यां
श्चरोगान् । नैपुण्याज्ञापुत्रकर्मार्थसिद्धिंधर्मे
जीवःशालिनीनांचलाभं ॥३०॥

अर्थ–गुरु अष्टमस्थानीं अ० बंधन, पीडा, मोठा शोक, मार्गामध्यें क्लेश, मृत्युतुल्य-रोग, सर्वकार्यांचें निपुणत्व, प्रभुत्व, पुत्र, कर्म, अर्थ यांची सिद्धि; व शालिनी ह० भात पिकावयाजोगी उत्कृष्ट भूमि यांचा लाभ होतो. ( हें शालिनीवृत्त )॥३०॥

स्थानकल्यधनहाद्दशर्क्षगस्तत्प्रदोभवतिलाभगोगुरुः ।
द्वादशेध्वनिविलोमदुःखभाग्यातियद्यपिनरोरथोद्धतः ॥

अर्थ–गुरु दशमस्थानीं अ० स्थान, आरोग्य, धन यांचा नाश करतो. एकादशस्थानीं अ० स्थान, आरोग्य, धन यांतें देतो. द्वादशस्थानीं अ० मनुष्य वेगयुक्त रथानें गमन करीत असला तरी मार्गामध्यें प्रतिकूल दुःख पावतो. ( हें रथोद्धतवृत्त ) ॥३१॥

प्रथमगृहोपगोभृगुसुतःस्मरोपकरणैःसुरभिम
नोज्ञगंधकुसुमांबरैरुपचयं । शयनगृहासनाश
नयुतस्यचानुकुरुतेसमदविलासिनीमुखसरो
जपट्चरणतां ॥३२॥

अर्थ–शुक्र जन्मराशीस अ० कामोद्दीपक, सुगंध, मनास आनंदकारक, अशीं गंधद्रव्यें, पुष्पें, वस्त्रें यांचा लाभ होतो. शय्या, गृह, आसन, भोजन यांहींयुक्त पुरुष मद्यपानानें मत्तस्त्रीच्या मुखकमलीं भ्रमरासारखा होतो ( चुंबन करतो ) ( हें विलासिनीद्विपदीवृत्त ) ॥३२॥

शुक्रेद्वितीयगृहगेप्रसवार्थधान्यभूपालसन्नति
कुटुंबहितान्यवाप्य । संसेवतेकुसुमरत्नवि
भूपितश्चकामंवसंततिलकद्युतिमूर्धजोपि ॥३३॥

